श्री

# रसतरंगिणी

( मराठी प्राचीन व अर्वाचीन कवितांतील निवडक वेंचे; प्रस्तावना, अर्थनिर्णायक टीपा व शब्दकोश यांसहित )

संपादक

**सीताराम वासुदेव पेंडसे,**

बी. ए., एम्. सी. पी., एफ्. आर्. सी. आय्.

डिप्लोमा इन् पेडॅगॉजी, लंदन युनिव्हर्सिटी, माजी चीफ इन्स्पेक्टर ऑफ एज्युकेशन बडोदे; बडोदे कॉलेजचे माजी फेलो

मॅक्मिलन् आणि कंपनी लिमिटेड,

हॉर्नबी रोड, कोट, मुंबई

सन १९२६



[ किंमत २-८-०

श्री

# चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना

शाळाखात्याकडून व अन्य गृहस्थाकडून झालेल्या सूचनास अनुसरून ही चवथी आवृत्ति प्रसिद्ध करण्यात येत आहे. ह्या आवृत्तीत विशेष महत्त्वाचे फेरफार केले नाहीत.

ही आवृत्ति शाळाखात्यास संपूर्ण रीतीने मान्य होईल अशी आशा आहे.

बडोदे,
१८ मे १९२५

**सी. वा. पेंडसे**

# प्रथमावृत्तीच्या प्रस्तावनेंतील उतारा

कै. वा. परशुरामपंतांनी मोठ्या परिश्रमाने प्राचीन महाराष्ट्र–काव्योदधीचें मंथन करून ‘ **नवनीत** ’ काढिले व तद्द्वारें प्राचीन मराठी कवींची महाराष्ट्रीयांस ओळख करून दिली. या गोष्टीला अर्धशतक होऊन गेलें. यानंतर, मराठी काव्यविस्तार एवढा मोठा असतांना देखील, ‘नवनीता’सारखा दुसरा म्हणण्यासारखा एकही प्रयत्न झाला नाही ! नवनीताने जशी प्राचीन कवींची थोडीबहुत ओळख करून दिली, त्याचप्रमाणे अगदी अलीकडे **‘अर्वाचीन कविता,’ ‘काव्यदोहन’**

यांसारख्या एकदोन पुस्तकांनीं अर्वाचीन कवीची ओळख करून देण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि अशी पुस्तके हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीही नाहीत; आणि जरी ती आपआपल्या परीने सुंदर आहेत, तरी ती एकागी असल्यामुळे विद्यार्थ्याच्या वाढत्या गरजा भरून काढण्यास अपुरी व गैरसोईची आहेत, असे माझे मत आहे. मराठी काव्याच्या प्रचंड विस्ताराकडे पाहिले तर अशी पुस्तके जितकी निघतील तितकी थोडीच आहेत. 'गोल्डन ट्रेझरी,' 'वन् थावजंड् ॲन्ड् वन् जेम्स् ऑफ् पोएट्री' वगैरे इंग्रजी काव्यग्रंथाप्रमाणे, एकाच पुस्तकात प्राचीन व अर्वाचीन कविताचा समावेश झाल्यास, त्यापासून विद्यार्थ्यास एकंदर काव्यवाङ्मयाची चागली कल्पना येऊन, विशेष महत्त्वाचा उपयोगही होईल, आणि दोन्ही प्रकारच्या कविताची तुलना करण्यासही अधिक सोपे पडेल, हे उघड आहे. या एकंदर गोष्टीचा विचार करून, व कित्येक मित्राच्या खास सूचनास अनुसरून प्रस्तुत '**रसतरंगिणी**' निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे.

मराठी काव्यवाङ्मयाचे सामान्यतः प्राचीन व अर्वाचीन असे दोन वर्ग करण्यांत येतात. कालानुक्रमाच्या धोरणाने पाहिले, तर इ स. च्या १८ व्या शतकाच्या अखेरपर्यंतच्या काव्यास प्राचीन व त्यानंतर म्हणजे साधारणत. इंग्रजी राज्यक्राति झाल्यानंतर जे काव्यवाङ्मय निर्माण झाले व होत आहे, त्यास अर्वाचीन अशी संज्ञा देण्यांत येते. परंतु हा भेद केवळ कालानुक्रमावरच अवलंबून नाही, या वर्गीकरणाचे मुख्य कारण म्हटले म्हणजे अलीकडील काव्याचें स्वरूपभिन्नत्व व विषयभिन्नत्व हेंच होय. पाश्चात्य सुधारणांचा व विचारांचा जसा हिंदुस्थानात इतर सर्व गोष्टीवर थोडाबहुत परिणाम झाला, तसाच किंबहुना त्यापेक्षाही वाङ्मयावर विशेष महत्त्वाचा परिणाम झाला. आंग्लसाहित्याच्या अध्ययनानें विचारास एक प्रकारचें नवीन वळण लागले आणि या विचारक्रांतीमुळेच अलीकडील काव्याचे विषय व स्वरूप ही प्राचीन काव्याहून अगदी निराळी झालीं.

आंग्लसाहित्याच्या अध्ययनाबरोबरच संस्कृत भाषेच्या अध्ययनास एक प्रकारचें नवीन वळण लागले, आणि या दोन्ही भाषाचा मराठीवर विशिष्ट संस्कार झाला.

प्राचीन मराठी काव्यांत न आढळणारें असे काव्याचे धोरण आंग्ल व संस्कृत साहित्यात नवीन पिढ्यांस आढळले व त्याचे प्रतिबिब त्यांच्या मनावर उमटल्यामुळेच अर्वाचीन कवीचा वर्ग निर्माण झाला प्राचीन मराठी काव्याचे धोरण म्हटलें म्हणजे संस्कृत पुराणग्रंथाचे मराठीत रूपांतर करणे किवा त्यावर टीकात्मक विवेचन करणे हेंच होय. हे धोरण एकोणिसाव्या शतकाच्या मध्यकालांत उदयास आलेल्या कृष्णशास्त्री चिपळूणकर, परशुरामपंत गोडबोले, राजवाडे, लेले, पारखी—ज्यांच्यावर इंग्रजीचाही थोडाबहुत संस्कार झाला होता—या शास्त्रीमंडळीने बदलून ते पुराणेतर संस्कृत ग्रंथावर आणिले. यापैकीच कांहीनी ऐतिहासिक व इतर विषयांवर स्वतंत्र काव्ये लिहिण्याचा उपक्रम केला, आणि अलीकडील पिढ्यास नवीन विविध विषयांवर स्वतंत्र काव्यें लिहिण्याची दिशा दाखविली. यांच्या मागून गेल्या तीस चाळीस वर्षांत झालेल्या व विद्यमान कवींनी याच धोरणाचा स्वीकार करून त्यांत इंग्रजी कवितेचे विषयवैचित्र्य व जीवन आणून सोडिले आहे या कारणामुळें प्राचीन व अर्वाचीन असे वर्गीकरण झाले हे उघड आहे.

पण एकंदर मराठी काव्यवाङ्मयाच्या अंतरंगाचा स्थूल मानाने जर विचार केला, तर त्याचे चार वर्ग करिता येतील पहिला वर्ग म्हणजे टीकात्मक काव्ये हा होय. यात ज्ञानेश्वर, वामनपंडित वगैरे कवीच्या काव्यांचा बहुतेक भाग येतो. दुसरा वर्ग स्वतंत्र स्फुट पद्यरचना हा होय. यात ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, एकनाथ, रामदास वगैरे कवीचे अभंगरूप व इतर स्फुट स्वरूपाचे सारस्वत येते. तिसऱ्या वर्गातील कविता बहुतेक भाषांतरस्वरूपाची आहे. यात मुक्तेश्वर, मोरोपंत, वगैरे कवीच्या काव्यग्रंथाचा समावेश होतो. चवथा वर्ग म्हटला म्हणजे थोडीबहुत पुराणेतर संस्कृत ग्रंथाची भाषांतरे, ऐतिहासिक व इतर विषयावर लहानमोठी स्वतंत्र काव्ये, हा होय. यांत १९ व्या शतकाच्या मध्यकालांतील शास्त्रीमंडळी, व गेल्या ३०।४० वर्षात झालेली व विद्यमान कविमंडळी यांचा समावेश होतो. या वर्गांतील कवितेचे अंतरंग व बाह्यांग पहिल्या तिन्ही वर्गातील कवितेहून अगदी भिन्न आहे.

वर दर्शविल्याप्रमाणे विचार केला असतां असें दिसून येईल कीं, पहिल्या

वर्गांतील ग्रंथांत क्वचित् क्वचित् काव्याची स्थळे असलीं, तरी काव्य हे त्यांचे जीवन नव्हे; आणि त्यांचा विषय प्राधान्येंकरून वेदान्त असल्यामुळे काव्य या दृष्टीने त्यांचा विचार करणे म्हणजे त्यांचें महत्त्व कमी करण्यासारखें आहे. दुसऱ्या वर्गातील कविता धर्म, नीति, भक्ति, वैराग्य वगैरे विषयांवर स्फुट स्वरूपाची आहे. यांत ठिकठिकाणी सुंदर प्रतिभा, मनोहर कल्पना, विषयांशी तादात्म्य पावण्याची शक्ति वगैरे खऱ्या कवित्वशक्तीचे गुण आढळतात. या अभंगी कवींची काव्यकृति फार चागली उतरली असून, काव्य या दृष्टीने ती विशेष महत्त्वाची आहे परंतु हे कवि देखील शांति, भक्ति, वैराग्य वगैरे विषयांपलीकडे फारसे गेले नसून, इतर ज्या अनेक महत्त्वाच्या मानवी मनोवृत्ति आहेत, त्यांचा त्यांनीं फारसा विचार केलेला आढळत नाही. आतां, तिसऱ्या वर्गातील जे काव्यसारस्वत आहे त्याचा मुख्य हेतु पुराणग्रंथांची मराठीत रूपांतरें करणें हाच होय. यांत स्थलविशेषीं मानवी मनोवृत्तीचे दिग्दर्शन, सृष्टिवर्णन वगैरे आढळतात. परंतु या कवीनी पुराणकथा मराठींत सागण्याकडेच आपली दृष्टि ठेविल्यामुळे, इतर गोष्टीकडे त्यांना फारसे लक्ष देतां आलें नाही, असें दिसतें.

या तिन्ही वर्गातील कवींनी ज्या विषयांकडे जवळ जवळ दुर्लक्ष केले, किंवा ज्याकडे त्यास लक्ष देण्यास अवकाश मिळाला नाहीं, असे मानवी मनोवृत्ति उत्तेजित करून सोडणारे, मनाला खळबळून टाकणारे, चमत्कृति उत्पन्न करून मनोरंजन करणारे, असे विषय चवथ्या वर्गांतील--अर्वाचीन--कवीनीं हातीं घेतले. सृष्टीचें चमत्कृतिमय अनेकविध स्वरूप; निसर्गातील भव्य, रमणीय, शांत, गंभीर असे देखावे; एकंदर सृष्टपदार्थात दृग्गोचर होणारे ईश्वराचें सर्वव्यापी अस्तित्व; पशु, पक्षी, वनस्पति इत्यादिकांचे सहृदयतापूर्वक निरीक्षण; मानवांवर कोसळणारे अनेक प्रकारचे सुखदु:खाचे प्रसंग--ज्याच्या योगानें मनोवृत्ति उत्तेजित होऊन मनांत एक प्रकारची खळबळ उत्पन्न होते--अशा प्रकारच्या गोष्टी या चवथ्या वर्गातील काव्यात बऱ्याच विशिष्ट रूपानें आढळूं लागल्या आहेत. प्राचीन अभंगी कवीनी ज्याप्रमाणे आपल्या कवितेच्या द्वारें ईश्वरभक्ति, नीतितत्वें वगैरे

वाचकांच्या मनांत बिंबविण्याचा प्रयत्न केला, त्याचप्रमाणें या चवथ्या वर्गातील– अर्वाचीन–कवि देखील आपल्या सृष्टिविषयक कविताच्या द्वारें, सृष्टींत आढळणारें ईश्वराचें सर्वव्यापी स्वरूप, ईश्वराविषयीं प्रेम, शांति, नीति व इतर सात्विकवृत्ति वाचकांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न करीत आहेत, असे कोणाही निःपक्षपाती मनुष्याला सहज कळण्यासारखें आहे.

आतां अभंगी कवींखेरीज बाकीच्या प्राचीन मराठी कवींची काव्यकृति स्वतंत्र स्वरूपाची अशी फारच थोडी आहे. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, एकनाथ, मुक्तेश्वर, वामनपंडित, मोरोपंत वगैरे पांचसात कवींशिवाय इतर कवींमध्यें खरी कविप्रतिभा, उच्च प्रकारचें कल्पनाचातुर्य, स्वतंत्र काव्य उत्पन्न करण्याची शक्ति वगैरे गुण फारच क्वचित् आढळतात. आधुनिक कवीची स्थिति मात्र केवळ अशीच आहे असे नाहीं. आधुनिक काव्यकृतीचा बराच भाग स्वतंत्र स्वरूपाचा असून, त्यामध्यें सुंदर प्रतिभा, मनोहर कल्पना ठिकठिकाणीं आढळतात. मात्र यावरून असें कदापि म्हणतां येणार नाही की, प्राचीन मराठी कवीमध्ये प्रतिभाच नव्हती, किंवा त्यांच्यांत स्वतंत्र कल्पनाचातुर्याची उणीव होती. त्यांचा हेतूच निराळा असल्यामुळे या गुणांस व्यक्तस्वरूप येण्यास अवसरच नव्हता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

त्याचप्रमाणें अर्वाचीन कवींमध्यें प्रतिभाच नाहीं, अर्वाचीन कविता म्हणजे कांही तरी आहे, असें जे कित्येक प्राचीन कवींची तरफदारी करणाराचें मत आहे, त्यांतही कांही अर्थ नाही. प्रतिभेचा मक्ता ईश्वरानें फक्त प्राचीनांसच दिला, आणि अर्वाचीन कवीस त्याचा मुळीच लाभ झाला नाहीं, असें कदापि म्हणतां येणार नाही. प्राचीन कवीच्या भक्तानीं त्यांची कितीही तरफदारी केली, आणि ती करतांना अर्वाचीन कवींस असतीं नसतीं कुसपटें काढून व कोट्या लढवून कितीही दोष देण्याचा प्रयत्न केला, तरी खऱ्या रसिकास, खऱ्या सहृदयास, कवितेच्या खऱ्या भक्तास, अर्वाचीन काव्याची योग्यता कधींही नाकबूल करतां येणार नाहीं. आणि ती नाकबूल करणें म्हणजे अरसिकतेचें

प्रदर्शनच होय, असे म्हटल्यावांचून राहवत नाही! ‘ राजा शिवाजी, ’ ‘ यशवंतराय काव्य, ’ ‘ वृन्दा, ’ ‘ गंगावर्णन, ’ ‘ कृष्णाकुमारी, ’ ‘ संमोहलहरी, ’ ‘ शोकावर्त, ’ ‘ सुरतरंगिणी, ’ ‘ वनवासी फूल, ’ ‘ घनाभिनंदन ’ ‘ कुंजकूजन, ’ ‘ कवितारति, ’ ‘ मूर्तिकार, ’ ‘ नैऋत्यदिशेकडला वारा, ’—ही यादी आणखी पुष्कळ लाबविता येईल—एवढीच आधुनिक कवीच्या प्रतिभेची व कल्पनाचातुर्याची साक्ष पटविण्यास पुरेशी आहेत. अर्वाचीनकाव्यदूषकांनी आज अर्वाचीन कवितेस कितीही नावे ठेविली, तरी कालातराने तिची खरी योग्यता निर्णीत होईल, यांत यत्किंचित् संदेह नाहीं.

आता प्राचीन आणि अर्वाचीन काव्यांच्या बाह्यस्वरूपाचा थोडासा विचार करूं. प्राचीन मराठी काव्याचा निम्याहून अधिक भाग ओंवी छंदांत आहे. या छंदाला गणमात्राची वगैरे बंधने फारशी नसल्यामुळे बहुतेक प्राचीन मराठी कवींनीं याचाच उपयोग केला आहे. या निर्बंधरहित ओवीवृत्ताचा उपयोग करण्यात कवींचा स्वच्छंदीपणा स्थलविशेषीं हद्दीच्या पलीकडेही गेला आहे. बाकी राहिलेल्या प्राचीन काव्याचा जवळ जवळ निम्मे भाग अभंग, पदें, दिंड्या वगैरे छंदात आहे. आणि बाकीचा भाग प्रसिद्ध संस्कृत छंदात आहे. आतां, अर्वाचीन काव्याचा बहुतेक भाग संस्कृत छंदातच आढळतो. या संस्कृत वृत्तात काव्यरचना करण्यात कवीचा स्वच्छंदीपणा मुळीच चालूं शकत नाही; आणि या छंदाना गणमात्रादिक अनेक बंधनें असल्यामुळे अर्वाचीन कवीचे काव्यरचनेचे काम अधिक अवघड आहे. तरीदेखील त्यांच्याकडून ते काम विशेष निर्दोष रीतीने होत आहे, हे कोणाच्याही सहज लक्षांत येईल. दुसरें असे की, ज्या प्राचीन कवींनीं संस्कृत वृत्तांत काव्यरचना केली आहे, ते पदलालित्य व यमके याच्या नादीं विशेष लागल्यामुळे, क्वचित् क्वचित् या बाह्य सौंदर्याला खरे कवित्व बळी पडलेलें आढळते. तिसरें असे की, मोरोपंतप्रभृति पांचचार कवीशिवाय इतर प्राचीन कवीनी भाषेच्या शुद्धत्वाकडे जवळ जवळ दुर्लक्ष केले आहे असें दिसतें. हा दोष अर्वाचीन कवितेत फारसा आढळत नाही, आणि अशी स्थिति हल्लीच्या मनूंत चालणेंही शक्य नाही.

असो; येथपर्यंत प्राचीन व अर्वाचीन काव्यांच्या अंतरंगाचा व बाह्यांगाचा विचार केला. आता प्रस्तुत पुस्तकाविषयीं दोन शब्द लिहितो. या पुस्तकात प्राचीन, व अर्वाचीन मिळून एकंदर ४७ कवीच्या काव्यांतील वेचे दिले आहेत. प्राचीन कवीपेक्षा अर्वाचीनाची संख्या जरी जास्त आहे, तरी प्राचीनाच्या वेच्यांची पृष्ठसंख्या अर्वाचीनांच्या दुपटीपेक्षा अधिक आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे आधुनिक कवीचे वेचे केवळ नमुन्यादाखल थोडथोडे घेतले आहेत. कवि कालानुक्रमाप्रमाणे घेण्याचा प्रयत्न केला असून प्रत्येक कवीच्या वेच्यांच्या आरंभी त्याचे त्रोटक चरित्र व त्याने केलेल्या काव्याची संक्षेपानें माहिती दिली आहे. × × × × बहुतेक वृत्तें सामान्य वाचकाच्या व विद्यार्थ्यांच्या बऱ्याच परिचयाची असल्यामुळें वृत्ताची नावे दिली नाहीत. यामुळे पुष्कळ जागा वाचली आणि अधिक मजकूर घेता आला. एकंदर वेच्यांची संख्या सुमारे २२५ असून, पद्यसंख्या जवळ जवळ सहा हजार आहे. मोठमोठ्या प्रकरणातून जे वेंचे काढिले आहेत, त्यास योग्य अर्थद्योतक नांवे दिली आहेत. तुकाराम, मुक्तेश्वर, वामनपंडित, रामदास, मोरोपंत वगैरे वाखाणलेल्या कवीच्या काव्यातून भरपूर वेंचे काढिले आहेत. तुकारामाच्या अभंगाची विषयवार रचना करण्याचा प्रयत्न केला आहे. वेचे घेताना विषयवैचित्र्य विचारवैचित्र्य, प्रौढ भाषासरणी, इत्यादि गोष्टीकडे विशेष लक्ष दिले आहे. काव्याच्या अध्ययनाबरोबर मनोरंजन होऊन, व्यवहार, नीति, उच्च प्रकारच्या सात्विक मनोवृत्ति याचे प्रतिबिब सामान्य वाचकांच्या व विशेषतः विद्यार्थ्यांच्या मनावर ठसावें व त्यास नीतिशिक्षणाचाही लाभ व्हावा या हेतूनें नैतिक विषयावरील वेंचे पुष्कळ घेतले आहेत. एकंदरीने सामान्य वाचकास आणि विशेषेकरून विद्यार्थ्यास प्रस्तुत पुस्तक जितके उपयुक्त होईल तितके करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे हें ठरविण्याचे काम सहृदय व गुणग्राही वाचकावर सोंपवितों.

———०———

# अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# रसतरंगिणी

## १ मुकुंदराज

मुकुंदराज हे महाराष्ट्रातील पहिले कवि होत, आणि हे इ. सनाच्या १२ व्या शतकात होऊन गेले, असें म्हणतात हे महान् साधु, जातीचे देशस्थ ब्राह्मण असून जोगाईचे आबे या गावी रहात असत, याशिवाय व काही दंतकथाशिवाय याच्याविषयी विश्वसनीय अशी काहीएक माहिती उपलब्ध नाही.

याचे हल्ली प्रसिद्ध असे दोनच ग्रंथ आहेत, 'विवेकसिंधु' आणि 'परमामृत'. दोन्ही वेदान्त विषयावर आहेत. यात वेदान्तासारख्या गहन विषयाची मांडणी थोडक्यांत, पण मोठ्या मार्मिकपणाने व सोपपत्तिक रीतीने केली आहे. कवितेला अनुकूल असा विषय नसताही याची काव्यरचना रसाळ उतरली आहे. याची वाणी प्रासादिक असून, शुद्ध, प्रौढ, गंभीर व अर्थपूर्ण आहे.

### वेंचे–( परमामृतांतील )

#### मंगलाचरण ( ओव्या )

**ॐ नमो श्रीसद्गुरुनाथा । तूं परमप्राप्तीचा[1] दाता । कृपा-सिंधू जी समर्था । अनंता अपारा ॥ १ ॥ तूं आनंदमय स्वयं–प्रकाश[2] । कैवल्यदाता[3] परम–ईश । तूं निजरूपें अविनाश । निराकार ॥ २ ॥ तूं निःसंग निरंजन[4] । तूं निरंतर अभिन्न । नाही तुजसमान । कोणी देवा ॥ ३ ॥ तूं जंव कृपा करिसी । तंव संसारबंधना तोडिसी । अविद्येपासूनि[5] सोडविसी । तारिसी जीवां ॥ ४ ॥ न होय जें देवां**

१ मोक्षप्राप्तीचा २ स्वतेजानें प्रकाशमान ३ मोक्षदाता ४ उपाधिरहित ५ अज्ञान, माया

असुरां। तें तुझें करणें दातारा। समर्थ न देखों दुसरा। तुजवांचुनी ॥ ५ ॥ आणिका कवणा नमस्कारूं। कवणाचें स्तवन करूं। जयजयाजी श्रीगुरु। अगाध महिमा ॥ ६ ॥ जैसा सर्व पटांमाजी एक तंतू। तैसा तूं विश्वीं विश्वभरितू[६]। सर्व व्यापूनि विरहितू[७]। अलिप्त तूं ॥ ७ ॥ हीं अनेक सगुण रूपें। तूं धरिसी आपुलेनि व्यापें[८]। शिवशक्तींचीं[९] साकाररूपें। दाविसी तूं ॥ ८ ॥ तुजवीण अन्य न देखों कोणी। म्हणोनि आणिकातें न मानीं। हा मस्तक तुझिये चरणीं। ठेविला सत्य ॥ ९ ॥ तूं शुद्धात्मा स्वयंज्योती। तुझी सर्वत्र ज्ञानदीप्ती। नमो नमो जी श्रीगुरुमूर्ती। आनंदाविभो ॥ १० ॥ तूं ब्रह्मारूपें उत्पत्ति करिसी। विष्णुरूपें प्रतिपाळिसी। रुद्ररूपें संहारिसी। पुनरपि रचावया ॥ ११ ॥ तूं सर्वसाक्षी सर्वज्ञ। तूं सर्व-विद्या-विद् प्राज्ञ। तूं तत्त्वार्थे[१०] जीवसंज्ञ। सर्वेश्वर ॥ १२ ॥ तूं जाणसी स्व-रूपासी। म्हणोनि जाणीव स्फुरविसी। परमात्मा म्हणविसी। यया उपाधीस्तव[११] ॥ १३ ॥ तुझिये इच्छेचा विस्तारू। विस्तारिलें हें चराचरू[१२]। जीवअंश अपारू। स्फुरसी तूंची ॥ १४ ॥ सर्व जीवांची ज्ञप्तिकळा। जगासी जाणे सकळा। तो ज्ञानात्मा जिव्हाळा। 'त्वं' पदाचा तूं ॥ १५ ॥ माया अविद्यासंबंधें। जीव, ईश्वर होसी भेदें। हाही आपुलेनि विनोदें[१३]। खेळ तुझा ॥ १६ ॥ तूं स्वानंद सदोदित। 'असि[१४]' पदीं तदात्मा अलिप्त। पदातीत स्वयंभरित। कैवल्य तूं ॥ १७ ॥ ऐसी करितां तुझी स्तुती। मुकावल्या वेदश्रुति। मग मी प्राकृत किती। वर्णावया योग्य तुज ॥ १८ ॥ तूं प्रेमभरित परम पुरुष। चतुर्विध वाचेचा ईश। आतां देवा देईं मतिप्रकाश। तुज जाणावया ॥ १९ ॥ तूं कृपासिंधू जरी वरद होसी। तरी अज्ञान जीवाचें फेडिसी। मग

---

६ विश्वव्यापी ७ अलिप्त, निराळा ८ सर्वव्यापीपणाच्या योगानें ९ देव आणि देवी १० तत्त्वार्थानें जीव अशी सज्ञा आहे ज्याला तो ११ ज्या जीवपणाच्या उपाधीमुळें १२ सचेतन व जड सृष्टि १३ लीलेनें १४ 'तत् त्वम् असि' म्ह० तें परब्रह्म तू आहेस ह्या उपनिषदाच्या अद्वैत मताचें, १५-१७ या ओंव्यांत विवरण आहे. ह्या ओवीच्या पहिल्या तीन ओळींचा अर्थ असाः–तत् म्ह० शिवपदात तू अलिप्त असून असि म्ह० सत् पदात मात्र आनदस्वरूप असतोस, असि पदात जीवशिवाच्या ऐक्यामुळें पदातीत म्ह० पदरहित असतोस.

**लोपलें प्रगटविसी। शिवत्व सिद्ध ॥२०॥ म्हणोनि मी विनवी शरणागत। तूं ज्ञानसूर्य हृदयीं उदित। तरी अविद्यातम क्षणांत। फिटेल स्वामी ॥ २१ ॥ यावरी श्रीगुरु झाले प्रसन्न। करविती परमार्थाचें कथन। बोलेन सकल शास्त्रांचें मथन[15]। निर्वाण तेंची ॥ २२॥**

---

# २ ज्ञानदेव

---

महाराष्ट्रांत भक्तिमार्गप्रवर्तकांमध्यें ज्या महापुरुषाची प्रमुखत्वानें गणना करण्यात येते, त्यापैकी महासाधु ज्ञानेश्वर हे एक होत. पैठणाजवळील आपेगांवच्या कुळकर्ण्यांचा मुलगा विठ्ठलपंत यांचे ज्ञानेश्वर हे द्वितीय पुत्र होत. याच्या आईचें नाव रखुमाबाई. याचा जन्म आळंदी येथे शके ११९७ श्रावण व. ८ स झाला. ज्ञानदेवास निवृत्तिनाथ व सोपानदेव असे दोन भाऊ व मुक्ताबाई नावाची एक बहीण अशी तीन भावंडें होतीं. हीं सर्व मुले लहानपणापासूनच ज्ञानी, विरक्त व विठ्ठलभक्त होती.

ज्ञानेश्वरानीं ‘ ज्ञानेश्वरी ’ या नावानें प्रख्यात असलेली ‘ भावार्थदीपिका ’ नांवाची श्रीमद्भगवद्गीतेवर ओवीबद्ध विस्तृत टीका केली आहे. शिवाय ‘ अमृतानुभव ’ आणि ‘ पासष्टी ’ असे वेदान्तविषयावर स्वतंत्र ओंवीबद्ध ग्रंथ, व भक्ति, ज्ञान, वैराग्य वगैरे विषयावर गोड अभंग केले आहेत. या ग्रंथांवरून ज्ञानेश्वराच्या अलौकिक बुद्धिमत्तेची व अगाध ज्ञानाची पूर्ण साक्ष पटते. यांची भाषा जुनी असल्यामुळें जरी स्थलविशेषीं दुर्बोध वाटते, तरी तींत एकदा प्रवेश झाला म्हणजे सर्व दुर्बोधत्व लुप्त होऊन, तीच अत्यंत रसाळ वाटूं लागते. याची भाषा गंभीर, जोरदार व अर्थपूर्ण आहे. यांना लोकव्यवहाराचें व अनेकविध विषयाचें किती मार्मिक ज्ञान होते हें त्यांनी दिलेल्या अनेक प्रकारच्या दृष्टांतांवरून स्पष्ट दिसतें. यांची वाणी प्रसादगुणयुक्त, सुरस व प्रेमळ असून विचारसरणी उदात्त आहे व विषय प्रतिपादन करण्याची पद्धति अप्रतिम आहे. उपमा, रूपके व विशेषतः उत्कृष्ट दृष्टांत यांच्यायोगानें वाचकांच्या मनावर विषयार्थ ठसविण्याची यांची हातोटी अनुपमेय आहे. शके १२१८ कार्तिक व. ८ स ज्ञानेश्वर समाधिस्थ झाले.

---

१५ सार, रहस्य

## स्वधर्म–( ज्ञानेश्वरी अ० २ )

तूं अर्जुनी कां न विचारिसी । काय हें चिंतित आहासी[1] । स्वधर्म तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १ ॥ या कौरवां भलतें जाहालें । अथवा तुजचि कांही पातलें । की युगचि हें बुडालें । ऱ्ही एथ ॥ २ ॥ तरी स्वधर्म एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे । मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥ ३ ॥ अर्जुना तुझें चित्त । ऱ्ही जाहालें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ ४ ॥ अगा ! गोक्षीर जरी जाहालें । तरी पथ्यासि नाहीं घेतलें । ऐसेनिंहि विष[2] होय सुदलें । नवज्वरी देतां ॥ ५ ॥ तैसें आनी[3] आन करितां । नाश होईल स्वहिता । म्हणऊनि तूं आतां । सावध होईं ॥ ६ ॥ वायांचि व्याकुळ कायी । आपुला निजधर्म पाही । जो आचरितां बाध नाहीं । कवणें काळी ॥ ७ ॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपायो न पवे सर्वथा । कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे[4] ॥ ८ ॥ तयापरि पार्था । स्वधर्में राहाटतां । सकळ कामपूर्णता । सहजें होय ॥ ९ ॥ म्हणोनि यालागी पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणिक कांही । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ १० ॥ निष्कपट होआवें[5] । उसिणा[6] घाईं झुंजावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥ ११ ॥ आतां हा ऐसा अव्हेरिजे । मग नाथिलें[7] शोचूं बैसिजे । तरी आपण शाहाणा होईजे । आपणपेयां ॥ १२ ॥ पूर्वजांचें जोडलें । आपणचि होय धाडिलें[8] । जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इये ॥ १३ ॥ तरी असती कीर्ति जाईल । जगचि अभिशाप देईल । आणि गिंवसित[9] पावतील । महादोष ॥ १४ ॥ जैसी भर्तारेंहीन वनिता । उपहती[10] पावे सर्वथा । मग तैसी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥ १५ ॥ नातरी रणीं शव सांडिजे । चौमेरीं[11] गिधीं विदारिजे । तैसें स्वधर्महीना अभिभाविजे । महादोषीं ॥ १६ ॥

## मृत्युलोकाची नश्वरता ( ज्ञानेश्वरी अ० ९ )

म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी[1] । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं ।

---

१ आहेस २ विष दिल्यामारखें होय ३ भलत्या ठिकाणी भलतें केले असता ४ अडखळत नाहीं ५ व्हावे ६ समोरासमोर एकमेकावर घाव घालून लढावें ७ नसल्यासाठी शोक करीत बसावें. ८ गमाविलें ९ शोधीत, ग्रासीत १० अपमान ११ चोहीकडून

१ गोष्ट

कैंची सुखनिद्रा आंथरूणीं। इंगळाच्या ॥ १ ॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी। जेथ उदय होय अस्तालागीं। दुःख[2] लेऊनि सुखाची आंगीं। सळित जगातें ॥ २ ॥ जेथ मंगळाचिया अंकुरीं। सवेंचि अमंगळाची पडे पारी[3]। मृत्यु उदराचिया परिवरीं[4]। गर्भ गिंवसी[5] ॥ ३ ॥ जें नाहीं तें तयातें चिंतवी। तंव तेंचि नेइजे गंधर्वीं। गेलियाची कवणे गांवीं। शुद्धी[6] न लगे ॥ ४ ॥ अगा गिंवसितां आघविया वाटी। परतलें पाउलचि नाहीं किरीटी। सैंघ[7] निमालियाचिया गोष्टी। तियें पुराणें जेथीचीं ॥ ५ ॥ जेथींचिये अनित्यतेची थोरी। करितया[8] ब्रह्मयाचे आयुष्यवेरी। कैसें नाहीं होणें अवधारीं। निपटूनियां[9] ॥ ६ ॥ ऐसी लोकांची जिये नांदणुक। तेथ जन्मले आथि[10] जे लोक। तयांचिये निश्चितीचें कौतुक। दिसत असे ॥ ७ ॥ पैं दृष्टादृष्टाचिये जोडीलागीं। भांडवल न सुटे कवडी। जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी[11]। वेंचिती गा ॥ ८ ॥ जो बहुवें विषयविलासें गुंफे[12]। तो म्हणती उवाईं[13] पडिला सांपें[14]। जो अभिलाषभारें दडपे। तयातें सज्ञान म्हणती ॥ ९ ॥ जयाचें आयुष्य धाकुटें[15] होय। बळप्रज्ञा जिरोनि जाय। तयाचे नमस्कारिती पाय। वडिल म्हणुनी ॥ १० ॥ जंव जंव बाळ बळिया वाढे। तंव तंव भोजें[16] नाचती कोडें[17]। आयुष्य निमालें आंतुलियेकडे[18]। ते ग्लानीचि[19] नाहीं ॥ ११ ॥ जन्मलिया दिवसदिवसें। हों लागे काळाचेंयाचि[20] ऐसें। कीं वाढती[21] करिती उल्हासें। उभविती गुढिया ॥ १२ ॥ अगा मर हा बोल न साहती। आणि मेलिया तरी रडती। परि असतें[22] जात न गणिती। गहिंसपणें[23] ॥ १३ ॥ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा। कीं तो मासिया वेंटाळी जिभा। तैसे प्राणिये कवणे लाभा। वाढविती

---

२ दु:ख सुखाची आंगीं लेऊनि जगाते सळित=दु:ख सुखाचा आगरखा घालून जगाला छळिते, म्ह० बाहेरून सुख असें वाटतें पण सर्व दु:खच आहे ३ आच्छादन ४ घरीं ५ शोधी ६ स्मरण ७ बहुत ८ कर्ता जो ब्रह्मा त्याचें आयुष्य संपर्यंत ९ सर्वथा १० आहेत ११ कोट्यावधि द्रव्य १२ गुंते १३ सुखामध्यें १४ प्रस्तुत १५ उणें १६ सोंगें १७ कौतुकानें १८ आतून १९ दु:ख २० काळाच्याच स्वाधीन २१ वाढदिवस २२ जात असतें ते जुमानीत नाहींत २३ मूर्खपणानें

तृष्णा ॥ १४ ॥ अहा ! कटकटा[२४] ! हें वोखटें[२५] । इये मृत्युलोकींचें उफराटें । एथ अर्जुना जरि अवचटें[२६] । जन्मलासी तूं ॥ १५ ॥ तरि झडझडोनि वाहिला[२७] निघ । इये भक्तिचिये वाटे लाग । जिया[२८] पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ १६ ॥

भक्तीमध्यें जातिभेद नाही–( ज्ञानेश्वरी अ० ९ )

जयांचिये वाचे आलाप[१] । दृष्टी भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥ १ ॥ माझिया कीर्तीविण । जयांचे रितें नाहीं श्रवण । जयां सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥ २ ॥ जयांचें ज्ञान विषो[२] नेणे । जाणीव मज एकातेंचि जाणें । जयां ऐसें लाभे तरी जिणें । येऱ्हवीं मरण ॥ ३ ॥ ऐसा आवघाचि–परी पांडवा ! । जिहीं आपुलिया सर्वभावा । जियावयालागीं[३] वोलावा[४] । मीचि केला ॥ ४ ॥ ते पापयोनीही होतु[५] कां । ते श्रुताधीतहि[६] न होतु कां । परि मजसीं तुकितां[७] तुका । तुटी नाही ५ ॥ पाहें पां भक्तिचेनि ओथिलेपणें[८] । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व लेणें[९] । जयाचिये महिमे ॥ ६ ॥ येऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारें[१०] । परि इंद्रही सरि[११] न लाहे उपरें[१२] । म्हणोनि भक्ति गा ! एथ सरे[१३] । जाति अप्रमाण ॥ ७ ॥ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती । तियें चामा[१४] एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ८ ॥ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे । तेंचि चाम एक जें लाहे । तेणें विकती आवघीं ॥ ९ ॥ तैसें उत्तमत्व तेंचि तरे । तेंचि सर्वज्ञता सरे । जें मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ १० ॥ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा ! अकारण । एथ अर्जुना ! माझेंपण । सार्थक एक ॥ ११ ॥ तेंचि भलतेणें[१५] भावें । मन मज आंतु येतें होआवें । आलें तरी

---

२४ हायहाय २५ वाईट २६ सहजगत्या २७ वेगळा २८ ज्या भक्तीनें

१ नामोच्चार २ पाच विषय ३ उपजीविकेसाठीं ४ आश्रय ५ असेनात कां ६ वेदशास्त्र पढलेले ७ माझी व त्याची तुलना केली तर काही कमती ( तुटी ) नाही ८ महत्त्वानें, भक्तियुक्त असल्यानें ९ स्वीकारणें १० खरेपणानें ११ बरोबरी १२ अधिकपणानें १३ पुढारी, महत्वाची होय १४ तीं ज्या चामड्या ( च्या तुकड्या ) वर पडतात, त्या चामड्यापासून वाटेल ती वस्तु मिळते १५ कोणत्याही

आघवें[१६] । मागील[१७] वावो[१८] ॥१२॥ जैसें तंवचि वहाळ[१९] वोहळ। जंव न पवती गंगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप ॥ १३ ॥ कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना[२०] तंवचि घटे। जंव न घापती[२१] एकवटे। अग्निमाजी ॥ १४ ॥ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ १५ ॥ मग जातीं व्यक्तीं पडे बिदुलें[२२] । जेव्हां भावें होती मज मीनले[२३] । जैसे लवणकण[२४] घातले। सागरामाजी ॥ १६ ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना। कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥ १७ ॥

सत्य–( ज्ञानेश्वरी अ० १६ )

आतां तीख होऊनि मवाळ[१] । जैसें जातीचें[२] मुकुळ। कां तेज परी शीतळ । शशांकाचें ॥ १ ॥ शके दावितांचि रोग फेडूं । आणि जिभे तरि नव्हे कडू । तें वोखद नाही मा[३] घडू । उपमा कैंची ॥ २ ॥ तरी मउपणें बुबुळें। झगडतांही परि नाडळे[४] । येरवी फोडी कोराळें[५] । पाणी जैसें ॥ ३ ॥ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह। श्राव्यत्वें[६] तरि माधुर्य । पायीं[७] घाली ॥ ४ ॥ ऐकों ठातां[८] कौतुकें । कानातें निघती मुखें । जें साचारिवेचेनि[९] बिकें[१०] । ब्रह्महीं भेदी ॥ ५ ॥ किंबहुना प्रियपणें । कोणातेंहि झकऊं[११] नेणें। यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा॥ ६ ॥ येऱ्हवो गोरी[१२] करि काना गोड । परी साचाचा[१३] पाखाळीं कीड । आगियेचें करणें उघड । परी जळों तें साच ॥ ७ ॥ कानीं लागतां महुरें[१४] । अर्थे विभांडी[१५] जिव्हारें[१५] । ते वाचा नव्हे, सुंदर। लांवचि[१६] पां ॥ ८ ॥ परि अहिती कोपोनि सोपें[१७] । लालनी मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥ ९ ॥ तैसें श्रवणसुख-चतुर । परिणमोनि साचार । बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥ १० ॥

---

१६ सगळें १७ नीचवर्णादिक १८ व्यर्थ १९ लहान २० भेद २१ घातले जातात २२ शून्य २३ मिळाले २४ मिठाचे खडे

१ मृदु २ जाईची कळी ३ तर मग देऊ ४ प्रतिबंध न पावे ५ पर्वताचा कडा, दगड ६ ऐकिलें असता ७ नमस्कार करू लावी ८ उभें राहता ९ साहा शास्त्रें व चार वेद यांच्या १० बळानें ११ ठकवू १२ पारध्याचें गायन १३ खऱ्या पक्षानें पाहता घातक १४ मधुर १५ काळीज फोडी १६ राक्षसी, विवशी १७ पोकळ

## दुसऱ्याचें उणें पाहूं नये-( ज्ञानेश्वरी अ० १६ )

आतां कदर्थवित[१] व्याधी। बळीकरणाचिया[२] आर्धी[२]। आप पर न शोधी। सद्वैद्य जैसा॥ १॥ कां चिखलीं रुतली गाये। धडभाकड[३] न पाहे। जो तियेचिया ग्लानी[४] होये। कालाभुला[५]॥ २॥ नाना बुडतयातें सकरुण। न पुसे अंत्यज कीं ब्राह्मण। काढूनि राखे प्राण। हेंचि जाणे॥३॥ की मायवणी[६] पापियें। उघडी केली विपायें[७]। नेसविल्यावीण न पाहे। शिष्ट जैसा॥ ४॥ तैसें अज्ञानप्रमादादिकीं। कां प्राक्तनींही सदोषीं। निंद्यत्वाच्या सर्वविषी। खिळिलें[८] जे॥ ५॥ तयां आंगीक[९] आपुलें। देउनियां भलें। विसरविजती सलें[१०]। सलती तियें॥ ६॥ अगा पुढिलाचे दोख। करूनि आपुलिये[११] दिठी चोख। मग घापे अवलोक। तयावरी॥ ७॥ जैसा पुजूनि देव पाहिजे। पेरूनि शेता जाइजे। तोषौनि[१२] प्रसाद[१३] घेईजे। अतिथीचा॥ ८॥ तैसें आपुलेनि गुणें। पुढिलाचें उणें। फेडुनियां पाहणें। तयाकडे॥ ९॥ वांचूनि न विंधिजे वर्मी। नातुडविजे[१४] अकर्मी। न बोलविजे नामीं। सदोषी तिहीं॥ १०॥ वरि कोणें एके उपायें। पडिलें[१५] तें उभें होये। तेंचि कीजे, परि घाये। नेदावे वर्मी॥ ११॥ पै उत्तमाचिया साटीं[१६]। नीचें[१७] मानिजे किरीटी!। हें वांचोनि दिठी। दोष न घेपे॥ १२॥ अगा अपैशुन्याचें[१८] लक्षण। अर्जुना! फुडें जाण। मोक्षमार्गीचें सुखासन[१९]। मुख्य हें गा॥ १३॥

## दया-( ज्ञानेश्वरी अ० १६ )

आतां दया ते ऐसी। पूर्णचंद्रिका जैसी। निववितां न कडसी[१]। साने थोर॥ १॥ तैसें दुःखितांचें शिणणें। हिरतां[२] सकणवपणें[३]। उत्तमाधम

---

१ नासवीत, पीडा करीत २ निरोगी करण्याच्या कळकळीमुळ ३ दूध देणारी किंवा न देणारी ४ दु:खानें ५ कासावीस ६ पतिव्रता ७ कदाचित् ८ कष्टले ९ सहाय्य १० दु:खें ११ दुसऱ्याचे दोष धुवून काढून मग त्याच्याकडे पाहतात, असा भाव १२ संतोष करून १३ आशीर्वाद १४ न गुतविजे १५ पडलेल्यास सावरून उभें होईल असें करावयाचे १६ ठिकाणी १७ नीचाला देखील उत्तम मानितो १८ उणें न पाहण्याचें १९ पालखी

१ न परीक्षी २ हरण करिता ३ सदयपणानें

नेणें। विवंचूं गा ॥ २ ॥ पैं जगीं जीवनासारिखें[४] । वस्तु अंगवरी[५] उपखे[६] । परि जातें जीवित राखे । तृणाचेंही ॥ ३ ॥ तैसें पुढिलांचेनि तापें । कळवळलीये कृपें । दिधलेंही आपणपें । न्यूनचि मानी ॥ ४ ॥ निम्न[७] भरलिया उणें । पाणी ढळोंचि नेणें । तेंवि श्रांता तोषौनि जाणें । सामोरें पां ॥ ५ ॥ पैं पायीं कांटा नेहटे[८] । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥ ६ ॥ कां पावों[९] शीतळता लाहे । की ते डोळ्याचिलागीं होये । तैसा परसुखें जाये । सुखावत जो ॥ ७ ॥ किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें[१०] असे जगीं । तैसें दुःखितांचें सेलभागीं[११] । जिणें जयाचें ॥ ८ ॥ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि[१२] तया । ऋणिया लाभें ॥ ९ ॥

## स्वकर्म सोडूं नये–( ज्ञानेश्वरी अ० १८ )

म्हणौनि भलतिये कर्मीं । आयास जऱ्ही उपक्रमीं । तरी काय स्वधर्मीं । दोष सांगें ॥ १ ॥ अगा! उजू वाटा चालवावें । तऱ्ही पायचि शिणवावे । ना आडरानें धांवावें । तऱ्ही तेंचि ॥ २ ॥ पैं शिळा कां सिदोरिया । दाटणें[१] एक धनंजया!। परी जें वाहतां विसावया[२] । मिळिजे तें घेपे ॥ ३ ॥ येऱ्हवीं कणा आणि भुसा । काढितांही सोस[३] सरिसा । जेंचि रंधन[४] श्वानमांसा । तेंचि हवी ॥ ४ ॥ दधी जळाचिया घुसळणा । व्यापार सारिखेचि विचक्षणा!। वाळुवे[५] तिळा घाणा । गाळणें एक ॥ ५ ॥ पैं नित्यहोम देयावया । कां सैरा[६] आगीं सुवावया[७] । फुंकितां धूम धनंजया! । साहणें तेंचि ॥ ६ ॥ परी धर्मपत्नी, धांगडी[८] । पोसितां जरी एकी वोढी । तरि कां अपरवडी[९] । आणावी आंगां ॥ ७ ॥

---

४ पाण्यासारखे ५ आग वेष्टून ६ नाश पावे, तृणाचें रक्षण करण्यासाठी पाण्यासारखी वस्तु देखील आपला जीव खर्ची घालिते, असा भावार्थ ७ सखल जागा ८ जोर करी, शिरे ९ पाय १० उत्पन्न केलें ११ बऱ्यासाठी, कल्याणासाठी १२ उपजताच त्यानें मला ऋणी केलें.

१ दडपणें २ विश्रांतीस ३ श्रम सारखाच ४ शिजविण्याची खटपट ५ रेतीला ६ इतर कामासाठी ७ पेटविण्यास ८ दाडगी, व्यभिचारी ९ अन्यायवर्तन

**हां गा पाठीं लागला घाई । मरण न चुकेचि पाही । तरी समोरला[10] काई । आगळें न कीजे ॥ ८ ॥ कुळस्त्री दांडयाचे घाये । परघर रिगालीहि जरी साहे । तरी स्वपतीतें वांयें । त्यजिलें कीं ॥ ९ ॥ तैसे आवडतेंही करणें । न निपजे शिणल्याविणें । तरी विहितें[11] बा रे ! कोणें । बोले भारी ॥ १० ॥ वरी थोडेंचि अमृत घेतां । सर्वस्व वेंचो कां पंडुसुता । जेणें जोडे जीविता । अक्षयत्व ॥ ११ ॥ येर कांह्या[12] मोलें वेंचूनी । विष पियावें घेउनी । आत्महत्येसि निमोनी । जायिजे जेणें ॥ १२ ॥ तैसें जाचूनियां इंद्रियें । वेचूनि आयुष्याचेनि दियें[13] । साचलें पापीं आन आहे । दुःखावांचूनि ! ॥ १३ ॥ म्हणोनि करावा स्वधर्म । जो करितां हिरोनि घे श्रम । उचित देईल परम । पुरुषार्थराज[14] ॥ १४ ॥ या कारणें किरीटी ! । स्वधर्माचिये राहटी । न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्र जैसा ॥ १५ ॥ कां नाव जैसी उदधीं । महारोगीं दिव्यौषधी । न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ १६ ॥**

---

# ३ नामदेव

नामदेव हे दामाशेटी नावाच्या शिप्याचे पुत्र असून, पंढरपूरचे रहिवासी होते. कोणी म्हणतात कीं, हे दामाशेटीस भीमातीरीं सापडले होते. हे उद्धवाचा अवतार होते असेंही कित्येक लोक मानितात. याचा जन्म शके ११९२ कार्तिक शुद्ध ११ स झाला, व शके १२७२ आषाढ वद्य १३ स यानीं समाधि घेतली, असे रा. रा. मुळेकृत 'श्रीनामदेवचरित्रा' वरून कळते. यांनीं भक्ति, वैराग्य वगैरे विविध विषयांवर व कृष्णलीलेवर पुष्कळ अभंग केले; परंतु त्यापैकी हल्लीं थोडे प्रसिद्ध आहेत. हे निस्सीम विठ्ठलभक्त असून, यांची वाणी भक्तिरसप्रचुर, साधी पण जोरदार व सहृदयानन्ददायी आहे. यांच्या घरची मोलकरीण जनाबाई हिनें सुद्धां पुष्कळ सुरस अभंग केले आहेत, त्यांपैकीं थोडे प्रस्तुत पुस्तकात घेतले आहेत.

---

१० समोर होऊन केलेला घाय, पाठीवर घाव लागला तर मृत्यु येणार, मग समोरासमोर दोन हात करून श्रेष्ठत्व का मिळवू नये, असा भाव ११ स्वकर्तव्य कठिण आहे, असें कोणत्या शब्दानीं म्हणावे? १२ कशाला १३ दिवस १४ मोक्ष

## कृष्णजन्म

### ( अभंग )

॥ १ ॥

पापी जे अभक्त दैत्य ते मातले ॥ धरणीसीं झाले ओझें त्यांचें ॥ १ ॥
दिधलासे त्रास ऋषिमुनि सर्वां ॥ न पूजिती देवा कोणी एक ॥ २ ॥
राहियेले यज्ञ मोडिलें कीर्तन ॥ पळाले ब्राह्मण दैत्यां भेणें[1] ॥ ३ ॥
वत्सरूपी पृथ्वी ब्रह्ययापाशी जाय ॥ नेत्रीं वाहे तोय सांगतसे ॥ ४ ॥
बुडविला धर्म अधर्म झाला फार ॥ सोसवेना भार मज आतां ॥ ५ ॥
ब्रह्मा इन्द्र आणि बरोबरी शिव ॥ चालियेले सर्व क्षीराब्धीशीं ॥ ६ ॥
नामा म्हणे आतां करितील स्तुती ॥ सावधान चित्तीं परिसावें ॥ ७ ॥

॥ २ ॥

आकाशवाणी होय सांगे सकळांसी ॥ तळमळ मानसीं करूं नका ॥ १ ॥
देवकीच्या गर्भा येईल भगवान ॥ रक्षील ब्राह्मण गाई भक्त ॥ २ ॥
उतरील भार मारील दैत्यांसीं ॥ आनंद सर्वांशी करील तो ॥ ३ ॥
रोहिणी उदरीं शेष बळिभद्र ॥ यादव समग्र व्हारे तुम्ही ॥ ४ ॥
ऐकोनियां ऐसें आनंद मानसीं ॥ येती स्वस्थळासी नामा म्हणे ॥ ५ ॥

॥ ३ ॥

वसुदेवा देत देवकी बहीण ॥ लग्नामध्यें विघ्न झालें ऐका ॥ १ ॥
अकाशींची वाणी सांगतसे कंसा ॥ मानीं भरवंसा बोलण्याचा ॥ २ ॥
आठवा इचा पुत्र वधील तुजशीं ॥ ऐकोनि मानसी क्रोधावला ॥ ३ ॥
घेऊनियां खड्ग माराया धांवला ॥ हात तो धरिला वसुदेवें ॥ ४ ॥
देईन मी पुत्र सत्य माझें मानीं ॥ ठेवा बंदीखानीं दूतां सांगे ॥ ५ ॥
पुण्य सारावया भेटे देवऋषि[2] ॥ वधीं बाळकांशीं ठेवूं नको ॥ ६ ॥
होतांची प्रसूत नेऊनियां देत ॥ साहाही मारीत दुराचारी ॥ ७ ॥
धन्य त्याचें ज्ञान न करीच शोक ॥ वधितां बालक नामा म्हणे ॥ ८ ॥

---

१ भीतीनें २ नारद

॥ ४ ॥

सातवा जो गर्भ योगमाया नेत ॥ आश्चर्य करीत मनामाजी ॥ १ ॥
रोहिणी उदरीं नेवोनी घातला ॥ न कळे कोणाला देवांवीण ॥ २ ॥
कंसाचिया भेणें यादव पळाले ॥ ब्राह्मण राहिले अरण्यांत ॥ ३ ॥
नाहीं कोणा सुख तळमळ मानसी ॥ वधील दुष्टांसी कोण आतां ॥ ४ ॥
विश्वाचा जो आत्मा कळलें तयाला ॥ दावितसे लीला संभूतीची[3] ॥ ५ ॥
अहर्निशीं ध्यान भक्तांचे मानसीं ॥ स्थापील धर्मासी नामा म्हणे ॥ ६ ॥

॥ ५ ॥

मयूरादी पक्षी नृत्य करीताती ॥ नद्या वाहताती दोही थड्या ॥ १ ॥
भूमीवरे सडे केशर कस्तुरी ॥ आनंद अंतरी सकळांच्या ॥ २ ॥
विमानांची दाटी सुरवर येती ॥ गंधर्व गाताती सप्त स्वरें ॥ ३ ॥
मंदमंद मेघ गर्जना करीती ॥ वाद्यें वाजताती नानापरी ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वर्गीं नगारे वाजती ॥ अप्सरा नाचती आनंदानें ॥ ५ ॥

॥ ६ ॥

दशरथें मारिला तोचि असे[4] मास ॥ वर्षाऋतु असे कृष्णपक्ष ॥ १ ॥
वसुनाम तिथी बुधवार असे ॥ शुक सांगतसे परीक्षिती ॥ २ ॥
रोहिणी नक्षत्र दोन प्रहररात्र ॥ माया घाली अस्त्र रक्षपाळां ॥ ३ ॥
नवग्रह अनुकूळ सर्वांचें जें मूळ ॥ वसुदेव कपाळ धन्य धन्य ॥ ४ ॥
जयाचा हा वंश तयासीं आनंद ॥ माझे कुळी गोविंद अवतरला ॥ ५ ॥
अयोनीसंभव[5] नोहे कांही श्रमी ॥ नामयाचा स्वामी प्रगटला ॥ ६ ॥

॥ ७ ॥

कोटिशा आदित्य गोठे एके ठायी ॥ तेजें दिशा दाहि उजळल्या ॥ १ ॥
घाबरा होवोनी वसुदेव पाहे ॥ हृदयीं आश्चर्य करीतसे ॥ २ ॥
मुकुटावरी रत्न नक्षत्रांचा मेळा ॥ भाळीं शोभे टिळा केशराचा ॥ ३ ॥
व्यंकटा[6] भृकुटी कमलाकार नेत्र ॥ नासीक विचित्र शुकचंचू ॥ ४ ॥

---

३ अवताराची ४ श्रावण, एके समयी दशरथ राजा शिकार करीत असता त्याच्या हातून श्रावण नामक मनुष्याचा वध झाला, ती कथा येथें लक्ष्य आहे ५ स्वयभू ६ वाकडी

विद्युल्लते ऐसी झळकती कुंडलें ॥ अधर कोंवळे अरुणोदय[7] ॥ ५ ॥
कंबुग्रीव[8] कंठ हृदयी वत्सलांच्छन[9] ॥ ब्रह्मयासी सीण न कळे अंत ॥ ६ ॥
चतुर्भुज शंखचक्र गदापद्म ॥ चिमणा मेघश्याम वर्ण ज्याचा ॥ ७ ॥
कौस्तुभ निर्मळ वैजयंती माळा ॥ कासे सोनसळा हाटवर्ण[10] ॥ ८ ॥
रुणझूण रुणझूण वाजताती वाळे ॥ आरक्त वर्तुळ नखीं शोभा ॥ ९ ॥
ध्वजवज्रांकुश जैसी रातोत्पलें[11] ॥ नामा म्हणे डोळे दिपताती ॥ १० ॥

॥ ८ ॥

अयुत गाई ब्राह्मणांसी ॥ सोडी संकल्प मानसीं ॥ १ ॥
ओळखिलें तुज ॥ आतां कळलासी मज ॥ २ ॥
धर्म स्थापावया ॥ येथें येसी देवराया ॥ ३ ॥
आलिंगितां दोही बाही ॥ नामा म्हणे डोई पायी ॥ ४ ॥

॥ ९ ॥

सोडीं सोडीं मिठी ॥ लपवा लपवा जगजेठी ॥ १ ॥
झणी कंसासी कळेल ॥ माझ्या बाळासी मारील ॥ २ ॥
वसुदेव चिंता मनीं ॥ तेज न माये गगनीं ॥ ३ ॥
नामा म्हणे आलें हासें ॥ देव तेव्हां सांगतसे ॥ ४ ॥

॥ १० ॥

नंदाच्या घराला ॥ मज नेई गोकुळाला ॥ १ ॥
माया उपजली तेथें ॥ ठेवीं मज आणी येथें ॥ २ ॥
म्हणसी असे रक्षपाळ ॥ ते म्यां मोहिले सकळ ॥ ३ ॥
आच्छादित रूप ॥ नामा म्हणे माझा बाप ॥ ४ ॥

॥ ११ ॥

उचलिला कमळापती ॥ पायींची बंधनें गळती ॥ १ ॥
त्रैलोक्यांत जो न माय ॥ त्यासी बंधन करील काय ॥ २ ॥
कवाडें उघडती ॥ देखतांची देवाप्रती ॥ ३ ॥

---

७ आरक्त ८ शखासारखी मान ९ श्रीवत्सनामक खूण १० सुवर्णवर्ण ११ तांबडीं कमळें

मंद मंद पडे पाऊस ॥ शिरीं छाया करी शेष ॥ ४ ॥
पूर चढला अचाट ॥ त्यासी लाविला अंगुष्ठ ॥ ५ ॥
त्वरें आला नंदाघरीं ॥ निद्रिस्थ त्या नरनारी ॥ ६ ॥
ठेवी तेथें कृष्णजीला ॥ माया घेऊनि निघाला ॥ ७ ॥
रडे माया करी आक्रांत ॥ नामा म्हणे उठवी दूत ॥ ८ ॥

॥ १२ ॥

पूर्णब्रह्म मानी कंसाच्या भयासी ॥ वाटेल मानसीं कोणाचिया ॥ १ ॥
इच्छामात्रें करी सृष्टीचा प्रलय ॥ त्यासी असे भय कवणाचें ॥ २ ॥
नंदाचें सुकृत झालें अगणीत ॥ म्हणोनि भगवंत आला तेथें ॥ ३ ॥
सर्वां होय सुख तरतील लोक ॥ नामा म्हणे शुक सांगतसे ॥ ४ ॥

॥ १३ ॥

तांतडीनें जाती ॥ कंसा सेवक सांगती ॥ १ ॥
उपजला वैरी ॥ त्यासी तूं रे त्वरें मारी ॥ २ ॥
त्वरें धांव घाली ॥ पाहे कन्या उपजली ॥ ३ ॥
ज्याचा धोका तूज ॥ नव्हे कन्या द्यावी मज ॥ ४ ॥
मारायाशीं खड्ग घाली ॥ हातिंची सुटूनियां गेली ॥ ५ ॥
तुजलागीं वधी ॥ उपजला मज आधीं ॥ ६ ॥
सांगे ब्रह्मज्ञान ॥ देवकीचें समाधान ॥ ७ ॥
नामा म्हणे तयेवेळीं ॥ त्यांचीं बंधनें काढिलीं ॥ ८ ॥

## गुरुदक्षिणा

कृष्णाच्या गुरूचा पुत्र समुद्रांत नष्ट झाला होता तो कृष्णाने त्यास परत आणून दिला, ती कथा यात आहे.

( अभंग )

॥ १ ॥

चारी वेदां ज्याचा नयेचि उमज ॥ करीतसे मुंज वसुदेव ॥ १ ॥
कर्दळीचे स्तंभें वाडे श्रृंगारिले ॥ गर्गासी धाडिलें आणावया ॥ २ ॥

देशोदेशीं चिठ्या लिहिल्या वसुदेवें ॥ मुंजीसाठीं यावें कृष्णजीच्या ॥ ३ ॥
मथुरेचे लोक आणिती आहेर ॥ होतसे गजर वाजंत्रांचा ॥ ४ ॥
उग्रसेनें तेव्हां फोडिलें भांडार ॥ द्विजांसी अपार द्रव्य दिल्हें ॥ ५ ॥
विष्णुदास नामा वांटितो सुपारी ॥ झाले ब्रह्मचारी रामकृष्ण ॥ ६ ॥

॥ २ ॥

घालितसे पंथ तरावया जना ॥ गेले संदीपनां[1]-घरी दोघे ॥ १ ॥
गुरुसेवा करिती वंदिती चरणा ॥ जाहली संपूर्ण विद्या तेव्हां ॥ २ ॥
जोडोनियां हात करिती प्रार्थना ॥ मागावी दक्षणा गुरुराया ॥ ३ ॥
नामा म्हणे द्विज म्हणत स्त्रियेसी ॥ असे जे मानसी इच्छा तुझ्या ॥ ४ ॥

॥ ३ ॥

समुद्रांत पुत्र बुडाला रे माझा ॥ पराक्रम तुझा ठावा असे ॥ १ ॥
अवश्य म्हणोनि तेथोनी निघाले ॥ समुद्रांत आले रामकृष्ण ॥ २ ॥
करोनियां पूजा पुसे वर्तमान ॥ देई रे आणून गुरुपुत्र ॥ ३ ॥
पांचजन्य दैत्य येथें बळी राहे ॥ बंधु तेथें पाहे कृष्णनाथा ॥ ४ ॥
टाकोनियां उडी वधिलें तयासी ॥ पाहे हृषीकेशी उदरांत ॥ ५ ॥
नाही ऐसें कळों आलें तें ईश्वरा ॥ घेवोनी शरीरा आला वरी ॥ ६ ॥
परीक्षिती काय न कळे तयाला ॥ दावीतसे लीला नामा म्हणे ॥ ७ ॥

॥ ४ ॥

यमाचिया नगरी दोघेजण गेले ॥ शंखातें स्फुरीलें कृष्णनाथें ॥ १ ॥
ऐकोनियां नाद कांपतसे काळ ॥ उठिले सकळ पाहावया ॥ २ ॥
जोडोनियां हात आणी अधोक्षजा ॥ करोनियां पूजा पुसतसे ॥ ३ ॥
संदीपनपुत्र आहे तुजपाशीं ॥ आणी रे तयासी शीघ्र आतां ॥ ४ ॥
तुमचा मी किंकर निरोप हो द्यावा ॥ रामा वासुदेवा पुसतसे ॥ ५ ॥
घेवोनियां पुत्र तेथोनी चालिले ॥ नामा म्हणे आले गुरुगृही ॥ ६ ॥

॥ ५ ॥

काढीतसे दृष्टी संदीपन पत्नी ॥ न वर्णवे वाणी हर्ष तीचा ॥ १ ॥

---

१ हा कृष्णाचा गुरु होता.

असे कांहीं इच्छा मागावें आणीक ॥ दिल्हें हें बाळक म्हणती दोघे ॥ २ ॥
अहर्निशीं तुम्हां असावें कल्याण ॥ आले रामकृष्ण मथुरेसी ॥ ३ ॥
कृतांतासी धाक नामा म्हणे त्याचा ॥ आहें मी तयाचा शरणागत ॥ ४ ॥

## सुदामचरित्र

( अभग )

॥ १ ॥

सुदामा ब्राह्मण होता तो दुर्बळ ॥ परि चित्तीं गोपाळ दृढ धरिला ॥ १ ॥
तयाचें चरित्र ऐका सावधान ॥ तेणे जन्ममरण दूर होती ॥ २ ॥
सत्वाचा सागर धैर्याचा मांदार[१] ॥ भक्तीचा निर्धार तयापाशीं ॥ ३ ॥
हालेना चालेना चळेना ढळेना ॥ आणीक कल्पीना इच्छा कांहीं ॥ ४ ॥
सदा सर्वकाळ समाधी लागला ॥ प्रपंच सांडिला छेदूनियां ॥ ५ ॥
नामा म्हणे तोचि योगियांचा राजा ॥ न्यायाचीया पूजा पूजतसे ॥ ६ ॥

॥ २ ॥

ऐसा तो ब्राह्मण दरिद्रें पीडीला ॥ सदा स्वरूपीं झाला अखंडित ॥ १ ॥
न करीच खंती कांहीं तो अंतरी ॥ वाचे तो उच्चारी रामकृष्ण ॥ २ ॥
नाहीं धड घर केवळ जर्जर ॥ चंद्र प्रभाकर उगवती ॥ ३ ॥
बाळें पांच सात बाहाती[२] झोंबती ॥ भुकें तळमळिती सर्वकाळ ॥ ४ ॥
उष्णें पोळे वारा येतसे भरारा ॥ मेघाचिया धारा घरामाजी ॥ ५ ॥
नामा म्हणे त्यानें प्रपंच सांडिला ॥ परमार्थ मांडिला अखंडीत ॥ ६ ॥

॥ ३ ॥

एके दिनी भार्या भावें तें मानवी ॥ भ्रतारा विनवी नम्रतेनें ॥ १ ॥
तुमचा सोइरा आहे नारायण ॥ अखंडित ध्यान करितां त्याचें ॥ २ ॥
तयाचिये भेटी जावें लवकरी ॥ तो आहे कैवारी दीनालागीं ॥ ३ ॥
भेटतांचि नासे अज्ञान दरिद्र ॥ सुखाचा समुद्र पांडुरंग ॥ ४ ॥
नामा म्हणे देव भक्ता साहाकारी ॥ सर्व सिद्धि घरीं वोळगती[३] ॥ ५ ॥

---

१ पर्वनविशेष २ बोलाविती, हाका मारिती ३ येतात

॥ ४ ॥

ऐकतां वचन मानलें तयासी ॥ पुढें कल्पनेसी ठाव नाही ॥ १ ॥
तेथें म्यां मागावें हें कांहीं न कळे ॥ निवतील डोळे दर्शनानें ॥ २ ॥
परी तया भेटी न्यावें कांहीं बाहीं ॥ परंतु तें नाहीं लेश घरीं ॥ ३ ॥
नामा म्हणे द्विज वांच्छी दरुषण ॥ रिकाम्या हातानें जातां लाजे ॥ ४ ॥

॥ ५ ॥

पाहे चहूंकडे धुंडोनी सुंदरी ॥ देखे मुष्टी चारी तंदुळिका ॥ १ ॥
तोचि शुद्धभाव उगवला पुढें ॥ सर्वही तें कोडें देवालागीं ॥ २ ॥
अहं-सोहं-वृत्ति[४] तेथें एक झाली ॥ दृष्टीनें देखिली पोह्यांकडे ॥ ३ ॥
नामा म्हणे सर्वरूपीं नारायण ॥ बोलाया कारण नाहीं येथें ॥ ४ ॥

॥ ६ ॥

तेचि भक्तिभावें पतीपुढें ठेवी ॥ पाहोनी गौरव ब्रह्मनिष्ठा ॥ १ ॥
तया योग्य नव्हेचि गे हा पदार्थ ॥ आमुचिया तया आर्त[५] तुळसीदळ ॥२॥
द्रौपदीच्यासाठीं भाजीपान खाये ॥ तेणें त्याची काय भूक गेली ॥३॥
नामा म्हणे हें तो कोड कौतुक ॥ थोडेंहि अधीक देव करी ॥ ४ ॥

॥ ७ ॥

शुद्ध भावार्थाचे पाहोनियां पोहे ॥ आनंदला भाव योगियाचा ॥ १ ॥
म्हणे आतां भेटूं बाळमित्र हरी ॥ भक्ताचा कैवारी कृष्णनाथ ॥ २ ॥
बांधावया वस्त्र केवळ जर्जर ॥ त्यामाजी न धरे गुंडाळितां ॥ ३ ॥
नामा म्हणे द्विज आनंद पावला ॥ मुहूर्त नेमियेला प्रयाणासी ॥ ४ ॥

॥ ८ ॥

वाचे नाम गात चालिला तो द्विज ॥ एकाचें तें चोज शुद्धभावें ॥ १ ॥
जीवशिव एकाकार झाली वृत्ती ॥ नाही कांही चित्तीं शम दम ॥ २ ॥
हात पाय नळ्या वळती फेंगड्या ॥ भावार्थाच्या गुड्या उभारीत ॥३॥
नामा म्हणे वाट चालतां समाधि ॥ सोहं[६] स्वरूपीं बुद्धि ठसावली ॥४॥

---

४ जीवशिवभाव ५ आवड, कौतुक ६ बुद्धि परमात्म्याच्या ठायीं तादात्म्य पावली

॥ ९ ॥

दुरोनि देखिलें द्वारकानगर ॥ अवघें कनकाकार वोतियेलें ॥ १ ॥
जेथें देवराणा नांदतो तो ठाव ॥ काय म्यां वर्णावें मंदमती ॥ २ ॥
हिरे चिरे रत्न झगमग दिसती ॥ घोंस ते लोंबती मोतियांचे ॥ ३ ॥
वैकुंठींचें सर्व वैभव आणिलें ॥ शोभेसी शोभले आपेआप ॥ ४ ॥
गुडीया गोपुरें झळकती पताका ॥ वाजताहे डंका चौवेदांचा ॥ ५ ॥
साहाजण भाट उभे महाद्वारीं ॥ अठरा वारकरी मोकाशांचे ॥ ६ ॥
नामा म्हणे रिद्धिसिद्धीचें भांडार ॥ देखिलें नगर ब्राह्मणानें ॥ ७ ॥

॥ १० ॥

चालिला देवाचे भेटीला सन्मुख ॥ ब्राह्मणाचा हरिख न समाये ॥ १ ॥
पाहतां लोचनी राजीवलोचन[७] ॥ भवाचें मोचन तेचि काळीं ॥ २ ॥
सभा ते साजिरी रत्नसिंहासनीं ॥ देव चुडामणी शोभतसे ॥ ३ ॥
राईरखुमाई चामरें ढाळिती ॥ राधा उभी हातीं घेउनी छत्र ॥ ४ ॥
समारंभें पुढें गरुड तो उभा ॥ शोभतसे शोभा दिव्य कांही ॥ ५ ॥
यादवांची सभा दाटलीसे भारी ॥ नाना उपचारी रिद्धी सिद्धी ॥ ६ ॥
उद्धव अक्रूर उभे पायांपासीं ॥ देवादिदेवासी विडे देत ॥ ७ ॥
नामदेव तेथें उभा होता निका ॥ घेऊनि पादुका दोन्हीं हातीं ॥ ८ ॥

॥ ११ ॥

पुढें तो भिकारी जाता झाला वेगें ॥ आपुलिये रंगें रंगूनियां ॥ १ ॥
येकाकार करी चित्त आणि वृत्ति ॥ पाहे लक्ष्मीपती दुरोनियां ॥ २ ॥
तटस्थ जाहला चालला त्वरित ॥ मुखीं नाम गात गोविंदाचें ॥ ३ ॥
नामा म्हणे नीर पाझरे लोचनीं ॥ समाधी लागुनी मुनी ठेला ॥ ४ ॥

॥ १२ ॥

देखिला सुदामा आपुल्या नयनीं ॥ मग चक्रपाणी उठे त्वरें ॥ १ ॥
सिंहासनाखाली टाकोनियां उडी ॥ करद्वय जोडी नमनालागीं ॥ २ ॥

---

७ कमलनयन

भेटूनियां तेव्हां धरिला हस्तकीं ॥ बैसवी मंचकीं वैडुर्याच्या ॥ ३ ॥
म्हणे रुक्मिणीसी आणीं उदकाला ॥ पुजूं या द्विजाला सन्मानेंसी ॥ ४ ॥
नामा म्हणे देवें चरण प्रक्षाळिले ॥ आंचळी पुसीले आपुलिया ॥ ५ ॥

॥ १३ ॥

काय वहिनीनें दिधलें आम्हांसी ॥ दाखवा वेगेंसी कृष्ण म्हणे ॥ १ ॥
सोडियेली तेव्हां मुष्टी तंदुळिका ॥ रुक्मिणीनायका पुढें ठेवी ॥ २ ॥
घेऊनि ते पोहे मुखामाजी टाकी ॥ मागे ते भीमकी धरोनि हात ॥ ३ ॥
ब्रह्मादिक देव उभे पोह्यांसाठीं ॥ नाही त्या ललाटीं नामा म्हणे ॥ ४ ॥

॥ १४ ॥

भक्षूनियां पोहे संतुष्ट जाहला ॥ मग आनंदला नारायण ॥ १ ॥
विश्वकर्म्यालागीं तेव्हां आज्ञा केली ॥ क्षणांत रचिली सुदामपुरी ॥ २ ॥
सर्व सुवर्णाची द्वारकेप्रमाणें ॥ ब्राह्मणासी दान गुप्त दिल्हें ॥ ३ ॥
नामा म्हणे दुजा नाहीं देवावीण ॥ देता घेता जाण पांडुरंग ॥ ४ ॥

॥ १५ ॥

सुदामा म्हणे अनंता ॥ आम्हां आज्ञा द्यावी आतां ॥ १ ॥
जाऊं घरासी सत्वर ॥ येऊनि दिवस झाले चार ॥ २ ॥
सर्व ठेउनि जातां बरें ॥ वाटे मारिती तस्कर ॥ ३ ॥
ऐसीं ऐकोनी वचनें ॥ सर्व काढिलीं भूषणें ॥ ४ ॥
आज्ञा घेऊनि चालिला ॥ देव बोळवीत आला ॥ ५ ॥
नामा म्हणे चोर ॥ याचा उफराटा व्यापार ॥ ६ ॥

॥ १६ ॥

नाहीं आमुचे दैवीं त्याणें कोठुनि द्यावें ॥ व्यर्थ कां रुसावें देवावरी ॥ १ ॥
न करितां खेद पुढें वाट चाले ॥ गौरक्षक भेटले तयालागी ॥ २ ॥
पुसतसे त्यांसी कोणाचें नगर ॥ ते म्हणती घर सुदाम्याचें ॥ ३ ॥
सुदाम्याची तुम्ही हेळणा[८] करितां ॥ तयाच्या संचिता प्राप्त कैचें ॥ ४ ॥

---

८ उपहास, थट्टा

मानुनी असार नगरद्वारा गेला ॥ प्रचीती तयाला नयेचि ते ॥ ५ ॥
जेव्हां वेत्रधारी मुजरा करिती ॥ चरणासी लागती सुदाम्याच्या ॥ ६ ॥
सुदामदेव तेव्हां मंदिरासी गेला ॥ मग ओंवाळीला सुंदरीनें ॥ ७ ॥
समाधानी झाला सुदामा ब्राह्मण ॥ करा रे कीर्तन नामा म्हणे ॥ ८ ॥

## स्फुट-अभंग

॥ १ ॥

सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली ॥ निजवस्तु दाविली माझी मज ॥ १ ॥
माझें सुख मज दावियेलें डोळां ॥ दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥ २ ॥
तया उतराई व्हावें कवण्या गुणें ॥ जन्म नाहीं येणें ऐसें केलें ॥ ३ ॥
नामा म्हणे निकी दावियेली सोय ॥ न विसरावे पाय विठोबाचे ॥ ४ ॥

॥ २ ॥

नाचूं कीर्तनाचे रंगीं ॥ ज्ञानदीप लावूं जगीं ॥ १ ॥
सर्व सांडुनी माझाई[1] ॥ वाचे विठ्ठलरखुमाई ॥ २ ॥
परेहून[2] परतें घर ॥ तेथें राहूं निरंतर ॥ ३ ॥
सर्वांचें जें अधिष्ठान ॥ तेंचि माझें रूप पूर्ण ॥ ४ ॥
अवघी सत्ता आली हाता ॥ नामयाचा खेचरी[3] दाता ॥ ५ ॥

॥ ३ ॥

तुझिया सत्तेनें वेदांसीं बोलणें ॥ सूर्यासी चालणें तुझिया बळें ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी ॥ वर्म हें जाणूनि शरण आलों ॥ २ ॥
मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें ॥ वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥
नामा म्हणे कांहीं न हाले साचार ॥ प्रभू तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४ ॥

मजसाठीं काय लाजतोसी देवा ॥ तृणा आणि जीवा साच होसी ॥ १ ॥
ते काय पवाडे गमाविलों ब्रीदें ॥ ब्रह्मादिकें वृन्दें ध्याती कैसीं ॥ २ ॥
जाणतां नेणतां सर्वांसीं उद्धार ॥ भवसिंधु पार पावविसी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे उपकार ऐसे ॥ दावीं जगदीशा हेळामात्रें[4] ॥ ४ ॥

---

१ माझें माझें असा भाव २ परात्पर ब्रह्म ३ हा नामदेवाचा गुरु होता ४ लीलामात्रें

॥ ५ ॥

चिंतातुर देहीं न साहे काजळी ॥ मनाची पाजळी उभय दिवीं ॥ १ ॥
प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल ॥ वैकुंठ जोडेल भजनभक्तीं ॥ २ ॥
नाहीं यातिवर्ण नाहीं या वेदोक्ति ॥ नामेंचि संतृप्ति होती जीवा ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम हेंचि बीजसार ॥ तुटेल येरझार भवबंधाची ॥ ४ ॥

॥ ६ ॥

मज गांजिल्याचा धांवा ॥ सावधान परिसावा ॥ १ ॥
विठो सुजाणाच्या राया ॥ धांव माझ्या करुणालया ॥ २ ॥
मोहोपाशीं मज बांधिलें ॥ थोर वैर त्वां साधिलें ॥ ३ ॥
माझें मन हें पामर ॥ भ्रांत हिंडे दारोदार ॥ ४ ॥
नामा म्हणे काय करूं ॥ तुजविण भूमीभारू ॥ ५ ॥

॥ ७ ॥

वांसरूं भोंवे खुंटिया भोंवतें ॥ आपआपणियांतें गोवियलें ॥ १ ॥
तैसी परी मज झाली गा देवा ॥ गुंतलों मी भावा लटिकीया ॥ २ ॥
नामा म्हणे केशवा तोडीं कां बंधनें ॥ मी एक पोसणें भक्त तुझा ॥ ३ ॥

॥ ८ ॥

उडाली पक्षिणी गेली अंतराळीं ॥ चित्त बाळाजवळी ठेवूनीयां ॥ १ ॥
तैसें माझें मन राहो कां ईश्वरीं ॥ मग सुखें संसारीं असेन कां ॥ २ ॥
धेनु चरे वनीं वत्स असे घरीं ॥ चित्त वत्सावरी ठेवूनि फीरे ॥ ३ ॥
दुडीवरी दुडी सखिसीं गोष्टि करी ॥ चित्त दुडीवरी ठेवूनीयां ॥ ४ ॥
विष्णुदास नामा विनवी परोपरी ॥ हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ ५ ॥

॥ ९ ॥

लपलासि तरी नामा कैसें नेसी ॥ आम्हीं अहर्निशीं नाम गाऊं ॥ १ ॥
आम्हांपासूनियां जातां नये तुज ॥ तें हें वर्मबीज नाम घोकूं ॥ २ ॥
आम्हांसी तों तुझें नामचि पाहिजे ॥ मग भेटी सहजें देणें लागे ॥ ३ ॥
भोळीं भक्तें आम्ही चुकलों होतों वर्म ॥ सांपडलें नाम नामयासी ॥४॥

॥ १० ॥

असत्याचे मळ बैसले ये वाचे ॥ ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥ १ ॥
हरिनामामृत प्रक्षाळी जिव्हेतें ॥ पाणीयें बहुतें काय करिती ॥ २ ॥
गंगासागरादी तीर्थे कोडीवरी ॥ हरिनामाची सरी न पावती ॥ ३ ॥
हरिनामगंगे सुस्नात पैं झाला ॥ नाम्याजवळी आला केशिराज ॥ ४ ॥

॥ ११ ॥

गोक्षीर लावीलें आंधळिया मुखी ॥ तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥
तैसें देवा तुझें नाम निरंतर ॥ जिव्हेसी पाझर अमृताचे ॥ २ ॥
सोलूनियां केळें साखरें घोळिलें ॥ अंधारी खादलें तरी गोड ॥ ३ ॥
द्राक्षफळां घड सेवितां चोखड ॥ तयाहूनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥
आळुनियां क्षीर तुपाचिये आळें ॥ कालविलें गुळें गोड जैसें ॥ ५ ॥
जाणोनियां नामा करी विनवणी ॥ अमृताची खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

॥ १२ ॥

भक्त केशवाचे आले ॥ दूत यमाचे पळाले ॥ १ ॥ भक्त हरीचे चालले ॥
हातीं हरिनामाचे भाले ॥ २ ॥ तळपे शांतीचे ओढण ॥ घेती स्वानंदें
उड्डाण ॥ ३ ॥ नामा म्हणे निजदास ॥ कळिकाळाचे भरंवसे ॥ ४ ॥

॥ १३ ॥

सर्वांभूतीं पाहें एक वासुदेव ॥ पुसोनियां ठाव अहंतेचा ॥ १ ॥
तोचि संतसाधु ओळखावा निका ॥ येर ते आइका मायाबद्ध ॥ २ ॥
देखिलिया धन मृत्तिकेसमान ॥ नवविधा रत्नें जैसे धोंडे ॥ ३ ॥
काम क्रोध दोघे घातले बाहेरी ॥ शांति क्षमा घरी राबवीत ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे ॥ विसंबेना त्याचे क्षणमात्र ॥ ५ ॥

॥ १४ ॥

आशा नाहीं ज्याला ॥ देव कां मारी तयाला ॥ १ ॥
जेव्हां सुखाची उन्नती ॥ मोह पायांसी लागती ॥ २ ॥
सर्वां चित्तीं समभाव ॥ सर्व मानी वासुदेव ॥ ३ ॥
नामा म्हणे अंगी प्रेम ॥ मुखीं विठोबाचें नाम ॥ ४ ॥

॥ १५ ॥

चंद्र सूर्यादि बिंबें लिहिताती सांग ॥ परि प्रकाशाचें अंग लिहितां नये॥१॥
संन्यासाचीं सोंगें आणिताती सांग॥परि वैराग्याचें अंग आणितां नये॥२॥
नामा म्हणे कीर्तन करिताती सांग ॥ प्रेमाचें तें अंग लिहितां नये ॥ ३ ॥

॥ १६ ॥

दुष्ट तो दुर्जन दुरीच धरावा ॥ संग न करावा पापियाचा ॥ १ ॥
सर्पाचें पिलें सानें म्हणऊनि पोशिलें ॥ त्यासी पान दिधलें अमृताचें ॥२॥
नव्हे ते निर्विष न संडी स्वभावगुण ॥ घेऊं पाहे प्राण पोसिल्याचे ॥ ३ ॥
विष्णुदास नामा सांगतसे युक्ति ॥ विवेक हा चित्तीं दृढ धरा ॥ ४ ॥

॥ १७ ॥

कांडितांचि कोंडा न निघे तांदूळ ॥ शेरा कैंचें फळ अमृताचें ॥ १ ॥
कण्हेरीच्या मूळा सुगंध तो नाहीं ॥ कसाबाची गाई जिणें कैंचें ॥ २ ॥
रुईदूध जरी येईल भोजना ॥ लोभियाच्या धना वेंच नाही ॥ ३ ॥
निर्फळ हें जिणें भक्तीविण मन ॥ नामा म्हणे जाण नये कामा ॥ ४ ॥

॥ १८ ॥

बुजवणें शेतीं माणसें म्हणती ॥ काय त्याचे हातीं शस्त्र शोभे ॥ १ ॥
हंसाशीं विरोध करीत कावळा ॥ नेणें त्याची कळा उंचपणें ॥ २ ॥
अनामिकासंगें पाठवितां पंडिता ॥ तो तयातें तत्वतां काय जाणे ॥ ३ ॥
नामा म्हणे बापा करूं नको तैसें ॥ विचार कायसें पाहसील ॥ ४ ॥

॥ १९ ॥

देह जावो अथवा राहो ॥ पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा ॥ तुझी आण पंढरीनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळनाम ॥ हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवराजा ॥ केला नेम चालवी माझा ॥ ४ ॥

---

# ४ जनाबाई

ही नामदेवांच्या घरची दासी होती. भगवद्भक्ताच्या सहवासानें हिच्या अंगीही भक्ति बाणली, व आपल्या धन्याच्या अनुग्रहानें आणि परमेश्वराच्या प्रसादानें हिलाही अभंग करण्याची स्फूर्ति झाली. हिच्या अभंगात प्रसाद आणि माधुर्य आहे. हिच्या अभंगांवरून हिच्या अंतःकरणाचे औत्सुक्य व्यक्त होतें. हिचे अभंग साधे असून बोधप्रद आहेत.

## स्फुट अभंग

॥ १ ॥

गातां विठोबाची कीर्ती ॥ महापातकें जळती ॥ १ ॥
सर्व सुखाचा आगर ॥ उभा असे विटेवर ॥ २ ॥
आठवितां पाय त्याचे ॥ मग तुम्हां भय कैचें ॥ ३ ॥
कायावाचामनें भाव ॥ जनी म्हणे गावा देव ॥ ४ ॥

॥ २ ॥

सख्या घेतलें पदरीं ॥ आतां न टाकावें दुरी ॥ १ ॥
थोरांचीं उचितें ॥ हेंचि काय सांगों तूतें ॥ २ ॥
ब्रह्मियाच्या ताता ॥ सज्जना लक्षुमीच्या कांता ॥ ३ ॥
आपुली म्हणवूनी ॥ आण गावी दासी जनी ॥ ४ ॥

॥ ३ ॥

गंगा गेली सिंधुपाशीं ॥ त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
तरी तें सांगावें कवणाला ॥ ऐसें बोले बा विठ्ठला ॥ २ ॥
जळ काय जळचरा ॥ माता अव्हेरी लेंकुरा ॥ ३ ॥
जनी म्हणे शरण आलें ॥ अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

॥ ४ ॥

येरे येरे माझ्या रामा ॥ मनमोहन मेघश्यामा ॥ १ ॥
संतमिसें भेटी ॥ देई देई कृपा गोष्टी ॥ २ ॥
आमची चुकवीं जन्मव्याधी ॥ आम्हां देईं हो समाधी ॥ ३ ॥
जनी म्हणे चक्रपाणी ॥ करीं ऐसी हो करणी ॥ ४ ॥

॥ ५ ॥

मी वत्स माझी गाई ॥ नये आतां करूं काई ॥ १ ॥
तुम्हीं तरी सांगा कांहीं ॥ शेखी विनवा विठाबाई ॥ २ ॥
येई माझिये हरणी ॥ चुकलें पाडस दासी जनी ॥ ३ ॥

॥ ६ ॥

ज्याचा सखा हरी ॥ त्यावरि विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें ॥ वारें[1] सोसी आघातांचें[1] ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी ॥ कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥
आंगा आपुले वोढोनी ॥ त्याला राखे जो निर्वाणीं[2] ॥ ४ ॥
ऐसा अंकित भक्तांसी ॥ म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ ७ ॥

पंढरीच्या राया ॥ माझी विनवणी पायां ॥ १ ॥
काय वर्णूं हरिच्या गोष्टी ॥ अनंत ब्रह्मांडें याचे पोटीं ॥ २ ॥
सेनान्हावीयाचे[3] घरी ॥ अखंड राबे विठ्ठल हरी ॥ ३ ॥
राम चिंता ध्यानीं मनीं ॥ म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

॥ ८ ॥

कोणें एके दिवशीं ॥ विठोबा गेला जनीपाशीं ॥ १ ॥
हळूच मागतो खायासी ॥ काय देऊं बा मी तुसीं ॥ २ ॥
हातीं धरून नेला आंत ॥ वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥
प्रेमसुखाचा ढेंकर दिला ॥ जनी म्हणे विठो धाला ॥ ४ ॥

---

१ प्रहाराचा जोर २ संकटसमयीं ३ हा एक न्हावी मोठा भक्त होता.

॥ ९ ॥

जेवीं जेवी बा मुरारी ॥ तुज वाढिली शिदोरी ॥ १ ॥
कनकाचे ताटीं ॥ रत्नजडित ठेविली वाटी ॥ २ ॥
आमुचें ब्रह्म सारंगपाणी ॥ हिंडतसे रानोरानी ॥ ३ ॥
गोपाळांचे मेळीं ॥ हरी खेळे चेंडूफळी ॥ ४ ॥
तुळसीचे वनी ॥ उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

॥ १० ॥

आतां पुरे हा संसार ॥ कोठें फेडूं उपकार ॥ १ ॥
सांडुनियां थोरपण ॥ करी दळणकांडण ॥ २ ॥
नारिरूप होउनी हरी ॥ माझें न्हाणें धुणें करी ॥ ३ ॥
राना जाये वेंची शेणी ॥ शेखीं वाहे घरी पाणी ॥ ४ ॥
ठाव मागे पायांपाशी ॥ म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

॥ ११ ॥

देहभाव सर्व जाय ॥ तेव्हां विदेही सुख होय ॥ १ ॥
तया निद्रे जे पहुडले ॥ भवजागृति नाहीं आले ॥ २ ॥
ऐसी विश्रांती लाधली ॥ आनंदकळा संचरली ॥ ३ ॥
त्या एकी एक होतां ॥ दासी जनी कैंचि आतां ॥ ४ ॥

॥ १२ ॥

नाद पडे कानीं ॥ मृग पैज घाली प्राणीं ॥ १ ॥
आवडी अंतरीं ॥ गज मेला पडे गारीं ॥ २ ॥
चोख पाहे अंग ॥ दीपें नाडला पतंग ॥ ३ ॥
गोडी रसगळा ॥ मच्छ अडकला गळा ॥ ४ ॥
गंधे अली[४] नेला ॥ म्हणे जनी तोचि मेला ॥ ५ ॥

॥ १३ ॥

विवेकाची पेंठ ॥ उघडी पंढरीची वाट ॥ १ ॥
तेथें नाहीं कांही धोका ॥ उठाउठी भेटे सखा ॥ २ ॥

४ भ्रमर

मरोनियां जावें ॥ शरण विठोबासी व्हावें ॥ ३ ॥
म्हणे नामयाची जनी ॥ देव करा ऐसा ऋणी ॥ ४ ॥

॥ १४ ॥

जहाज तारिलें तारिलें ॥ शेवटीं उगमासी आलें ॥ १ ॥
भाव शिडासी लाविला ॥ नाम फरारा सोडिला ॥ २ ॥
कथा भरीयेलें केणें[5] ॥ घ्यारे नका दैन्यवाणे ॥ ३ ॥
एका मनाचा विसार ॥ आर्धीं देउनी निर्धार ॥ ४ ॥
कोण देतो फुकासाठीं ॥ आर्तभूत व्हावें पोटीं ॥ ५ ॥
आर्तभूत व्हारे ॥ जनी म्हणे केणें घ्यारे ॥ ६ ॥

॥ १५ ॥

द्वारकेच्या राया ॥ बुद्धि दे गा नाम गाया ॥ १ ॥
मतिमंद तुझी दासी ॥ ठाव देईं चरणापाशीं ॥ २ ॥
तुझे पदरी पडलें खरी ॥ आतां सांभाळ करीं हरी ॥ ३ ॥
न कळे हरीची करणी ॥ म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

---

# ५ एकनाथ

एकनाथ हे सूर्यनारायण नावाच्या ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणाचे पुत्र व पैठणचे रहिवासी होते याच्या आईचे नाव रुक्मिणीबाई. एकनाथास हरिपंडित या नांवाचा एक मुलगा व गोदूबाई व गंगाबाई या नावाच्या दोन कन्या होत्या. एकनाथ हे स्वतः संस्कृत भाषेंत फार प्रवीण पंडित होते. परंतु मराठी भाषेचा यांस फार अभिमान असल्यामुळे, त्याच्या वेळी होत असलेली मराठी भाषेची अनास्था व मराठी ग्रंथरचनेवर लोकाची वक्रदृष्टि, यातून मराठी भाषेचा उद्धार करण्यासाठी यानीं मराठी भाषेत ग्रंथ केले. याचे ग्रंथ ओंवीबद्ध असून, यानीं अभंगरचना देखील विपुल केली आहे. हे भागवतधर्माचे मोठे अभिमानी होते. याचे गुरु जनार्दनपंत यांच्याठायी याची अनन्य निष्ठा असे, व त्यांच्या स्मरणार्थ यांनीं

---

५ व्यापाराचा माल

प्रत्येक अभंगाच्या शेवटीं ‘ एका जनार्दनी ’ हें पद घातलें आहे. यांनीं ‘ एकनाथी भागवत,’ ‘ भावार्थरामायण,’ ‘ रुक्मिणीस्वयंवर,’ ‘ स्वात्मसुख,’ ‘ चतुःश्लोकी भागवत टीका ’ ‘ हस्तामलक, ’ ‘ आनंदलहरी ’ असे ओंवीबद्ध ग्रंथ केले असून, यांत वेदान्त व भक्ति हे प्रधान विषय आहेत. यांची भाषा सुबोध पण प्रौढ व अर्थपूर्ण आहे. यांची वाणी भक्तिरसप्रधान व प्रेमळ आहे. यांनीं हिंदुस्तानी भाषेंतही कांहीं कविता केली आहे. हे श० १४७० च्या सुमारास जन्मले व श० १५२१ ंत समाधिस्थ झाले.

## भक्तिमहिमा

( भा. रा. )

भक्तीस विकला भगवंत ॥ भक्तांचें उच्छिष्ट स्वयें काढित ॥ रणांगणीं घोडे धूत ॥ शेखीं होत द्वारपाळ ॥ १ ॥ जेथें राहती भगवद्भक्त ॥ तें भूमंडळ होय पुनीत ॥ कीर्तनसुखें डुल्लत ॥ जग उद्धरत त्यांचेनि ॥ २ ॥ आनंदें करिती कीर्तन ॥ नामासवें गर्जे गगन ॥ श्रोतया वक्तयांचें अंतरक्षाळण[1] ॥ न लागतां क्षण पैं होय ॥ ३ ॥ क्षाळलेनि अंतरें ॥ परमानंद अंतरीं भरे ॥ चित्त चित्तपणा विसरे ॥ न देखे दुसरें जगामाजी ॥ ४ ॥ जगाचे ठायीं विषमता ॥ चित्तपणें भासवी चित्ता ॥ तेणें श्रवण कीर्तन करितां ॥ स्वयें भगवंता रातले ॥ ५ ॥ तेणें अंतर सुखावे तत्त्वतां ॥ विषम जगामाजी पाहतां ॥ बुडाली विषमाची[2] वार्ता ॥ चिदाभासता सर्वत्र ॥ ६ ॥ जेथें दुजेपणासी भान ॥ तेंचि लाजेसि आपतन ॥ हरपलिया द्वैतभान ॥ लज्जा पूर्ण निमाली ॥ ७ ॥ उन्मत्ताचेपरी जाण ॥ निर्लज्ज करी कीर्तन ॥ तेणें कीर्तनें सदा आपण ॥ करी कीर्तन तालछंदें ॥ ८ ॥ जो मोल वेचून मद्यासी ॥ सवें सेवी विषय विलासी ॥ तो विसरे देहभावासी ॥ द्वैत त्यासी भासेना ॥ ९ ॥ उन्मादरस विचित्र ॥ मेळवूनि केले एकत्र ॥ त्याचा केवढा बडिवार ॥ क्षणे संसार विसरवी ॥ १० ॥ सकळ रसांचें रसपान ॥ जे गोडियेमाजी होती निमग्न ॥ तो ब्रह्मरस सेविलिया

---

१ अंतःकरणाची शुद्धि २ द्वैताची

जाण ॥ संसारभान केविं उरे ॥ ११ ॥ ऐसे ब्रह्मरस महायोगें ॥ जगीं मद्भक्त दाटुगे ॥ कळिकाळातें जिणोनि वेगें ॥ नामबळें जग उद्धरिती ॥ १२ ॥ चारा घालोनि मुखा आंत ॥ जेविं पक्षिणी पिलीं पोशित ॥ तेविं आपुले निजभक्त ॥ रक्षी भगवंत अहर्निशी ॥ १३ ॥ विघ्न नयेचि नामापाशीं ॥ तें केंवि ये भक्तापाशी ॥ भगवंत रक्षी अहर्निशी ॥ विघ्न भक्तांसी निर्विघ्न ॥ १४ ॥ विघ्न करूं ये छळणार्थ ॥ विघ्नाचा आत्मा तो भगवंत ॥ विघ्न निर्विघ्न होय तेथ ॥ भूतें भगवद्रूप भक्तासी ॥ १५ ॥ सर्व भूतीं भगवद्भाव ॥ तेथें विघ्नासी कैंचा ठाव ॥ विघ्ना-विघ्नत्वा अभाव ॥ विघ्न स्वयमेव देव झाला ॥ १६ ॥ यथासामर्थ्यें यथावित्तें ॥ चित्तें भावार्थें जीवितें ॥ सुख द्यावें प्राणिमात्रातें ॥ हेंचि निश्चितें निजभजन ॥ १७ ॥ भलतेयासी भलते योनी ॥ भलतेनि प्रकारें करुनी ॥ सुख प्राणिमात्रालागोनी ॥ द्यावें अनुदिनीं हेंचि भजन ॥ १८ ॥ मेळवूनि षोडशोपचार ॥ प्रतिमा पूजितां साचार ॥ स्वयें सुखावेना शंकर ॥ तेवी चराचर पूजिलिया ॥ १९ ॥ मुख्य पूजेचें आयतन ॥ प्राणिमात्रा सुखदान ॥ बाह्य विधीचें प्रतिपाळण ॥ प्रतिमा जाण लौकिक ॥ २० ॥

## धनलोभ

### ( ओंव्या )

धनलोभी जे लुब्धक । स्वप्नीं न देखती सुख । या जन्मादारभ्य[1] देख । भोगिती नरक अनिवार ॥ १ ॥ मरणांत झटे घेतां । रुका न मिळे सर्वथा । तथापि सायास करितां । आळ[2] चित्ता उपजेना ॥ २ ॥ ऐसें पैशा कष्टें मिळे । तें वाढवी उपायबळें । निजशरीर कष्टविलें । जेणें कळे निजमोक्ष ॥ ३ ॥ जेणें भोगिजे इहभोगु । जेणें भोगिजे स्वर्गभोगु । जेणें साधिजे मायायोगु । जिवशिवविभागु जेथें नाहीं ॥ ४ ॥ एवढिये प्राप्तीचे दाते । ते कष्टती धनार्जनातें । इतरासी कोण पुसे तेथें । दुःखें समस्तें संगतीचीं ॥ ५ ॥ देवधर्म नेणती कांहीं । पर्वकाळ

१ जन्मापासून २ लाज

ठाउका नाहीं । श्राद्धाची संभावना नाहीं । निराश पाहीं सदा पितर ॥ ६ ॥ जैं धनाचा वेंच होय । तैं प्राण जाऊं पाहे । सणावाराची नेणें सोय । अतिथि तेथें काय करील ? ॥ ७ ॥ कष्टें जोडिली संपत्ती । ते ठेविती अति निगुति[3] । तोंडीं दगडमाती घालिती । आपण मरती धुळी खात ॥ ८ ॥ लोभें ऐहिकीं न मानी कोणी । लोभें निंद्य होइजे जनीं । लोभें परलोकाची हानी । निंद्य पतनी पडे लोभें ॥ ९ ॥ वंचोनि उत्तम लोकासी । लोभें होइजे नरकवासी । म्हणोनि निर्लोभ मानसी । द्विजसेवेसी करावें ॥ १० ॥ ज्याचा जेथें अतिशयो पूर्ण । तें त्यासी न पावतां जाण । स्वयें होऊनि दुःखनिमग्न । बोले पैशुन्य सर्वदा ॥ ११ ॥ जेथें दृढत्वें लोभाची वस्ती । तेथें कैंची विवेकस्थिति । अंध होऊनि ठाके वृत्ति । दृढ विषयार्थी लोभिष्ट ॥ १२ ॥ लोभ तेथें कैंचें ज्ञान । लोभ तेथें कैंचें ध्यान । लोभ तेथें समाधान । सर्वथा जाण पैं नाही ॥ १३ ॥ लोभ तेथें कैंची भक्ति । लोभ तेथें कैंची मुक्ति । जेथें लोभ तेथें विरक्ति । नाही निश्चितीं सर्वथा ॥ १४ ॥ लोभाचें ठाणें अंतरी असतां । सकळें साधनें होती वृथा । गुरूसी चाळी विकल्पता । ज्याचेनि तत्वतां मोक्ष लाभे ॥ १५ ॥ मातापिता इतर जन । त्यांची कथा गणी कोण । हें लोभाचें स्वाभाविक चिन्ह । कुबेर जाण तैसा नव्हे ॥ १६ ॥

## क्रोध

क्रोध पित्यापुत्रातें बाधी । क्रोध स्त्रीपुरुषा विरोधी । क्रोध प्रियाप्रिय उच्छेदी । क्रोध त्रिशुद्धीं अनर्थ ॥ १ ॥ क्रोध निजज्ञाना निर्दाळी । क्रोध स्वार्थाची करी होळी । क्रोध तापसातें छळी । क्रोध महाबळी अनर्थ ॥ २ ॥ क्रोध केवळ महामांग । जिवें मारिलें वैराग्य । सकळ योगां होय भंग । क्रोध सर्वांग अति अपवित्र ॥ ३ ॥ मातंगविटाळ[1] जळे निवृत्ति । क्रोधाची चित्तामाजी वस्ती । त्याचे क्षाळणीं न चले युक्ति । क्रोध सर्वार्थी घातक ॥ ४ ॥ क्रोधा ऐसा

---

३ जपून, गुप्त    १ मांगाचा विटाळ

वैरी। बैसला असतां जिव्हारीं। जो तयाची मानी थोरी। तो चराचरी अति मूर्ख ॥ ५ ॥ अपकारियावरी कोप करिती। कोणी कोपावरी कोप न करिती। क्रोध वाटपाडा[2] निश्चितीं। चहूं पुरुषार्थी नागवी ॥ ६ ॥ अल्प अन्याय देखल्यावरी। त्यावरी जो तो कोप करी। क्रोधा एवढा अपकारी। क्रोध क्रोधावरी न करिती ॥ ७ ॥ क्रोध आलिया कडकडाटी। काम पळे उठाउठी। धर्म जाय बारा वाटी। क्रोधें तुटी अर्थस्वार्था ॥ ८ ॥ क्रोध कामाचा कैवारी। क्रोध अभिमानाचा सहाकारी। क्रोध लोभा सबाह्यांतरीं। पापकरी निजक्रोधा ॥ ९ ॥ क्रोध संचरल्या देहीं। अणुमात्र हित नाहीं। पापाच्या कोटी पाहीं। क्रोधाच्या पायीं तोडरी ॥ १० ॥ कोप आलिया दुर्धर। जयाचा लोपेना विचार। तोचि मोक्षाचा अधिकार। परम धीर तो एकू ॥ ११ ॥ कोपामाजी सावधान। अवतारपुरुषाचें हें चिन्ह। तें चालतें ब्रह्मज्ञान। जग पावन त्याचेनी ॥ १२ ॥ आंगा येतां क्रोधसंग। अपवित्र होय सर्वांग। ब्रह्मचर्या होय भंग। तपा संहार होय क्रोधें ॥ १३ ॥ छिद्र पडतां घट गळे। क्रोधानळें तप जळे। योगी संन्यासी पडती मेळे। क्रोधें निजबळें बांधिले पैं ॥ १४ ॥ करितां काशीवास स्नान। तंव क्रोध खवळे गहन। क्रोधा ऐसा पापी पूर्ण। नाहीं आन संसारीं ॥ १५ ॥ क्रोधा ऐसा महावैरी। जडला असतां निज जिव्हारीं। जो ज्ञानाची मानी थोरी। तो संसारीं अति मूर्ख ॥ १६ ॥ क्रोध येऊं न देती दृष्टी। धन्य धन्य ते नर श्रेष्ठी। क्रोध आलिया पोटीं। ते विवेकदृष्टी निर्दाळिती ॥ १७ ॥ ऐशिये दृष्टीचे जे नर। चैतन्याचें निजमंदिर। परब्रह्माचें भांडार ॥ ब्रह्म साकार ते पुरुष ॥ १८ ॥

## सर्ववर्णांचा धर्म

जो सर्ववर्णांचा सहज धर्म। जेणें पाविजे परब्रह्म। जे नाशिती चित्तब्रह्म। ते गुण उत्तम अवधारीं ॥ १ ॥ हो कां उपायो जेणें तेणें।

२ चोर

पुढिलासी जें सुख देणें। तें उपतिष्ठे मजकारणें। तो गुण म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ २ ॥ तैसेंच परपीडा असुख। पुढिलिया न देणें दुःख। तेंही करूनि मज होय सुख। जाण निष्कंट उद्धवा ॥ ३ ॥ दुःख नेदूनि सुख देणें। या नांव अहिंसा म्हणणें। हा पहिला गुण जाणणें। ऐक लक्षणें सत्याचीं ॥ ४ ॥ सत्य तें जाण पां ऐसें। ज्याचें मन वाचा असत्यदोषें। जागृत-स्वप्न-सुषुप्ति-वशें[1]। स्पर्शलें नसे अणुमात्र ॥ ५ ॥ निंदा आणि नरस्तवन। कदा मिथ्या न बोले वचन। वाचा अनसुट धरणें जाण। सत्य संपूर्ण या नांव ॥ ६ ॥ हो कां अधर्माचिये जोडी। कोडी धरोनियां कवडी। जो रिघों नेदी दृष्टी बुडी। फुटकी कवडी स्पर्शेना ॥ ७ ॥ तेथें ही चोरी करणें। कां दृष्टि चुकवूनि वस्तु घेणें। अथवा न पुसतां नेणें। जीवें प्राणें न संभवे ॥ ८ ॥ अन्यायोपार्जित[2] धन। स्वप्नीं ही नातळे मन। हें अचौर्याचें लक्षण। तिसरा गुण उद्धवा ॥ ९ ॥ स्वधर्में धन यावें हाता। हेंही नसे धनकामता। कामिनीकामाची नेणें वार्ता। परस्त्री ते माता नेमस्त ॥ १० ॥ या नांव अकामता। उद्धवा जाण तत्वतां। हे चौथी लक्षणता। ऐक आतां अक्रोधू ॥ ११ ॥ जेथ कामाचा आदरु नाहीं। तेथ क्रोधाचें न चले कांहीं। जेवीं आकाशाचे ठायीं। न रुपती पाहीं निजशस्त्रें ॥ १२ ॥ जरी बीज जाहलें गोमटें। तरी भूमीविण अंकुर न फुटे। तैसे कामावांचूनि कोठें। क्रोधें उद्भटें न वाढिजे ॥ १३ ॥ एवं कामाची जे बोळवण। तेचि क्रोधाचीही जाण। जैसें गरोदरीचें मरण। करी निर्दळण गर्भाचें ॥ १४ ॥ शिर तुटलियापाठीं। हस्तपादादिक्रिया नुठी। काम निमालियापाठीं। निमाली गोष्टी क्रोधाची ॥ १५ ॥ जेथ कामक्रोध नाहीं। तेथ लोभ उठी कोणे ठायीं। तळवटीं नसतां भुयी। वृक्ष कांहीं वाढेना ॥ १६ ॥ या नांव निर्लोभता। सत्य जाण सर्वथा। क्रोधलोभातें वाढविता। जाण तत्त्वतां कामची ॥ १७ ॥ जेवीं कां भ्रताराचें मरण। घेवोनि जाये अहेवपण[3]। तेवीं कामक्रोधेंवीण। लोभ लक्षण असेना ॥ १८ ॥ जेथ कामाचें अपूर्ण काज।

---

१ निद्रा २ अन्यायानें मिळविलेलें ३ सौभाग्य

तेथ क्रोधाचें खवळे तेज। जेव्हां कामाचें पूर्ण निज। तेव्हां नाचे भोज लोभाचें ॥ १९ ॥ जेवीं दीपाची दीपकळा। ते सवें वागवी तेज काजळा। तेवीं क्रोधलोभांचा सोहळा। कामाजवळी संतत ॥ २० ॥ जेवीं कां वारियाचें शीत। घामज्वरा समवेत। तेवीं क्रोध लोभयुक्त। जाण निश्चित कामची ॥ २१ ॥ जेथ कामाचा नाहीं पांगू। तोचि क्रोधलोभांचा त्यागू। हा समूळ उपावो चांगू। स्वयें श्रीरंगु बोलिला ॥ २२ ॥ एवं कामत्यागें सर्वथा। त्यागू पावे क्रोधलोभता। भूतांसी जे प्रियत्वें हितता। ऐक तत्त्वतां सांगेन ॥ २३ ॥ जैशी शक्ति आपणासी। तैसें प्रिय करावें भूतांसी। अगत्य विचंबू ज्याचा ज्यासी। तें तें त्याशी अर्पावें ॥ २४ ॥ अन्न वस्त्र दान मान। पोटींच्या कळवळ्यानें जाण। करावें भूतीं प्रियप्रिय भाषण। हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ २५ ॥ ऐसें प्रिय करावें भूतां। तें परिपाकीं ये त्याच्या हिता। जें प्रियत्वा उपजे बाधकता। तें सर्वथा न करावें ॥ २६ ॥ भूतप्रियहितकारी। ऐसा जो पुरुष संसारी। मी भगवंत त्याच्या घरीं। सर्व हितकारी सर्वदा ॥ २७ ॥ जो सद्भावें सत्य साचार। भूतांसि हितत्वें प्रियकर। त्यासि मी भूतात्मा श्रीधर। करीं संसार सुखरूप ॥ २८ ॥ अहिंसादि सत्यलक्षण। हा सर्वांचा स्वधर्म जाण। सर्वाश्रम सर्व वर्ण। त्यांसि मुख्यत्वें हा धर्म ॥ २९ ॥

## स्फुट–अभंग

॥ १ ॥

श्रीगुरुराया पार नाहीं तव गुणीं ॥ म्हणोनि विनवणी करीतसों ॥ १ ॥
मांडिला व्यवहार हरिनामी आदर ॥ सादरासादर[1] वदवावें ॥ २ ॥
न कळेचि महिमा उंच नीचपणें ॥ कृपेचे पोसणें तुमचें जाहलों ॥ ३ ॥
एका जनार्दनीं करुनी स्तवन ॥ घातिलें दुकान मोलेंवीण ॥ ४ ॥

---

१ योग्यायोग्य

॥ २ ॥

वेदाचिया मतें विसरूनि कीर्तन ॥ करिती जे पठण शीण त्यांसी ॥ १ ॥
वेदाचा अर्थ न कळेचि पाठका ॥ कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥ २ ॥
श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार ॥ परी सारासारविचार कीर्तनीं ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं पुराणाच्या गोष्टी ॥ कीर्तन वाक्पुटीं करा सुखें ॥ ४ ॥

॥ ३ ॥

ध्यानीं ध्यातां गुरुराया ॥ ब्रह्मभूत होय काया ॥ १ ॥
करें करितां गुरुपूजा ॥ तेंचि पूजन अधोक्षजा ॥ २ ॥
पायीं करा गुरुयात्रा ॥ मुखें उच्चारा गुरुमंत्रा ॥ ३ ॥
एकाजनार्दनी परब्रह्म ॥ हेंचि जाणा धर्म कर्म ॥ ४ ॥

॥ ४ ॥

पीक पिकलें प्रेमाचें ॥ सांठविलें गगन टांचें ॥ १ ॥
भूमी शोधोनी पेरिजे बीज ॥ सद्गुरुकृपें उगवलें सहज ॥ २ ॥
कामक्रोधाच्या उपटोनि पेंडी ॥ कल्पनेच्या काशा काढी ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं निजभाव ॥ विश्वंभरित पिकला देव ॥ ४ ॥

॥ ५ ॥

देहीं असोनियां देव ॥ वाउगा करिती संदेहो ॥ १ ॥
जाय देऊळासी स्वयें ॥ मनी आशा दुसरी वाहे ॥ २ ॥
बैसोनी कीर्तनीं ॥ लक्ष लावी सदा धनीं ॥ ३ ॥
करूं जाय तीर्थयात्रा ॥ गोंविलें मन विचारा ॥ ४ ॥
ऐशियासी न भेटे देव ॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव ॥ ५ ॥

॥ ६ ॥

होईं शरणागत भाकीं रे करुणा ॥ तरीच बंधना चुकशील ॥ १ ॥
आपुलें तूं हित करूनियां घेईं ॥ सदा वाचे गाईं रामनाम ॥ २ ॥
जंववरी आहे इंद्रियसंबंध ॥ तोंवरी तूं बोध करीं मना ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं मावळलिया दीप ॥ सहजचि खेप येईल बापा ॥ ४ ॥

॥ ७ ॥

भावेंविण देव नयेचि पैं हातां ॥ वाउगें फिरतां रानोरान ॥ १ ॥
मुख्य तें स्वरूप पाहिजे तो भाव ॥ तेणें आकळे देव निःसंदेह ॥ २ ॥
संतसमागम नाम तें पावन ॥ वाचे नारायण हाची भाव ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं सोपा मंत्र राम ॥ गातां जोडे धाम वैकुंठींचें ॥ ४ ॥

॥ ८ ॥

यातीकुळ कांहीं नाणी तो मनासी ॥ धांवे त्याचे पाठीसीं लागवेगें ॥१॥
आपुलें म्हणविल्या न देखे पारिखें ॥ रक्षी त्या कौतुकें आपुले काजा ॥२॥
एकाजनार्दनीं पहा अनुभव ॥ धांवतसे देव लवलाहें ॥ ३ ॥

॥ ९ ॥

चातकाची तहान किती ॥ तृप्ति करूनि निववी क्षितीं ॥ १ ॥
धेनु वत्सातें वोरसे ॥ घरीं दुभतें पुरवी जैसें ॥ २ ॥
पक्वान्न सेवूं नेणती बाळें ॥ माता मुखीं घाली बळें ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं बोले ॥ एकपण माझें नेलें ॥ ४ ॥

॥ १० ॥

बाधभानु तया नाहीं माध्यान्ह ॥ सायंप्रातर्नाहीं तेथें कैंचा अस्तमान॥१॥
कर्मेचि खुंटलें करणेंचि हारपलें ॥ अस्तमान गेलें अस्तमाना ॥२॥
जिकडे पाहें तिकडे उदयोचि दीसे ॥ पूर्वपश्चिम तेथें कैंची भासे ॥ ३॥
एकाजनार्दनीं नित्यप्रकाशा ॥ कर्माकर्म जालें दिवसा चंद्र जैसा ॥४॥

॥ ११ ॥

तुमचें नामसंकीर्तन ॥ हेंचि माझें संध्यास्नान ॥ १ ॥ तुमचे पायाचा
साक्षेप[2] ॥ हाचि माझा कालक्षेप ॥ २ ॥ तुमचे पायाचें वंदन ॥ हेंचि
माझें अनुष्ठान ॥ ३ ॥ तुमचे पायापाशीं निद्रा ॥ हेचि माझी प्रेममुद्रा
॥ ४ ॥ एका जनार्दनाकार ॥ ब्रह्मरूप हा संसार ॥ ५ ॥

---

२ प्रतीति, दर्शन

॥ १२ ॥

**काया ही पंढरी आत्मा हा विठ्ठल ॥ नांदतो केवळ पांडुरंग ॥ १ ॥**
**भावभक्ति भीमा उदक तें वाहे ॥ बरवा शोभताहे पांडुरंग ॥ २ ॥**
**दयाक्षमाशांति हेंचि वाळुवंट ॥ मिळालासे थाट वैष्णवांचा ॥ ३ ॥**
**ज्ञान ध्यान पूजा विवेक आनंद ॥ हाचि वेणुनाद शोभतसे ॥ ४ ॥**
**दश इंद्रियांचा एक मेळा केला ॥ ऐसा गोपाळकाला होत असे ॥ ५ ॥**
**देहीं देखिली पंढरी जनीं वनीं ॥ एकाजनार्दनी वारी करी ॥ ६ ॥**

# ६ तुकाराम

आपल्या काव्यसुधेच्या योगानें जे महाराष्ट्रीयांचे केवळ कंठमणि होऊन बसले आहेत व ज्यांनीं आपल्या अभंगाच्या सामर्थ्यानें अभंग कीर्ति संपादन केली आहे, असे साधुवर्य तुकाराम याचा जन्म शके १५३० त झाला. हे पुण्यापासून नऊ कोसांवर देहू म्हणून गाव आहे तेथील रहिवासी असून, वाण्याचा धंदा करीत असत. बाळपणापासून याच्या अंतःकरणात विरक्तता उद्भवली असून, यांची अत्यंत द्वाड पत्नी जिजाबाई हिच्या त्रासाने हे जास्त उद्विग्न झाले व शेवटीं संसारत्याग करून यानी आपले सर्व आयुष्य भगवद्भजनात व संतसमागमात घालवून आपल्या जन्माचे पूर्ण सार्थक केले. श. १५७१ फा. व. १२ स यांचें देहावसान झाले.

यांनीं वैराग्य, ज्ञान, भक्ति, नीति, उपदेश वगैरे विषयांवर हजारों अत्युत्कृष्ट अभंग रचिले आहेत. हे जरी सुशिक्षित पंडित नव्हते, तरी याची काव्यकृति महान् महान् पंडितांना लाजवील अशी आहे. कीर्तन करण्याची पद्धत यांनीं प्रचारात आणिली असे म्हणतात. नानाविध गायनादिक मनोरंजक साधनाचा अभाव असूनही यांची कथा अत्यंत लोकप्रिय असे. स्वकृत अभंगांच्या अर्थाचें स्पष्टीकरण करून निरपेक्ष बुद्धीनें लोकास उपदेश करावा हाच यांचा उद्देश असे. याच्या कथेची शिवाजी महाराजांस फार गोडी असे, असें म्हणतात. यांची काव्यरचना केवळ ईश्वरी स्फूर्तीचेच फळ आहे. हे विठ्ठलाचे निस्सीम भक्त व भक्तिमार्गाचे मोटे पुरस्कर्ते होते. यांच्या कवितेंत औत्सुक्य व प्रेम हे गुण प्रधान

असून, यांची वाणी अत्यंत सुरस व भक्तिरसप्रधान आहे. यांची भाषा साधी असूनहि अर्थगांभीर्ययुक्त आहे. यांचा उपदेश अत्यंत कळकळीचा, निर्भीड व निस्पृह असल्यामुळें मनांत ठसण्याजोगा आहे, व याच गुणामुळे ते आबालवृद्धांस सारखेच प्रिय होऊन बसले आहेत.

## मंगलाचरण

( अभंग )

॥ १ ॥

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ॥ कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
तुळसीहार गळां कांसे पितांबर ॥ आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं ॥ कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख ॥ पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

॥ २ ॥

आवडे हें रूप गोजिरें सगुण ॥ पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥
आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें ॥ जो मी तुज पाहें पांडुरंगा ॥ २ ॥
लांचावलें मन लागलीसे गोडी ॥ ते जीवें न सोडी ऐसें जालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं मागावें लडिवाळी ॥ पुरवावी आळी[1] मायबापें ॥ ४ ॥

## पंढरीमाहात्म्य

॥ १ ॥

धन्य पुंडलिका बहु बरें केलें ॥ निधान आणिलें पंढरीये ॥ १ ॥
न करीं आळस आलिया संसारीं ॥ पाहें पां पंढरी भू-वैकुंठ ॥ २ ॥
न पवीजे केल्या तपांचिया राशी ॥ तें जनलोकांसी दाखवीलें ॥ ३ ॥
सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव ॥ शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ ४ ॥
विष्णुपद गया रामधाम काशी ॥ अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥ ५ ॥
तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस ॥ तात्काळ हा नास अहंकाराचा ॥ ६ ॥

---

१ आवड

॥ २ ॥

पंढरीचा महिमा ॥ देतां आणीक उपमा ॥ १ ॥
ऐसा ठाव नाहीं कोठें ॥ देव उभाउभीं भेटे ॥ २ ॥
आहेती सकळ ॥ तीर्थें काळें देती फळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पेंठ ॥ भूमिवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

॥ ३ ॥

सिंचन करितां मूळ ॥ वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥
नको पृथकाचे भरी ॥ पडों एक मूळ धरीं ॥ २ ॥
पाणचोऱ्याचें दार ॥ वरिल दाटावें तें थोर ॥ ३ ॥
वश झाला राजा ॥ मग आपुल्या त्या प्रजा ॥ ४ ॥
एक चिंतामणी ॥ फिटे सर्व सुखधणी ॥ ५ ॥
तुका म्हणे धांवा ॥ आहे पंढरी विसांवा ॥ ६ ॥

॥ ४ ॥

कासया करावे तपाचे डोंगर ॥ आणीक अपार दुःखराशी ॥ १ ॥
कासया फिरावे अनेक ते देश ॥ दावितील आस पुढे लाभ ॥ २ ॥
कासया पुजावीं अनेक दैवतें ॥ पोट भरे तेथें लाभ नाहीं ॥ ३ ॥
कासया करावे मुक्तीचे सायास ॥ मिळे पंढरीस फुकासाठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे करीं कीर्तन पसारा ॥ लाभ येईल घरा पाहीजे तो ॥ ५ ॥

## आत्मस्थिति

॥ १ ॥

संवसारतापें तापलों मी देवा ॥ करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणऊनि तुझे आठविले पाय ॥ ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥

बहुता जन्मींचा झाला भारवाही ॥ सुटिजे हें नाहीं वर्म[1] ठावें ॥ ३ ॥
वेढियलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं ॥ कणव[2] न करी कोणी माझी ॥ ४ ॥
बहु पांगविलों बहु नागविलों ॥ बहु दिवस झालों कासावीस ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं ॥ ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ॥ ६ ॥

॥ २ ॥

आजवरी होतों संसाराचे हातीं ॥ आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ १ ॥
तुला शरणागत व्हावें नारायणा ॥ अंगीकारा दीना आपुलिया ॥ २ ॥
विसरलों काम याजसाठीं धंदा ॥ सकळ गोविंदा माझें तुझें ॥ ३ ॥
तुका म्हणे विज्ञापना परिसावी ॥ आवडी हे जीवीं झाली तैसी ॥ ४ ॥

॥ ३ ॥

माझे मज कळों येती अवगुण ॥ काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आतां आड उभा राहें नारायणा ॥ दयासिंधुपणा साच करी ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण ॥ इंद्रियां अधीन झालों देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास ॥ न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

॥ ४ ॥

वृक्ष वल्ली आम्हां सोयरीं वनचरें ॥ पक्षीही सुस्वरें आळविती ॥ १ ॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास ॥ नाहीं गुण दोष अंगा येत ॥ २ ॥
आकाश मंडप पृथिवी आसन ॥ रमे तेथें मन क्रीडा करी ॥ ३ ॥
कंथा कमंडलु देह उपचारा ॥ जाणवितो वारा अवसरु ॥ ४ ॥
हरिकथा भोजन परवडी विस्तार ॥ करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ५ ॥
तुका म्हणे होय मनासीं संवाद ॥ आपुलाचि वाद आपणांसी ॥ ६ ॥

---

१ रहस्य २ करुणा

॥ ५ ॥

विरोधाचें[3] मज न साहे वचन ॥ बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
म्हणऊनि जीवा न साहे संगती ॥ बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २ ॥
देहाची भावना वासनेचा संग ॥ नावडे, उबग[4] आला यांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देव अंतरे यामुळें ॥ आशामोहजाळें दुःख वाढे ॥ ४ ॥

॥ ६ ॥

जननी हे जाणे बाळकाचें वर्म ॥ सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अंधापुढें जेणें दिधला आधार ॥ त्याचा हा विचार तोचि जाणे ॥ २ ॥
शरणागता जेणें घातलें पाठीशीं ॥ तो जाणे तेविशीं राखों तया ॥ ३ ॥
कास लागे तया न लगती सायास ॥ पोहोणार त्यास पार पावी ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं ॥ दिला त्याची गति तोचि जाणे ॥ ५ ॥

॥ ७ ॥

जे जे कांहीं मज होईल वासना ॥ ते ते नारायणा व्हावें तुम्ही ॥ १ ॥
काय भाव एक निवडूं निराळा ॥ जाणसी तूं कळा अंतरींची ॥ २ ॥
तुजवीण कोण मज आहे सखा ॥ जें सांगों आणिकां जीवभाव ॥ ३ ॥
अवघे पिशुन[5] झाले असे जन ॥ आपपर कोण नाठवे हें ॥ ४ ॥
तुका म्हणे तूंचि जीवांचें जीवन ॥ माझें समाधान तुझे हातीं ॥ ५ ॥

॥ ८ ॥

धर्माचें पाळण ॥ करणें पाखांडखंडण ॥ १ ॥
हेंचि आम्हां करणें काम ॥ बीज वाढवावें नाम ॥ २ ॥
तीक्ष्ण उत्तरें ॥ हातीं घेउनि बाण फिरें ॥ ३ ॥
नाहीं भीड भार ॥ तुका म्हणे साना थोर ॥ ४ ॥

॥ ९ ॥

काय मागावें कवणासी ॥ ज्यासी मागों तो मजपाशीं ॥ १ ॥
जरी मागों पद इंद्राचें ॥ तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ २ ॥

---

३ द्वैताचें ४ कटाळा ५ दुष्ट

जरी मागों ध्रुवपद ॥ तरी त्यासी येथील छंद ॥ ३ ॥
स्वर्गभोग मागों पूर्ण ॥ पुण्य सरल्या मागुती येणें ॥ ४ ॥
आयुष्य मागों चिरंजीव ॥ जीवा मरण नाहीं स्वभावें ॥ ५ ॥
तुका म्हणे एक मागें ॥ एकपणा नाहीं भंग ॥ ६ ॥

॥ १० ॥

तुझी कीर्ति सांगों तुजपुढें जरी ॥ ब्रह्मांडींही हरि माईना ते ॥ १ ॥
मेरूची लेखणी सागराची शाई ॥ कागद हा मही न पुरेची ॥ २ ॥
अनंत अपार आपंगिले[६] भक्त ॥ माझेंचि संचित ओडवेना ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हां बोल नाहीं देवा ॥ पामरें म्यां सेवा केली नाहीं ॥ ४ ॥

॥ ११ ॥

कोणी निंदा कोणी वंदा ॥ आम्हां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥
काय तुम्हांसी गरज ॥ आम्हीं भजूं पंढरीराज ॥ २ ॥
तुम्हांसारिखें चालावें ॥ तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हो कां कांहीं ॥ गळ दिला विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

॥ १२ ॥

बोले तैसा चाले ॥ त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥
आंगें झाडीन अंगण ॥ त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर ॥ उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
तुका म्हणे देव ॥ त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

॥ १३ ॥

कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें ॥ तेणें हातां आलें हरिदास्य ॥ १ ॥
रात्रीदिवस ध्यान हरीचें भजन ॥ कायावाचामन भगवंतीं ॥ २ ॥
ऐसिया प्रेमळा म्हणताती वेडा ॥ संसार रोकडा बुडवीला ॥ ३ ॥

---

६ रक्षिले, तारिले

एकवीस कुळें जेणें उद्धरीलीं ॥ हे तों न कळे खोली[७] भाग्यमंदा ॥४॥
तुका म्हणे त्याची पायधुळी मिळे ॥ भवभय पळे वंदीतांची ॥ ५ ॥

॥ १४ ॥

देवाचिये पायीं वेंचो सर्व शक्ति ॥ होतील विपत्ती ज्या ज्या कांहीं ॥ १ ॥
नेघे माझी वाचा पुढें कांहीं वाव[८] ॥ आणि दुजे भाव बोलायाचे ॥ २ ॥
मनाची वांटणी चित्ताचा विक्षेप ॥ राहो हा अनुताप आहे तैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे घेई विठ्ठलाचा छंद ॥ आनंदाचा कंद विस्तारेल ॥ ४ ॥

॥ १५ ॥

संतकृपा झाली ॥ इमारत फळा आली ॥ १ ॥
ज्ञानदेवें रचिला पाया ॥ रचियेलें देवालया ॥ २ ॥
नामा तयाचा किंकर ॥ तेणें केला हा विस्तार ॥ ३ ॥
जनार्दन एकनाथ ॥ ध्वज उभारिला भागवत[९] ॥ ४ ॥
भजन करा सावकाश ॥ तुका झालासे कळस ॥ ५ ॥

## भाव

॥ १ ॥

कांहीच मी नव्हे कोणिये गांवीचा ॥ एकटा ठायींचा ठायीं एक ॥ १ ॥
नाहीं जात कोठें येत फिरोनियां ॥ अवघेंचि वांयांविण बोलें ॥ २ ॥
नाहीं मज कोणी आपुलें दुसरें ॥ कोणाचा मी खरें कांही नव्हे ॥ ३ ॥
नाहीं आम्हां ज्यावें[१] मरावें लागत ॥ आहों अखंडित जैसे तैसे ॥ ४ ॥
तुका म्हणे नांव रूप नाहीं आम्हां ॥ वेगळा त्या कर्मा अकर्मासी ॥ ५ ॥

॥ २ ॥

न मिळो खावया न वाढो संतान ॥ परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी ॥ आणीक लोकांसी हेंचि सांगे ॥ २ ॥

---

७ रहस्य ८ अवकाश ९ भक्तिपथाचा १ जन्मावें

विटंबो शरीर होत कां विपत्ति ॥ परि राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाशिवंत हें सकळ ॥ आठवे गोपाळ हेंचि हित ॥ ४ ॥

॥ ३ ॥

याचिया आधारें राहिलों निश्चित ॥ ठेवूनियां चित्त पायीं सुखें ॥ १ ॥
माझें सुख दुःख जाणें हित फार ॥ घातलासे भार पांडुरंगा ॥ २ ॥
कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंकिलीं[2] ॥ म्हणऊनि लागली यास चिंता ॥ ३ ॥
मन राखे हातीं घेउनियां काठी ॥ इंद्रियें तापटीं फांको नेदी ॥ ४ ॥
तुका म्हणे यासी अवघड नाहीं ॥ शरणागता कांहीं रक्षावया ॥ ५ ॥

॥ ४ ॥

खावें ल्यावें द्यावें ॥ जमाखर्च तुझे नांवें ॥ १ ॥
आतां चुकली खटपट ॥ झाड्यापाड्याचा बोभाट ॥ २ ॥
आहे नाही त्याचें ॥ आम्हां काय सांगायाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंता ॥ भार वाही त्याचे माथां ॥ ४ ॥

॥ ५ ॥

आता सर्वभावें हा माझा निर्धार ॥ न करी विचार आणिकांसी ॥ १ ॥
सर्वभावें नाम गाईन आवडी ॥ सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ २ ॥
लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं ॥ पाहीन भरोनी डोळे मुख ॥ ३ ॥
निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं ॥ येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ४ ॥
अंकित अंकिला दास तुझा देवा ॥ संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

॥ ६ ॥

तैसे नव्हों आम्ही विठ्ठलाचे दास ॥ यावें आणिकांस काकुळती ॥ १ ॥
स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ ॥ आला कळिकाळ हाताखालीं ॥ २ ॥

---

२ स्वाधीन

अंकिताचा असे अभिमान देवा ॥ समर्पूनि हेवा असों पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें ॥ कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

॥ ७ ॥

बाळ काय जाणे जीवन उपाय ॥ मायबाप वाहे सर्व चिंता ॥ १ ॥
आइतें भोजन खेळलें अंतरीं ॥ अंकिताचे शिरीं भार नाहीं ॥ २ ॥
आपुलें शरीर रक्षितां न कळे ॥ सांभाळूनि लळे पाळी माय ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता ॥ आमुची ते सत्ता तयावरी ॥ ४ ॥

॥ ८ ॥

करावें गोमटें ॥ बाळा माते तें उमटे ॥ १ ॥
आपुलिया जीवाहुनी ॥ असे वाल्हें[3] तें जननी ॥ २ ॥
वियोग ते तिस ॥ त्याच्या उपचारें तें विष ॥ ३ ॥
तुका म्हणे पायें ॥ डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ४ ॥

॥ ९ ॥

कुमुदिनी[4] काय जाणे तो परिमळ ॥ भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम ॥ आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥ १ ॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी ॥ ज्याची नये जोडी[5] त्यासी कामा ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ताफळ[6] शिंपीपोटीं ॥ नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४ ॥

॥ १० ॥

शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ति ॥ तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
म्हणऊनि नाहीं आणिकांचा पांग ॥ सर्व जालें सांग नामें एका ॥ २ ॥
सगुण निर्गुण जायाचीं हीं अंगें ॥ तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥
तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते ॥ स्वयंभू आइते केले[7] नव्हों ॥ ४ ॥

---

३ आवडतें ४ चद्रकमलिनी ५ सपादन केलेली वस्तु ६ मोतीं ७ बनावट, कृत्रिम नाहीं

॥ ११ ॥

भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं ॥ अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ १ ॥
नाहीं तें पुरवीत आणुनि जवळी ॥ गाऊनि माउली गीत सुखें ॥ २ ॥
प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ ॥ वोळलीं[८] सकळ सुखें ठायीं ॥ ३ ॥
आपुल्या स्वभावें जैसे जेथें असों ॥ तैसे तेथें दिसों साजिरेचि ॥ ४ ॥
वासनेचा कंद उपडिलें मूळ ॥ दुरितें सकळ निवारिलीं ॥ ५ ॥
तुका म्हणे भक्तजनांची माउली ॥ करील साउली विठ्ठल आम्हां ॥ ६ ॥

॥ १२ ॥

अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां ॥ सोडूं चोजवितां[९] पुढें पोतीं ॥ १ ॥
देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी ॥ शोभतील गुणीं आपुलीया ॥ २ ॥
आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका ॥ बीज आणि पिका चिंता नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत ॥ तें नाहीं लागत पसरावें ॥ ४ ॥

॥ १३ ॥

बाळ मायेवीण क्षणभरि न राहे ॥ न देखतां होये कासावीस ॥ १ ॥
आणिक उदंड बुझाविती[१०] जरी ॥ छंद त्या उदंड माउलीचा ॥ २ ॥
नावडती तया बोल आणिकांचे ॥ देखोनियां नाचे माय दृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली ॥ आणिकांचे बोली चाड नाहीं ॥ ४ ॥

## करुणा ( धांवा )

॥ १ ॥

मुखें बोलावें तें जीवींचें जाणसी ॥ विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ १ ॥
आतां हेंचि भलें भाकावी करुणा ॥ विनियोग तो जाणां तुम्ही त्याचा ॥ २ ॥
आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं ॥ साधनाच्या वाहीं[१] पडों नये ॥ ३ ॥
तुका म्हणे देह दिला पिंडदान ॥ वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ४ ॥

---

८ वळली, एकत्र झालीं ९ उत्साहयुक्तापुढे १० समजाविती १ भरीस

॥ २ ॥

तुज म्हणतील कृपेचा सागर ॥ तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ १ ॥
अझूनि कां नये तुज माझी दया ॥ काय देवराया पाहतोसी ॥ २ ॥
आळवितों जैसें पाडस कुरंगिणी[२] ॥ पीडिलिया वनीं तानभूक ॥ ३ ॥
प्रेमरसपान्हा पाजीं माझे आई ॥ धांवें वो विठाई वोरसोनी[३] ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें कोण हरी दुःख ॥ तुजविण एक पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ३ ॥

एकवेळ करीं या दुःखावेगळें ॥ दुरिताचें जाळें उगवूनि[४] ॥ १ ॥
आठवीन पाय हा माझा नवस ॥ रात्रींही दिवस पांडुरंगा ॥ २ ॥
बहू दूरवरी भोगविलें भोगा ॥ आतां पांडुरंगा सोडवावें ॥ ३ ॥
तुका म्हणे काया करीन कुरवंडी ॥ ओंवाळूनि सांडीं मस्तक हें ॥ ४ ॥

॥ ४ ॥

साखरेचें नाम घेतां कळे गोडी ॥ तैसी आम्हां जोडी वैष्णवांची ॥ १ ॥
मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी ॥ सोस तो भजनीं आवडीचा ॥ २ ॥
भोजनाची चिंता माय वाहे बाळा ॥ आम्हां तरी खेळावरी चित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं देह उपकारें ॥ गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ४ ॥

॥ ५ ॥

मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड ॥ घेतां वाटे गोड नाम तुझें ॥ १ ॥
नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें ॥ बोलतों वचनें आवडीनें ॥ २ ॥
भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं ॥ घातला विठाई भार तुज ॥ ३ ॥
तुका म्हणे नाचे निर्लज्ज होऊनी ॥ नाहीं माझे मनीं दुजा भाव ॥ ४ ॥

॥ ६ ॥

मायबापापुढें लेंकरांची आळी[५] ॥ आणीक हे पाळी कोण लळे ॥ १ ॥
सांभाळा जी माझीं विषमें अनंता ॥ जवळी असतां अव्हेर कां ॥ २ ॥

---

२ हरिणी ३ पान्ह्यानें भरून ४ उकलून ५ हट्ट, आवड

आणिकांची चाले सत्ता आम्हांवरी ॥ तुमची तो थोरी काय मग ॥ ३ ॥
तुका म्हणे आलों दुरोनि जवळी ॥ आतां टाळाटाळी करूं नये ॥ ४ ॥

॥ ७ ॥

मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ॥ आपुलिया बळें न वंचे तें ॥ १ ॥
रुसोनियां पळे सांडूनियां ताट ॥ मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥
भांडवल आम्ही आळी करावी हे ॥ आपणचि माये धांवशील ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी करूनियां निकी ॥ देसील भातुकी बुझाऊनी ॥ ४ ॥

॥ ८ ॥

बोलविसी तैसें आणीं अनुभवा ॥ नाही तरी देवा विटंबना ॥ १ ॥
मिठेंविण काय करावें मिष्टान्न ॥ शव जीवेंविण शृङ्गारिलें ॥ २ ॥
संपादणीविण विटंबिलें सोंग ॥ गुणेंविण चांग रूप हीन ॥ ३ ॥
कन्यापुत्रेंविण मंगलदायकें ॥ वेंचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी होते मज परी ॥ न देखें अंतरी प्रेमभाव ॥ ५ ॥

॥ ९ ॥

आपुल्या महिमानें ॥ धातु परिसें केलें सोनें ॥ १ ॥
तैसे न[६] मनी माझे आतां ॥ गुण दोष पंढरीनाथा ॥ २ ॥
गांवाखालील वोहोळ ॥ गंगा न मनी अमंगळ ॥ ३ ॥
तुका म्हणे माती ॥ केली कस्तूरीनें सरती ॥ ४ ॥

॥ १० ॥

कोठें गुंतलासी योगियांचे ध्यानीं ॥ आनंदकीर्तनीं पंढरींच्या ॥ १ ॥
काय काज कोठें पडलीसे गुंती[७] ॥ कानीं न पडती बोल माझे ॥ २ ॥
काय शेषशयनीं सुखनिद्रा आली ॥ सोय कां सांडिली तुम्हीं देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें गुंतलेती सांगा ॥ किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ४ ॥

---

६ न मनी, मानू नको ७ अडचण

॥ ११ ॥

कामक्रोध आड पडले पर्वत ॥ राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सांपडे वाट ॥ दुस्तर हा घाट वैरीयांचा[८] ॥ २ ॥
आतां कैंचा मज सखा नारायण ॥ गेला अंतरोन पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे व्यर्थ मोलाचें शरीर ॥ गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

॥ १२ ॥

भक्ति–ऋण घेतलें माझें ॥ चरण गाहाण आहेत तुझे ॥ १ ॥
प्रेमव्याज देईं हरि ॥ माझा हिशेब लवकरि करीं ॥ २ ॥
माझें मी न सोडीं धन ॥ नित्य करीतों कीर्तन ॥ ३ ॥
तुझे नांवें आहे खत ॥ सुखें करीं पंचाईत ॥ ४ ॥
तुका म्हणे गरुडध्वजा ॥ यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ५ ॥

॥ १३ ॥

कुरंगी पाडस चुकलेंसें वनीं ॥ फुटे दुःखेंकरोनि हृदय त्याचें ॥ १ ॥
तैसा परदेशी झालों तुजवीण ॥ नको हो निर्वाण[९] पाहूं माझें ॥ २ ॥
अपराधाच्या कोटी घालीं सर्व पोटीं ॥ नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ ३ ॥
तुका म्हणे असों द्यावी माझी चिंता ॥ कृपाळु अनंता पांडुरंगा ॥ ४ ॥

## भेटीची उत्सुकता–[ श्रीविठ्ठलाशीं सलगी ]

॥ १ ॥

कासयासी व्यर्थ घातलें संसारीं ॥ होतें तैसें जरी तुझे चित्तीं ॥ १ ॥
तुझिये भेटीची थोर असे आस ॥ दिसोनि निरास आली मज ॥ २ ॥
आतां काय जीणें झालें निरर्थक ॥ वैकुंठनायक भेटेची ना ॥ ३ ॥
आडलासी काय कृपेच्या सागरा ॥ रुकमादेवीवरा सोइरिया ॥ ४ ॥
तुका म्हणे देईं चरणाची सेवा ॥ नुपेक्षीं केशवा मायबापा ॥ ५ ॥

---

८ कामक्रोधादि षड्रिपूंचा ९ अत

॥ २ ॥

भेटिलागीं जीवा लागलीसे आस ॥ पाहें रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र चकोरा[1] जीवन ॥ तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥
दिवाळीच्या मूळा[2] लेंकी आसावली ॥ पाहातसे वाटुली पंढरीची ॥३॥
भुकेलिया बाळ अति शोक करी ॥ वाट पाहे परि माऊलीची ॥ ४ ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक ॥ धांवूनि श्रीमुख दावीं देवा ॥ ५ ॥

॥ ३ ॥

कन्या सासुऱ्यासी जाये ॥ मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें जालें माझ्या जिवा ॥ केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥
चुकलिया माये ॥ बाळ हुरूहुरू[3] पाहे ॥ ३ ॥
जीवनावेगळी मासोळी ॥ तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

॥ ४ ॥

स्वामीसी संकट पडे जे गोष्टींचें ॥ काय त्या प्रेमाचें सुख मज ॥ १ ॥
दुखवीना चित्त तुझें नारायणा ॥ कांहीच मागेना तुजपाशीं ॥ २ ॥
रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास ॥ सोडियेली आस यांची जीवें ॥३॥
तुका म्हणे एके वेळे देई भेटी ॥ वोरसोनी पोटीं आलिंगावें ॥ ४ ॥

॥ ५ ॥

झाड कल्पतरु ॥ न करी याचकां आव्हेरु ॥ १ ॥
तुम्ही सर्वां सर्वोत्तम ॥ ऐसे विसरतां नाम ॥ २ ॥
परिसा तुमचें देणें ॥ तो त्या जाणे अभिमानें ॥ ३ ॥
गाऱ्हाण्यानें तुका ॥ गर्जे मारुनियां हाका ॥ ४ ॥

---

१ चकोर नावाचा पक्षी चद्रकिरणावर उपजीविका करितो असा कविसंकेत आहे.
२ बोलावण्याला ३ चुकल्यामारखे, घाबरल्यासारखे

॥ ६ ॥

समर्थाचें बाळ पांघरे वाकळ[४] ॥ हांसती सकळ लोक कोणा ॥ १ ॥
समर्थासी लाज आपुल्या नांवाची ॥ शरण आल्याची लागे चिंता ॥ २ ॥
जरि तुज कांहीं होईल उचित ॥ तरी हा पतित तारी तुका ॥ ३ ॥

॥ ७ ॥

कासया हो माझा राखिला लौकिक ॥ निवाड कां एक केला नाही ॥ १ ॥
मग तळमळ न करितें मन ॥ झालें तें कारण कळों येतें ॥ २ ॥
तुका म्हणे केला पाहिजे निवाड ॥ वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥ ३ ॥

॥ ८ ॥

आम्ही ध्यावें तुझें नाम ॥ तुम्ही आम्हां द्यावें प्रेम ॥ १ ॥
ऐसें निवडिलें मुळी ॥ संतीं बैसोनि सकळी ॥ २ ॥
माझी डोई पायांवरी ॥ तुम्ही न धरावी दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे केला ॥ खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४ ॥

॥ ९ ॥

वेडें वाकुडें गाईन ॥ परि मी तुझाचि म्हणवीन ॥ १ ॥
मज तारी दीनानाथा ॥ ब्रीद साच करी आतां ॥ २ ॥
केल्या अपराधाच्या राशी ॥ म्हणऊनि आलों तुजपाशी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तारी ॥ सांडीं ब्रीद नाही तरी ॥ ४ ॥

॥ १० ॥

आम्हां केलें गुणवंत ॥ तें उचित राखावें ॥ १ ॥
तुम्हांसी तों चाड नाहीं ॥ आणिकां कांही सुखदुःखा ॥ २ ॥
दासांचें तों देखों नये ॥ उणें काय होइल तें ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभरा ॥ दृष्टि करा सामोरी ॥ ४ ॥

---

४ गोदडी

॥ ११ ॥

माता कापी गळा ॥ तेथें कोण राखी बाळा ॥ १ ॥
हें कां नेणां नारायणा ॥ मज चाळवितां[५] दीना ॥ २ ॥
नागवी धांवणें[६] ॥ तेथें साह्य व्हावें कोणें ॥ ३ ॥
राजा सर्व हरी ॥ तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥
तुझ्या केल्याविण ॥ नव्हे स्थिर वश मन ॥ ५ ॥
तुका म्हणे हरी ॥ सूत्र तुम्हां हाती दोरी ॥ ६ ॥

॥ १२ ॥

वारंवार हाची न पडावा विसर ॥ वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥ १ ॥
इच्छेचा ये दाता तूं एक समर्था ॥ अगा कृपावंता मायबापा ॥ २ ॥
लाभाचिये वोढी उताविळ मन ॥ त्यापरि चिंतन चरणाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवो जीवन ओलावा ॥ पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥ ४ ॥

॥ १३ ॥

उपासासेवटीं अन्नासवें भेटी ॥ तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ १ ॥
पुर्व्वीं वासना साच सर्व जाणा ॥ आम्हां नारायणा अंकिताची ॥ २ ॥
वहुदिस पुत्रा मातेसवें भेटी ॥ तैसा दाटो पोटीं प्रीति उभड[७] ॥ ३ ॥
तुका म्हणे धन कृपणा सोइरें ॥ यापरि दुसरे न हो आतां ॥ ४ ॥

॥ १४ ॥

दुर्बुद्धि ते मना ॥ कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥
आतां मज ऐसें करी ॥ तुझे पाय चित्ती धरी ॥ २ ॥
उपजला भावो ॥ तुमचे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां ॥ लाभ नाहीं यापरता ॥ ४ ॥

---

५ उडवा उडवी करिता ६ रक्षणकर्ता ७ पान्हा

॥ १५ ॥

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड ॥ तो असे उघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी ॥ नवल तेविशीं पुरवितां ॥ २ ॥
ज्याचें त्यासी देणें कोणतें उचित ॥ मानूनियां हित घेतों सुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें देईं संवसार ॥ आवडीसी थार करी माझे ॥ ४ ॥

॥ १६ ॥

एकांतींचें सुख देईं मज देवा ॥ आघात या जीवा चुकवूनी ॥ १ ॥
ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर ॥ आपुला विसर पडों नेदीं ॥ २ ॥
मायबाळा भेटी सुखाची आवडी ॥ तैशी मज गोडी देईं देवा ॥ ३ ॥
कीर्ति ऐकोनियां आलों शरणागत ॥ दासाचें तूं हित करितोसी ॥ ४ ॥
तुका म्हणे मी तो दीन पापराशी ॥ घालावें पाठीशी मायबापा ॥ ५ ॥

॥ १७ ॥

देव वसे ज्याचे चित्ती ॥ त्याची घडावी संगती ॥ १ ॥
ऐसें आवडतें मना ॥ देवा पुरवावी वासना ॥ २ ॥
संतजनासवें भेटी ॥ न हो अंगसंगें तुटी ॥ ३ ॥
तुका म्हणे जिणें ॥ भलें संतसंघट्टणें ॥ ४ ॥

## अद्वैतपर

॥ १ ॥

स्तुती करूं तरी नव्हेचि या वेदा ॥ तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥
परी हे वैखरी[1] गोडावली सुखें ॥ रसना रस मुखें इच्छीतसे ॥ २ ॥
रूप वर्णावया कोठें पुरे मती ॥ रोमीं होतीं जातीं ब्रह्मांडेंही ॥ ३ ॥
तुका म्हणे तूंच ऐसा एक साचा ॥ ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥ ४ ॥

---

१ वाणी

॥ २ ॥

पुसावें तें ठाईं आपल्या आपण ॥ अहंकारा शून्य घालूनियां ॥ १ ॥
येर वाग्जाळ मायेचा अहंकार ॥ वचनाशी थार अज्ञान तें ॥ २ ॥
फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ ॥ उपनांवें मूळ न पालटे ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघे गव्हांचे प्रकार ॥ सोनें अलंकार मिथ्या नांव ॥ ४ ॥

॥ ३ ॥

आपुलें आपण जाणावें स्वहित ॥ जेणें राहे चित्त समाधान ॥ १ ॥
बहुरंगें माया असे विखुरली[2] ॥ कुंठितचि चाली होतां बरी ॥ २ ॥
पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं ॥ भाव विश्वंभरीं समर्पावा ॥ ३ ॥
तुका म्हणे गेला फिटोनियां भेव[3] ॥ मग होतो देव मनाचाची ॥ ४ ॥

॥ ४ ॥

मान अपमान गोवे ॥ अवघे गुंडूनी[4] ठेवावे ॥ १ ॥
हेंचि देवाचें दर्शन ॥ सदा राहे समाधान ॥ २ ॥
शांतीची वसती ॥ तेथें खुंटे काळगती ॥ ३ ॥
आली ऊर्मी साहे ॥ तुका म्हणे थोडें आहे ॥ ४ ॥

॥ ५ ॥

देह हा सादर पहावा निश्चित ॥ सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥
ब्रह्म जे देखणें द्वैत जेव्हां गेलें ॥ शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ २ ॥
यजन याजन तप व्रतें करिती ॥ विकल्पें नागविती शुद्ध पुण्या ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व सुख एथें आहे ॥ भ्रांति दूर पाहें टाकूनियां ॥ ४ ॥

॥ ६ ॥

सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा ॥ न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥
सत्यवादी करी संसार सकळ ॥ अलिप्त कमळ जळीं जैसें ॥ २ ॥

---

२ पसरली ३ भीति, संशय ४ गुंडाळून

घडे ज्या उपकार भूतांचि ते दया ॥ आत्मस्थिति तया अंगी वसे ॥ ३ ॥
न बोले गुणदोष नाइके जो कानीं ॥ वर्तोनि तो जनी जनार्दन ॥ ४ ॥
तुका म्हणे वर्म जाणितल्याविण ॥ पावे करितां सीण सांडीमांडी[५] ॥५॥

॥ ७ ॥

पंडित तो भला ॥ नित्य भजे जो विठ्ठला ॥ १ ॥
अवघें सम ब्रह्म पाहे ॥ सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥
रिता नाहीं कोणी ठाव ॥ सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि दास ॥ त्या देखिल्या जाती दोष ॥ ४ ॥

॥ ८ ॥

ठेवा जाणीव[६] गुंडून ॥ तेथें भावचि प्रमाण ॥ १ ॥
एका अनुसरल्या काज ॥ अवघें जाणे पंढरिराज ॥ २ ॥
होणें[७] तर्कवितर्कासि ॥ वाव नलगे सायासासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भावाविण ॥ अवघा बोलती तो सीण ॥ ४ ॥

॥ ९ ॥

होईल जाला अंगें देव जो आपण ॥ तयासी हे जन अवघे देव ॥ १ ॥
येरांनी सांगावी रेमट[८]–कहाणी ॥ चित्ता रंजविणी करावया ॥ २ ॥
धाला आणिकांची नेणे तान भूक ॥ सुखें पाहे सुख आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे येथे पाहिजे अनुभव ॥ शब्दांचें[९] गौरव कामा नये ॥ ४ ॥

॥ १० ॥

मृगजळा काय करावा उतार ॥ पावावया पार पैलथडी ॥ १ ॥
खापराचे होन[१०] खेळती लेंकुरें ॥ कोण त्या वेव्हारें लाभ हानी ॥ २ ॥
मंगळदायकें[११] करिती कुमारी ॥ काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥

---

५ खटपट ६ ज्ञान, शब्दपांडित्य ७ भाव असला म्हणजे तर्कवितर्कास अवकाश मिळत नाही व खटपटीचीही जरूर पडत नाही ८ कटाळवाणी गोष्ट ९ शब्दपांडित्य १० एक प्रकारचें नाणें ११ लग्नादि मंगल कृत्ये

स्वप्नींचें जें सुख दुःख जालें कांहीं ॥ जागृती तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥
सारी झाली मेलीं लटिकें वचन ॥ बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

॥ ११ ॥

भक्ति ते नमन वैराग्य तो त्याग ॥ ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥
देहाच्या निरासें पाविजे या ठाया ॥ माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥
उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक ॥ एकाविण एक कामा नये ॥ ३ ॥
तुका म्हणे मज कळते चांचणी ॥ बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

॥ १२ ॥

तरुवर बीजापोटीं ॥ बीज तरुवरासेवटीं ॥ १ ॥
तैसें तुम्हां आम्हां जालें ॥ एकी एक समावलें ॥ २ ॥
उदकावरील तरंग ॥ तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥
तुका म्हणे बिंबच्छाया ॥ ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

॥ १३ ॥

कां रे तुम्ही ठेवा बहुतां निमित्तें ॥ माझिया संचितें[१२] वोढवलें ॥ १ ॥
भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं ॥ आनंद अंतरीं येणें झाला ॥ २ ॥
पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें ॥ जगाचि भरले ब्रह्मानंदें ॥ ३ ॥
तुका म्हणे केलों कामनेवेगळा ॥ आवडी गोपाळावरी वसे ॥ ४ ॥

॥ १४ ॥

हेचि थोर भक्ति आवडते देवा ॥ संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें ॥ चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ ॥ भोगणें तें फळ संचिताचें ॥ ३ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार ॥ वाहूं हा संसार देवापाईं ॥ ४ ॥

॥ १५ ॥

रूपीं जडले लोचन ॥ पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥
देहभाव हरपला ॥ तुज पाहतां विठ्ठला ॥ २ ॥

---

१२ पूर्वजन्मींचें कर्म

कळों नेदी सुख दुःख ॥ तान हरपली भूक ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे परती ॥ तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

॥ १६ ॥

लवण मेळवितां जळें ॥ काय उरलें निराळें ॥ १ ॥
तैसा समरस जालों ॥ तुजमाजी हरपलों ॥ २ ॥
अग्नि कर्पूराच्या मेळीं[१३] ॥ काय उरली काजळी ॥ ३ ॥
तुका म्हणे होती ॥ तुझी माझी एक ज्योती ॥ ४ ॥

॥ १७ ॥

बोलणेंचि नाहीं ॥ आतां देवाविण कांही ॥ १ ॥
एकसरें केला नेम ॥ देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥
पाहेन ते पाय ॥ जोंवरि हे दृष्टि धाय[१४] ॥ ३ ॥
तुका म्हणे मनें ॥ हाचि संकल्प वाहाणें ॥ ४ ॥

॥ १८ ॥

थुंकोनियां मान ॥ दंभ, करितों कीर्तन ॥ १ ॥
झालों उदासीन देहीं ॥ एकाविण चाड नाही ॥ २ ॥
अर्थ अनर्थासारिखा ॥ करूनि ठेविला पारिखा ॥ ३ ॥
उपाधिवेगळा ॥ तुका राहिला सोंवळा ॥ ४ ॥

## नाममहिमा

॥ १ ॥

नाशवंत देह नासेल हा जाण ॥ कां रे उच्चारीना वाचे नाम ॥ १ ॥
नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी ॥ नामें हे वैकुंठीं बैसविले ॥ २ ॥
नामापरतें सार नाही त्रिभुवनीं ॥ तें कां तुम्ही मनीं आठवाना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम वेदांसी आगळें ॥ तें दिलें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

---

१३ मिलाफात १४ तृप्त होय

॥ २ ॥

नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म ॥ त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥
आणिकें दुरावली करितां खटपट ॥ वाउगे बोभाट वर्माविण ॥ २ ॥
रामनामीं जिहीं धरिला विश्वास ॥ तिही भवपाश तोडियेले ॥ ३ ॥
तुका म्हणे केलें कळिकाळ ठेंगणें[1] ॥ नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ४ ॥

॥ ३ ॥

ब्रह्म रस घेई काढा ॥ येणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें ॥ आणिक वाचे न सेवी ॥ २ ॥
भवरोगा ऐसें जाय ॥ आणिक काय क्षुल्लकें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा ॥ आणिक कदा भूतांची ॥ ४ ॥

॥ ४ ॥

कर्म धर्म नव्हती सांग ॥ उण्या अंगें पतन ॥ १ ॥
भलत्या[2] काळें नामावळी ॥ सुलभ भोळी भाविकां ॥ २ ॥
प्रायश्चित्तें पडती पायां ॥ गाती तया वैष्णवां ॥ ३ ॥
तुका म्हणे नुपजे दोष ॥ करा घोष आनंदें ॥ ४ ॥

॥ ५ ॥

जेथें आठवती स्वामीचे ते पाय ॥ उत्तम तो ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥
रान अथवा घर एकांत लोकांत ॥ समाधान चित्त ते ते घडी ॥ २ ॥
धन्य तो हा काळ खरें आनंदरूप ॥ वाहतां संकल्प गोविंदाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभकाळ तेंचि जीणें ॥ भाग्य नारायण उत्तम तें ॥ ४ ॥

॥ ६ ॥

निजल्यानें गातां उभा नारायण ॥ बैसतां कीर्तन करितां डोले ॥ १ ॥
उभा राहोनियां मुखीं नाम वदे ॥ नाचे हा गोविंद नाना छंदें ॥ २ ॥

---

१ तुच्छ २ कोणत्याही काळीं

मारगीं चालतां मुखीं नाम वाणी ॥ उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी ॥ प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥४॥

॥ ७ ॥

आनंदें कीर्तन कथा करी घोष ॥ आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥
मज या आवडे वैष्णवांचा संग ॥ तेथें नाहीं लाग[3] कळिकाळा ॥ २ ॥
स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका ॥ रामकृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥
विचारितां दुजें वाटे मज लाज ॥ उपदेशें काज आणिक नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे चित्त रंगलेंसे ठायीं ॥ माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ८ ॥

दया क्षमा शांति ॥ तेथें देवाची वसती ॥ १ ॥
पावे धांवोनियां घरा ॥ राहे धरोनियां थारा ॥ २ ॥
कीर्तनाचे वाटे ॥ बराडिया[4] ऐसा लोटे ॥ ३ ॥
तुका म्हणे घडे ॥ पूजा नामें देव जोडे ॥ ४ ॥

॥ ९ ॥

लटिकें तें ज्ञान लटिकें ते ध्यान ॥ जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥ १ ॥
लटिकेंचि दंभ घातलें दुकान ॥ चाळविले जन पोटासाठीं ॥ २ ॥
लटिकेंचि केलें वेदपारायण ॥ जरि नाहीं स्फुंदन प्रेमकथे ॥ ३ ॥
लटिकें तें तप लटिका तो जप ॥ आळस निद्रा झोंप कथाकाळीं ॥ ४ ॥
नाम आवडे तो करील बाहेरी ॥ नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसीं गर्जती पुराणें ॥ शिष्टांची वचनें मागिलाही ॥ ६ ॥

॥ १० ॥

नामाचें चिंतन प्रकट पसारा ॥ असाल तें करा जेथें तेथें ॥ १ ॥
सोडवील माझा स्वामी निश्चयेसीं ॥ प्रतिज्ञा हे दासीं केली आम्हीं ॥२॥

---

३ अवसर, ठिकाण ४ आधाशासारखा

गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं ॥ प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ ३ ॥
तुका म्हणे कडु वाटतो प्रपंच ॥ रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ४ ॥

## संत

॥ १ ॥

जे कां रंजले गांजले ॥ त्यांसि म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोचि साधु ओळखावा ॥ देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत[1] ॥ तैसें सज्जनांचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपंगिता[2] नाहीं ॥ त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें जे पुत्रासी ॥ तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती ॥ तोचि भगवंताची मूर्ति ॥ ६ ॥

॥ २ ॥

हिरा ठेवितां ऐरणीं ॥ वाचे मारितां जो घणी ॥ १ ॥
तोचि मोल पावे खरा ॥ करणीचा[3] होय चुरा ॥ २ ॥
मोहरा तोचि अंगें ॥ सूत न जळे ज्याच्या संगें ॥ ३ ॥
तुका म्हणे तोचि संत ॥ सोसी जगाचे आघात ॥ ४ ॥

॥ ३ ॥

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास ॥ गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥
विषय तो त्यांचा जाला नारायण ॥ नावडे धन जन मातापिता ॥ २ ॥
निर्वाणी गोविंद असे मागें पुढें ॥ कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य ॥ घातलिया भय नर्का जाणें ॥ ४ ॥

॥ ४ ॥

शुद्धबीजापोटीं ॥ फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
मुखीं अमृताची वाणी ॥ देह देवाचे कारणीं ॥ २ ॥

---

१ लोणी २ रक्षण कर्ता ३ कृत्रिम, बनावटी हिऱ्याचा

सर्वांग निर्मळ ॥ चित्त जैसें गंगाजळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती ॥ ताप दर्शनें विश्रांती ॥ ४ ॥

॥ ५ ॥

गंगाजळा पाहीं पाठीं पोटी नाही ॥ अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥
रवि दीप काळिमा काय जाणे हिरा ॥ आणिकां तिमिरां नाश तेणें ॥२॥
कर्पूरकांडणी काय कोंडा कणी ॥ सिंधु मिळवणीं काय चाले ॥ ३ ॥
परिस चिंतामणी आणिकांच्या गुणीं ॥ पालटे लागोनि नव्हे तैसा ॥४॥
तुका म्हणे तैसे जाणा संतजन ॥ सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ५ ॥

॥ ६ ॥

संतांचा महिमा तो बहु दुर्गम ॥ शाब्दिकांचें काम नाहीं तेथें ॥ १ ॥
बहू दुधड[४] जरी झाली म्हैस गाय ॥ तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण ॥ तरीच माहिमान येईल कळों ॥ ३ ॥

॥ ७ ॥

भुंकुनियां सुनें[५] लागे हस्तीपाठीं ॥ होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें ॥ आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड विटवी पंचानना[६] ॥ घेतलें मरणा धरणें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे संतां पीडितील खळ ॥ घेती तोंड काळें करूनीयां ॥४॥

॥ ८ ॥

नाहीं संतपण मिळत हें हाटीं[७] ॥ हिंडतां कपाटीं[८] रानीं वनीं ॥ १ ॥
नये मोल देतां धनाचिया राशी ॥ नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥२॥
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं ॥ नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

॥ ९ ॥

नलगे चंदना सांगावा परिमळ ॥ वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ १ ॥
अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी ॥ धरितांही परी आवरेना ॥ २ ॥

---

४ दुधाळ ५ श्वान, कुत्रें ६ सिंहाला ७ दुकानात, बाजारात ८ गुहेंत

सूर्य नाहीं जागें करीत या जना ॥ प्रकाश किरणा कर म्हूण[९] ॥ ३ ॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें ॥ लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥

॥ १० ॥

सोनियाचा कळस ॥ माजी भरिला सुरारस ॥ १ ॥
काय करावें प्रमाण ॥ तुम्ही सांगा संतजन ॥ २ ॥
मृत्तिकेचा घट ॥ माजी अमृताचा सांठ ॥ ३ ॥
तुका म्हणे हित ॥ तें मज सांगावें त्वरित ॥ ४ ॥

॥ ११ ॥

चंदनाचे हात पायही चंदन ॥ परिसा नाही हीन कोणी अंग ॥ १ ॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार ॥ सर्वांगें साकर अवघी गोड ॥ २ ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून ॥ पाहातां अवगुण मिळेचि ना ॥ ३ ॥

॥ १२ ॥

जिचें पीडे बाळ ॥ प्राण तियेचा विकळ ॥ १ ॥
ऐसा मातेचा स्वभाव ॥ सूत्र दोरी एक जीव ॥ २ ॥
सुखाची विश्रांति ॥ उमटे मातेचिये चित्तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे संत ॥ तुम्ही बहु कृपावंत ॥ ४ ॥

॥ १३ ॥

कल्पतरु त्या नव्हती बाभुळा ॥ पुरविती फळा इच्छातिया ॥ १ ॥
उदंड त्या गायी म्हैशी आणि शेळ्या ॥ परि त्या निराळ्या कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे देव दाखवील दृष्टी ॥ तयासवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

॥ १४ ॥

पुनीत केले विष्णुदासी ॥ संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥
कोण पाहे तयांकडे ॥ वीर विठ्ठलाचे गाढे[१०] ॥ २ ॥

---

९ म्हणून १० बलवान्, पराक्रमी

अशुभ त्यांपुढें ॥ शुभ होऊनियां ठाके ॥ ३ ॥
प्रेमसुखाचिया रासी ॥ पाप नाही ओखदासी ॥ ४ ॥
तुका म्हणे त्यांनीं ॥ केली वैकुंठ मेदिनी ॥ ५ ॥

॥ १५ ॥

मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास ॥ कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असों निजोनियां जागे ॥ जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥
मायबापाहूनी बहु मायावंत ॥ करूं घातपात शत्रूहूनी ॥ ३ ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें ॥ विष तें बापुडें कडू किती ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड ॥ जया पुरे कोड त्याचेपरी ॥ ५ ॥

॥ १६ ॥

कोण्या पुण्यें यांचा होईन सेवक ॥ जींहीं द्वंद्वादिक[११] दुराविलें ॥ १ ॥
ऐसें वर्म मज दावीं नारायणा ॥ अंतरीच्या खुणा प्रकटोनी ॥ २ ॥
वहु अवघड असे संतभेटी ॥ तरि जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥
तुका म्हणे मग नये वृत्तीवरी ॥ सुखाचे शेजारी पहुडेन ॥ ४ ॥

॥ १७ ॥

काय वाणूं आतां न पुरे ही वाणी ॥ मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपुली परिसें ॥ नेणे शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति ॥ देह कष्टविती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां ॥ आपुल्या ममता नाही देहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख पराचिया सुखें ॥ अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

॥ १८

जाणे भक्तिचा जिव्हाळा[१२] ॥ तोचि दैवाचा पुतळा ॥ १ ॥
आणीक नये माझ्या मना ॥ हो कां पंडित शाहाणा ॥ २ ॥

---

११ द्वैतभाव १२ मर्म

नामरूपी जडलें चित्त ॥ त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥
तुका म्हणे नवविध ॥ भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ४ ॥

॥ १९ ॥

अग्निमाजी गेलें ॥ अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥
काय उरलें तया पण ॥ मागील तें नाम गुण ॥ २ ॥
लोह लागे परिसा अंगी ॥ तोही भूषण झाला जगी ॥ ३ ॥
सरिता ओहळ ओघा ॥ गंगे मिळोनि झाल्या गंगा ॥ ४ ॥
चंदनाच्या वासें ॥ तरु चंदन झाले स्पर्शें ॥ ५ ॥
तुका जडला संतांपायीं ॥ दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

॥ २० ॥

लेकरा लेववी माता अलंकार ॥ नाही अंतपार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन ॥ आजि संतजन मायबाप ॥ २ ॥
आरुष[13] उत्तरी संतोषे माउली ॥ कवळूनि घाली हृदयांत ॥ ३ ॥
पोटी आलें त्याचे नेणे गुणदोष ॥ कल्याणचि असे असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाचिये सोई ॥ ओघें गंगा काई परतों जाणें ॥ ५ ॥
तुका म्हणे कोठें उदार मेघा शक्ति ॥ माझी तृषा किती चातकाची ॥ ६ ॥

॥ २१ ॥

संतांचिये गांवी प्रेमाचा सुकाळ ॥ नाही तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक ॥ घालितील भीक तेचि मज ॥ २ ॥
संतांचिया गांवीं वरो[14] भांडवल ॥ अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान ॥ करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेंठ ॥ प्रेमसुख साठ घेती देती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी ॥ म्हणोनि भिकारी झालों त्यांचा ॥ ६ ॥

१३ आर्ष, कठोर १४ पुष्कळ

## दुर्जननिषेध

॥ १ ॥

शब्दा नाहीं धीर ॥ ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥
त्याचें न व्हावें दर्शन ॥ खळापंगतीं भोजन ॥ २ ॥
संतांस जो निंदी ॥ अधम लोभासाठीं वंदी ॥ ३ ॥
तुका म्हणे पोटीं ॥ भाव आणिक जया होटीं ॥ ४ ॥

॥ २ ॥

रासभ धुतला महा तीर्थामाजी ॥ नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥
तेवी खळा काय केला उपदेश ॥ नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजिलें शर्करापीयूष ॥ अंतरीचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन ॥ सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

॥ ३ ॥

जेवीं नवज्वरें तापलें शरीर ॥ लागे तया क्षीर विषतुल्य ॥ १ ॥
तेवीं परमार्थ जिहीं दुराविला ॥ तयांलागीं झाला सन्निपात ॥ २ ॥
कामिनी[1] जयाच्या जाहाली नेत्रासी ॥ देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ ३ ॥
तुका म्हणे मद्यपानाची आवडी ॥ न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

॥ ४ ॥

दर्पणासी[2] बुजे ॥ नकटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥
गुण ज्याचे जो अंतरीं ॥ तोचि त्यासी पीडा करी ॥ २ ॥
चोरा रुचे निशी ॥ देखोनियां विटे शशी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन ॥ देवा असे भाग्यहीन ॥ ४ ॥

॥ ५ ॥

दुबळें सदैवा ॥ म्हणे नागवेल केव्हां ॥ १ ॥
आपणा ऐसें करूं पाहे ॥ स्वभावासी करील काये ॥ २ ॥

---

१ कावीळ, कमला, एक प्रकारचा नेत्ररोग आहे  २ आरशाला

मूढ सभेआंत ॥ इच्छी पंडिताचा घात ॥ ३ ॥
गांढें[3] देखूनियां शूरा ॥ उगें करिती बुरबुरा ॥ ४ ॥
आणिकांचा हेवा ॥ करीं शरण जाई देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे किती ॥ करूं दुष्टांची फजिती ॥ ६ ॥

॥ ६ ॥

ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला ॥ कुसंगें नाडला साधु तैसा ॥ १ ॥
ओढाळाच्या संगें सात्विकें नासलो ॥ क्षण एक नाडलीं समागमें ॥ २ ॥
डांकाचे संगती सोनें हीन झालें ॥ मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥ ३ ॥
विषानें पक्वान्नें गोड कडू झाली ॥ कुसंगानें केली तैसी परी ॥ ४ ॥
भावें तुका म्हणे सत्संग हा बरा ॥ कुसंग हा फेरा चौऱ्यांशीचा ॥ ५ ॥

॥ ७ ॥

वाइटानें भलें ॥ हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥
एकाविण एका ॥ कैंचें मोल होतें फुका ॥ २ ॥
विषें दाविलें अमृत ॥ कडू गोड घातें हित ॥ ३ ॥
काळिमेनें ज्योती ॥ दिवसें कळों आली राती ॥ ४ ॥
उंच निंच गारा ॥ हिरा परिस मोहरा ॥ ५ ॥
तुका म्हणे भले ॥ ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

## जनांस उपदेश

॥ १ ॥

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें ॥ उदास विचारें वेंच करी ॥ १ ॥
उत्तमचि गती तो एक पावेल ॥ उत्तम भोगील जीव खाणी ॥ २ ॥
परउपकारी नेणे परनिंदा ॥ परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥

३ बलहीन

भूतदया गाई पशूंचें पालन ॥ तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट ॥ वाढवो महत्त्व वडिलांचें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें[1] फळ ॥ परमपद बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

॥ २ ॥

साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं ॥ तयासी शेवटीं करबाडें[2] ॥ १ ॥
मालाचे पैं पेटे वाहताती उंटें ॥ तयांलागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥
वाउगा हा धंदा आशा वाढविशी ॥ बांधोनियां घेसी यमहातीं ॥ ३ ॥
ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी ॥ येर तीं बापुडीं सिणलीं वांयां ॥ ४ ॥
तुका म्हणे शहाणा होईं रे गव्हारा ॥ चौऱ्यांशीचा फेरा फिरों नको ॥ ५ ॥

॥ ३ ॥

अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक ॥ तरि कां हे पाक घरोघरीं ॥ १ ॥
आपुलालें तुम्ही करा रे स्वहित ॥ वाचे स्मरा नित्य राम राम ॥ २ ॥
देखोनि जीवन जरि जाय तान ॥ तरि कां सांठवण घरोघरीं ॥ ३ ॥
देखोनियां छाया सुख न पवीजे ॥ जंव न बैसीजे तया तळीं ॥ ४ ॥
सुख तरि होय गातां आइकतां ॥ जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ५ ॥
तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त ॥ काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ६ ॥

॥ ४ ॥

कां रे नाठविसी कृपाळु देवासी ॥ पोशितो जगासी एकला तो ॥ १ ॥
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती ॥ वाढवी श्रीपति सवें दोन्ही ॥ २ ॥
फुटती तरुवर उष्णकाळमासीं ॥ जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता ॥ राहें त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर ॥ त्याचें निरंतर ध्यान धरीं ॥ ५ ॥

---

१ गृहस्थाश्रमाचें २ कडबा

॥ ५ ॥

पायां घालुनियां दोरी ॥ भृंग बांधिला लेंकुरीं ॥ १ ॥
तैसा पावसी बंधन ॥ मग सोडवील कोण ॥ २ ॥
गळां बांधोनियां दोरी ॥ वानर हिंडवी दारोदारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहें ॥ रीस धापा देत आहे ॥ ४ ॥

॥ ६ ॥

तुळसीवृन्दावनीं उपजला कांदा ॥ नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥
तैसे वंशामध्यें झाले जे मानव ॥ जाणावे दानव अभक्त ते ॥ २ ॥
केवड्यामधील निर्गंध कणसें ॥ तैसीं ती माणसें भक्तिहीन ॥ ३ ॥
तुका म्हणे जेवीं चंदनांतील आळी ॥ न चढे निढळीं देवाचीया ॥ ४ ॥

॥ ७ ॥

बरवे दुकानीं बैसावें ॥ श्रवण मनन असावें ॥ १ ॥
सारअसाराचीं पोतीं ॥ ग्राहक पाहोनि करा रितीं ॥ २ ॥
उगेचि फुगवूं नका गाल ॥ पूर्ण सांठवावा माल ॥ ३ ॥
सत्य तराजू पैं धरा ॥ नका कृत्रिम विकरा ॥ ४ ॥
तुका जाला वाणी ॥ चुकवुनि चौऱ्यांशीच्या खाणी ॥ ५ ॥

॥ ८ ॥

भरणी आली मुक्त पेठा ॥ करा लाटा व्यापार ॥ १ ॥
उधार घ्यारे उधार घ्यारे ॥ अवघे या रे जातीचे ॥ २ ॥
येथें पंक्तिभेद नाही ॥ मोठें कांहीं लहान ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ घ्यावा ॥ मुद्दल भावा जतन ॥ ४ ॥

॥ ९ ॥

वैद्य वांचविती जीवा ॥ तरि कोण ध्यातें देवा ॥ १ ॥
काय जाणों कैसी परी ॥ प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ २ ॥

अंगीं दैवत संचरे ॥ मग तेथें काय उरे ॥ ३ ॥
नवसें कन्यापुत्र होती ॥ तरि कां करणें लागे पती ॥ ४ ॥
जाणे हा विचार ॥ स्वामी तुकयाचा दातार ॥ ५ ॥

॥ १० ॥

चंदनाचे गांवी सर्पांची वसती ॥ भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥
एका ओझें एका लाभ घडे देवा ॥ संचिताचा ठेवा वेगळाला ॥ २ ॥
क्षीराची वसति अशुद्ध सेवावें ॥ जवळी तें जावें भोगें दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड ! ॥ त्याहुनी दगड बरे देवा ॥ ४ ॥

॥ ११ ॥

याचि नांवें दोष ॥ राहे अंतरीं किल्मिष[३] ॥ १ ॥
मना अंगीं पुण्य पाप ॥ शुभ उत्तम संकल्प ॥ २ ॥
बीजाऐसीं फळें ॥ उत्तम कां अमंगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त ॥ शुद्ध करावें हें हित ॥ ४ ॥

॥ १२ ॥

आली सिंहस्थपर्वणी ॥ न्हाव्या भटा झाली धणी ॥ १ ॥
अंतरीं पापाच्या कोडी ॥ वरी वरी बोडी डोई दाढी ॥ २ ॥
बोडिलें तें निघालें ॥ काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची काय खुण ॥ नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्तिभावेंविण ॥ तुका म्हणे अवघा सीण ॥ ५ ॥

॥ १३ ॥

कावळ्याच्या गळा मुक्ताफळमाळा ॥ तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥
गजालागीं केला कस्तूरिचा लेप ॥ तिचें तो स्वरूप काय जाणे ॥ २ ॥

---

३ पातक

बकापुढें सांगे भावार्थवचन ॥ वाउगाची सीण होय त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसे अभाविक जन ॥ त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ४ ॥

॥ १४ ॥

चित्त समाधानें ॥ तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥
बहु खोटा अतिशय ॥ जाणा भले सांगों काय ॥ २ ॥
मनाच्या तळमळें ॥ चंदनेंही अंग पोळे ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजा ॥ उपचार पीडा पूजा ॥ ४ ॥

॥ १५ ॥

नाहीं निर्मळ जीवन ॥ काय करील साबण ॥ १ ॥
तैसी चित्तशुद्धि नाही ॥ तेथें बोध करील काई ॥ २ ॥
वृक्ष न धरी पुष्प फळ ॥ काय करील वसंतकाळ ॥ ३ ॥
वांझे न होती लेंकुरें ॥ काय कीजे त्या भ्रतारें ॥ ४ ॥
नपूंसका पुरुषासी ॥ काय करील बाईल त्यासी ॥ ५ ॥
प्राण गेलिया शरीर ॥ काय करील वेव्हार ॥ ६ ॥
तुका म्हणे जीवनेंविण ॥ पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

॥ १६ ॥

आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ ॥ त्याचें याति कुळ काय कीजे ॥ १ ॥
उकिरड्यावरी वाढली तुळसी ॥ टाकावी ते कैसी ठायागुणें[4] ॥ २ ॥
गाईचा जो भक्ष अमंगळ खाया ॥ तिचें दुध काय सेवूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे काय सलपटासी काज ॥ फणसांतील बीज काढूनि घ्यावें ॥ ४ ॥

॥ १७ ॥

क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं ॥ दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥
तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि ॥ जाय तो विझोनि आपसया[5] ॥ २ ॥
तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित ॥ धरा अखंडित सुखरूप ॥ ३ ॥

---

४ स्थानदोषास्तव ५ आपोआप

॥ १८ ॥

राजा चाले तेथें वैभव सांगातें ॥ हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
कोणी कोणा येथें न मनी जी फुका ॥ कृपेविण एका देवाचिया ॥ २ ॥
श्रृंगारिलें[६] नाहीं तगों येत वरी ॥ उमटे लौकरी जैसें जैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं वसे नारायण ॥ कृपेची ते खूण साम्या येते ॥ ४ ॥

॥ १९ ॥

देव भक्तालागीं करूं नेदी संसार ॥ अंगें वारावार करीतसे ॥ १ ॥
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा ॥ म्हणोनि करंटा करोनि ठेवी ॥ २ ॥
स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा ॥ यालागीं कर्कशा पाठी लावी ॥३॥
तुका म्हणे मज प्रचित आली देखा ॥ आणीक या लोकां काय सांगों ॥४॥

॥ २० ॥

उपदेश भलत्या हातीं ॥ जाणा चित्तीं धरावा ॥ १ ॥
नये जाऊं पात्रावरी ॥ कवटी सार नारळें ॥ २ ॥
स्त्री पुत्र बंदीजन ॥ नारायण स्मरवीतो ॥ ३ ॥
तुका म्हणे रत्नसार ॥ परि उपकार चिंधीचे ॥ ४ ॥

॥ २१ ॥

सुख पाहतां जवापाडें ॥ दुःख पर्वता एवढें ॥ १ ॥
धरीं आठवण ॥ मानीं संतांचें वचन ॥ २ ॥
नेलें रात्रीनें तें अर्धें ॥ बाळपण जरा व्याधें ॥ ३ ॥
तुका म्हणे पुढां ॥ घाणा जुंतीजशी मूढा ॥ ४ ॥

॥ २२ ॥

आतां तरी पुढें हाचि उपदेश ॥ नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
सकळांच्या पायां माझें दंडवत ॥ आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥

---

६ वरकरणी कितीही आव घातला तरी त्याचा टिकाव लागत नाही.

हित तें करावें देवाचें चिंतन ॥ करूनियां मन शुद्ध भावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हित होय तो व्यापार ॥ करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

## दांभिकनिषेध

॥ १ ॥

शिष्याची जो न घे सेवा ॥ मानी देवासारिखें ॥ १ ॥
त्याचा फळे उपदेश ॥ आणिकां दोष उफराटे ॥ २ ॥
त्याचें खरें ब्रह्मज्ञान ॥ उदासीन देहभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सांगें ॥ येोत रागें येती ते ॥ ४ ॥

॥ २ ॥

मुखें बोले ब्रह्मज्ञान ॥ मनीं धन अभिमान ॥ १ ॥
ऐशियाची करितां सेवा ॥ काय सुख होय जिवा ॥ २ ॥
पोटासाठी संत ॥ झाले कलींत बहुत ॥ ३ ॥
विरळा ऐसा कोणी ॥ तुका त्यासी लोटांगणी ॥ ४ ॥

॥ ३ ॥

निंदा स्तुती करवी पोट ॥ सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥
जटा राख विटंबना ॥ धीर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥
शृंगारिलें मढें ॥ जीवेंविण जैसें कुडें ॥ ३ ॥
तुका म्हणे रागें ॥ भलतें चावळे वाउगें ॥ ४ ॥

॥ ४ ॥

नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति ॥ पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥
माझ्या विठोबाचें वर्म आहे दूरी ॥ कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥
यज्ञ याग जप तप अनुष्ठान ॥ राहे ध्येय ध्यान अलीकडे ॥ ३ ॥
तुका म्हणे होय उपरति चित्ता ॥ अंगीं सप्रेमता येणें लागे ॥ ४ ॥

॥ ५ ॥

पंडित म्हणतां थोर सुख ॥ परि तो पाहतां अवघा मूर्ख ॥ १ ॥
काय करावें घोकिलें ॥ वेदपठण वांयां गेलें ॥ २ ॥
वेदीं सांगितलें तें न करी ॥ सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ ३ ॥
तुका देखे जिवीं शिव ॥ हाचि तेथीचा अनुभव ॥ ४ ॥

॥ ६ ॥

महारासी शिवे ॥ कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥
तया प्रायश्चित्त कांहीं ॥ देहत्याग करितां नाहीं ॥ २ ॥
नातळे चांडाळ ॥ त्याचा अंतरीं विटाळ ॥ ३ ॥
ज्याचा संग चित्तीं ॥ तुका म्हणे तो त्या यातीं ॥ ४ ॥

॥ ७ ॥

डोई वाढवूनि केश ॥ भुतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हती संतजन ॥ तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥
मेळवूनि नरनारी ॥ शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मैंद[1] ॥ नाहीं त्यापाशीं गोविंद ॥ ४ ॥

॥ ८ ॥

तोंवरी तोंवरी शोभतील गारा ॥ जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥
तोंवरी तोंवरी शोभती दीपिका ॥ नुगवतां एका भास्करासी ॥ २ ॥
तोंवरी तोंवरी सांगती संताचिया गोष्टी ॥ जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥ ३ ॥

॥ ९ ॥

तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें ॥ जरी हिंडविलें देशोदेशीं ॥ १ ॥
करणीचें कांहीं न मने सज्जना ॥ यावें लागे मना वृद्धांचिया ॥ २ ॥
हिरियासारिखा दिसे शिरगोळा ॥ पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३ ॥

---

१ लबाड, भोदू

देऊनियां भिंग कामाविलें मोतीं ॥ पारखिया हातीं घेतां नये ॥ ४ ॥
तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ ॥ आपुलें हें चित्त आपणा ग्वाही[2] ॥ ५ ॥

॥ १० ॥

बसोनि थिल्लरीं[3] ॥ बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाही देखिला ना ठावा ॥ तोंड पिटी करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें ॥ म्हणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहूनि खर ॥ म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें ॥ तुका म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

॥ ११ ॥

जळो प्रेमा तैसा रंग ॥ जाय उडोनी पतंग ॥ १ ॥
सासू-साठीं रडे सून ॥ भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥
मैंद मुखीचा कोंवळा ॥ भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥
जैसी वृंदावनकाती ॥ उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥
बक ध्यान धरी ॥ सोंग करूनि मासे मारी ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्प डोले ॥ तैसा कथेमाजी खुले ॥ ६ ॥

॥ १२ ॥

बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग ॥ नाहीं झाला त्याग अंतरींचा ॥ १ ॥
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा ॥ मनासी हा ठावा समाचार ॥ २ ॥
जागृतीचा नाही अनुभव स्वप्नीं ॥ जातों विसरूनी सकळ हें ॥ ३ ॥
प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त ॥ केले करी नित्य व्यवसाय ॥ ४ ॥
तुका म्हणे मज भोरप्याची[4] परी ॥ झालें सोंग वरी आंत तैसें ॥ ५ ॥

॥ १३ ॥

आशाबद्ध वक्ता ॥ भय श्रोतयांच्या चित्ता ॥ १ ॥
गातो तेंही नाहीं ठावें ॥ तोंड वासी कांहीं द्यावें ॥ २ ॥

---

२ साक्षी ३ डबक्यात ४ बहुरुप्याची

झालें लोभाचें मांजर ॥ भीक मागे दारोदार ॥ ३ ॥
उभयतां लोभी मन ॥ वायां गेलें तें भजन ॥ ४ ॥
बहिरे मुके एके ठायीं ॥ तैसें झालें तया दोहीं ॥ ५ ॥
माप आणि गोणी ॥ तुका म्हणे रिती दोन्ही ॥ ६ ॥

॥ १४ ॥

मोलें घातलें रडाया ॥ नाहीं असूं आणि माया ॥ १ ॥
तैसा भक्तिवाद काय ॥ रंग बेगडीचा न्याय ॥ २ ॥
वेठी धरिल्या दावी भाव ॥ मागें पळावया पाव ॥ ३ ॥
काजव्याच्या ज्योती ॥ तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

॥ १५ ॥

आंधळयासी जन अवघेचि आंधळे ॥ आपणासी डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्यां विषतुल्य लागे हें मिष्टान्न ॥ तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण ॥ तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

॥ १६ ॥

भाव धरी तया तारील पाषाण ॥ दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
करितां नीट नव्हे श्वानाचें हें पुच्छ ॥ खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करिल तया[५] साखरेचें आळें ॥ बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ ॥ कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

॥ १७ ॥

वाघें उपदेशिला कोल्हा ॥ सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥
अंतीं मरसी तें न चुके ॥ मज कां मारितोसी भुकें ॥ २ ॥

---

५ तया ( कारल्याला ), 'काय कारेलिया' असा पाठभेद आहे तो ज्यास्त ग्राह्य दिसतो.

येरु म्हणे भला भला ॥ निवाड तुझ्या तोंडें जाला ॥ ३ ॥
देह तंव जाणार ॥ घडेल हा उपकार ॥ ४ ॥
येरू म्हणे मनीं ॥ ऐसें जावें समजोनी ॥ ५ ॥
गांठी पडली ठका ठका ॥ त्याचें वर्म बोले तुका ॥ ६ ॥

॥ १८ ॥

दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद ॥ पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
तैसें खळां मुखें न करावें श्रवण ॥ अहंकारें मन विटाळलें ॥ २ ॥
काय करावीं तीं बत्तीस लक्षणें ॥ नाक नाहीं तेणें वायां गेलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी ॥ आपुलिया जैसी संवसर्गें ॥ ४ ॥

॥ १९ ॥

एक तटस्थ मानसी ॥ एक सहजचि आळसी ॥ १ ॥
दोन्ही दिसती सारिखीं ॥ वर्म जाणे तो पारखी ॥ २ ॥
एक ध्यानीं करिती जप ॥ एक बैसुनि घेती झोंप ॥ ३ ॥
एकां सर्वस्वाचा त्याग ॥ एकां पोटासाठीं जाग ॥ ४ ॥
एकां भक्ति पोटासाठी ॥ एकां देवासवें गांठी ॥ ५ ॥
वर्म पोटीं एका ॥ फळें दोन म्हणे तुका ॥ ६ ॥

॥ २० ॥

कासया पाषाण पूजिती पितळ ॥ अष्ट धातु खळ भावहीन ॥ १ ॥
भावचि कारण भावचि कारण ॥ मोक्षाचें साधन बोलियेलें ॥ २ ॥
काय करिल जपमाळा कंठमाळा ॥ करिशी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिशील कुशल गायन ॥ अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ४ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा ॥ तेणें काय देवा योग्य होशी ॥ ५ ॥

॥ २१ ॥

गाचिये अंगी कस्तूरीचा वास ॥ असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥
ाग्यवंत घेती वेचूनियां मोलें ॥ भारवाही मेले वाहतां ओझें ॥ २ ॥
ंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा ॥ भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥
धिकारी येथें घेती हातवटी ॥ परीक्षवंता दृष्टी रत्न जैसें ॥ ४ ॥
ुका म्हणे काय अंधळिया हाती ॥ दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥ ५ ॥

॥ २२ ॥

ोन्यिाचें ताट क्षीरीनें भरिलें ॥ भक्षायाला दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
ुक्ताफळहार खरासी घातला ॥ कस्तुरी सुकराला चोजविली[६] ॥ २ ॥
ादपारायण बधिरा सांगे ज्ञान ॥ तयाची ते खूण काय जाणे ॥ ३ ॥
ुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे ॥ भक्तीचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

॥ २३ ॥

ाका दंतकथा येथें सांगों कोणी ॥ कोरडे ते मानी बोल कोण ॥ १ ॥
नुभव येथें पाहिजे साचार ॥ न चलती चार[७] आम्हांपुढें ॥ २ ॥
ारि कोणी मानी रसाळ बोलणें ॥ नाहीं झाली मनीं ओळखी तों ॥ ३ ॥
नेवडी वेगळें क्षीर आणि पाणी ॥ राजहंस दोन्ही वेगळाली ॥ ४ ॥
ुका म्हणे येथें पाहिजे जातीचें ॥ येरा गाबाळाचें काम नाहीं ॥ ५ ॥

॥ २४ ॥

ादा सर्वकाळ अंतरीं कुटिल ॥ तेणें गळां माळ घालूं नये ॥ १ ॥
यासि नाहीं धर्म दया क्षमा शांति ॥ तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥ २ ॥
यासी न कळे भक्तीचें महिमान ॥ तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ ३ ॥
याचें मन नाहीं लागलें हातासी ॥ तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥
ुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ती ॥ तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

---

६ चोपडली ७ चाळे

॥ २५ ॥

देहीं असोनियां देव ॥ वृथा फिरतो निर्दैव ॥ १ ॥
देव आहे अंतर्यामीं ॥ व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ २ ॥
नाभीं मृगाचे कस्तूरी ॥ व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ ३ ॥
साखरेचें मूळ ऊंस ॥ तैसा देही देव दिसे ॥ ४ ॥
दुधीं असतां नवनीत ॥ नेणें तयाचें मथित ॥ ५ ॥
तुका सांगे मूढजना ॥ देहीं देव कां पहाना ॥ ६ ॥

॥ २६ ॥

स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा ॥ जातकर्मं जाणा वांटीती पैं ॥ १ ॥
तैसें शब्दज्ञान[८] करिती चावटी ॥ ज्ञान पोटासाठी विकूनीयां ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाची भात ॥ जेवूनियां तृप्त कोण झाला ॥ ३ ॥
कागदी लिहीतां नामाची साकर ॥ चाखतां मधूर केवी लागे ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो तैसें ज्ञान-बंड ॥ यमपुरी दंड कठिण आहे ॥ ५ ॥

## भक्तिरहस्य

॥ १ ॥

त्रैलोक्य पाळितां उबगला[१] नाहीं ॥ आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥
पाषाणाचे पोटी बैसला दर्दुर ॥ तया मुखीं चारा कोण घाली ॥ २ ॥
पक्षी अजगर न करी संचित ॥ तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे तया भार घातलिया ॥ उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

॥ २ ॥

भवसिंधूचें काय कोडें ॥ दावी वाट चाले पुढें ॥ १ ॥
तारूं भला पांडुरंग ॥ पाय भिजों नेदी अंग ॥ २ ॥

---

८ वाचाळपणा १ कटाळला

मागें उतरिले बहुत ॥ पैल तीरीं साधुसंत ॥ ३ ॥
तुका म्हणे लाग वेगें ॥ जाऊं तयाचिया मागें ॥ ४ ॥

॥ ३ ॥

गोड नांवें क्षीर ॥ परी साखरेचा धीर[2] ॥ १ ॥
तैसें जाणा ब्रह्मज्ञान ॥ बापुडें[3] तें भक्तीविण ॥ २ ॥
रुची नेदी अन्न ॥ त्यांत नसतां लवण ॥ ३ ॥
अंधळ्याचे श्रम ॥ शिकविल्याचेचि नाम ॥ ४ ॥
तुका म्हणे तारा ॥ नांव तंबुऱ्याच्या सारा ॥ ५ ॥

॥ ४ ॥

सत्यसंकल्पाचा दाता भगवान ॥ सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अलंकार शोभती सकळ ॥ भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीज जाणे कळवळा ॥ व्यापक सकळ ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं चालत तांतडी ॥ आप्तकाळ घडी आल्याविण ॥ ४ ॥

॥ ५ ॥

हरिहरां भेद ॥ नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥
एक एकाचे हृदयीं ॥ गोडी साखरेच्या ठायीं ॥ २ ॥
भेदकासी नाड[4] ॥ एक वेलांटीच आड ॥ ३ ॥
उजवें वामांग ॥ तुका म्हणे एक अंग ॥ ४ ॥

## मुमुक्षूंस बोध

॥ १ ॥

साधकाची[1] दशा उदास असावी ॥ उपाधि नसावी अंतर्बाहीं ॥ १ ॥
लोलुपता काय निद्रेसी जिंकावें ॥ भोजन करावें परिमित ॥ २ ॥

---

२ आवश्यकता ३ निरर्थक ४ अडचण, नड १ मुमुक्षूची

एकांती लोकांती स्त्रियांशीं भाषण ॥ प्राण गेल्या जाण बोलों नये ॥ ३ ॥
संग सज्जनांचा उच्चार नामाचा ॥ घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे ॥ तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥ ५ ॥

॥ २ ॥

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन ॥ आश्रमासी स्थान कोपी[2] गुहा ॥ १ ॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन ॥ हृदयीं नारायण सांठवावा ॥ २ ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं ॥ सावधान बुद्धि इंद्रियें दमी ॥ ३ ॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी ॥ त्रिगुणांची गोवी[3] उगवूनी ॥ ४ ॥

॥ ३ ॥

आशा हे समूळ खाणोनि काढावी ॥ तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥
नाही तरि सुखें असावें संसारीं ॥ फजिती दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनियां जयवंत व्हावें ॥ तेव्हांचि निघावें सर्वांतूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी योगाची तांतडी ॥ आशेची बीबुडी[4] करी आधीं ॥ ४ ॥

॥ ४ ॥

घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान ॥ परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥
निरें[5] कोणापाशीं होय एक रज ॥ तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥
आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही ॥ दंभ तो दुरोनि दिसतसे ॥ ३ ॥
काम क्रोध लोभ शिणवी बहुत ॥ मेळवूनि आंत काळकूट ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें कांहीं हातां नये ॥ आयुष्य मोलें जाये वांयांविण ॥ ५ ॥

॥ ५ ॥

जाऊनियां तीर्था काय तुवां केलें ॥ चर्म प्रक्षाळिलें वरीवरी ॥ १ ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें जालें ॥ भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥

---

२ झोपडी ३ गुता ४ बींमोड, निर्मूलन ५ शुद्ध, निर्भेळ

वृंदावनफळ घोळिलें साकरा ॥ भीतरील थारा मोडेचि ना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाही शांति क्षमा दया ॥ तोंवरी कासया स्फुंदा तुम्ही ॥ ४ ॥

॥ ६ ॥

अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें ॥ हिंवें तोचि तापे जाऊनियां ॥ १ ॥
उदक म्हणे काय या हो मज प्यावें ॥ तृषित तो धांवे सेवावया ॥ २ ॥
काय वस्त्र म्हणे या हो मज नेसा ॥ आपुले स्वइच्छा जग वाढी ॥ ३ ॥
तुक्या स्वामी म्हणे काय मज स्मरा ॥ आपुल्या उद्धारा लागूनियां ॥ ४ ॥

॥ ७ ॥

गंधर्वनगरी क्षण एक रहावें ॥ तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥
खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा ॥ लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ २ ॥
वंध्यापुत्राच्या लग्नाचा सोहळा ॥ आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ ३ ॥
मृगजळ पोहीं घालूनि सज्ञाना ॥ तापलिया जना निववावें ॥ ४ ॥
तुका म्हणे मिथ्या देहेंद्रियकर्मे ॥ ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ५ ॥

॥ ८ ॥

भावें गावें गीत ॥ शुद्ध करूनियां चित्त ॥ १ ॥
जरी व्हावा तुज देव ॥ तरि हा सुलभ उपाव ॥ २ ॥
आणिकांचे कानीं ॥ गुण दोष मना नाणीं ॥ ३ ॥
मस्तक ठेंगणा ॥ करीं संतांच्या चरणा ॥ ४ ॥
वेचीं तें वचन ॥ जेणें राहे समाधान ॥ ५ ॥
तुका म्हणे फार ॥ थोडा करीं उपकार ॥ ६ ॥

## मनास बोध

॥ १ ॥

होऊं नको कांहीं या मना आधीन ॥ नाईकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥
हटियाची[1] गोष्टी मोडून टाकावी ॥ सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥

---

१ हटयोगाची

आपुले आधीन करूनियां ठेवा ॥ नाहीं तरि जीवा घातक हें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाले जे मना आधीन ॥ तयांसी बंधन यम करी ॥ ४ ॥

॥ २ ॥

मन करारे प्रसन्न ॥ सर्व सिद्धीचें कारण ॥ मोक्ष अथवा बंधन ॥ सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥ मनें प्रतिमा स्थापिली ॥ मनें मना पूजा केली ॥ मनें इच्छा पुरविली ॥ मन माउली सकळांची ॥ २ ॥ मन गुरु आणि शिष्य ॥ करी आपुलेंचि दास्य ॥ प्रसन्न आपणास ॥ गति अथवा अधोगति ॥ ३ ॥ साधक वाचक पंडित ॥ श्रोते वक्ते ऐका मात ॥ नाही नाही आन दैवत ॥ तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

॥ ३ ॥

हरिनामवेली पावली विस्तार ॥ फळीं पुष्पीं भार वोल्हावली[२] ॥ १ ॥
तेथें माझ्या मना होईं पक्षीराज ॥ साधावया काज तृप्तीचें या ॥ २ ॥
मुळीचिया बीजें दाखविली गोडी ॥ लवकरची जोडी जालियाची ॥ ३ ॥
तुका म्हणे क्षणक्षणां जातो काळ ॥ गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

॥ ४ ॥

घेईं घेईं माझे वाचे ॥ गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
तुम्ही घ्यारे डोळे सुख ॥ पाहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुम्ही ऐका रे कान ॥ माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना येथें धांव घेईं ॥ राहे विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा ॥ नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

॥ ५ ॥

जरा[३] कर्णमूळीं सांगों आली गोष्टी ॥ मृत्युचिये भेटी जवळ आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होईं सावधान ॥ ॐपुण्याची जाण कार्यसिद्धी ॥ २ ॥

---

२ भारानें लवली ३ म्हातारपण

शेवटील घडी बुडतां न लागे वेळ ॥ साधावा तो काळ जवळी आला ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता ॥ वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ४ ॥

## सामान्य नीति

॥ १ ॥

खरें बोले तरी ॥ फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
ऐसे फुकाचे उपाय ॥ सांडुनियां वायां जाय ॥ २ ॥
परउपकार ॥ एका वचनाचा फार ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ ॥ मने सांडितां शीतळ ॥ ४ ॥

॥ २ ॥

सर्वांभूती द्यावें अन्न ॥ द्रव्य पात्र विचारोन ॥
उपतिष्ठे कारण ॥ तेथें बीज पेरिजे ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप ॥ दुग्ध पाजोनि पोशिला साप ॥
करोनी अघोराचा जप ॥ दुःख विकत घेतलें ॥ २ ॥
भूमि पाहतां नाहीं वेगळी ॥ माळ बरड एक काळी ॥
उत्तम निराळी ॥ मध्यम कनिष्ठ ॥ ३ ॥
म्हणोनि विवेकें ॥ कांहीं करणें तें निकें ॥
तुका म्हणे फिकें ॥ रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

॥ ३ ॥

आलिया भोगासी असावें सादर ॥ देवावरी भार घालूं नये ॥ १ ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें ॥ येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भयाचिये पोटीं दुःखाचिया रासी ॥ शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां ॥ चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

॥ ४ ॥

परिमळ म्हूण चोळूं नये फूल ॥ खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद ॥ यंत्र भेदूनि नाद पाहूं नये ॥ २ ॥
कर्मफळ म्हणुनी इच्छुं नये काम ॥ तुका म्हणे वर्म दावूं नको ॥ ३ ॥

॥ ५ ॥

शांतीपरतें नाही सुख ॥ येर अवघेंची दुःख ॥ १ ॥
म्हणऊनि शांति धरा ॥ उतराल पैल तीरा ॥ २ ॥
खवळलिया कामक्रोधी ॥ अंगीं भरती आधिव्याधी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्रिविध ताप ॥ जाती मग आपेंआप ॥ ४ ॥

॥ ६ ॥

मायबापें जरी सर्पीण कीं बोका ॥ त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी ॥ सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥
तुका म्हणे नरकी घाली अभिमान ॥ जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

॥ ७ ॥

आणिकांच्या घातें मानितां संतोष ॥ सुखदुःखदोष अंगी लागे ॥ १ ॥
ऐसे मनीं वाहूं नयेती संकल्प ॥ करूं नये पाप भांडवल ॥ २ ॥
किल्मिषाची चित्तीं राहतां कांचणी ॥ अग्नींत टाकोनी ठाव जाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे कोपे घडे पुण्यक्षय ॥ होणार तें होय प्रारब्धीचें ॥ ४ ॥

॥ ८ ॥

जेणें वाढे अपकीर्ती ॥ सर्वार्थी तें त्यजावें ॥ १ ॥
सत्य रुचे भलेपण ॥ वचन तें जगासी ॥ २ ॥
होइजेतें शुद्ध त्यागें ॥ वाउगें तें सारावे ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटें वर्म ॥ निंद्य कर्म काळिमा ॥ ४ ॥

॥ ९ ॥

आशाबद्ध तो जगाचा दास ॥ पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥
आहे तें अधीन आपुले हातीं ॥ आणिकां ठेविती काय बोल ॥ २ ॥
जाणतिया पाठीं लागला उपाध ॥ नेणता तो सावध भोजनासी ॥ ३ ॥
तुका म्हणे भय बांधिलेंसे गांठीं ॥ चोर लागे पाठीं दुम तया ॥ ४ ॥

॥ १० ॥

सत्या मान वाढे ॥ गबाळाची चाली खोडे ॥ १ ॥
उतरे तें कळे कसीं[2] ॥ विखरोन सर्वदेशीं ॥ २ ॥
घरामध्यें राजा ॥ नव्हे हो वा पाटपूजा ॥ ३ ॥
तुका म्हणे साचें ॥ रूप तें दर्पणाचें ॥ ४ ॥

॥ ११ ॥

स्वामिकाज गुरुभक्ति ॥ पितृवचन सेवा पति ॥ १ ॥
हेचि विष्णूची महापूजा ॥ अनुभव नाहीं दुजा ॥ २ ॥
सत्य बोले मुखें ॥ दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ ३ ॥
निश्चयाचें बळ ॥ तुका म्हणे तेचि फळ ॥ ४ ॥

---

# ७ मुक्तेश्वर

सुप्रसिद्ध कवि व भगवद्भक्त एकनाथस्वामी याचे मुक्तेश्वर हे नातू होत याच्या ाईचे नाव लीलाबाई व बापाचें नाव चिंतामणि ऊर्फ विश्वंभरबावा. मुक्तेश्वर हे ातीचे देशस्थ ब्राह्मण व पैठणचे रहिवासी होते. हे जन्मत. मुके होते, परंतु कनाथस्वामींच्या प्रसादाने त्यास वाचा फुटली अशी एक दंतकथा आहे. याचा न्म शके १५३१ या वर्षी झाला.

मुक्तेश्वरांनी ‘ महाभारत, ’ ‘ भागवत, ’ ‘ हरिश्चंद्राख्यान, ’ असे ओंवीबद्ध ग्रंथ, ोकबद्ध ‘ रामायण ’ व इतर काहीं फुटकळ प्रकरणे, पदे, आरत्या वगैरे लिहिली ाहेत. यांची वाणी प्रासादिक, प्रसन्न व रसाळ आहे. यांच्या कवितेंत सृष्टिसौंद- ेचीं व उदात्त आणि गंभीर अशा देखाव्याचीं वर्णने ठिकठिकाणीं आढळतात. ाची वर्णन करण्याची हातोटी मार्मिक व हृदयंगम आहे. याची कविता जशी

---

२ कसोटीस

नानाविध अलंकारांनी मंडित आहे, तशी ती रसांनींही ओतप्रोत भरलेली आहे. यांची विचारसरणी उदात्त व प्रौढ असून, शब्दचमत्कारापेक्षा अर्थमाधुर्याकडे यांचें लक्ष विशेष आहे. एकंदरीत सहृदयता, माधुर्य, मार्दव, मोहक व मार्मिक वर्णनशैली, सरस-रमणीयता, प्रतिभा व ईश्वरी प्रसाद वगैरे खऱ्या कवित्वशक्तीचे अवश्य ते गुण मुक्तेश्वरामध्ये पूर्णपणे होते व म्हणूनच त्यास मराठी कविमालिकेत श्रेष्ठत्व प्राप्त झालें आहे.

## कश्यपारण्यांतील देखावा

तेथें चंदन पारिजात ॥ देवदार केतकी सुपुष्पित ॥ तुळसीवनें सुशोभित ॥ दवनें वनें घमघमिती ॥ १ ॥ सरिता–सरोवरींचीं पैं जळें ॥ पद्मगंधे सुशीतळें ॥ रातोत्पळें[1] नीलोत्पळें ॥ सीतोत्पळें कनकाचीं ॥ २ ॥ तेथें राजहंस कारंडक ॥ चकोर सारस चक्रवाक ॥ करींद्र करिणी करिशावक ॥ स्वेच्छा करिती जलक्रिडा ॥ ३ ॥ मयूर गर्जती किंकारें ॥ कोकिळा गर्जती पंचमस्वरें ॥ षट्पद[2] बोलती झुंकारें ॥ आणि कपोतें कूजती ॥ ४ ॥ सदा सर्वदा पुष्पीं फळीं ॥ वृक्ष लवती भूमंडळीं ॥ जैसा कुलीन ऐश्वर्यकाळीं ॥ विनयें भजे सर्वांतें ॥ ५ ॥ चहूं वेदांचीं पारायणें ॥ अनेक शाखांचीं अध्ययनें ॥ रायें[3] परिसोनि अंतःकरणें ॥ पापक्षयो भाविला[4] ॥ ६ ॥ नदी मालिनी पवित्रजीवनी ॥ वाहे जैसी देवतटिनी[5] ॥ तरंगलिंगें सुफेन[6] सुमनीं ॥ सुपूजित शोभती ॥ ७ ॥ तिच्या तटाकीं असंख्यात ॥ संशितव्रती वानप्रस्थ ॥ श्रौतस्मार्तें[7] विधिनिरत ॥ अनुष्ठानी तपस्वी ॥ ८ ॥ याजकीं[8] रचोनी होमशाळा ॥ होमकुंडीं प्रदीप्त अनळा ॥ हवि[9] होमितां रविमंडळा ॥ धूम भेदिती हविर्गंधें ॥ ९ ॥ द्वादशपंचाग्नी[10] धूम्रपानें ॥ ग्रीष्मीं रविचक्रावलोकनें ॥ वर्षाकाळीं वृष्टी साहणें ॥ शीतकाळीं जलशय्या ॥ १० ॥ एक उभे एकचरणीं ॥ एक वातांबुपर्णाशनी[11] ॥ ऐशा तपोधनांच्या श्रेणी ॥ असंख्यात देखिल्या ॥ ११ ॥ सप्तकोटी महामंत्रें ॥ अनेक पात्रीं

---

१ तांबडी, निळी व पांढरीं उत्पळें (कमळें) २ भृंग ३ दुष्यंत राजानें ४ मानिला ५ देवनदी (गंगा) ६ सुंदर फेंस ७ श्रुतिस्मृतीच्या विधीमध्यें मग्न ८ यज्ञ करणारांनीं ९ आहुति १० अग्निकुंडें पेटवून मधोमध बसून तपश्चर्या करणें, धूम्रपान करणें, इत्यादि तपश्चर्येचे प्रकार या व पुढील ओव्यात वर्णिले आहेत. ११ वायु, पाणी व पानें भक्षण करणारे.

अनेक यंत्रें[१२] ॥ सांग[१३] मंत्रें चतुःषष्टि तंत्रें ॥ मंत्रोपासक पूजिती ॥ १२ ॥ एक मौनी एक स्मरणी ॥ एक साकारमूर्तिध्यानी[१४] ॥ एक आत्मानुसंधानी[१५] ॥ 'सोहमस्मि' या बोधें ॥ १३ ॥ साही[१६] अंगें दशलक्षणें ॥ पाठक करिती वेदपठणें ॥ साम करिती सामगायनें ॥ अति सुस्वरें ते ठायीं ॥ १४ ॥

## अवधीरित[१] शकुंतलेचे दुष्यंतास उद्देशून क्रोधोद्गार

मंत्रबीजाक्षरांच्या ओळी ॥ अबद्ध जपतां भद्रकाळी[२] ॥ क्षोभे, तैसी क्रोधानळीं ॥ अंगार टाकी शब्दांचे ॥ १ ॥ पवित्र विश्वामित्रबाला ॥ शकुंतला अलिकुंतला[३] ॥ म्हणे " कुंतळ[४]–मंडळपाला ! ॥ तूंचि अविचारें जल्पसी ॥ २ ॥ तूं तंव भूचर[५] विचरसी क्षिती ॥ पाहें माझी सख्यां प्रतीती ॥ श्रेष्ठा सावित्री गौरी पार्वती ॥ साक्षी आणीन या ठाया ॥ ३ ॥ अपरसृष्टीचा[६] परमेष्ठी ॥ गाधिज मुनी निंदिसी दोषदृष्टी ॥ हें ऐकोनी काय श्रेष्ठी ॥ श्रेष्ठ तूतें म्हणिजेल ? ॥ ४ ॥ मागें[७] एकासि बोलिजे न्यून ॥ याहून अपराध तो कवण ?॥ विशेष समर्थ तपोधन ॥ निंदितां, अनर्थ रोकडा ॥ ५ ॥ पराचे दोष न बोलतां मुखीं ॥ तो मान्यता पावे उभय लोकीं ॥ विष्णुदूत त्या मस्तकीं ॥ वाहूनि नेती वैकुंठा ॥ ६ ॥ कुरूप न पाहे आरसीं वदन ॥ तोंवरी वाहे रूपाभिमान ॥ देखिल्या म्हणे अपार जन ॥ रूपें विशेष मजहुनी ॥ ७ ॥ वृद्धासि करितां अभिवंदन ॥ साधु होती सुखसंपन्न ॥ करूनि साधूचा

---

१२ इष्ट फल प्राप्तीसाठी विविध प्रकारच्या आकृति काढितात त्यास यंत्रें म्हणतात १३ अंगासह १४ प्रतिमा किंवा मूर्तीचें ध्यान करणारा १५ 'स अहम् अस्मि' तो (आत्मा) मी आहे, अशा ज्ञानाच्या योगानें आत्म्याचें चिंतन करणारा. १६ शिक्षा, छंद, व्याकरण, निरुक्त, कल्प आणि ज्योतिष अशी वेदाची सहा अंगे आहेत.

१ दुष्यंतानें शकुंतलेशी गांधर्वविवाह केला. पुढें त्याच्या घरी कण्वमुनीनें तिला पाठविली असता दुष्यंतानें तिच्याशी विवाह केल्याचें नाकबूल केले व तिची अवधीरणा केली, त्या प्रसंगाचे वर्णन यांत आहे. अवधीरित=अव्हेरलेली २ भद्रकाली देवी ३ भ्रमरासारखे सुंदर काळे केस आहेत जिचे अशी ४ भूमंडळपाला =राजा ५ भूमीवर राहणारा ६ प्रतिसृष्टि उत्पन्न करणारा प्रजापति-विश्वामित्र ७ पाठीमागें, दुसऱ्याच्या पश्चात्

अवमान ॥ परम लाभ दुष्टांतें ॥ ८ ॥ दोष न देखती जे लोकी ॥ ते सर्वत्र सदा सुखी ॥ दोष-दुःखें स्वयेंच दुःखी ॥ दुःख देती पुढिलांतें ॥ ९ ॥ मुख्य साधूचें लक्षण ॥ परदोष न वदे गेलिया प्राण ॥ पैशुन्य बोले कारणेंविण ॥ तोचि दुर्जन दुरात्मा ॥ १० ॥ नरसिंहा[8] ! सोडोनी कपट ॥ मांडिये बैसवी कुमार श्रेष्ठ ॥ सत्व स्वधर्म करी प्रकट ॥ वडील वृद्धां देखतां ॥ ११ ॥ अश्वमेध–शतांचें पुण्य ॥ एकीकडे सत्य वचन ॥ तुळितां सत्य आगळे जाण ॥ मेरुसर्षप दृष्टांतें ॥ १२ ॥ कोटी पुण्यें जोडिलीं यत्नीं ॥ तीं जळती एके असत्य वचनी ॥ जैसी पावकस्फुलिंगकणी[9] ॥ नाशी कर्पूरगिरीतें ॥ १३ ॥ सत्यापरता नाहीं धर्म ॥ सत्य तेंचि परब्रह्म ॥ सत्यापाशीं पुरुषोत्तम ॥ सर्वकाळ तिष्ठत " ॥ १४ ॥

## विदुराचा पांडवांस बोध

कौरवाचा दुष्ट हेतू तडीस न जावा या हेतूने विदुरानी वारणावतास जाण्यास सिद्ध झालेल्या पाडवास हा उपदेश केला.

' प्रज्ञा ' शब्दार्थ ' संकेत जाणे ॥ तो प्राज्ञ ' ऐसें बोलती शहाणे ॥ पराची प्रज्ञा ओळखी मनें ॥ नीतिशास्त्री सोज्ज्वळ ॥ १ ॥ लोहो नव्हे, परी अति तीक्ष्ण ॥ काळीज भेदोनि निवटी[1] प्राण ॥ तें शस्त्र ओळखे, त्या मरण ॥ शत्रुपासाव असेना ॥ २ ॥ विवर गर्भी असतां प्राणी ॥ अग्नीनें अथवा सूर्यकिरणीं ॥ दाहिला न वचे[2], सुजाणीं ॥ जाणितलें पाहिजे ॥ ३ ॥ मार्ग नोळखे चक्षुर्हीन ॥ न कळे दिशा केउती[3] कोण ॥ अधैर्यपुरुषातें कल्याण ॥ उभय लोकीं असेना ॥ ४ ॥ सकामातें न साधे सिद्धि ॥ सुखा न पावे अशांत क्रोधी ॥ अधैर्यवंत ऐश्वर्यपदीं ॥ पावूं न शके सर्वथा ॥ ५ ॥ शत्रुसंबंधी असावधान ॥ आलस्य निद्रा अधैर्य पूर्ण ॥ तेणें आंवतुनियां[4] मरण ॥ निजपालवीं बांधिलें ॥ ६ ॥ अमित्रमुखींचा शब्द सुरस ॥ तो विषकमळाचा सुवास ॥ आलिंगनी मैदपाश ॥ अतुट कंठी शिरकला ॥ ७ ॥ अन्नस्वरूपें कालकूट[5] ॥

---

८ पुरुषश्रेष्ठा ९ अग्नीची ठिणगी

१ नाशी २ वाचत नाहीं ३ कोणती ४ बोलावून ५ विष

गृहस्वरूपें हव्यवाट[६] ॥ द्यूतस्वरूपें पाशकपट ॥ उत्तरोत्तर जाणावें ॥८॥ मन राखोनि सावध वृत्ती ॥ हितोपदेश मानूनि चित्ती ॥ आत्महिताचे गूढ पंथीं ॥ नित्याभ्यासीं वर्तावें ॥ ९ ॥ अहोरात्र अटण करितां ॥ तो रात्रीही न चुके पथा ॥ नक्षत्रज्ञानिया सर्वथा ॥ दिशाभुली न पडेची ॥ १० ॥ हृदयी वर्तला वृत्तांत ॥ तो पंचप्राणांसीच विदित ॥ ज्ञाते आपुला गुह्यार्थ ॥ बाहेर प्रगटो नेदिती ॥ ११ ॥ ध्रुवमंडळ[७] घालूनि पाठीं ॥ अगस्तिचक्र लक्षूनि दृष्टीं ॥ दक्षिण भेदितां जगजेठी ॥ विजयी झाला हनुमंत ॥ १२ ॥ श्रेष्ठ जाणती श्रेष्ठखुण ॥ हृदयीं स्मरतां श्रीकृष्णचरण ॥ अपायकाळी संकटहरण ॥ उपाय येती सामोरे ॥ १३ ॥ मानस धाडिजे कृष्णापासीं ॥ कृष्णचि ठेविजे मानसीं ॥ तेणें अरिष्टें भंगोनि आपैसी ॥ उपाय येती सामोरे ॥ १४ ॥ बुडवितां बुडवूं न शके आप ॥ दंशकर्ते सर्प होती अकोप ॥ विषें मरतया अमूप ॥ अमृत जोडे प्राशनो ॥ १५ ॥ गृही धडकल्या प्रळयाग्नी ॥ विवरमार्ग दे मेदिनी ॥ षडिंद्रियें चक्रपाणी ॥ सत्त्व रक्षी सातवा ॥ १६ ॥ एकटें वनामाजी पडतां ॥ धैर्य देउनी बुडवी व्यथा ॥ अपाय चिंती विष्णुभक्ता ॥ तोचि आधी विनाशे ॥ १७ ॥ रात्री उमजे मार्गरेखा ॥ जळलंघनी सांपडे नौका ॥ आतुडतां[८] राक्षसमुखा ॥ तेथें रक्षी श्रीविष्णु ॥ १८ ॥ संकटीं क्षमा विष्णुस्मरण ॥ तात्काळ त्यासी गुरुदर्शन ॥ गुरुदर्शनें समाधान ॥ आपदा वाटे संपदा ॥ १९ ॥ भंगोनी विघ्नाचा उमाळा ॥ विजय-लक्ष्मी घाली माळा ॥ आत्मपदाचा[९] सोहळा ॥ भगवद्भक्त पावती ॥ २० ॥ तेंचि स्मरण धरितां पोटीं ॥ जगीं स्फुरली चातुर्य गोष्टी ॥ मेघश्याम असतां पाठीं ॥ ताप संताप असेना ॥ २१ ॥

## महारण्यांतील रात्रीचा देखावा[१]

भीमसेन पाहे दृष्टीं ॥ तंव अंधकारें कोंदली सृष्टी ॥ गुल्मलता वृक्षदाटी ॥ तृणें मार्ग लक्षेना ॥ १ ॥ निशाचरी श्वापद पक्षी ॥ थोर गर्जना करिती कक्षीं ॥ ओळकंबलीं महावृक्षीं ॥ अस्वलें आणि वाघुळें

---

६ आहुतीचा, नाशाचा मार्ग ७ नक्षत्रविशेष ८ सापडता ९ आत्मानुभूतीचा आनंद

१ मुक्तेश्वरकृत वनपर्वातील पांडवांच्या वनवासाच्या वर्णनातून हा व पुढील उतारा घेतला आहे.

॥ २ ॥ वनदेवता यक्षिणीपाळें ॥ धुमस घालिती गदारोळें[२] ॥ दीपिका लावूनि भंबाळें ॥ गुप्त होती एकसरां ॥ ३ ॥ प्रेतगण स्मशानवासी ॥ रूपें धरूनि भ्यासुर[४] वेषी ॥ छळिती अशुचि मानवांसीं ॥ झोंबती मांस भक्षावया ॥ ४ ॥ दिवाभीतांचे घुंघाट ॥ पिंगळियांचे किलकिलाट ॥ भालू[५] भुंकती सैराट ॥ टिटवे थोर टिवटिवती ॥ ५ ॥ चक्रवाकांचे आर्तस्वरी ॥ कुमुदीं भ्रमरांचे झुंकारी ॥ मस्तकमणी[६] तेज-विखरी ॥ जीव आहारा शोधिती ॥ ६ ॥ चारिया निघोनि निधानें ॥ धगधगीत प्रकाशमानें ॥ ईश्वरकृपेस्तव पूर्वपुण्यें ॥ येवों म्हणती सभाग्या ॥ ७ ॥ असो, हे निशा दाटली काळी ॥ जेंवी[७] काळपुरुषाची कांबळी ॥ ब्रह्मांडदेवतेवरी सगळी ॥ पांघुरविली आप्तत्वें ॥ ८ ॥

## प्रभातकाल

शेष वेंचतां अठरा घटिका ॥ पूर्व दिशेनें क्षाळिलें मुखा ॥ कुंकुम रेखिलें त्या तिलका ॥ अरुणोदय बोलिजे ॥ १ ॥ भार्गवाचार्य उदया येत ॥ तंव अपार क्रमूनियां पंथ ॥ पुढें जान्हवीजळाचा वात ॥ शीतळ मंद पातला ॥ २ ॥ हस्त आंवरितां कुमुदीं[१] ॥ अवमान मानिला षट्पदी ॥ त्यांतें आदरें कोकनदीं[२] ॥ पाचारिलें जवळिके ॥ ३ ॥ गगनसमुद्रीं मुक्ताफळें ॥ अरुणचंचूनें कनकमराळें[३] ॥ वेंचूनि घेतां कळाकुशळें ॥ नाहींच केलीं नक्षत्रें ॥ ४ ॥ कीं व्योमनर्मदेमाजीं[४] थोर ॥ कार्तवीर्य सहस्रकर[५] ॥ तारा[६] बाणलिंगांचा भार ॥ निवटोनि[७] करी परौता ॥ ५ ॥ कापडी[८] चालिले तीर्थपंथें ॥ 'सोऽहमस्मि' चिंतिती ज्ञाते ॥ भक्त स्मरती हरिहरांतें ॥ प्रेमभावें आवडी ॥ ६ ॥ शाक्त[९] चिंतिती शक्तिप्रतिमा ॥ सौर म्हणती सूर्यचि आत्मा ॥ गाणपत्य गणेशमहिमा ॥ वाखाणिती ब्रह्मत्वें ॥ ७ ॥ प्रातर्होम द्यावया

---

२ भयकर गर्जना करून ३ दिवट्या ४ भयकर ५ कोल्हे ६ नाग ७ हें रात्रीच्या स्वरूपाचें वर्णन फार मार्मिक आहे

१ चद्रकमलानी २ सूर्यकमलानी ३ सुवर्णहसानें, पक्षी, सूर्यानें ४ आकाशरूप नर्मदेंत ५ सूर्य ६ नक्षत्ररूप बाणलिंगें ७ नाशून ८ यात्रेकरू ९ शक्तीचे भक्त, शाक्तपथाचे लोक

जाणा ॥ अग्निहोत्री उठले स्नाना ॥ एक सिद्ध झाले अनुष्ठाना ॥ जपी तपी सुनेमें ॥ ८ ॥

## मैत्रेयाचा दुर्योधनास शाप

अदृश्य होतां व्यास मुनी ॥ मैत्रेय आला तेचि क्षणीं ॥ नमस्कारिला सभास्थानी ॥ भीष्मद्रोणें धृतराष्ट्रें ॥ १ ॥ कौरव नरेंद्र आदरें म्हणे ॥ "पवित्र तीर्थें पुण्यारण्यें ॥ अवलोकुनी येथें येणें ॥ कृपेनें जालें स्वामिया" ॥ २ ॥ मैत्रेय म्हणे धृतराष्ट्रातें ॥ "अवलोकुनी बहुत तीर्थें ॥ काम्यकवना पातलों तेथें ॥ पांडव दृष्टी देखिले ॥ ३ ॥ जटा वल्कलें अजिनांबरी[1] ॥ शीतोष्णपीडा फळाहारी ॥ कष्टतां देखोनि अतरा ॥ खेद अद्भुत उदेला ॥ ४ ॥ तुझिया पुत्रांचा अविवेक ॥ ऐकोनि वाटलें परम दुःख ॥ तिही लोकांमाजी एक ॥ बरवें कोणी न म्हणती ॥ ५ ॥ पुरुषें तंव जगावें जगीं ॥ जंव अपकीर्ति न शिवे अंगीं ॥ आयुष्य तंव तो कुमार्गी ॥ जितची[2] प्रेतासमान ॥ ६ ॥ बरवें न करितां न पवे बरवें ॥ अधर्म केल्यानें केवी पावे ॥ विष भक्षुनि अमर व्हावें ॥ हें अघटित ज्यापरी ॥ ७ ॥ तूं आणि पितामहो[3] ॥ वर्तत असतां पाहा हो ॥ पुत्रीं करावया कलहो ॥ कारण कांहीं असेना ॥ ८ ॥ भीड सोडुनी निजवचनीं ॥ तरी भीष्म अपजयो पावेल रणीं ॥ पुत्रशोकाचा वडवाग्नी ॥ तुज ग्रासील निर्धारें ॥ ९ ॥ तेंवीच म्हणे दुर्योधना ॥ चित्त द्यावें माझिया वचना ॥ स्वल्पासाठीं महाप्राज्ञा ॥ पाप अद्भुत जोडिलें ॥ १० ॥ नश्वर राज्य जोडिलें वेगीं ॥ परि अपकीर्ति जोडिली युगानुयुगीं ॥ कुबुद्धि विषयकुसंगीं ॥ कवण्या दृष्टी गोंविली ॥ ११ ॥ यावरी विरोधव्याधि विषम ॥ संगियासंगीं व्यापला परम ॥ झडले भ्रूलतेचे[4] रोम ॥ सारासार विचारी ॥ १२ ॥ गेले[5] प्रतिष्ठेचे प्राण ॥ उभय लोकीं न दाखवीं वदन ॥ कुश्चित दुर्गुणांचें दर्शन ॥ उघड दिसती जनदृष्टी ॥ १३ ॥ यास औषध देतसें

---

१ कातडयाची वस्त्रे परिधान करणारे २ जीवत असूनही ३ आजा ( भीष्म ) ४ भुवईचे केंस ५ मोठेपणा नष्ट झाला

एक ॥ करावें पांडवांशीं सख्य ॥ तेणें आरोग्य तात्कालिक ॥ हें निश्चयें जाण पां ॥ १४ ॥ जें वर्तलें नाहीं सृष्टी ॥ ऐशी ऐकों तुझी रहाटी ॥ मी साक्षेपें पावलों भेटी ॥ याचि लागी या ठाया ॥ १५ ॥ आतां निर्वैर निजमानसी ॥ सख्यत्व करावें सुहृदांशी ॥ त्यांचा विभाग देऊनी त्यांसी ॥ सुखसंतोषें असावें ॥ १६ ॥ ऐसें न करितां भूपाळा ॥ क्षयो पातला जाण कुळा ॥ अन्यथा असे तरी रविमंडळा॥ पतन हो कां भूमंडळी " ॥ १७ ॥ ऐकोनी मैत्रेयाच्यां वचना ॥ क्रोध नावरे दुर्योधना ॥ आरक्तता पातली वदना ॥ खदिरांगार ज्यापरी ॥ १८ ॥ दुःखें सोडी दीर्घ हुंकार ॥ जैंवी फूत्कारे महा विखार[६] ॥ गजशुंडाकार कर ॥ तेणें जानु ताडिली ॥ १९ ॥ पादांगुष्ठें रेखीत धरणी ॥ सरोष मौन्यें अधोवदनी ॥ हें देखोनी मैत्रेयमुनी ॥ प्रळयानळ[७] क्षोभला ॥ २० ॥ म्हणे " दुर्जना पापरूपा ॥ हित सांगतां आलासि कोपा ॥ आतां घेईं माझ्या शापा ॥ भस्म होशी स्वकुळेशीं ॥ २१ ॥ हेचि मांडी गदाप्रहरी ॥ चूर्ण होईल, रणचत्वारी[८] ॥ पादलत्ता बसतील शिरी ॥ वज्रप्राय भीमाच्या " ॥ २२ ॥

## दमयन्तीचा त्याग

निषध देशाचा राजा नल ह्याचे सर्वस्व ह्याच्या भावाने द्यूतांत हरण केलें व त्याला दमयंतीसह वनवासास धाडिले. नळाच्या देहात कलीनें संचार करून त्याचा फार छळ केला. शेवटी नळ व दमयंती फक्त एका वस्त्राने फिरत असता नळाला फार दुःख झालें व त्या भरात दमयंती निजलेली असता तिचा त्याग करून तो गेला. त्या हृदयद्रावक प्रसंगाचे वर्णन यात आहे.

निराहार निरुदक ॥ दोघां मिळून वस्त्र एक ॥ नळा हृदयी नावरे शोक ॥ पुढती धैर्य सांवरी ॥ १ ॥ निशा प्रवर्तली प्रबळ ॥ निद्रेलागी न दिसे स्थळ ॥ शीतनिवारण अळुमाळ[१] ॥ आश्रयो पाहे काननी ॥ २ ॥ जीर्ण पर्णकुटी तेथ ॥ देखता झाला नळ वनांत ॥ तृणशय्ये

---

६ विषारी सर्प ७ प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणे ८ समरांगणात

१ किंचित् थोडासा

भार्येसहित ॥ खेदभूत बैसला ॥ ३ ॥ दोघीं वेढिलें एक वसन ॥ तळीं शय्या ना प्रावरण ॥ पंचरात्र उपोषण ॥ तेणें प्राण जाकळती[2] ॥ ४ ॥ राजा विचारी मानसीं ॥ "गुह्य न वदावें स्त्रियेसी ॥ खरतर[3] दुःखाच्या हुताशी ॥ देह भस्मेल दोघांचा ॥ ५ ॥ सुंदर सुकुमार पवित्रगुणी ॥ चरण चाली चाले वनी ॥ आहारावीण उपोषणीं ॥ प्राण त्यागील तत्त्वतां ॥ ६ ॥ दृष्टीवेगळे होत कां कष्ट ॥ यालागीं वाटे वियोग श्रेष्ठ ॥ इनें देखोनी हृदयस्फोट ॥ क्षणक्षणीं होतसे ॥ ७ ॥ मज वेगळें हो कां भलतें ॥ यालागी त्यागूनि जाईन इतें" ॥ ऐसा निश्चय करूनि चित्तें ॥ सखेद शब्दें शांतवी ॥ ८ ॥ म्हणे "प्राणवल्लभे एथें ॥ घालुनी हृदयकवचातें[4] ॥ तुतें रक्षावें हा वात– ॥ स्पर्श तोही न द्यावा ॥ ९ ॥ पाहे माझी क्लेशावस्था ॥ सहज बोलणें तुझिया हिता ॥ देश अवलोकी सभोंवता ॥ सर्व येथुनी दिसताहे ॥ १० ॥ हा सुपंथ विदर्भाप्रती ॥ जेथें जनका तुझिया वस्ती ॥ येणें मार्गे अयोध्यापती ॥ कोसलदेशी देखिजे" ॥ ११ ॥ ऐकोनी प्राणेश्वराची मात ॥ वल्लभे हृदयीं शस्त्रघात ॥ म्हणे "हा कासया संकेत ॥ दावीतसां साक्षेपें[5] ॥ १२ ॥ मनी धरूनि माझा त्याग ॥ ज्ञान करिसी नाना मार्ग ॥ हा संकल्प अति अयोग्य ॥ पुण्यश्लोका[6] ! तुजलागी ॥ १३ ॥ सांडूनियां देवांच्या मूर्ती ॥ त्यागुनी पृथ्वीचे भूपती ॥ तुतें वरिलें परम आर्ती[7] ॥ एक भक्ति भावार्थे ॥ १४ ॥ काया वाचा आणि मन ॥ त्वांही ठेविला मजवरी प्राण ॥ ऐशियाचें हृदय कठिण ॥ केंवी जालें कळेना ॥ १५ ॥ पतिव्रता मी निर्धूत ॥ तुजही एकपत्नीव्रत ॥ माझा त्याग करितां एथ ॥ काय ईश्वर संतुष्टे ? ॥ १६ ॥ गेलें असतां सर्व राज्य ॥ क्षुधे तृषेनें पीडिली भाज[8] अर्धवस्त्रा एकटी मज ॥ त्यागूं म्हणसी काननीं ॥ १७ ॥ तापत्रय-निवारणाचें छत्र ॥ भार्ये परता नाही मित्र ॥ पतिव्रता मी सुपवित्र ॥ केंवी त्यागूं भाविशी ॥ १८ ॥ मातें घेऊनि राजेश्वरा ॥ चालिजे

---

२ कासावीस होती ३ अत्यत प्रखर दु:खाग्नीत ४ हृदयरूप चिलखत ५ मुद्दाम
६ पवित्रकीर्ति ! ( नळा ! ) ७ प्रेमानें ८ बायको

वैदर्भीचिया नगरा ॥ दुष्ट काळ क्रमुनी चतुरा ॥ पुढें वर्तों प्रारब्धें ॥ १९ ॥ भीम दयावंत सहसा ॥ परिहारील आपल्या क्लेशा ॥ संशय सांडुनी मानसा ॥ शीघ्र गेलें पाहिजे " ॥ २० ॥ नळ म्हणे "विचारनिष्ठे ॥ आपत्तिकाळीं न वचीजे कोठें ॥ विशेष सन्मानहानी मोठें ॥ परम दुःख अंतरी ॥ २१ ॥ राज्य हारवूनियां पणी ॥ भार्येसहित एकवसनी ॥ श्वशुरगृही जातां व्यसनीं ॥ विश्व ठेवील मूर्खता ॥ २२ ॥ दारिद्र्यकाळामाजी देख ॥ नीच श्रेष्ठातें म्हणती मूर्ख ॥ उपहासिती सकळ लोक ॥ आप्तवर्ग विशेषें ॥ २३ ॥ यालागी धरूनियां धीर ॥ प्रारब्धावरी घालूं भार ॥ भोग सरलिया ईश्वर ॥ कृपा करील निर्धारें ॥ २४ ॥ आतां ऐकें गुणवेल्हाळी ॥ चिंता सांडुनी हृदयकमळी ॥ चालतां श्रमलीस भूतळी ॥ निद्रा करी नावेक[९] " ॥ २५ ॥ दमयंतीस लागली निद्रा ॥ नळमळ नावरे नरेंद्रा ॥ ग्रहणीं राहू गिळी चंद्रा ॥ तेवी चिंतें ग्रासिलें ॥ २६ ॥ भार्येसी क्षुधे तृषेची झोंप ॥ राजया मनीं उद्वेग ताप ॥ धुधुःकारे जैसा सर्प ॥ हा! हा! कष्ट म्हणोनी ॥ २७ ॥ कली संचरला आंगी ॥ यालागी निश्चय केला त्यागी ॥ अर्धवस्त्रछेदनालागीं ॥ उपाय चित्तीं करितसे ॥ २८ ॥ अर्धवस्त्र नेणतां इतें ॥ खंडोनी गेलें पाहिजे परतें ॥ ऐसा विचार करुनी चित्ते ॥ विलोकित काननी ॥ २९ ॥ कोशरहित[१०] पडलें शस्त्र ॥ तेणें छेदिलें अर्ध वस्त्र ॥ निद्रिस्त पतिव्रता पवित्र ॥ निर्जन वनी एकली ॥ ३० ॥ त्यागुनी चालिला तो राया ॥ परतोनि पातला त्याचि ठाया ॥ निद्राभूत देखोनि जाया ॥ जाता जाला मागुता ॥ ३१ ॥ शिणली पायी चालतां वाट ॥ उपोषणीं आगळे कष्ट ॥ चेतनारहित पडे काष्ठ ॥ तेविं निद्रिस्त भूतळी ॥ ३२ ॥ म्हणे "हे पतिव्रता निर्दोष ॥ स्पर्शों न शके परका पुरुष ॥ इचे नेत्रींचा हुताश ॥ भस्म करील दुष्टातें ॥ ३३ ॥ माझिये आशीर्वचनीं ॥ क्षेम कल्याण वांचो विजनीं ॥ दुःख न देखवे नयनीं ॥ यालागीं त्यागूनि जातसें ॥ ३४ ॥ निकट असतां, आपदा ॥ माझेनी न देखवे कदा ॥ त्यागीलिया पवित्र

---

९ क्षणभर १० वेष्टना ( म्याना ) विरहित

प्रमदा ॥ ईश्वर ईतें रक्षील ॥ ३५ ॥ आदित्य रुद्र आणि वसव ॥ आश्विन मरुत नागदेव ॥ सप्तऋषी सिद्ध सर्व ॥ धर्मशीले रक्षतु ॥ ३६ ॥ ग्रहनक्षत्रपंचभूतां ॥ श्वापदें पक्षी वनदेवतां ॥ वृक्षवल्ली-गुल्मलतां ॥ नमन माझें साष्टांगी ॥ ३७ ॥ धरादेवी तुज नमन ॥ तुजवरी कंटक बहु पाषाण ॥ दमयंतीचे सुकुमार चरण ॥ छिन्न भिन्न न करावे ॥ ३८ ॥ तुम्ही समस्तीं स्नेहें भावें ॥ लावण्यलतिके सांभाळावें ॥ तुम्हांसी निरखूनि स्वस्थ जीवें ॥ मी जातसें वनपंथी ॥ ३९ ॥ सर्वी वसंतिया आत्मारामा ! ॥ तुवां वांचवावी अंगनोत्तमा[११] ॥ पंचप्राण नमन तुम्हां ॥ त्यागूं नका इयेतें ॥ ४० ॥ आपा तुवां जीवना ॥ इच्छिलिया करी जलपाना ॥ सूर्यासी म्हणे उष्ण किरणा ॥ लागों इतें न द्यावें ॥ ४१ ॥ ईश्वर रक्षील सर्वथा ॥ माझ्यानें न देखवे व्यथा ॥ यालागी त्यागुनी जातों आतां ॥ क्षेम कल्याण हें असो ॥ ४२ ॥ मी सत्यवादी पुण्यश्लोक ॥ हें सत्य असेल निष्टंक[१२] ॥ तरी लोटुनी कोटि दुःख ॥ स्वस्थ जाईल माहेरा " ॥ ४३ ॥ ऐसा देऊनि आशीर्वाद ॥ जाता झाला नळ नैषध ॥ पुढती पश्चात्तापें खेद ॥ अत्यद्भुत उदेला ॥ ४४ ॥ त्यागुनि जाय परता ॥ परत ये मागुता ॥ सातपांच वेळां चित्ता ॥ संशयचक्रीं सूदलें ॥ ४५ ॥ मग कठिणता घालुनी मनीं ॥ कलीनें लोटिला दुरी वनी ॥ खेचरभूचरांचे[१३] नयनी ॥ अश्रुपात डळमळती ॥ ४६ ॥

## राजमान्यता कशानें प्राप्त होते

नामरूप थोरपण ॥ कोणा न कळों द्यावें ज्ञान ॥ दीनाहूनि परमदीन ॥ ऐसें लोकां दाखवावें ॥ १ ॥ दावुनी चातुर्य कुशळते ॥ मूर्खत्व नाणिजे प्रभूतें ॥ श्रेष्ठ बोलिजे न घडे तें ॥ तेचि शब्दीं प्रतिष्ठा ॥ २ ॥ असत्य न बोलिजे सर्वथा ॥ धरिजे निर्लोभ निर्मळता ॥ इंद्रियनियमीं नित्य वसतां ॥ तोचि वल्लभ रायातें ॥ ३ ॥ राजस्त्री-संवाद ॥ राजमित्राशीं विरोध ॥ राजपुरोहिताशी विनोद ॥ जाणते पुरुषीं न करावा ॥ ४ ॥ राजा अचाट काम सांगे ॥ न करवे म्हणोनि

११ स्त्रियामध्ये श्रेष्ठ १२ पूर्णपणे १३ प्राणिमात्राच्या

न येईजे मागें ॥ स्वभाव ओळखुनी जो वागे ॥ तोचि वल्लभ रायातें ॥ ५ ॥ मागां सरे अंतःपुरीं ॥ पुढां ठाके रणचत्वारीं ॥ दिली आज्ञा वंदी शिरीं ॥ तोचि वल्लभ रायातें ॥ ६ ॥ कीजे सर्वांचें आर्जव ॥ कोठें न दाखवी वक्रभाव ॥ सर्वांपासोनि गौरव ॥ तोचि पावे निर्धारें ॥ ७ ॥ करणी[1] करोनियां लपवी ॥ महिमा दुजियाची वाढवी ॥ महायशाची तो पदवी ॥ आपोआप पावत ॥ ८ ॥ रायें नेमलिये व्यापारीं[2] ॥ सावधान[3] अहोरात्रीं ॥ आळस निद्रा दवडूनि दुरी ॥ तोचि रायातें आवडे ॥ ९ ॥ झालिया मानापमान ॥ हर्षविषादीं[4] न घाली मन ॥ क्षमाशीळ सुप्रसन्न ॥ तोचि पावे महिमेतें ॥ १० ॥ राजपैशुन्य नायके कानीं ॥ राजनिंदा न बोले वदनीं ॥ राजमान्यातें सन्मानी ॥ तोचि मान्य नृपातें ॥ ११ ॥ पुसल्याविणें न करी काज ॥ संतुष्टकालीं न मानी लाज ॥ राजगौरवें न चढे माज[5] ॥ तोचि पावे महिमेतें ॥ १२ ॥ प्रभूनें बोलविल्या बोलणें ॥ प्रभू पुसेल तें सांगणें ॥ न पाचारितां न जाणें ॥ तोचि पावे प्रतिष्ठा ॥ १३ ॥ राजासनीं राजवहनीं ॥ राजाचिया एकांत सदनीं ॥ बैसका न करी तो षड्गुणी ॥ मान पावे नृपाचा ॥ १४ ॥ आपुलें प्रकटूं नेदी ज्ञान ॥ नेणत्यातें न म्हणे जो अज्ञान ॥ ज्याचिये मुखीं मधुरवचन ॥ तोचि मान्य विश्वातें ॥ १५ ॥

## मूर्खाचीं लक्षणें

सर्वही एकापासुनी झालें ॥ सर्वही एकासीच पावलें ॥ परी तेणें कांहीं नाहीं केलें ॥ हें ज्या न कळे तो एक मूर्ख ॥ १ ॥ हरिहरांतें मानी भेद ॥ साधुसज्जनांतें देखोनि पावे खेद ॥ नेणोनि करी वितंडवाद[1] ॥ तो द्वितीय मूर्ख जाणावा ॥ २ ॥ नाहीं अर्थाचें अनुसंधान ॥ पाठमात्रें ज्ञानअभिमान ॥ गर्वें जगासि मानी न्यून ॥ तो तृतीय मूर्ख जाणावा ॥ ३ ॥ आपुले अवगुण नाठवी ॥ पुढिलांचे अपराध माजवी ॥ निर्दोषियां दोष लावी ॥ तो एक मूर्ख जाणावा

---

१ कार्य २ कार्यात ३ दक्ष ४ सुखदु.खात ५ उन्मत्तपणा

१ ज्ञानाशिवाय व्यर्थ वाद

॥ ४ ॥ ईश्वर, काळ आणि पापाचें ॥ वेद, वडील, लोकनिंदेचें ॥ भय नाहीं जया साचें ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ ५ ॥ चंचळ आंवरावया मन ॥ शक्ति नाही अर्ध क्षण ॥ मेरूतुल्य शब्दज्ञान ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ ६ ॥ पुढिलां उपदेशी अमाप ॥ आपण झांकून करी पाप ॥ करूनि म्हणे मी निःपाप ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ ७ ॥ विरक्त आणि इच्छावंत ॥ योगी आणि इंद्रियासक्त ॥ वादी क्रोधी शास्त्रज्ञ पंडित ॥ ते हे तिघे मूर्ख जाणावे ॥ ८ ॥ ज्ञान आणि वैराग्यहीन ॥ भक्ति करी विश्वासावीण ॥ कुटुंबसंग्रही निर्धन ॥ हे तिघे मूर्ख जाणावे ॥ ९ ॥ एकला एकट चाले पंथी ॥ हाटचोहटा[2] करी वस्ती ॥ वर्ते कुसंगाचिया संगती ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १० ॥ संबंधेंवीण वार्ता पुसे ॥ उगाचि लोकांशी रुसे ॥ तापियाकोपियांसि[3] हांसे ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ ११ ॥ बहुत हानीतें नाठवी ॥ स्वल्पासाठी कलह वाढवी ॥ वेळ न पहातां आडवी ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १२ ॥ फिटेल कैसें हें न विचारी ॥ रीण घेऊनि घाली उदरी ॥ मग भंडमा[4] भोगी अपारी ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १३ ॥ न बोलवितां परगृहा जाणें ॥ न पुसतां मात[5] सांगणें ॥ समर्थ प्रभु सोयरा म्हणे ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १४ ॥ आपण नेणे सारासार ॥ नायके श्रेष्ठाचा विचार ॥ बोले तांतडीभरें थोर ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १५ ॥ घडला जरी उपकार नाठवी ॥ अपकार तो जीवीं आठवी ॥ आपुलें केलें तें मुखीं रूढवी ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १६ ॥ पुढें स्तुति, मागें निंदा ॥ स्वल्प अपराधें चढे क्रोधा ॥ समयी जो न मिळे संवादा ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १७ ॥ एकांत करितां दोघेजण ॥ समीप जाऊनि लावी कान ॥ श्रेष्ठा आधीं इच्छी मान ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ १८ ॥ परगुणपरीक्षा परवेदना ॥ हे दोन्ही नकळे ज्याचिया मना ॥ त्याचिया संगतीं सुखवासना ॥ इच्छी तो एक मूर्ख ॥ १९ ॥ मायबापाची हेळणा करी ॥ आर्जवें आदरें उचित करी ॥ विश्वीं वर्ते मिथ्याचारी ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २० ॥ ज्ञाता आणि ईश्वर न भजे ॥

---

२ बाजारातील चव्हाट्यावर ३ तापट व रागीट लोकास ४ सकटें, उपहास ५ गोष्ट

भाग्यकाळीं मित्रास माजे ॥ उपदेश घेऊनि गुरूसी लाजे ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥२१॥ सांप्रदायमताभिमानीं ॥ श्रेष्ठ अश्रेष्ठ मानी मनीं ॥ अयोग्य योग्यत्वें पूजणें ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २२ ॥ अविश्वासिया अतिविश्वास ॥ विश्वासस्थळी अति अविश्वास ॥ स्वहितकर्ता त्यासी अविश्वास ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २३ ॥ उत्तर वयीं करी लग्न ॥ जीविकेविण बांधी सदन ॥ प्राणत्यागी न वेंची धन ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २४ ॥ राजगृही पैशुन्य बोले ॥ परनाश देखूनि हरिखें डोले ॥ स्तुति ऐके तंव तंव खुले ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥२५॥ भाग्यें माजे दरिद्रें शिजे ॥ परकीर्ति ऐकूनि मत्सर भजे ॥ निंदितयातें निवेद नवाजे ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २६ ॥ निंदूनि स्वहितधर्मा ॥ स्तवी अविहित परधर्मा ॥ तोचि आचरे परधर्मा ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ २७ ॥ उपजोनियां संसारी ॥ आयुष्य वेंची विषयावरी ॥ आत्मप्राप्ती नव्हे पुरी ॥ हें नेणे तो मूर्ख ॥ २८ ॥ आत्मप्राप्तीचें साधन ॥ एक मनोनिग्रह हाचि जाण ॥ यासि वैराग्य मुख्य कारण ॥ हेंचि नेणे तो मूर्ख ॥ २९ ॥ सर्वां भूतीं भगवंत परिपूर्ण ॥ सर्व दया हें ज्ञान भूषण ॥ हा विश्वास न मानी जयाचे मन ॥ तो एक मूर्ख जाणावा ॥ ३० ॥

## हरिश्चंद्राचा प्रवास

पूर्वी अयोध्या नगरीत सूर्यवंशातील हरिश्चंद्र नावाचा राजा राज्य करीत होता. एकदा इंद्रसभेत वसिष्ठविश्वामित्रादि तपोधन बसलेले असता नारदानें हरिश्चंद्राच्या सत्त्वस्थपणाची फार स्तुति केली. त्यामुळे हरिश्चंद्राचा गुरु वसिष्ठ यास फार आनंद झाला; परंतु विश्वामित्रास राग आला व हरिश्चंद्राच्या थोरपणाविषयी त्या दोघामध्यें चुरस उत्पन्न होऊन विश्वामित्रानें त्याचा छळ माडिला. त्यानें हरिश्चंद्राच्या स्वप्नां येऊन त्याजकडून सर्व राज्यदानाचें उदक सोडविले व त्याची राणी तारामती व पुत्र रोहिदास यासह त्यास राज्यातून घालवून दिले. वाटेंत त्यानें त्याचा फार छळ केला. राज्यदानाची सागता दक्षिणा दित्याशिवाय होत नाहीं, म्हणून त्याने आपणास

६ निर्वाहाच्या साधनाशिवाय ७ दुष्ट नीच भाषण ८ तडफडे

दक्षिणा मिळविण्यासाठी वीरबाहु नावाच्या डोंबास विकिले, व तारामती आणि रोहिदास यास काळ-कौशिक नावाच्या ब्राह्मणास विकिलें, आणि दक्षिणा पुरी करून घेतली. इतका जरी छळ झाला व पुढेही त्यानें अतिशय छळ केला तरी त्यानी आपले सत्त्व सोडिले नाही. शेवटी हरिश्चंद्राचा जयजयकार झाला. या कथेपैकीच खालील ओंव्या असून त्यात वाराणसीस ( काशीस ) त्याचा प्रवास व नंतर तेथे त्याचा जो विक्रय झाला त्या प्रसंगाचे वर्णन यात व पुढील प्रकरणात आहे.

**घोर वनातरीं नृपति ॥ कुमर आणि तारामती ॥ रोहिदास धरूनि हाती ॥ जातां कैसें वर्तलें ॥ १ ॥ कौशिकदर्पे[1] सहस्ररश्मी ॥ तपों लागला तीव्र व्योमीं[2] ॥ तेणें तेजें पर्वत भूमी ॥ उलों पाहे ते काळी ॥ २ ॥ केवढें ऋषीचें सामर्थ्य ॥ वरुणें केला निर्वारि पंथ ॥ कूप, सरिता, तडाग समस्त ॥ आर्द्रता लोपली ॥ ३ ॥ कांता कुमर चालतां पंथी ॥ उष्णें करपली सुकुमारकांती ॥ कडिये कुमर तारामती ॥ घेऊनी चाले नृपसंगें ॥ ४ ॥ रोहिदास म्हणे 'जी ताता ॥ तृषेनें प्राण जाईल आतां ' ॥ म्हणोनी कडेहुनी खालता ॥ पडोनी लोळे गडबडां ॥ ५ ॥ माता म्हणे ' रे तान्हया ॥ पैल वृक्षातळी छाया ॥ तेथें बैसोनियां तोया ॥ आणूनि पाजूं तुजलागीं ' ॥ ६ ॥ म्हणोनि गेली तरुतळीं ॥ तंव सूर्यबिंब आलें मध्यमंडळीं ॥ स्वल्प छाया दिसे मूळी ॥ जाऊनि तेथें बैसली ॥ ७ ॥ रायें शोधिलें सकळ वन ॥ कोठें न मिळे जीवन ॥ परतोनि आला नंदन ॥ होता जेथें मातेशीं ॥ ८ ॥ राजा अवलोकी तयांतें ॥ तंव धुळीमाजी जैसीं प्रेतें ॥ पल्लवें वारा घालुनी हातें ॥ स्पर्शोनि केलीं सावध ॥ ९ ॥ कुमर म्हणे ' द्यावें जीवन[3] ' ॥ ऐकोनि रायें उभय नयन ॥ भरूनि म्हणे सखेद वचन ॥ ' पुढें येई डोळसा ' ॥ १० ॥ ऐसें बोलोनि उभय करीं ॥ कवळोनि चालतां पुढारी ॥ विश्वामित्र वनांतरीं ॥ प्रगट झाला द्विजरूपें ॥ ११ ॥ रायें देखोनि केलें नमन ॥ येरें दिधलें आशीर्वचन ॥ म्हणे ' तुझी कीर्ती परिसोन ॥ आलों एथें सकाम ' ॥ १२ ॥ राजा म्हणे ' बोलिजे स्वामी ' ॥ येरू म्हणे ' तीर्थवासी आम्ही ॥ भार्या सुत समागमीं ॥**

---

१ विश्वामित्राच्या सामर्थ्यभयानें २ आकाशीं ३ पाणी

चालतां चरण पोळती ॥ १३ ॥ जो देईल पादत्राणें[4] ॥ त्यासी कल्याण नारायणें ॥ कीजे ' म्हणतां नरभूषणें ॥ वसनें वोपिली[5] चरणींचीं ॥ १४ ॥ तिघें जणें चालतां चरणीं ॥ तळीं तापली धरणी ॥ माथा पोळती उष्ण किरणीं ॥ अंतर तृषेनें करपलें ॥ १५ ॥ ऐसीं लंघितां वनोपवनें ॥ पुढें विश्वामित्रें वाटिका जीवनें ॥ अति रमणीय प्रपा-स्थाने ॥ मायामय निर्मिली ॥ १६ ॥ विश्वामित्रें रमणीय धाम ॥ पुढें निर्मिलें मनोरम ॥ जें देखतां जाय श्रम ॥ दोष जैसे हरिनामे ॥ १७ ॥ ऐसी ऋषी निर्मी पोहे[6] ॥ नृपवर दुरोनि पाहे ॥ जीवनालागीं लवलाहें ॥ जाता झाला पुढारां ॥ १८ ॥ सुत कांता सांडुनी मागें ॥ मायावनीं पातला वेगें ॥ पोहे जाणुनियां नेघे ॥ राजा फिरे माघारा ॥ १९ ॥ ऐशियापरी प्रपामंदिर ॥ सांडोनि जातां राजेश्वर ॥ तोयपात्र ऋपीश्वर ॥ घेऊनि धांवे पाठीशी ॥ २० ॥ म्हणे ' उभा राहें पांथिका ॥ श्रमें श्रांतलासी घे उदका ' ॥ राजा म्हणे ' हे धार्मिका ॥ सेव्य नव्हे सर्वथा ' ॥ २१ ॥ ऋषि म्हणे ' तनुभांडवल ॥ रक्षितां सुकृतधन[7] जोडेल ॥ यालागी बोलती वडील ॥ शरीर रक्षी तो धर्म ' ॥ २२ ॥ ऐसें बोलोनि धरिला करीं ॥ म्हणे ' चाल मम मंदिरीं ॥ स्नान सारूनि भोजन करीं ॥ नावेक[8] शयनीं पहुडावें ' ॥ २३ ॥ ' विश्रांति पावलों समस्त ॥ तुमच्या दर्शनें कृतकृत्य ' ॥ ऐसें बोलोनि नृपनाथ ॥ शीघ्र चामके[9] पुढारा ॥ २४ ॥ तारामती तयापाठीं ॥ चालतां झाली परम कष्टी ॥ पोई जाणोनियां दृष्टी ॥ मुरडोनियां चालली ॥ २५ ॥ येरीकडे आश्रमांत ॥ ऋषीनें केलें अत्यद्भुत ॥ मायामय नृपनाथ ॥ करूनि बैसवी मंचकीं ॥ २६ ॥ ऋषी म्हणे ' वो पतिव्रते ॥ तुझा पति पाचारी तूतें ॥ पैल पालवीतसे[10] हातें ॥ मंचकीं बैसूनी मंदिरीं ' ॥ २७ ॥ येरी अवलोकी भीतरीं ॥ रायासि देखे मंच-कावरी ॥ चरणसेवा सुंदरी ॥ सुकुमार करी करिताती ॥ २८ ॥ ऐसें अवलोकितां सती ॥ म्हणे ' हें काय घडलें ! श्रीपति ! ॥ अंधका-

---

४ पाय रक्षण करण्याचें साधन म्ह० जोडे ५ अर्पिलीं ६ पाणपोई ७ पुण्यरूपधनाची प्राप्ति होईल ८ क्षणभर ९ जाई, गेला १० वोलावीतसे

रामाजी गभस्ती[११] ॥ अडखळोनी पडियेला ॥२९॥ दुष्टदंडना कमळा-
पती ॥ अवतार धरितां भागे चित्तीं, ॥ अस्तमान होतां फिरे
गभस्ती ॥ तरी हें ऐसें घडों ये ॥ ३० ॥ की पर्वतमस्तकीचें जळ ॥
अधोपंथें धांवे तुंबळ ॥ तें परतोनि पावे मूळ ॥ तरी हें ऐसे घडो ये
॥ ३१ ॥ तैसा राजा सूर्यवंशी ॥ धर्मशील सत्वराशी ॥ क्लेश पावतां
पोईशीं ॥ विश्रामेल, हे घडेना ॥ ३२ ॥ असो; मी तंव न घें जीवन' ॥
म्हणोनि केलें पुढारा गमन ॥ विश्वामित्र म्हणे 'कोण ॥ सत्व
इये सतीचें !' ॥ ३३ ॥ मागें पाहे जंव कौशिक ॥ तंव येतां देखिलें
बालक ॥ श्रमें शोषलें वदनांबुजक ॥ अंतर तृषेनें करपलें ॥ ३४ ॥
म्हणे 'श्रमलासी चालतां पंथीं ॥ या पोहेसी करी विश्रांती ॥ उदक
प्राशूनियां पुढती ॥ गमन करी बाळका' ॥ ३५ ॥ रोहिदास म्हणे
'स्वामिया ॥ आम्ही न शिवों ऐसिया तोया ॥ कलंक लागेल
आमुचिया ॥ सूर्यवंशालागुनी' ॥ ३६ ॥ ऋषीप्रति बोलोनी ऐसें ॥
गमन केलें रोहिदासें ॥ विश्वामित्र निजमानसें ॥ वोवाळीत
बाळका ॥ ३७ ॥ येरीकडे वसुधापति ॥ पाहे लंघुनी जातां पंथी ॥
तयामागें तारामती ॥ कवळोनि चाले पुत्रातें ॥ ३८ ॥ विश्वामित्रें
जाऊनि पुढें ॥ वणवा लाविला चहुंकडे ॥ जळों लागली उभी झाडें ॥
श्वापदपक्ष्यां आकांत ॥ ३९ ॥ धूम्रें दाटलें अंबर ॥ भडके उठती
भयंकर ॥ तयांमाजी राजेश्वर ॥ सहपरिवारें सांपडला ॥ ४० ॥
विश्वामित्रें काय केलें ॥ राया रोहिदासा चुकविलें ॥ तारामतीतें
सावाइलें[१२] ॥ तया वणवियामाझारी ॥ ४१ ॥ मागें पाहे तारामती ॥
पुत्र न देखोनी पडली क्षिती ॥ पुढें पाहे, तंव नृपती ॥ तोही तीतें
दिसेना ॥ ४२ ॥ म्हणे 'बाळा ! रोहिदासा ! ॥ भेटी देई बा पाडसा ॥
तुज वेगळया दाही दिशा ॥ वोस वाटती मजलागीं ॥ ४३ ॥ अहा !
सूर्यवंशचूडारत्ना[१३] ॥ माझिया प्राणपती निधाना ॥ मजवेगळे
सायुज्यसदना[१४] ॥ भोगावया गेलेती ॥ ४४ ॥ जया अनळें दाहिला
पती ॥ तया वोपीन वपु आहुती' ॥ मनेंचि सौभाग्यसंपत्ति ॥

---

११ सूर्य १२ साह्य केलें १३ सूर्यवशशिरोमणि १४ मोक्षसदना

वर्षती झाली पावकी ॥ ४५ ॥ ब्रह्मरूप भाविला वन्ही ॥ धर्मशिळे उभी राहुनी ॥ उडी टाकावी तंव ते क्षणी ॥ प्रगट झाला कौशिक ॥ ४६ ॥ वणवा विझवुनी आंगें ॥ सतीसमीप पावला वेगें ॥ म्हणे ' तूं कवण कवणाची सांगें ॥ किमर्थ आलीस काननी ? ' ॥ ४७ ॥ येरी म्हणे ' आम्ही पथिक ॥ माझा पति आणि बाळक ॥ या वणवियामाजी देख ॥ जळोनि मेले कळेना ॥ ४८ ॥ तुम्हीं देखिले असती जरी ॥ कृपेनें सांगिजे उत्तरी ॥ ऋषी म्हणे ' वो ! वनांतरी ॥ जळोनि पडलीं दोन शवें ' ॥ ४९ ॥ तारामतीस नेऊनी तेथें ॥ दाविता झाला उभय प्रेतें ॥ त्वचा जळोनि पडली व्यस्तें[15] ॥ हस्त पाद पसरूनी ॥ ५० ॥ अवलोकुनी पतीचें मढें ॥ म्हणे " वल्लभा ! पाहें मजकडे ॥ रुसणें सांडोनी बोलिजे तोंडें ॥ गुजगोष्टी मजसवें ॥ ५१ ॥ मजवेगळें उदकपान ॥ तुम्हांसी लागे विषासमान ॥ जीवींचें गुह्य वचन ॥ अखंड सांगा मजलागीं ॥ ५२ ॥ ते तुम्ही आजी कवणा गुणें ॥ क्रोध धरिला अंतःकरणें ॥ मौन धरूनियां वचनें ॥ कां न बोलां मजसवें ' ॥ ५३ ॥ रोहिदास कवळोनि पोटीं ॥ ललाट मेळवी ललाटीं ॥ शोक करितां श्वापदें दृष्टी ॥ देखोनी गहिवरें दाटली ॥ ५४ ॥ ऐसा विलाप करितां सती ॥ अस्तमाना गेला गभस्ती ॥ ऋषि म्हणे ' आतां किती ॥ शोक करिशी शवांचा ॥ ५५ ॥ आम्हीं परिसिलों एक मात ॥ तुम्हांस ऋण असे किंचित ' ॥ येरू म्हणे ' जी ! सत्य ॥ देणें असे ऋषीचें ' ॥ ५६ ॥ येरू म्हणे ' पतीचें ऋण ॥ फेडिते पतिव्रता जाण ॥ तेणें अक्षय स्वर्गभुवन ॥ भोगावया जोडेल ॥ ५७ ॥ आमुच्या गृहीं क्रमूनी निशी ॥ प्रभातीं अग्नि देणें शवांसी ॥ भलतियापरी[16] पतिऋणासी ॥ हरुनी स्वर्गा धाडिजे ' ॥ ५८ ॥ तारामती म्हणे ' दयाळा ॥ केवीं सांडूं मी पती आणि बाळा ? ॥ धणीवरी[17] पाहेन डोळां ॥ मुखकमळें दोघांचीं ' ॥ ५९ ॥ ऐसें ऐकुनियां वचन ॥ अदृश्य झाला तपोधन ॥ कौशिक ऋषीनें विंदाणें[18] ॥ काय केलें वनांत ॥ ६० ॥ घोर दाटली इंदुवल्लभा[19] ॥

---

१५ अस्ताव्यस्त १६ अन्य मार्गानें १७ तृप्ति होईपर्यंत १८ चातुर्य, कपट १९ रात्र

माजी उडुगणें[20] दाविती शोभा ॥ पिशाचश्वापदांची सभा ॥ प्रेतें देखोनी पातली ॥ ६१ ॥ तयांमाजी विश्वामित्र ॥ व्याघ्ररूप धरूनी क्रूर ॥ महा भयानक पसरोनी वक्त्र ॥ झेंप घाली अवचिती ॥ ६२ ॥ सतीपुढोनि उभय प्रेतें ॥ वोढूनि नेली परौतें[21] ॥ उदर फाडोनी अंत्रें ॥ काढूनी टाकी बीभत्स ॥ ६३ ॥ तारामती म्हणे 'गा! श्रीपती ॥ धांव धांव या आकांती ॥ कैशी प्राप्त झाली गती ॥ ऐशी वैरिया होऊं नये ॥ ६४ ॥ जन्मल्या देहासी मरण ॥ कदां न चुके ब्रह्मवचन ॥ परी त्या ब्राह्मणाचें ऋण ॥ फिटलें नाही आमुतें ॥ ६५ ॥ असो पुढें जन्म घेतां ॥ ऋषिऋण फेडूं सर्वथा ॥ मी पतिसवें पतिव्रता ॥ गमन करीन अविलंबें' ॥ ६६ ॥ म्हणवुनी नयन झांकिले ॥ पंचप्राणांतें आकर्षिले ॥ प्राण द्यावा तंव सुचलें ॥ ज्ञानदृष्टी कौशिका ॥ ६७ ॥ तारामती सांडील प्राण ॥ आमुचें जाईल प्रतिज्ञावचन ॥ म्हणोनि आणी दोघे जण ॥ पति पुत्र तीपुढें ॥ ६८ ॥ कैंचा व्याघ्र? कैंचा वणवा? ॥ जैसा मृगाब्धीचा[23] हेलावा ॥ कीं दुष्ट स्वप्न भोगितां जीवा ॥ वोडंबरीसारिखें[24] ॥ ६९ ॥ राजा म्हणे 'सौभाग्यसरिते ॥ किमर्थ शोक सांग मातें' ॥ येरी म्हणे 'तुम्हांतें ॥ पुनर्जन्म देखिलें ॥ ७० ॥ तुम्हीं जळोनि मेलेति वणवा ॥ कवळोनी बैसल्ये उभय शवां ॥ परम दुःख वाटलें जीवा ॥ शंका वाटे सांगतां ॥ ७१ ॥ यालागी झांकिले नयन ॥ हृदयीं स्मरला नारायण ॥ परिसोनि तुमचें वचन ॥ नेत्र उघडोनी पाहिलें' ॥ ७२ ॥ राजा म्हणे 'वैकुंठपाळ ॥ ऐशींच विघ्नें भंगुनी सकल ॥ मोक्षपदीं स्थापील अढळ ॥ सत्त्व देखोनी आमुचें' ॥ ७३ ॥ यापरी लोटला एक मास ॥ राजा न लभे सुखाचा लेश ॥ दुःखावेगळें निमिष ॥ जाऊं नेदी कौशिक ॥ ७४ ॥ भूपाळसत्त्व शुद्धरत्न ॥ कौशिककोप[25] न गणी घन ॥ मशकनाशिकीच्या[26] प्रभंजनें ॥ मेरू जैसा न हाले ॥ ७५ ॥

---

२० नक्षत्रें २१ पलीकडे २२ चिळस येईल अशा रीतीनें २३ मृगजळसमुद्राचा २४ गारुडीविद्या, राक्षसी माया २५ विश्वामित्राचा क्रोधरूप इातोडा २६ चिलटाच्या नाकातील वाऱ्यानें

## हरिश्चंद्राचें सत्त्व

अयोध्यापाळ पवित्र नृपति ॥ डोंबें रक्षणा ठेविला प्रेतीं ॥ मसणखांब ऐसें म्हणती ॥ नाम त्याचें प्रसिद्ध ॥ १ ॥ 'माझिया आज्ञेविना सर्वथा ॥ तुवां जाळूं न द्यावें प्रेतां' ॥ ऐसें सांगोनि नृपनाथा ॥ नेउनी ठेविलें स्मशानीं ॥ २ ॥ काळकौशिक-गृहीं सती ॥ पाकशाळे तारामती ॥ रोहिदास शिष्यपंक्ति ॥ सेवा करी सर्वदा ॥ ३ ॥ ऐसा क्रमिला किंचित् काळ ॥ कौशिकें येउनी मांडिला छळ ॥ कुसुमवाटिकेमाजी बाळ ॥ बडवियांसंगें[1] पातला ॥ ४ ॥ तंव विश्वामित्र म्हणे 'तक्षका ॥ दशनें दंशी नृपबाळका' ॥ आज्ञा वंदुनी वारीका[2] ॥ टाकुनी आला गुप्तत्वें ॥ ५ ॥ सुमनगर्भी वसे भोगी[3] ॥ जेवीं कां विजनी वसे योगी ॥ एथें नृपनंदन अति वेगीं ॥ आला समीप त्या ठायां ॥ ६ ॥ परिमळ-करंडा वामहस्तीं ॥ सवेग सुमनें वेंचिती ॥ जाळी वृक्ष वल्ली किती ॥ एक पाहती जळीं स्थळीं ॥ ७ ॥ मालती मोगरे शेवंती ॥ कमळ पारिजात केतकी ॥ मंदार कांचन चंपक जाती ॥ तुळशी दवणे बिल्वादि ॥ ८ ॥ भूपाळबाळें बडवियां-संगी ॥ सुमनें वेंचितां लक्षिला भोगी ॥ दैवें प्रेरिला असतां वेगीं ॥ त्याचि सुमना पातला ॥ ९ ॥ तक्षक जयामाजी वसत ॥ रोहिदास तेथें ये त्वरित ॥ दंश केला रोंवूनी दांत ॥ उलथोनि पडे माघारा ॥ १० ॥ तक्षक विषाचा अनळ ॥ स्पर्शतां अवरुधे[4] आयुष्यमूळ ॥ तनुयंत्रींचा प्राणगोळ ॥ जातां पात्र रितें पडे ॥ ११ ॥ बडवे पाहती जंव दृष्टीं ॥ तंव जाळिये व्याळ[5] धुंधुटी ॥ देखतां भयाभीत पोटीं ॥ पळोनि गेले आश्रमा ॥ १२ ॥ मातेसी सांगावया सवडी ॥ न दिसे, गुंतली पात्रें वाढी ॥ पाकशाळे जाऊनि तांतडी ॥ वृत्तांत कर्णी सुचविला ॥ १३ ॥ परिसोनि पुत्रनिधनवार्ता[6] ॥ माता हृदयीं शोकसरिता-॥ पूर उचंबळोनि गर्ता[7] ॥ पूर्ण होती नेत्रांच्या ॥ १४ ॥

---

१ ब्राह्मणबटूच्या सगें. २ राहण्याचें ठिकाण ३ सर्प ४ बंद पडे ५ सर्प फूत्कार टाकीत होता ६ मुलाच्या मृत्यूची वार्ता ७ खाचा

गिळोनि पुत्रशोकार्णव ॥ धैर्यें झाली कुंभोद्भव[8] ॥ म्हणे ' कळतांचि भूदेव ॥ अतृप्तीनें उठतील ' ॥ १५ ॥ भोजनें होतां सर्वांचीं ॥ दीप्ति लोपली दिनकराची ॥ पाउलें वंदुनी ऋषीची ॥ सद्गदित अनुवादे[9] ॥ ॥ १६ ॥ ' रोहिदास पूजेचीं कमळें ॥ आणूं गेला प्रारब्धकाळें ॥ तेथें अवचित काळव्याळें ॥ दंशिला ऐसें ऐकिलें ॥ १७ ॥ आतां जाईन कुसुमवना ॥ शोधूनि पाहेन निजनंदना ' ॥ ऐसें बोलोनि सजलनयना ॥ वातवेगें निघाली ॥ १८ ॥ मोहतमाच्या सागरीं ॥ कवळीत शोकार्णवाच्या लहरी ॥ कुसुमवाटिके मातामगरी ॥ अंचळत्यागें[10] जातसे ॥१९॥ म्हणे ' बाळा ! कुळभूषणा ! हृदयस्थानी प्रेमपान्हा ॥ भेटोनियां करी पाना ॥ अहो नंदना वेगेंसी ' ॥ २० ॥ ऐशी विलापें भ्रमतां वनीं ॥ तंव शवा उचलूनि कौशिकमुनी ॥ पुढें ठेवितां चरणीं ॥ लागुनी पडे अवचित ॥ २१ ॥ अवचट लागतां हात ॥ वोळखिलें निजतनयप्रेत ॥ भूमी माथां हाणित ॥ पिटोनियां कपाळा ॥ २२ ॥ मुखें करिनसे शोक ॥ हृदय पिटोनि मारी हाक ॥ दुःखें रडतां कौशिक ॥ प्रगट झाला काननीं ॥ २३ ॥ म्हणे ' तूं कवण कवणाची, ऐथें ॥ यक्ष राक्षस भूत प्रेतें ' ॥ येरी म्हणे ' बाळकातें ॥ काळसर्पें डंखिलें ' ॥ २४ ॥ ऋषि म्हणे ' आहे की प्राण ' ॥ माता म्हणे 'निमाला नंदन' ॥ येरू बोले ' कीजे दहन ॥ मोक्ष माथां मेळवा ॥२५॥ उदयो कोलिया पद्मिनीनाथें[11] ॥ धन वोपिल्यावीण येथें ॥ जाळूं नेदिती शवातें ॥ दाहितां दंड पावशील ॥ २६ ॥ आतां जाई स्मशान-भूमी ॥ धर्मार्थ काष्ठें वोपूं आम्ही ॥ शोक करितां निरयधामीं[12] ॥ पुत्र तुझा जाईल ' ॥ २७ ॥ येरी म्हणे ' निशा दाट ॥ चालतां मातें न दिसे वाट ' ॥ ऋषि म्हणे 'आम्हीं तट ॥ दाऊं तूतें गंगेचें ' ॥२८॥ ऐशी बोधूनि तारामती ॥ शवासहित धरूनि हातीं ॥ नेली जेथें रक्षण पती ॥ होता तिचा स्मशानीं ॥२९॥ चिताबितांचीं लांकडें ॥ आणूनी सरणीं घातलें मडें ॥ मुनिहस्तें उभय तोंडें ॥ लागतां, शिखा[13] दाटल्या ॥ ३० ॥ पुत्रशोकाचा उमाळा[14] ॥ धडके धडकतां चितानळ ॥ ऋषि

---

८ अगस्त्य ९ बोले १० पदर न सावरता ११ सूर्यानें १२ नरकीं १३ ज्वाला १४ हुदका

म्हणे 'प्रेतपाळा ॥ कळतां देह दंडिल' ॥ ३१ ॥ ऐसें बोलोनी आपण ॥ गुप्त झाला तपोधन ॥ प्रदीप्त देखोनी हुताशन ॥ मसणखांबा धांविन्नला ॥ ३२ ॥ जळें विझवूनी सरण ॥ शवा वोढिलें धरुनी चरण ॥ मातेपुढें टाकून ॥ ताडण करी तियेसी ॥ ३३ ॥ आतां कळतां प्रेतनाथा ॥ मातें दंडील सर्वथा ॥ ऐसें बोलोनी लाथा ॥ ताडोनि गेला तियेसी ॥ ३४ ॥ तंव अर्धदाहित प्रेत पोटीं ॥ कवळोनि माता हृदय पिटी ॥ म्हणे 'कटाकटा! अदृष्टी[15] ॥ काय लिहिलें विधात्या ॥३५॥ सूर्यवंशी विजयकेतु ॥ हरिश्चंद्र नृपाचा सुतु ॥ त्याचा मरणकाळ-पंथु ॥ केवढा घडला प्रारब्धें ॥ ३६॥ ऐशी तियेची विलापवचनें ॥ मसणखांबा ऐकोनि श्रवणें ॥ येऊनी म्हणे 'तूं कवण ॥ शोक करिशी कवणाचा?' ॥ ३७ ॥ येरी म्हणे 'प्रेतनाथा ॥ हरिश्चन्द्रनृपाची मी कांता ॥ काळसर्पें डंखिलें सुता ॥ रोहिदासा माझिया' ॥ ३८ ॥ ऐकुनी अंगनेच्या वचना ॥ अश्रु आले उभय नयनां ॥ म्हणे 'कर्मा निजनंदना ॥ कष्टविलें कृतघ्ने ॥ ३९ ॥ केवढें कर्माचें बळ ॥ कर्मे व्यापिलें ब्रह्मगोळ ॥ भेदुनी मायेचें पडळ[16] ॥ ऐसें दुर्घट करविलें' ॥ ४० ॥ येरी म्हणे 'स्मशानवासी ॥ मम दुःखें दुःखित होसी ॥ तूं कोण हें मज मानसीं ॥ कळलें पाहिजे दयाळा' ॥ ४१ ॥ येरू सांगतां पूर्वकथन ॥ दोघां पडिलें आलिंगन ॥ शोक करितां अश्रुजीवनें ॥ स्नान शवा घातलें ॥४२॥ 'मी येई तंववरी स्मशाना ॥ राहोनि रक्षावें नंदना ॥ आतांचि पुसोनियां वचना ॥ एथें येईन अविलंबें' ॥ ४३ ॥ ऐसें सांगुनी नरभूषण ॥ जातांचि पातला तपोधन ॥ म्हणे 'माये हे प्रेत जाण ॥ धरूनी राहाणें किमर्थ ॥ ४४ ॥ निशीमाजी तूं एकटी ॥ शवासहित स्मशानवाटीं ॥ श्वापद पिशाचांची घरटी ॥ मांस भक्षूं येतील ॥ ४५ ॥ शेखीं तुझिया जिवा नाशू ॥ राहतां घडेल निःशेषु ॥ पैल देवालयीं चंडांशू[17] ॥ उदया येई तों बैसावें' ॥ ४६ ॥ करें दाविलें देवालय ॥ शवा घेउनी गेली माय ॥ विश्वामित्रें नवल काय ॥ येउनी केलें तें ऐका ॥ ४७ ॥ घोर निद्रा लाविली तीतें ॥ प्रेत फाडूनि काढिलीं आंतें[18] ॥ रक्त थब-

---

१५ नशिबीं १६ पडदा, पटल १७ सूर्य १८ आतडीं

थबीतें हातें ॥ मातृवदनीं घातली ! ॥ ४८ ॥ मांसरक्ताचा सडा ॥ विखरोनि सांडिला चहुंकडां ॥ चूर्ण[१९] कज्जल तोंडा ॥ चर्चुनी केली बीभत्स ॥ ४९ ॥ आपण जाऊनी नगरमुखा ॥ शंख करुनी मारी हाका ॥ 'कपाटें उघडीं नरनायका ॥ लांव[२०] पाठी लागली ॥ ५० ॥ क्षुद्रकपाटें[२१] घेतला आंतु ॥ वृत्तांत पुसती राजदूतु ॥ येरु म्हणे 'माझा मृत्यु ॥ होत होता, वांचलों ॥ ५१ ॥ या नगरांतूनि राक्षसी ॥ भक्षीत आली बाळकासी ॥ माझे लागली पाठीशी ॥ पळोन आलों लगबगां ॥ ५२ ॥ बाळक भक्षीत देउळी ॥ जातां प्रत्यक्ष देखाल डोळीं' ॥ तंव राजदूत दीपिकाजाळी ॥ पाहों आले सत्वर ॥ ५३ ॥ दुरूनि टाकिती पाषाणा ॥ मुखें करिती गडगर्जना ॥ शस्त्रें परजुनी नाना ॥ भाव दाविती शौर्याचे ॥ ५४ ॥ तैल-दीपिका धरुनी हातीं ॥ देउळी रिघोनी धीर सुभटी ॥ वेणी धरुनी फरफराटीं ॥ वोढूनी बाहेर आणिती ॥५५॥ उभय दंडें कर्षुनी हाती ॥ दंडें दंडीत नगरपंथीं ॥ आणिली तंव मार्तंडदीप्ती ॥ प्रकाशली नभातें ॥ ५६ ॥ मात जाणविली रायासी ॥ 'आम्हीं बळें धरिली राक्षसी ॥ आतां इची आज्ञा कायसी ॥ ते आम्हांसी निवेदा' ॥ ५७ ॥ राजा अविचारबुद्धि मंद ॥ म्हणे 'करुनी दृढबंध ॥ नगरा भोंवंडूनि शिरच्छेद ॥ करा इचा अविलंबें' ॥ ५८ ॥ दूती मस्तकीं शेंदूर ॥ भरूनी फिरविली नगर ॥ पाहों आले नारी नर ॥ बाळतरुणवृद्धादि ॥ ५९ ॥ एक म्हणती 'हे खेचरी[२२] ॥ आम्हीं देखिली कौशिकघरीं ॥ अन्नसत्री पाक करी ॥ हे ते होय निर्धारें' ॥६०॥ एक म्हणे 'माझें बाळ ॥ इणेंचि भक्षिलें वेल्हाळ' ॥ एक म्हणे 'हे आळोआळ ॥ भक्षीत फिरे बाळकां' ॥ ६१ ॥ असो जनांची चाउटी ॥ फिरवुनी आणिली गंगातटी ॥ वीरबाहू शस्त्रमुष्टि ॥ देऊन धाडी सेवका ॥ ६२ ॥ स्नान घालूनि गंगा-जळें ॥ उभी केली अधोमौळें[२३] ॥ निजवल्लभें शस्त्र तेजाळें ॥ काढूनी आंचळें पुशिलें ॥ ६३ ॥ सत्त्व पहावयास गगनीं ॥ गण, गंधर्व, निर्जर,

---

१९ चुना २० हडळ २१ दिंडीमधून २२ आकाशात फिरणारी राक्षसी २३ खाली डोके करून.

मुनी ॥ सर्वांसहित विमानीं ॥ कौतुक पाहों पातले ॥ ६४ ॥ तंव दूत म्हणती 'खेचरी ॥ आतां कुलदेवतास्मरण करीं ॥ जयाची इच्छा पूर्ण अंतरीं ॥ चिंतन करी तयाचें ' ॥ ६५ ॥ सुकुमार बैसुनी पद्मासनी ॥ स्वरूपमुद्रा[२४] लाविली नयनीं ॥ हृदयीं स्मरोनि चक्रपाणी ॥ काय बोले गुरुवर्या ॥ ६६ ॥ म्हणे 'आतां जन्मची नसावा ॥ प्रारब्ध भोगवी जरी जीवा ॥ तरी मागणें हेंचि देवा ॥ जन्मोजन्मी इच्छित ॥ ६७ ॥ हरिश्चंद्रासारिखा कांत ॥ रोहिदासासारिखा सुत ॥ कुळगुरु अरुंधतीनाथ[२५] ॥ जन्मोजन्मी असावा ॥ ६८ ॥ प्रतिसृष्टीचा अपर-धाता[२६] ॥ तपोतेजें तीव्र सविता ॥ तोचि जन्मोजन्मी मागता ॥ याचक असो कौशिक ' ॥ ६९ ॥ ऐसें बोलोनी नृपभामिनी ॥ हनना वोढवी मूर्ध्नी ॥ शस्त्र पडावें तंव ते क्षणी ॥ विश्वामित्र धाविन्नला ॥ ७० ॥ वल्कल वसनें जटाधारी ॥ विभूती चर्चूनी शरीरी ॥ हुताशन नेत्रीं, मिरवे करी ॥ दंडकमंडलू साजिरा ॥ ७१ ॥ शुद्धसत्त्वकळाषोडशी ॥ पूर्ण देखोनि नृपशशी ॥ कौशिकहृदयपूर्णसिंधूसी ॥ प्रेमभरतें दाटलें ॥७२॥ प्रतिज्ञा लंघूनी वल्लरी[२७] ॥ नयनी लोटल्या अश्रुलहरी ॥ उदित हात वरिच्यावरी ॥ शस्त्रा जाउनी वारिलें ॥ ७३ ॥ कौशिककृपेच्या वरद-वातें ॥ डोलतां विबुधपारिजात[२८] ॥ सुकृतसुमनें परागभरित ॥ राज-मुकुटी वर्षती ॥ ७४ ॥ हरिश्चंद्रतारामती ॥ आवडी कौशिक धरूनी हाती ॥ मातृजनकाचिये पंक्ती ॥ रोहिदास बैसविला ॥ ७५ ॥ निज तपाच्या मौक्तिकें ॥ तिघां शेसें[२९] भरी कौतुकें ॥ जयजयकारें सृष्टिजनकें॥ हर्षें टाळी पीटिली ॥ ७६ ॥ राज कुमर कांता तिन्ही ॥ विबुध म्हणती स्वर्गभुवनीं ॥ विमानी वाहुनी नेऊं म्हणतां, मुनी ॥ म्हणे 'ऐका देव हो ! ॥७७॥ स्वर्गसुखाची अचळ फळे ॥ आंचळीं बांधिली तपोबळें ॥ परी शरीरदुःखाच्या अनळें ॥ देह जालें जर्जर ॥ ७८ ॥ राजहानीची काळिमा ॥ लागलीसे मज उत्तमा ॥ ते सारूनी स्वकीय धामा ॥ आरूढवीन ययांतें ' ॥ ७९ ॥ उमा रमा सावित्री सती ॥ लोपामुद्रा

---

२४ ऊर्ध्व किंवा अर्धोन्मीलितदृष्टि २५ वसिष्ठ २६ प्रतिब्रह्मदेव २७ वेला, मर्यादा २८ देव, विद्वान्‌रूप पारिजातकवृक्ष, २९ शुभकार्यप्रसंगी कपाळास कुंकू वगैरे लावून त्यावर तांदूळ लावितात त्यास शेस म्हणतात.

अरुंधती ॥ आपुल्या पुण्यें तारामती-॥ प्रति वोपिती चोळियाँ[30] ॥ ८० ॥ विमानीं आरूढोनी सुरवर ॥ गेले करूनी जयजयकार ॥ तिघां घेऊनी ऋषीश्वर ॥ निघता झाला अयोध्ये ॥ ८१ ॥ निमिष न लागतां सत्वर ॥ नृपकांतासहित कुमर ॥ तिघां घेऊनि ऋषीश्वर ॥ अयोध्यापुरा पातला ॥ ८२ ॥ नगर शृंगारिलें मनोहर ॥ वाद्यनादें गर्जे अंबर ॥ नाना वहनी नारीनर ॥ वळखोनी येती सामोरे ॥ ८३ ॥ शरत्काळीच्या निशारमणें ॥ शोभा दाविजे उडगणें ॥ तेवी तारानाथें[31] पुरजनें ॥ वेष्टित आला मंदिरा ॥ ८४ ॥ वर्षाकाळी सरिताओघ ॥ सागरा येती करित वेग ॥ तेवीं संपदा घेउनी जग ॥ भेटों आलें गुणाब्धी ॥ ८५ ॥ राज्यीं स्थापुनी ताराररमणा ॥ कौशिक गेला स्वर्गभुवना ॥ ऐसे क्लेश कुरुनंदनाँ[32] ॥ कोणें भोगिले सांग पां ? ॥ ८६ ॥

---

# ८ वामन पंडित

---

या कविरत्नाच्या जन्मकालाविषयीं निश्चित माहिती उपलब्ध नाहीं तथापि हे श. १५४० च्या सुमारास जन्मले असावे असा कित्येकाचा तर्क आहे. वामन-पंडित हे सातारा जिल्ह्यातील कोरेगाव कुमटे येथील जोशी होते. हे जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या आईचे नाव लक्ष्मीबाई व बापाचे नाव नरहरपंडित. ह्याच्या पत्नीचें नाव गिराबाई. वामनपंडितांनी शास्त्राध्ययन उत्तम प्रकारे केले व वादविवाद करून पुष्कळ पंडितास जिंकिले. पंडितानी प्रथम संस्कृत कविता पुष्कळ केली; परंतु पुढें पश्चात्ताप होऊन व रामदासाच्या सागण्यावरून मराठीत पद्यरचना करण्यास सुरुवात केली, असे म्हणतात.

वामनपंडितांची काव्यरचना कोमल, मधुर व मनोहर आहे. यानी नानाप्रकारच्या छंदाचा उपयोग केला असून ठिकठिकाणीं त्या त्या रसाला अनुकूल असे छंद योजिले आहेत. यांची भाषा प्रौढ, रसाळ व श्रमणमनोहर आहे. याची वाणी

---

३० सौभाग्यवायनें ३१ तारामतीचा पति हरिश्चंद्र ३२ धर्मराजा

गोड व प्रसादपूर्ण आहे. याची कविता विविध शब्दालंकारानी व अर्थालंकारानी आणि मनोहर यमकानी पूर्ण नटलेली आहे. याची वर्णनशैली झोंकदार, मार्मिक व चमत्कृतिमय अशी आहे. वर्णनात ठिकठिकाणी स्वभावोक्ति उत्तम वठली आहे. रसपरिपोष करण्याची याची हातोटी मुक्तेश्वराप्रमाणेच अप्रतिम आहे. विषय सुगम करून तो मनावर ठसविण्याची याची पद्धति मजेदार आहे. याचा आवडीचा विषय वेदात असल्यामुळे, याच विषयावर याची कविता अधिक आहे. यांचीं काव्ये भक्तिरसाने ओथंबलेलीं आहेत आणि त्यावरून परमेश्वराच्याठायीं असलेली त्याची अचल भक्ति पूर्ण व्यक्त होते.

पंडितानीं ‘ अनुभूतिलेश ’ व ‘ सिद्धातविजय ’ असे सस्कृत, आणि ‘ यथार्थ-दीपिका ’ ( भगवद्गीतेवर ओवीबद्ध टीका ), ‘ निगमसार ’ ‘ अपरोक्षानुभूति ’ ( टीका ) आणि वेदान्त, भक्ति, पौराणिक विषय यावर सुमारे ५८ वर लहानमोठी काव्ये मराठीत केली आहेत

‘नवनीता’त याचा मरणशक शके १५९५ हा दिला आहे, आणि ‘ महाराष्ट्र-कविचरित्र ’ कारानीं शके १६१७ हा दिला आहे.

## हरिनामसुधा

प्राण्यास मृत्यूपासून सोडविणारें जसे अमृत तसेच संसारापासून सोडविणारे नामरूप अमृत आहे, अशा प्रकारें यात हरिनाममहिमा वर्णिला आहे, म्हणून याला हरिनामसुधा हें नाव दिले आहे.

**हरि-चरण-सरोजी[1] चित्सुधा[2]-सार-पानें ।**
**भ्रमर परमयोगी गुंजती नामगानें ॥**
**हराति सकल दुःखा, हो सुखाची निधानें[3] ।**
**वद वद वद जिव्हे ! वासुदेवाभिधानें[4] ॥ १ ॥**

---

१ कमलीं २ चित् म्ह० आत्मज्ञानरूप अमृताच्या प्राशनानें ३ वसतिस्थानें ४ नावें

हरिपण[५] हरिनामें धातुमूर्तीसि आलें ।
हरिमय हरिनामें विश्व संतांसि झालें ॥
भवभय हरिनामें साधकांचें[६] पळालें ।
वद वद वद जिव्हे ! रामनामें रसाळें ॥ २ ॥

उडति मानस-हंस जया नभीं । शलभ त्याचि नभी उडतां न भी ॥
अजित[७]-नाम-महत्त्व ऋषि श्रुती । वदति, तेंचि वदेन यथामती ॥ ३ ॥

मोक्ष श्रुती वदति ज्यास गुणप्रसादें[८] ।
तो पावती सगुण-नाम-सुधानुवादें ॥
कोण्या मिसेंकरुनि यो हरिनाम वाचे ।
नेत्र प्रकाशति तयावरि माधवाचे ॥ ४ ॥

नकळतहि पडे हा विष्णुनामाग्नि जेथें ।
दुरित[९]-तृण-गृहाचें भस्म होणार तेथें ॥
मग सम करुणेची आयती कृष्णदृष्टि ।
भिजविल करिते जे सर्व सृष्ट्यर्थ वृष्टी ॥ ५ ॥

अजितनाम वदो भलत्या मिसें । करि कृतार्थ अमोघ सुधारसें ॥
करुनि शाकहि[१०] भक्षिल औषधी । न करि ते गुण हें न घडे कधी ॥ ६

येथें म्हणाल ' जळती जरि सर्व पापें ।
मूळें न कां जळति नाम–महा–प्रतापें ॥
नेणोनि नाम म्हणतां दुरितासि जैसें ।
जाळी न कां सकळ पातकमूळ तैसें ? ॥ ७ ॥
धातूवरी[११] अनळ नेणत बाळ घाली ।
तो अग्नि धातुमळ तो अतिशीघ्र जाळी ॥

---

५ देवपण ६ मुमुक्षूचें ७ ईश्वर ८ गुणप्रसादयोगेंकरून ९ पातकरूप गवताच्या घराचे १० भाजी ११ तांबें वगैरे

ताम्रादि भस्महि तया अनळेंचि, जेव्हां ।
कर्ता अभिज्ञ[१२] बहु जाळिल धातु तेव्हां ॥ ८ ॥
न जाणतहि ये मुखा 'हरि' तथापि पापें हरी ।
स्मरोनि महिमा स्मरे वदनि तीच नामें जरी ॥
प्रवृत्तिविषयीं[१३] जरी असति त्या जनांचीं मनें ।
विरक्त करितो हरी स्व-गुण-नाम-संकीर्तनें ॥ ९ ॥
कर्मे दासपणें[१४] करूनि निपुणें नारायणीं अर्पणें ।
पापातें क्षपणें[१५], रमापतिगुणें प्रेमामृता[१६] सेवणें ॥
सत्संगीं वसणें, स्मृतींत असणें, एकांतिचें बैसणें ।
सर्वां हें करणें, भवाब्धि तरणें, दुर्वासना मारणें ॥ १० ॥
ऐसी केवळ भक्तिमात्र करितां कैवल्यही[१७] पावती ।
भक्तीवांचुनि अन्यथा न चुकती तेव्हां तरी दुर्गती ॥
मद्याच्या कलशासि शुद्ध करितां व्यर्थेंचि तीर्थें जसीं ।
श्रीगोविंद–पदारविंद–विमुखां[१८] कर्मे समस्तें तसीं ॥ ११ ॥
प्रायश्चित्तें बहुत वदती वेदवक्ते, तथापी ।
त्या त्या कर्मे करुनिहि जरी शुद्ध होतील पापी ॥
'रामा कृष्णा मुरहर हरे' या पदी शुद्धि जैसी ।
प्रायश्चित्तें इतर न कधी शुद्धि देतील तैसी ॥ १२ ॥
हरुनि सकळ पापें गोड होतील नामें ।
मग मनिं अभिरामें[१९] सूचती विष्णुधामें ॥
हरि सकळहि पापें तत्फळें दुःखवृंदें ।
'हरि हरि' म्हणवीलें यास्तव श्रीमुकुंदें ॥ १३ ॥

---

१२ ज्ञाता १३ ससारपर १४ सेवकभावानें १५ नाश करणें १६ भक्तिरूप रस १७ मोक्ष १८ पराङ्मुख अशास १९ सुदर, सुखद

नामें स्फुरे तनु समग्र मनांत जेव्हा ।
मंदाकिनी[२०] पदनखांत दिसेल तेव्हां ॥
व्यापूनि नाम असणार समस्त अंगा ।
त्याची कसी सरि करी चरणांबुगंगा ? ॥ १४ ॥

करुनि तीर्थ तप व्रत मागती । श्रवण कीर्तन केवळ सद्गती ॥
म्हणुनियां हरिनामसुधा जसी । न गति जान्हवि[२०] देवुं शके तसी ॥ १५॥

कृष्णाची पद[२१]-पद्म-चित्सुख-सुधा सप्रेम जे चाखती ।
ते मिथ्या मृग[२२]-नीर-मायिक-गुणी कां हो पुन्हां माखती ? ॥
प्रायश्चित्त तदन्यही[२३] अघ हरी शुद्धी तरी त्या तशा ।
कीं हस्ती धुतला तथापिहि धुळी तीरी शिरी घे तशा ॥ १६ ॥

नरकनाशक नाम नरेश्वरें[२४] । शुकमुखें हरिचें अति आदरें ॥
परिसतां अतिविस्मित मानसी । मन बुडे हरि-नाम-सुधा-रसीं ॥ १७॥

## रामस्तव

मुनिमनें रमती रघुनंदना । तुजमधें दश-कंधर-सूदना[१] ॥
म्हणुनि निर्गुण जानकिनायका । म्हणति रामें[२] तुतें गतिदायका ॥ १ ॥

करुनि दिव्य अलौकिक[३] सुव्रतें । रमविशी मन तूं सगुण व्रतें ॥
सगुण संत असे रिति राम तूं । सुजन-हृत्कमळीं[४] अभिराम तूं ॥ २॥

सूर्य-वंश-अमृतांबुधि-सोमा[५] । रामचंद्र म्हणती तुज रामा ! ॥
पाप ताप हरि नाम जिवाचे । दाह शांत करणार शिवाचे ॥ ३ ॥

---

२० गगा २१ ईश्वरज्ञानापासून प्राप्त होणारें सुखरूप अमृत २२ मृगजळवत् खोट्या मायेमध्यें २३ नामस्मरणाहून अन्य २४ परीक्षितीनें

१ दशमुखी रावणाचा वध करणाऱ्या २ मुनींचीं मनें रमति म्हणून राम ३ अपूर्व ४ सज्जनाच्या अंत:करणरूप कमलांत ५ सूर्यवंशरूप समुद्रापासून उत्पन्न झालेल्या सोमा म्ह० चंद्रा

चंद्र आणि धरिली शिरिं गंगा । जाय ना तरि विषानळ भंगा ॥
रामनाम जपतां मग वाचे । दाह शांत करणार शिवाचे ॥ ४ ॥
राम हृत्कमळि आतळवेना[६] । रामनाम वदनी पळवेना ॥
काळकूट मग शंकर-कंठी । काळ राघव भयास्तव कंठी[७] ॥ ५ ॥
शर्व-कंठ-विष-गर्व हराया । शक्त नामचि तुझे रघुराया ! ॥
सेतु सागर कपी उतराया । नामसेतु भवसिंधु तराया ॥ ६ ॥
नाम राममय रामचि लोकों । हें न जाणत वृथा शिणलों की ॥
रामनाम धरिलें जइं वाचे । तूटले तइंच पाश भवाचे ॥ ७ ॥
सिंधुसेतु रचिला रघुरामें । नाशिला भवसमुद्रचि नामें ॥
तारिली स्वनगरी अवतारीं । रामनाम भुवनत्रय तारी ॥ ८ ॥
मूर्ति ते प्रकटली घनवर्णी[९] । जो दिवाकरकुळी नृपवर्णी[१०] ॥
तोचि हे गुणहि वामन वर्णी । मूर्ति आदिकवि वाल्मिकि वर्णी ॥ ९ ॥

## सीतास्वयंवर

वंदूनियां पद तया प्रभु-राघवाचे ।
सीतास्वयंवर निरूपिन लेश वाचे: ॥
जें व्यास-वाल्मिकि-मुखांतिल सार साचें ।
संक्षेप मी कथिन रूप तया रसाचें ॥ १ ॥

राम उद्धरुनि गौतम[१]-जाया । दे निरोप पति-सन्निध जाया. ॥
कौशिकासह गृहा जनकाच्या । ये, स्वयंवर[२]-वधू-जनकाच्या ॥ २ ॥
रावणादिक पती असुरांचे । वृंद वृंद नृप-भूमि-सुरांचे ॥
मान्यता जनक तो करि पूजी । तों मुनीत दशकंठ-रिपू[३] जी ॥ ३ ॥
बुद्धि जे अनुभवी जनकाची । मूर्ति त्या निजसुखा[४] कनकाची ॥
पाहतां धणि[५] पुरे न मनाची । न स्मृति[६] स्फुरतसे नमनाची ॥ ४ ॥

---

६ स्पर्शवना ७ घालवी ८ शिवाच्या कठस्थ विषाचा तीव्र ताप ९ कृष्णवर्ण, मेघवर्ण १० क्षत्रियकुळीं

१ अहल्या २ स्वयवरवधू जी सीता तिच्या पित्याच्या ३ रावणाचा शत्रु, राम ४ आत्मसुखा ५ तृप्ति ६ ( आनदामुळें ) नमस्कार करण्याची स्मृति उत्पन्न झाली नाहीं

तो भक्तिसंस्कार वरी विदेहा[७] । पाडी पदीं दंडचि जेविं देहा ॥
उठे करी त्यावरि पूजनातें । करूनि पायीं अवनेजनातें[८] ॥ ५ ॥
आले बहू आणिकही घरा जे । पूजी यथायोग्य मुनींद्र राजे ॥
त्यानंतरें आणवि त्या धनुष्या । न जें ढळे दैत्य-सुरां मनुष्यां ॥ ६ ॥

वाटे तयां परम दुर्लभ ते नवोढा[९] ।
जेव्हां पुरोहित म्हणे, ' धनु कां न ओढा ? ' ॥
कोणी धरूनि बसला बसल्याचि ठाया ।
उत्साहबुद्धि न मनाप्रति दे उठाया ॥ ७ ॥

तो दशकंठ अकुंठ विसां भुजिं तें विषकंठ-धनू[१०] उचली ॥
कष्टत कोष्ठवरि, द्विज-ओष्ठहि[११] चावुनि, ज्या जरिनें खचली ॥
चाप उरी दडपे, झडपे, मग आननपंक्ति धरे रचली ॥
वासुनि दांत मुखांत दहांत पडे मति[१२] गाढ तमीं पचली ॥ ८ ॥

म्हणे विश्वामित्र स्वमनिं ' सकळांचे भरंवसे ।
कळों आले, आतां मजजवळि विश्वंभर वसे ॥
तया या श्रीरामाविण जनक-जा अन्य न वरी ।
म्हणोनी बोले कीं उठ रघुपती साध नवरी' ॥ ९ ॥

श्रीराम तेव्हां मुनि-पादपद्मा ।
वंदी, जयाचे स्वपदींच पद्मा ॥
' आज्ञा गुरूची म्हणऊनि साची ।
करीन, ' बोलोनि उठे तसाची ॥ १० ॥
श्रृंगार-वीर-करुणादि नवां रसांची ।
लीला जगद्गुरुचिया[१३] पद-सारसांची ॥
स्वप्रेम तो दशम[१४] त्यासह त्या नवांतें ।
दावी सभेसि उठतां सुरमानवांतें ॥ ११ ॥
श्रृंगार-श्रृंगालय-केसरी[१५] हो । सांगा[१६] अनंगा[१७] नट-केसरी हो ॥

---

७ जनकाला ८ प्रक्षालन ९ नवरी १० शिवाचें धनुष्य ११ दात ओंठ १२ मूर्छा आली १३ परमेश्वर रामचंद्राच्या १४ भक्तिरस १५ शृंगाररूप शिखर हेंच आहे आलय ज्याचें असा सिंह १६ सर्व अवयवयुक्त, पक्षीं, सगुण १७ मदन; पक्षीं निर्गुण

कासे विकासे पट केसरी[१८] हो। श्री शंकली पंकजं-केसरीं हो॥ १२॥

श्रृंगाररूप पहिला रस चाखवीला।
बीभत्स शोककर त्यांतचि दाखवीला॥
कीं पाहतां विषय मानुनि त्या मलाही।
चिंतानळीं मन करीलचि काम लाही॥ १३॥

लज्जावती फार, तथापि त्याची। शंका न सीता धरि हो पित्याची॥
म्हणे 'अहा तात! अशा पणानें। केलें तुवां संकट आपणातें॥ १४॥
मदन-शत्रु-शरासन[२०] हें महा। मदनमूर्तिच केवळ राम हा॥
करील सज्ज कसा धनु आपण। अहह दारुण तात तुझा पण॥ १५॥
सखीशी असें बोलतां सारसाक्षी। कृपाक्लिन्न तो होय संसार-साक्षी॥
तिला आणि सर्वां जशी देव दावी। तशी गोड येथून लीला वदावी॥१६॥

छावा[२१] उठे दशरथ-प्रभु-दिग्गजाचा।
घे चाप इक्षु-सम[२२] तें पति भर्ग ज्याचा॥
शुंडा स्वबाहु उचलूनिच चालिला हो।
घेती समस्त नयनी प्रभुचाचि लाहो[२३]॥ १७॥

मोडो त्वरें हें भव-चाप हाती। ऐशा कृपेनें द्विज जे पहाती॥
तो भाव दावी स्वकृपारसाचा॥ जरि स्वयें पूर्ण अपार साचा॥ १८॥

'मुंगीस पक्ष फुटला उठला तसा रे'।
अन्योन्य हें वदति, हांसति चट्ट सारे॥
श्रीराम हास्यरस ये रिति भाव दावी।
आतां कथा किमपि वीररसी वदावी॥ १९॥
मोठ्या गजासहि जसा चिमणा[२४] हरी तो॥
गंडस्थळें अति विदारुनि संहरीतो॥
मोडील हें धनु असें कुशलांसि वाटे।
चित्तांत वीररस ये नयनासि वाटे॥ २०॥

---

१८ केशरी रंगाचा, पिंवळा १९ कमलाच्या परागांच्या ठायी २० मदनशत्रु शंकराचें धनुष्य २१ शावक, बालक २२ उसासारखें २३ लाभ, दर्शनलाभ २४ लहान

अद्भुतांत विभु अद्भुत दावी । ते कथा विशद लेश वदावी ॥
केंवि वोढिल धनुष्य भवाचें ?। आयका सुख निजानुभवाचें ॥ २१ ॥
घंटापताकांसह चाप हाती । घेतां स्त्रिया पूरुषही पहाती ॥
किशोरही थोर पराक्रमी तो । जाणों उसातें गज आक्रमीतो ॥ २२ ॥
जेव्हां कथेची गति हे वदावी । धनुष्यभंगी रस रौद्र दावी ॥
कडाडितां चाप भयानकांहीं । करी असा उग्र जनास कांहीं ॥ २३ ॥
सद्भक्ति दे मूर्ति नवां रसांची । देखोनि नेत्रीं गति मानसांची ॥
ते वर्षती प्रेम तयाचि वाटे । एवं दहावा रस त्यांसि वाटे ॥ २४ ॥
मोडी असें जों भवचाप हाती । तों लोक रामी रस हे पहाती ॥
ते जानकी ये प्रिय देवराया । रंगांत[२५] मांतग–गती[२६] वराया ॥ २५ ॥
गजगती जगतीप्रति[२७] दाविते । वसुमती सुमती सुख भाविते ॥
स्वतनु–जा–तनु[२८] जाणतसे धरा । नवरि ते वरिते मणि–कंधरा ॥ २६ ॥
ध्वनि उठे चरणीं लघु भूषणीं । मन समर्पित ये रघुभूषणीं ॥
परमहंस–गतीच[२९] जया प्रिया । परमहंस–गती[३०] वरिते प्रिया ॥ २७ ॥
अर्पी गळां हार जया सु–काळी । सीता सुखाच्या पडली सुकाळी ॥
विचित्र वाद्यें जन वाजवीती । सीतापतीचें यश गाजवीती ॥ २८ ॥
गेलीं अयोध्येसि सहस्र–पत्रें । कीं, राघवें हस्त–सहस्र–पत्रें[३१] ॥
भवायुध-ध्वंस-बळांत रंगीं । यशोब्धि केला धवला तरंगी ॥ २९ ॥

'भवधनु रघुवीरें भंगिलें विश्वसारें[३२] ।
तुम्हि सहपरिवारें, पत्र वाचूनि सारे ॥
निज–तनय–विवाहालागिं यावें प्रभावें' ।
जनक दशरथातें हें लिही प्रेमभावें ॥ ३० ॥
भिजवि सजळनेत्रें पत्र तें ज्यांत वाची ।
दशरथ नृप साची कीर्ति ते राघवाची ॥

---

२५ सभास्थानीं २६ गजगामिनी २७ पृथ्वीला २८ आपल्या मुलीचें शरीर २९ सन्याशाची गति ३० हंसाप्रमाणें मनोहर आहे गति जिची ३१ हस्तकमलें ३२ विश्वाचा जो सार ( सत्य ) त्यानें

ठक[३३] सकळ सभा ते राहिली; प्रेमपाणी[३४] ।
स्रवति नयन, चित्तीं राम तो चापपाणी ॥ ३१ ॥
करि विभुजयवार्ता भग्न वार्ता भवाची ।
नवल न धनुकांबी ध्वंसिली हे भवाची ॥
श्रवणिं निघत, नाशी दुःखसंसार सारा ।
दृढपण मृडचापाहूनिहीं ज्या असारा ॥ ३२ ॥
दशरथनृपसंगे सर्व आमात्य, योद्धे, ।
इतरहि जन, जाती, नीघती जे अयोद्धे; ॥
सजलनयन सारे राघवातें पहाती ।
'नवल' म्हणति 'यानें मोडिलें चाप हातीं' ॥ ३३ ॥
पूजूनियां जनक त्यां सकळां स्वहातें ।
येऊनि दूर बहुसादर ने गृहातें ॥
श्रीरामकीर्ति वदनेंचि किती वदावी ? ।
यालागिं चापशकलें नरदेव[३५] दावी ॥ ३४ ॥
म्हणे श्रीकौसल्या, 'परमसुकुमारा रघुपती ।
कडी हाती तूझ्या जडित जड चित्तांत खुपती ।
अशा या हस्ताब्जें, उचलुनि धनू, दोन तुकडे ।
कसे केले ? पाहों न शकति बळी थोर जिकडे' ॥ ३५ ॥
नसे अंत या रामकीर्तिप्रवाहा ।
असो तें; पुढें रामसीताविवाहा ॥
जनां देखतां फार आनंद झाला ।
अजा[३६] अब्जजा भेटली श्रीअजाला ॥ ३६ ॥

## भरतभाव

**राम** वनांत जाताच त्याच्या वियोगाने **दशरथ** मरण पावला. तेव्हां **भरत** आपल्या मामाच्या गावीं होता, तेथून त्यास **वसिष्ठ**ऋषीनें आणविले. तेव्हा **राम**

---

३३ थक्क, चकित ३४ प्रेमाचे अश्रु ३५ राजा (जनक) ३६ जन्मरहित कमलोद्भवा (सीता) जन्मरहित (अनादि) रामचंद्राला भेटली

**वनवासास** जाण्याला व **दशरथ** मरण्याला आपली आई **कैकेयी** हीच कारण झाली, असें भरतास समजतांच त्यास परम खेद झाला. बापाची क्रिया संपल्यावर तो रामाला वनांतून परत आणावें म्हणून त्याजकडे गेला; परतु मीं वनात जावे, तूं राज्य चालवावें अशी पित्याची अज्ञा आहे, ती आपण दोघानीही उल्लंघूं नये, असे रामानें सागून त्यास राज्याधिकार चालविण्यास परत पाठविलें. नंतर भरत रामाच्या पादुका घेऊन **अयोध्ये**जवळ **नंदिग्रामीं** आला, हे ह्या आख्यानात सांगितलें आहे. ह्यांत भरताची रामचंद्राविषयीं अलौकिक भक्ति वर्णिली आहे, म्हणून ह्यास **भरतभाव** ही सज्ञा कवीनें योजिली आहे.

**करुनि वंदन जानकि-नायका । भरत-भाव निरोपिन[1] आयका॥**
**जननि टाकुनि रामपदीं निघे॥ सुकृति[2] तो, मति हे समजोनि घे॥ १॥**

**भरत जवळि नाही मातुल-ग्राम-वासी ।**
**भरतजननि धाडी कानना राघवासी ॥**
**दशरथ मृत झाला राम जातां वियोगें ।**
**तृण बहुत दिसांचें अग्निच्या जेविं योगें ॥ २ ॥**
**मग भरत वसिष्ठें आणिला जों अयोध्ये ।**
**नगरि गतधवा[3] तों आणि निर्वीर्य[4] योद्धे ॥**
**जन मृतसम देखे हेतु कांहीं कळेना ।**
**जननिकृत कुचेष्टा[5] बुद्धितें आकळेना[6] ॥ ३ ॥**

**वृत्तांत सांगे भरतासि माय । स्वानंद जीचा त्रिजगीं न माय[7] ॥**
**भेदूनि वक्षःस्थळ[8] शब्द तीचा । करी महाक्षोभ महामतीचा[9] ॥ ४ ॥**
**जाळील तीतें निजजदृष्टिपातें[10] । पाहे असा हालविनाच पातें ॥**
**म्हणे अवो पापिणि पापरूपे । जळो तुझें तोंड जड–स्वरूपे[11] ॥ ५ ॥**
**वना धाडिलें जेधवां रामराया । तुवां हेतु केला स्वभर्ता मराया ॥**
**अहा! रामसीता अशा दंपतीतें । वना धाडिलें; मारिलें कां पतीतें ?॥ ६॥**

---

१ सांगेन २ उत्तम आचरणाचा, धन्य ३ विधवा ४ निस्तेज ५ दुष्कृत्य ६ समजेना ७ मावला नाही ८ हृदय ९ थोरमनाच्या भरताचा १० नुसत्या अवलोकनाने ११ पाषाणवत् म्ह० निरत.करण, असा भाव

धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे । कौसल्येच्या ये गृहा सानुरागें[१२] ॥
त्यातें देखे जेधवां राममाय । श्रीरामाचा शोक लोकीं न माय ॥ ७ ॥
मोकळा करुनि कंठ तेधवां । आठवूनि मनिं जानकीधवा ॥
ते रडे, भरतही तसा रडे । जोंवरी नयन होति कोरडे ॥ ८ ॥
म्हणे, 'वांसरा घात झाला असा रे । तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे ॥
वृथा धाडिला राम माझा वनासी । न देखों शके त्या जगज्जीवनासी ॥९॥
जानकी जनकराजकुमारी । पाय कोमल जिचे सुकुमारी ॥
चालली जसि[१३] वना अनवाणी । बोलली कटकटा[१४] जनवाणी ' ॥ १० ॥
भरत शोक अनेक तिचे असे । परिसतां, मग बोलत तो असे ॥
' जननि गोष्टि समस्तहि हे खरी । परिस येविषयीं मम वैखरी ॥ ११ ॥
मी ब्रह्म-हत्या-शत-पाप[१५] लाहें । ठावें असे लेश जरी मला हें ॥
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें । वधी जरी ठाउक हें मतीतें ॥ १२ ॥

म्हणे राममाता ' अरे वांसरा ! मी ।
तुझा जाणतें प्रेम उल्हास रामीं ॥
तुला रामसेवेविणें काम[१६] नाहीं ।
न राज्यादिकांची जया कामनाहीं ॥ १३ ॥

तों वसिष्ठ वदला भरतातें । राम-पाद-निज-लाभ-रतातें[१७] ।
पाळि यावरि समस्त धरा हे । राजनीति करिं, सावध राहें ॥ १४ ॥

रायें तुतेंचि दिधलें स्वनृपासना रे ।
संपूर्ण तूं जननिची करिं वासना रे ॥
शब्दार्थ हे न कळती गुरुलाघवाचे[१८] ।
साचे म्हणूनि पद आठवि राघवाचे ॥ १५ ॥
' राजाधिराज रघुराजचि एक जाणा ।
पाहों चला सकळ जाउनि त्या सुजाणा ॥

---

१२ प्रेमानें १३ जेव्हा १४ लोकानीं फार विलाप केले, असा भाव १५ शंभर ब्राह्मणवधाचें पातक १६ इच्छा १७ रामचरणाची आपल्याला प्राप्ति करून घेण्यास तत्पर १८ वसिष्ठाच्या खुबीदार भाषणाचा गुह्यार्थ

आम्हीं समस्त जन किंकर राघवाचे ।
जे रामनाम जपतों अजि नित्य वाचे ॥ १६ ॥

विना राक्षसी कैकयी, काननातें । चला सर्व, पाहूं मृगांकाननातें[१९] ॥
प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें । न येतां समर्पूं शरीरें स्व-हातें ॥ १७ ॥
वसिष्ठ, तो, आणि समस्त माया[२०] । रामार्थ टाकूनि समग्र माया[२१] ॥
सेना प्रजा सर्वहि त्याच वेळे । जाती, जसे लंघिति सिंधु वेळें[२२] ॥ १८ ॥

पायी निघे भरत सानुज रामवाटे ।
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे ॥
माथां जटा मुकुट, वल्कल नेसला हो ।
श्रीरामवेष, वदनीं प्रभुनाम लाहो ॥ १९ ॥

रामवृत्त रघु-वंश-वरातें । सर्व वर्णुनि गुहाख्य[२३] किरातें ॥
लंघुनी सुरनदी भरतातें । ने ससैन्य रघुराज-रतातें[२४] ॥ २० ॥
पादचिन्हित[२५] तये वसुधेतें । देखतां तृषित जेविं सुधेतें ॥
रामचंद्र-पद-सारस-मुद्रा । वाढवी भरत-सौख्य-समुद्रा ॥ २१ ॥
दूर्वा-दल-श्यामल[२६] दीप्ति देहीं । सेवी पदें लक्ष्मण तो विदेही ॥
गंगातटीं सेवित मंदवातें । देखे अशा श्रीरघु-पुंगवातें ॥ २२ ॥

रडे फुंदफुंदे, शिरीं पादपद्मा ।
धरी, सद्म मानी जया नित्य पद्मा ॥
बळें क्षेम[२७] दे त्यासि वोढूनि राम ।
स्वभक्तप्रिय स्वामि विश्वाभिराम ॥ २३ ॥
मांडिये उपरि बैसविला हो ।
अश्रुनीर पुशि दे सुखलाहो[२८] ॥

---

१९ चंद्रवदन रामाला २० माता २१ लोभ २२ मर्यादेला २३ गुहनामक पारध्याने २४ रामाच्या ठायी तन्मय झालेल्यास २५ रामपदांकित २६ दूर्वांकुराप्रमाणें हरितनीलवर्ण २७ आलिंगन २८ सुखाचा लाभ

"वांसरा न रड, सांग सुवार्ता"।
शब्द हा निववि दुःखादवार्ता[२९] ॥ २४ ॥
तों देखिला गुरुवसिष्ठ तयास वंदी।
ब्रह्मण्य देव जडला चरणारविंदी ॥
तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्या हो।
भेटोनियां तिघिहि सत्वर सेविल्या हो ॥ २५ ॥

'पिता सुखी कीं' म्हणतांचि रामा। रडोनि त्या सांगति सूपरामा[३०] ॥
रडे अहो रामहि लोकरीती। स्त्रिया पुन्हा शोक महा करीती ॥ २६ ॥
सपिंडीक्रिया[३१] राम गंगातटाकीं। करी, आणि ते पिंड गंगेत टाकी ॥
रडे, लोकदृष्टीस शोक-श्रमातें। प्रभू दावुनी ये पुन्हा आश्रमातें ॥ २७ ॥
तों वदे भरत गोष्टि मनाची। प्रार्थना बहुत आगमनाची ॥
मांडिली, परि न राघव मानी। देखतां सुरवरांस विमानीं ॥ २८ ॥
'आज्ञा पित्याची मज मोडवेना। वत्सा तुझी गोष्टहि तोडवेना ॥
घालूं नको बा मज संकटांत। नको पडों या सहसा हटांत ॥ २९ ॥
अशी आयके जेधवां रामवाणी। मुखश्री करी बंधु तो दीनवाणी ॥
म्हणे 'तात-आज्ञा मृगांकानना रे। मला सांग, जाईन मी कानना रे ॥३०॥
'बापा ऐसें वर्ततां तों विशेषें। आज्ञाभंग प्राप्त दोघां अशेषें ॥
एवं राज्यातें तुवां रे भजावें। ताताज्ञेनें कानना म्यांच जावें' ॥ ३१ ॥

ये ना असें भरत देखुनि रामराया।
गंगातटी रचुनि दर्भ बसे मराया ॥
पाहे वसिष्ठमुनि-वक्त्र-सरोरुहातें[३२]।
श्रीराम, आणि खुण दाखवि हो स्वहातें ॥ ३२ ॥
की 'सांग गुह्य अवतारचरित्र याला।
जें तारितें चहुं युगांत जगत्रयाला, ॥
बोले वसिष्ठ मग संनिध जाउनीयां।
'कां प्राण टाकिसि?' म्हणे समजावुनीयां ॥ ३३ ॥

---

२९ दु.खरूप वणव्यानें पीडिलेल्या भरताला ३० मरण ३१ उत्तरक्रिया ३२ वदनकमलातें

‘ हा राम मारील दशाननासीं ।
यालागिं जातो प्रभु काननासीं ॥
नको निवारूं भरता तयाला ।
ब्रह्मादिकांच्या पद–दातयाला’[33] ॥ ३४ ॥
हें आयकोनि जरि शोकहि दूर गेला ।
प्रत्यक्ष दर्शनसुखास बहू भुकेला ॥
तेव्हां उठोनि भरतें पदवंदनातें ।
केलें दुरूनि, म्हणतो रघुनंदनातें ॥ ३५ ॥
वर्षें द्विसप्त जरि काल समाप्त झाला ।
त्यानंतरें अजि तुझ्या चरणांबुजाला ॥
स्पर्शो शिरें न जरि देह, तयाच वारीं ।
यातें त्यजीनचि विरिंचि जरी निवारी ॥ ३६ ॥
वर्षें चतुर्दशहि रक्षिन, शासनातें ।
अंगीकरीन, न बसेन नृपासनातें ॥
सिंहासनावरि तुझ्या पद–पादुका मी ।
पूजीन जो तव पदांबुज–लाभ–कामी ॥ ३७ ॥
पादुका जडित आणुनि हातें । रामचंद्र-चरणांबु-रुहातें ॥
लावुनी, निजशिरीं भरतानें । वंदिल्या रघु–वरांघ्रि–रतानें ॥ ३८ ॥

## वनसुधा

प्रस्तुत प्रकरण भागवत स्कं. १० अ. ११–१३ याच्या आधारें रचिलेले आहे. श्रीकृष्णाने गोपबाळकांसह वनात जी क्रीडा केली तिचें वर्णन यात असून, ते वर्णन अमृताप्रमाणें मधुर आहे म्हणून या प्रकरणाला ‘वनसुधा’ हें नाव दिले आहे. कंसाने कृष्णवधार्थ अघासुरनामक राक्षसास पाठविलें होतें त्याच्या वधार्थच कृष्णाने ही क्रीडा केली व क्रीडेच्या मिषानें त्याचा वध केला, असें यात वर्णन आहे. वामनपंडिताच्या रसाळ काव्यांपैकीं हें एक आहे, व प्रकरणाच्या नांवानुरूप मधुर वठले आहे.

---

३३ पद प्राप्त करून देणाऱ्याला

सुगति[1] दे अतिदुष्ट अघासुरा[2] । स्मर मना दृढ त्या अनघा[3] सुरा ॥
प्रभु ऋणी जरि दे परमा गती । स्व-पद-दास्यचि ते नर मागती ॥ १ ॥

बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं, ।
'रात्रींच सिद्ध करणें अशनादि[4] शिकीं; ॥
जाऊं समस्तहि उद्यां वन-भोजनातें' ।
पोटांत[5] भाव वधणें अघ-दुर्जनातें ॥ २ ॥
एके दिनीं मनि धरूनि असें हरी तो ।
चाले प्रभातसमयीं, खळ जो हरीतो ॥
शृंगी-रवेंचि[6] करि जागृत मित्र-सेना ।
देणार[7] जागृतिस ज्याविण हो असेना ॥ ३ ॥

खडबडोनि[8] समस्तहि धांवले । सहितवत्स हरीप्रति पावले ॥
सकळ खेळति सोडुनि वांसुरां । परम कौतुक जें गगनीं सुरां ॥ ४ ॥
वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे[9] । तुरे खोंविती मस्तकीं पल्लवांचे ॥
फुलांचे गळां घालिती दिव्य हार । स्वनाथासवें[10] ते करीती विहार ॥ ५ ॥

स्वकौशल्य ज्या गुंज-माळांत[11] नाना ।
गळां घालिती ते करीती तनाना[12] ॥
शिरीं बांधिती मोरपत्रें[13] विचित्रें ।
शरीरावरी रेखिती[14] दिव्य चित्रें ॥ ६ ॥
नसोनी[15] उणें रत्नमुक्ता सुवर्णा ।
उगाळूनियां मृत्तिकावर्ण वर्णा[16] ॥

---

१ सद्गति, मुक्ति २ अघनावाच्या दैत्यास ३ पापरहित अशा देवाला ४ खाण्याचे पदार्थ ५ अतःकरणातील हेतु ६ लहान शिंगाच्या शब्दानें ७ ज्या (कृष्णा) शिवाय चैतन्य-स्फूर्ति, ज्ञानस्फूर्ति, करणारा कोणी नाहीं ८ मोठ्या गडबडीनें (श्लो. ५–१८ पर्यंत बाळकाच्या क्रीडेचें मोठें मार्मिक व हास्यरसोत्पादक वर्णन आहे) ९ गोपालाचें १० आपल्या स्वामीसह ११ गुंजाच्या माला १२ गायनाचे आलाप १३ मोराचीं पिसें १४ काढतात १५ रत्नाची, मोत्याची व सोन्याची उणीव नसताही १६ रंगास

तनू रेखिती, कृष्ण ही लोकरीती।
करी चित्र देहीं, जसे ते करीती॥ ७॥
पहायास शोभा मृगां-काननाची[१७]।
पुढें मूर्ति जातां मृगांकाननाची[१८]॥
गडी त्या चतुर्वक्त्र-बापास[१९] हातीं।
धरीतीच धांवोनि निष्पाप होती ॥ ८॥
परोपरी खेळति जी ! वनांत। अर्पूनि चित्तें जगजीवनांत[२०]॥
धरूनियां मर्कटपुच्छ[२१] हाती। तयांसवें वृक्षि उडों पहाती॥ ९॥
मुखें वांसुनी लोचन-भ्रूतटातें[२२]।
उभारूनियां वांकुल्या[२३] मर्कटातें॥
अहो ! दाविती शब्द तैसे करीती।
असे खेळती बाळ निःशंकरीती॥ १०॥
खगांचिया साउलिच्याच संगें।
ते धांवती हास्यरसप्रसंगें॥
हंसाचिया[२४] दाखविती गतीतें।
जे लाधले हंस-गुरू-गतीतें[२५]॥११॥
वनी देखुनी मेघ-नीळास[२६] मोर।
प्रमोदें करी नृत्यलीला समोर॥
तयासारिखे नाचती तोक[२७] सारे।
खुणावूनि अन्योन्य कीं 'तो कसा रे'॥ १२॥
जसे दांभिक ध्यानमुद्रा[२८] धरीती।
जना दाविती ज्ञान ही बोधरीती॥

---

१७ श्वापदाची व वनाची १८ मृगाचें चिन्ह आहे ज्यास असा जो चंद्र त्याच्या सारखे मुख आहे ज्याचें अशा कृष्णाची १९ चतुर्मुख जो ब्रह्मदेव त्याचा पिता २० मूळ शब्द जगज्जीवन असा आहे २१ माकडाची शेंपटी २२ डोळे वटारून व भिवया चढवून २३ वेडावणें २४ हंसपक्ष्याची चाल २५ हंस=परमहंस (इंद्रियदमन केलें आहे असा यति) त्यामध्यें श्रेष्ठ त्यांना मिळणारी गति ज्यास मिळाली होती २६ मेघासारख्या निळ्या कृष्णास २७ बाळक २८ ईश्वरध्यानमय अचचल स्थिति

तसी दाविती ते बकाभ्यासमुद्रा[२९] ।
गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा[३०] ॥ १३ ॥
उडत उडत चाले जेविं मंडूकजाती[३१] ।
उकड बसाति तैसे त्यासवें तीव्र[३२] जाती ॥
न बहु परिसतां ते हस्तपादादि पाणी ।
तरति नवल पाहे हांसतो चक्रपाणी ॥ १४ ॥
रस[३३] पहाति नभीं अवघे सुर ।
त्वरित ये इतुक्यांत अघासुर
दुरुनि लक्षितसे खळ खेळ तो ।
बक-बकी-रिपु[३४] ज्यांसह खेळतो ॥ १५ ॥
अघ अजगर मोठा तोंड वासूनि वाटे ।
शयन करि मुलांला तुच्छ होऊनि वाटे ॥
न फणि[३५] परि फणीसा दीसतो हा स्वरूपी ।
म्हणउनि शिशुवृंदें स्वैर-भावें निरूपी ॥ १६ ॥
गडी सर्व टाळीरवें केशवाचे । असे धांवती श्रीहृषीकेश[३६] वाचे ॥
सवें हांकिले वृंद ही वांसुरांचे । भयें कांपले देह सर्वां सुरांचे ॥ १७ ॥
देखोनि मानित अही हरि विस्मयातें ।
कीं सर्प हा करिल दारुण भस्म यांतें ॥
जाळील लाविल न हा असुर क्षणातें ।
यांच्या तरी करिन मी असु-रक्षणातें ॥ १८ ॥
विचारूनि[३७] ऐशा कृपेनें हरी तो । स्वयें जो रिघे जो खळां संहरीतो ॥
पडे भक्त त्यामाजि घाली स्वदेहा । जया आपुलें देव सर्वस्व दे हा ॥१९॥
स्वभक्तांसि जो देव सर्वस्व दे हा । अघाच्या मुखीं वाढवी तो स्वदेहा ॥
जसा वायु दाटे तसें दुःख वाटे । निघे प्राण तो ब्रह्मरंध्राच[३८] वाटे ॥२०॥

---

२९ ध्यानस्थ यतीप्रमाणें बगळा मासे धरण्याकरिता बसतो तद्वत् स्थिति ३० कृपासागर कृष्णास ३१ बेडूक ३२ चपल ३३ क्रीडारस ३४ बकासुर व पुतना यांचा शत्रु ३५ सर्प ३६ हृषीक म्हणजे इंद्रियें त्याचा स्वामी (कृष्ण) ३७ विचार करून ३८ मस्तकातून.

सवत्सें मुलें जीं मृतें त्यांस देवें। पहातांचि तीं उठती हो ! सदैवें ॥
तयांयुक्त बाहेर जेव्हां निघाला। हरी मुक्ति दे ज्योतिरूपा अघाला ॥२१॥
देऊनियां मुक्ति अघास देवें। मुलें सर्व घेउनि तीं सदैवें ॥
सरोवराच्या बरव्या तटातें। आला हरी नाशुनि संकटातें ॥ २२ ॥

म्हणे कृष्ण त्यां बाळसंतां,[३९] ‘ पहा रे।
अरे या स्थळीं सर्व संताप हारे ॥
करी ठाव[४०] खेळाचि या संपदा हा।
जया वाळवंटीं घडे संप[४१] दाहा ॥ २३ ॥
पहा हे मऊ शीतळ स्वच्छ वाळू।
रुचे अन्न येथें क्षुधा तुच्छ वाळूं॥
पहा साउली दाट केविं द्रुमांची।
नव्या पल्लवों श्री पहा विद्रुमाची[४२] ॥ २४ ॥
स्वपद्मीच पद्मालया[४३] श्री जळाला।
करी देखतां दाह जातो जळाला ॥
न नीरास हे स्वच्छता मानसाच्या[४४]।
गती ज्यांत संतांचिया मानसांच्या ॥ २५ ॥

झाडे पुण्यफळें करूनि सुफळें केळीं बरीं पोफळें।
नारेळें स–जळें विचित्र उजळें हीं रम्य सीताफळें ॥
तैसीं हीं प्रबळें स्वसंचितबळें जीं तुंबळें जांबळें।
पुष्पें हीं विमळें अशोक बकुळें कुंदादिकांचीं कुळें[४५] ॥ २६ ॥
पाळीयुक्त तळीं असीं न सुतळीं स्वर्गीं न वा भूतळीं।
वायूतें विमळी जळीं सकमळीं जीं पाळिती शीतळीं ॥
अंतर्बाह्य अली महा-शत-दळीं[४६] भृंगावळी सांवळी।
बिंदू त्याच दळीं कसा डळमळी घे पैज मुक्ताफळीं[४७] ॥ २७ ॥

वदे कृष्ण गोपाळबाळां जनांतें।
‘ बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें ॥

---

३९ बाळरूप सतांस ४० स्थान ४१ समाप्ति, अत ४२ पोंवळ्याची शोभा ४३ लक्ष्मी ४४ मानम सरोवराच्या ४५ कुज, समुदाय ४६ कमलामध्यें ४७ मोत्याशी

वनीं वत्स सोडा चरायासि पाणी ।
तयां पाजुनी या ' म्हणे चक्रपाणी ॥ २८ ॥
' बरें कृष्णजी ! बोलसी तूं जसा रे ! ।
तसें वर्ततों, लक्षितों तूज सारे ! ॥
असें बोलुनी सोडिती वांसुरांतें ।
नभी होय आश्चर्य सर्वां सुरांतें ॥ २९ ॥

शिंकाच कोणी अशनें[४८] करीती । पत्रावळी एक अनेकरीती ॥
कित्येकि दूर्वांकुर-दर्भकांही । केलीं स्वपात्रें व्रजअर्भकांहीं[४९] ॥ ३० ॥

निजमुख कवणाही आड दृष्टी असेना ।
रचुनि बसवि ऐसी भौंवती बालसेना ॥
हरिवदन पहाया सर्व दृष्टी भुकेल्या ।
म्हणुनि बहुत पंक्ती मंडलाकार केल्या ॥ ३१ ॥

संतोषतो नंदकुमार साचा । बाळांत तैशा परमा[५०] रसाचा ॥
पंक्तीस दे लाभ अजी ! वनांत । बुद्धी जयांच्या जगजीवनांत ॥ ३२ ॥
असे कर्णिका[५१] अंबुजामाजि जेवीं । मुलांमध्यभागीं बसे कृष्ण जेवी ॥
मुखीं ग्रास सप्रेम घालूनि हातीं । दहीं भात, हे देव लीला पहाती ॥ ३३ ॥

वंशी[५२] नादनटी[५७] तिला कटितटी[५३] खोवूनि पोटी पटीं[५४] ।
कक्षे वामपुटीं[५५] स्वशृंग निकटीं वेताटिही[५६] गोमटी ॥
जेवी नीरतटीं[५७] तरू-तळवटीं, श्रीश्यामदेहीं उटी ।
दाटी व्योमघटीं[५८] सुरां, सुखलुटी घेती जटी[५९] धूर्जटी ॥ ३४ ॥

वत्स सर्वहि सु-भा-गवतांत[६०] । श्रीपती स्वशिशु भागवतांत[६१] ॥
जेवितो म्हणति भागवतांत[६२] । स्वात्मतों-सर-वि-भागवतांत[६३] ॥ ३५ ॥

---

४८ भोजनपात्रें ४९ गवळ्याच्या बाळकानी ५० अत्यत आनदाचा ५१ कमलातील गड्डा ५२ वेळूची मधुर नाद करणारी मुरली ५३ कडोसरीस ५४ निऱ्या खोंवण्याच्या ठिकाणीं ५५ डाव्या कुशीस ५६ वेताची काठी ५७ यमुनेच्या काठीं ५८ आकाशाच्या पोकळींत ५९ जटाधारी तपस्वी ६० सुदर गवतात ६१ भगवद्भक्त गोपाळांमध्यें ६२ भागवतपुराणात ६३ स्वात्मरसाचा आस्वाद घेणाऱ्या गोपाळबाळामध्यें

## हरिविलास

कालिया नावाचा भयंकर सर्प यमुनेच्या डोहात राहून प्राण्यांस फार उपद्रव दे होता. त्याला कृष्णाने लीलेने शासन केलें तो प्रसंग या सुंदर प्रकरणात वर्णिला आहे म्हणून यास हरिविलास हे नाव दिले आहे. हें वामनपंडिताच्या अत्यंत रसाळ काव्यांपैकीं एक आहे.

**फणिफणावरि[1] नृत्य करी हरी। प्रकृति जो भवबंध-करी[2] हरी[3] ॥**
**त्रिभुवनीं जनिं काननिं दीसतो। स्मर मना प्रभु यामिनि-दीस[4] तो ॥ १ ॥**
**एके दिनीं गोप वसंततापें। तृषार्त मार्तंड-कर-प्रतापें[5] ॥**
**पुढें वनी धुंडिति सर्व पाणी। मागूनि ये दूरुनि चक्रपाणी ॥ २ ॥**

**ते पावले नदिस तों ऱ्हद[6] कालयाचा।**
**जेथें निवास भुजगा अतिकाल याचा ॥**
**ज्याच्या विषें विषम तें ऱ्हदनीर भारी।**
**प्याले समीप नसतां मधुकैटभारी[7] ॥ ३ ॥**

**धेनु गोपहि तया जलपानें। ज्या विषानल[8] कढे जल त्यानें ॥**
**पावले सकलही मरणातें। अंतरोनि हरिच्या चरणातें ॥ ४ ॥**
**पावला इतुकियांत हरी तो। जो स्वकीय-जन-मृत्यु हरीतो ॥**
**त्याचिया करिति जे स्मरणातें। होति ते वश कसे मरणातें ? ॥ ५ ॥**
**काळ-सर्प-विष-पान-मृतांतें[9]। जीववी स्वनयनें, अमृतातें ॥**
**वर्षतां, पशुप धेनु अशेषें ! ऊठती खडबडूनि विशेषें ॥ ६ ॥**
**काळिया तरि जळांतचि आहे। जाय दूरि गरळानळ[10]-आहे ॥**
**[11]उष्णवारि विषवायु नभाला। व्यापितां न उडवे शलभाला ॥ ७ ॥**
**इच्छिला नदिं अनुग्रह, राया !। या मिसें भुजगगर्व हराया ॥**
**थोर एकचि कदंब तटाकीं। त्यावरूनि उडि अच्युत टाकी ॥ ८ ॥**

---

१ सर्पाच्या फणावर २ ससारबधनरूप हत्ती ३ नाहींसा करितो ४ रात्रदिवस ५ सूर्याच्या खर तापानें ६ डोह ७ मधु व कैटभ दैत्याचा शत्रु ८ त्या अग्निवत् प्रखर विषानें यमुनेच्या पाण्यास कढ येई असा भाव ९ काळाप्रमाणें जो सर्प त्याच्या विषपानानें मृत्यु पावलेल्यास १० विषाग्नीची वाफ ११ तापलेलें पाणी

खेळे जळीं त्या खळ–दंड–पाणी[१२]। विदारिती श्री–भुज–दंड[१३] पाणी॥
जळांत हस्ती करि विक्रमातें। दावी तसा श्रीहरि विक्रमातें॥ ९॥
देखोनि तो क्रुद्ध फणींद्र झाला। धांवोनियां श्री–गरुड–ध्वजाला॥
मर्मस्थळीं दंश करोनि दांतें। दावी बळें विक्रम–संपदांतें[१४]॥ १०॥
भुजंगे हरी वेष्टिला सर्व देही। न हाले न चाले न कांहीं वदेही॥
असे देखती सर्व मूर्च्छेस जाती। महादुःखशोकें भयें गोपजाती॥ ११॥
धरूनी मनीं सर्व या काळजीला। निघाले पहायास गोपाळजीला॥
सवे चालली बाळ-वृद्धादि-सेना[१५]। हरीवीण जीवित्व कोणा दिसेना॥१२॥
परम वृद्ध बहु लवले कटी। धरुनि यष्टि करी अतिसंकटीं॥
त्वरित चालति बाळहि रांगती। हरिचिया सुपथीं सकळां गती॥ १३॥
ज्यांसि नित्य हरि–दर्शन–वोढा[१६]। चालिल्या तरुण आणि नवोढा[१७]॥
अंतरी धरुनि दैत्यजनारी। चालिल्या वडिलही व्रजनारी[१८]॥ १४॥
नदी–तटीं मूर्छित गोप सारे। राया हरी देखियला असारे॥
आक्रंदती वत्स गुरें तटाकीं। नेत्रोदकें तो पशुवृंद टाकी॥ १५॥

कष्टी स्वगोकुल असे स्वनिमित्त भारी।
स्त्री बाल वृद्ध पशु देखुनि कैटभारी॥
राहे मुहूर्तभरि आणिक लोकरीती।
पाहे स्वहेतु जन शोक कसा करीती॥ १६॥

स्वतनु फुगवि कांहीं बंधनीं कैटभारी।
तटतट करि त्याचा देह, ते कष्ट भारी॥
त्वरित उकलि वेढे, सर्प कांपे थरारी।
झडकरि फणि–बंधा–बाहिरी[१९] ये मुरारी॥ १७॥

---

१२ दुष्टाच्या संहारार्थ ज्याने हाती दंड घेतला आहे तो कृष्ण १३ कृष्णाचे बाहुदंड १४ पराक्रमरूपी संपत्ति म्ह० मोठा पराक्रम १५ समुदाय १६ उत्कंठा १७ नववधू १८ गोपिका १९ सर्पाच्या बंधनातून (या श्लोकात अष्टसिद्धींपैकी 'महिमा' ही सिद्धि ध्वनित होते)

जवळि खेळत खेळत पातला । झडप घालुनियां कर घातला ॥
गरगरां धरुनी भ्रमवी नभीं । गरुड सर्प जसा धरितां न भी ॥ १८ ॥
मुरडुनि नरडी करें दुजानें । धरुनि असें धरिलेंच पुच्छ ज्यानें ॥
रगडुनि फणिकंठ कैटभारी । उपरि चढे करि नाट्य[२०] नीट भारी ॥ १९
जो प्रवर्तक[२१] विलास-कळांचा । जो कलाप्रद कला-सकलांचा ॥
जे शिवादिक गुरू[२२] नटनाचे । त्यांसि आदिगुरु तो नट नाचे ॥ २० ॥
चपळ तो पळतो उदकावरी । उळखतो खळ तो हरि आंवरी ॥
कुलपती लपती फणि ते किती । भुजग ती जगती-तळें[२३] टाकिती ॥ २१

फणाछत्रें ऐसीं विकल हरिनें जीं तुडविलीं ।
मुखें रक्तें, धैर्यें सकळहि मनाची उडविलीं ॥
स्वचित्तें तो सर्प स्थिर-चर-गुरूतेंचि[२४] शरण ।
स्मरोनीयां गेला न कळति शिरी तेचि चरण ॥ २२ ॥

धरुनियां उदरीं स्थिरजंगमा[२५] । तुडवितां बहु कष्ट भुजंगमा ॥
मग नितंबिनि[२६] त्या भुजगाचिया । शरण येति पित्यास जगाचिया ॥ २३
अभय मागति, रक्षिल त्या जना, । धरुनि निश्चय हा, भवभंजना ॥
शरण येउनियां कमलालया । स्तविति त्या करुणा वरुणालया[२७] ॥ २४
नमो काळ-रूपा नमो विश्व-रूपा । नमो विश्व-साक्षी अनादि-स्वरूपा
नमो विश्वकर्त्या जगत्कारणालों[२८] । स्वयें कारणातीत[२९] नारायणाला ॥ २५
उपासना धन्य असे रितीची । तुझी करीती कमलापतीची ॥
यथारुची जे भजताति देवा । त्यांतें तसा भाससि वासुदेवा ॥ २६ ॥

जसे वर्णिती अंध बैसोनि हस्ती ।
धरूनी तदंगासही स्वस्वहस्तीं[३०] ॥

---

२० नृत्य २१ ललितकलाचा चालक २२ नृत्यकलेंत प्रवीण अशा शंकरादिकाचा। आदिगुरु २३ पृथ्वी २४ चराचरांचा नायक २५ चराचरजगताला २६ स्त्रिया २७ करुण सागराला २८ जगदुत्पत्तीचें कारण २९ स्वतः कारणापासून अलिप्त ३० आपआपल्या हाता

तुतें वर्णिती अज्ञ तैशा प्रकारें ।
तयां वाटसी तूं तसा त्या विकारें ॥ २७ ॥
जया सांपडे हस्तिचा पाय हस्ती ।
वदे तो स्वयें स्तंभरूपेंचि[३१] हस्ती ॥
जया सांपडे कान तो शूर्प[३२] दावी ।
अशी आत्मता[३३] सर्वशास्त्रीं वदावी ॥ २८ ॥

त्या हस्तिचें रूप तथापि सारें । ते नेणती हे कुमती असारे ॥
तसे न जाणोनि जगांत नाना । कुयुक्तिवादें[३४] करिती तनाना ॥ २९ ॥
तूं सूत्रधारीच जनाशयांचा[३५] । करूनि सृष्टि स्थिति नाश यांचा ॥
ज्या ज्यांस संस्कार जसे रितीचे । उद्बोध[३६] तैसे करिसी मतीचे ॥ ३० ॥
प्राणभीक पतिची करुणातें । मागतों शरण ज्या चरणातें ॥
प्रार्थितों तुज कृपानिपुणासी । दे रमापति ! अहेवपणासी[३७] ॥ ३१ ॥
आतां म्हणे श्रीशुक कीं नृपाळा । ऐशा प्रकारें स्तवितां कृपाळा ॥
आली कृपा त्याच जनार्दनातें । पुरे करी कालियमर्दनातें ॥ ३२ ॥

पायेंकरूनि भुजगाधिप लोटिला हो ।
हा शेवटीं पदरजें शत-कोटि लाहो ॥
गुंडाळल्या पद-युगावरि वर्तमाना ।
झिंझाडुनी ढकलितां भुजगेंद्रमाना ॥ ३३ ॥

तों काळिया होउनि सावधान । देखे रमाकांत दयानिधान ॥
भजावया श्रीगरुडध्वजाला । तत्काळ तोही नररूप झाला ॥ ३४ ॥

'आम्ही म्हणे उपजतां खळ दुष्ट भारी ।
की क्रोध दीर्घ अतिदारुण कैटभारी ॥

---

३१ खांबासारखा ३२ सूप ३३ त्याप्रमाणें शास्त्रकार आपआपल्या समजुतीप्रमाणें आत्म्याचें वर्णन करितात, असा भाव ३४ विविध युक्तींनीं आत्मस्वरूपाचें वर्णन करण्याचा आव घालितात, असा भाव ३५ प्राण्याच्या अंतःकरणाचा ३६ जसा संस्कार तदनुरूप मनाला प्रतीति होते ३७ अविधवापण म्ह० सौभाग्य

उत्पत्ति केवळ तमोगुण तामसाची[३८] ।
हे तो नव्हे अनृत गोष्टि असीच साची ॥ ३५ ॥

यालागि आतां करणेंचि दंड । करी तरी आणिकही उदंड ॥
कृपा करावी जरि हेंचि वाटे । सर्वज्ञ तूं लावि तशाच वाटे' ॥ ३६ ॥
शुक म्हणे मृदु शब्द वदे असे । हरिपुढें फणि तो पडला असे ॥
परिसतां प्रभु वैखरि बोलतो । नृपति सादर आयिक बोल तो ॥ ३७ ॥

'नको येथे राहो, गमन करिं डोहा त्यजुनियां ।
स्वबंधूंसी[३९] सिंधुप्रति निजगृहा जाइं जुनियां ॥
विलंबानें टाकी व्रजजन तटाकीं तळमळी ।
तटा जाणे जाण त्वरित मजला पादकमळी ॥ ३८ ॥

करुनि शुद्ध अजीं न्हदिनीन्हदा । दवडितांचि खळा अतिदुर्हृदा[४०] ॥
नदि-तटा-प्रति ये व्रजनायक । व्रजजनां सकळां सुखदायक ॥ ३९ ॥
प्राण ज्या निघतिं[४१] मानवदेहीं । तो उठे खडबडोनि वदेही ॥
येरिती उठति ते व्रजवासी । धांवती धरुनि तीव्र जवासी ॥ ४० ॥

कड्यावरुनियां उड्या प्रथम टाकुनी त्या गड्या ।
गडे पशुप भेटती तडतडां भुजीं आंगड्या[४२] ॥
फुगोनि तनु फाटती, मणगटी कडी दाटती ।
सुखें अमित वाटती विरहसिंधु ते आटती ॥ ४१ ॥

देखतां अनुज तो अभिराम । क्षेम[४३] दे बहु बळें बळराम ॥
हांसतां मुख-सुधाकर[४४] पाहे । नित्य नूतन मुकुंद-कृपा हे ॥ ४२ ॥
नंद नंदनमुखा अवलोकी । धन्य आपणचि मानवलोकीं ॥
भेटतां सकळ वीसरला हो । नंद घे श्रुति-अगम्यहि[४५] लाहो ॥ ४३ ॥

---

३८ तामसवृत्तीची ३९ आपल्या आप्तासह ४० दुष्टहृदय कालियाला ४१ शिरति ४२ आंगडी ४३ आलिंगन ४४ मुखचंद्र ४५ श्रुतीला सुद्धा अगम्य असा लाभ नंदाला मिळाला

वर्णितां न अकळे निगमांतें[४६] । मूर्ति वंदित असे मग माने ॥
पोटिसीं दृढ धरी घन-नीला । सोडवे न हरि तो जननीला ॥ ४४ ॥
वत्स धेनु वृषभांसह सारे । पाहतां हरिस त्या सहसा रे ॥
अर्पिती नयनि दृष्टि निधेना । तृप्ति लेश मन मानुनि घे ना ॥ ४५ ॥
आनंद झाला वृष-वांसुरांला । आनंद झाला गगनी सुरांला ॥
आनंद झाला धरणीस भारी । स्पर्शो पदाब्जें जिस कैटभारी ॥ ४६ ॥
गति धरा हरिची बहु तीव्र जी । हरि असे तुमच्याच मति-व्रजी[४७] ॥
हरि रुचे स्मरतां बरवा मना । करि दया कनकांबर[४८] वामना ॥ ४७ ॥

## कंसवध

कंसवधासाठी कृष्ण मथुरेस गेला तेव्हा तो लोकास ज्या ज्या भिन्न स्वरूपात भासला त्या त्या स्वरूपाचे यात वर्णन केले आहे या प्रकरणात नवरसाचे वर्णन केलें असल्यामुळे त्याला ‘ नवरस ’ असें नाव दिलेले आहे, व ते जास्त अन्वर्थक आहे.

नवरसें भव-रोग-रसायनें[१] । करि हरी करिती मुनि गायने ॥
किमपि कंसवधीं रस देखिले । कथिन जे मनिं वामनि रेखिले ॥ १ ॥
वधुनि दारवटांचि[२] महाकरी । उभय दंत सहाग्रज[३] घे करीं ॥
गज वधूनि मृगांत जसा हरी[४] । त्वरित मल्ल-दळांत निघे हरी ॥ २ ॥
रणांगणी लक्षुनि कैटभारी । वज्राहुनी मानिति मल्ल भारी ॥
ऐशा हरी रौद्र-रसासि दावी । कथारसाची रुचि हे वदावी ॥ ३ ॥
भोज-राज[५] विगतप्रभ[५] झाला । श्रीपती नृप गमे मनुजांला ॥
दाखवी सुरस अद्भुत लोकीं । की असें जन मला अवलोकी ॥ ४ ॥
शरीर रक्तांकित, दंत[६] हस्तीं । येतो कसा डोलत मत्त हस्ती ॥
म्हणोनि जे हांसति सख्यभावें । गोपाळ हा हास्यरस स्वभावें ॥ ५ ॥

---

४६ वेदातें ४७ मनरूप गोकुळात ४८ सुवर्ण वस्त्र परिधानकरणारा.

१ ससाररूप रोगास औषध २ दारात ३ वडील भाऊ बळरामासह ४ सिह ५ कस निस्तेज झाला ६ हत्तीचे दात

'घेऊनियां याच नृपासनातें। करील आम्हांवरि शासनातें'॥
वाटे असें दुःख नृपासि भारी। वीराख्य दावी रस कैटभारी॥ ६॥
कृष्ण हा परम देवदेव कीं। हें स्मरे न वसुदेव-देवकी॥
लेकरूं म्हणुनि वर्षती दया। दाखवी हरि दया-रसोदया[७]॥ ७॥
'कृष्ण हीनबळ बाळ लेंकरूं। मल्ल मारितिल काय मी करूं'॥
ये रितीं करिति खेद दंपती। फुंदती रडति आणि कांपती॥ ८॥
द्विरद्-दंत जसे उपडूनि घे। रस भयानक कंसमनीं निघे॥
मनिं म्हणे 'निमिषें वधिला करी। मजहि मारिल यावरि लौकरी॥९॥
अनंत-शक्तीसहि अज्ञ-लोकीं। अशक्त मानूनि कृपावलोकी॥
निरूपिला खेद बहु प्रकारें। बीभत्स केला रस निर्विकारें[८]॥ १०॥
श्रीमूर्ति देखूनि महा विभूती। संतां गमे स्वात्मसुखानुभूती[९]॥
ते देखती शांत निजस्वरूपीं। दावी हरी शांतरस स्वरूपीं॥ ११॥

नवरस कवि गाती हेचि वर्णूनि जाती[१०]।
निज-चरित-रसी त्या दाखवी दिव्यजाती॥
दशम-रस[११] अनन्य-प्रेमभक्तीस लोकीं।
यदुपति हरि ती दे यादवां स्वावलोकीं[१२]॥ १२॥

इष्ट सर्वहि अभीष्ट असेना। कृष्णरूप सचराचरसेना॥
वामनास सकळात्मक लाहो। कीर्तनप्रिय असा कळला हो॥ १३॥

## रुक्मिणी-पत्रिका

**रुक्मिणी** ही **विदर्भ** देशाचा राजा **भीष्मक** याची कन्या होती. हिच्या बापानें आपला मुलगा **रुक्मी** याच्या आग्रहामुळे तीस **चेदि** देशाचा राजा **शिशुपाल** यास देऊं केले; परंतु रुक्मिणीची निष्ठा कृष्णाच्या ठिकाणी असल्यामुळें

---

७ करुणरसाच्या उदयाला ८ विकारशून्य कृष्णानें ९ स्वात्मानंदाचा अनुभव १० प्रकार
११ भक्तिरस १२ आपल्या कृपावलोकनानें

तिने त्याजकडे **सुदेव** नावाच्या ब्राह्मणास गुप्तपणें पाठवून अमुक दिवशी येऊन मजला घेऊन जावें अशा आशयाचे त्याजबरोबर एक पत्र दिले, त्याचा आशय येथें वर्णिला आहे.

तापत्रयां[1] हरिति श्रोत्र-मनी रिघोनी ।
त्रै-लोक्य-सुंदर तुझे गुण आयकोनी ॥
रूपा तुझ्या मदन-मोहन सांवळ्यातें ॥
निर्लज्ज मन्मन हरी तुजला वरीतें ॥ १ ॥

विद्या वय द्रविण रूप इहीं करोनी ।
हा आत्म-तुल्य पति हेंचि मनीं धरोनी ॥
जे सर्व-लक्षण-विचक्षण[2] सत्कुलीना ।
ते कां नृसिंह नवरी तुजला वरीना ॥ २ ॥

जे सर्वलक्षणविचक्षण आणि धीरा ।
तेही तुझे गुण असे जगदेक-वीरा ॥
ऐकोन कोण नवरी न वरील तूतें ? ।
निर्लज्ज यास्तव म्हणीं म्हणशील मातें ॥ ३ ॥

देहार्पणा करूनि तूं पति म्यां वरीला ।
जाया करीं हरि ! तुं नेउनि शीघ्र माला ॥
सिंहांगनेसि मज नेइल, अंबुजाक्षा ! ।
जंबूक चैद्य[3] जरि तूं करिसी उपेक्षा ॥ ४ ॥

सर्वेश्वरार्पण-विधी करुनी अगण्यें ।
केली जरी असति कीं बहु जन्म पुण्यें ॥
येऊनियां मज करीं धरि चक्रपाणी ।
हे नातळोत दमघोष-सुतादि[4] कोणी ॥ ५ ॥

---

१ कायिक, वाचिक, मानसिक ताप २ सर्व लक्षणानी संपन्न ३ चेदिदेशाचा राजा शिशुपाळ ४ दमघोषाचा मुलगा शिशुपाळ वगैरे

शर्वादि सर्व तुझि इच्छिति पायधूळी।
तूझा प्रसाद नव्हतां मज याच काळी ॥
जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा!।
अंती तुझ्याच वरणे चरणारविंदा ॥ ६ ॥

अशि विदर्भ-महीपति-पुत्रिका।
लिहि हरीप्रति संस्कृतपत्रिका ॥
लिखितभाव तिचा बरवा मनें।
उकलिला हृदयांतुनि वामने ॥ ७ ॥

## भीष्मप्रतिज्ञा

कौरव पांडवाच्या युद्धाच्या प्रसंगी आपण प्रत्यक्ष लढणार नाही व हातात शस्त्र धरणार नाही अशी कृष्णाने प्रतिज्ञा केली होती ही प्रतिज्ञा कृष्णाला मोडावयाला लावून त्याच्याकडून शस्त्रधारण करवीन तर मी खरा भक्त अशी भीष्माने प्रतिज्ञा केली व ती शेवटी खरी ठरविली. तो प्रसंग येथे वर्णिला आहे.

लक्ष्मी-नृसिंह-चरण-द्वय-सारसाचा[१]।
जो रेणु मान्य वदती बहुसार साचा ॥
प्रत्यूह[२]-मत्त-गज-सिंह तया नमीतो।
जाणे तयाहुनि कदापि न आन मी तों ॥ १ ॥

प्रतिज्ञा जे केली यदु-कुळ-वरें[३] 'युद्ध न करी।
धरी ना शस्त्राते कदन-समयीं[४] मी निज-करीं'॥
'घडेना हें मिथ्या जरि तरि न मी भागवत रे'।
प्रतिज्ञेतें भीष्में मनि अवथिलें[५] या दृढतरें ॥ २ ॥

नृपा[६]! ऐकिजे युद्ध देवव्रताचें।
गमे हेंचि साफल्य तुझ्या व्रताचें ॥

१ लक्ष्मी आणि विष्णु याच्या पदयुगलाचा, (पक्षी वामनपंडिताची मातापितरें लक्ष्मीबाई व नरहरिपंडित याचा) २ विघ्न ३ कृष्णानें ४ युद्धसमयी ५ योजिले ६ जनमेजया

रथीं देखिले कृष्ण-कौंतेय दोघे।
म्हणे भीष्म ' माझ्या शरातें यदो! घे '॥ ३ ॥

भीष्माकडे रव भयानक दुंदुभीचा।
होतां वदे तनय आनक-दुंदुभीचा[७]॥
' दुश्चिन्ह आजि गमतें मज सव्यसाची[८]।
जाती शिवा[९] अशिव हे अपसव्य साची '॥ ४ ॥

गर्वोक्ति फाल्गुन वदे ' जगदेक-राया!।
आहे मशीं कवण तो झगडा कराया!॥
म्यां काळखंज[१०] वधिले अतुलप्रतापी।
पौलोमही[११] असुर गो-सुर-विप्र-तापी '॥ ५ ॥

पितामह वदे तया, ' प्रबळ तूं पृथा-नन्दना।
रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना॥
स्वयें गत-वयस्क[१२] मी प्रबळ वीर तूं रे नवा।
भिडें[१३] रणधुरंधरा! जय घडो सुखें वा न वा '॥ ६ ॥

परिक्षिता! मग शरासन पांडवानें।
ओढूनियां हुतवहार्पित-खांडवानें[१४]॥
तो भीष्मदेह खचिला शरतांडवानें।
ज्याच्या क्रिये सकळ पद्म-भवांड[१५] वानें॥ ७ ॥

'त्वां काय कर्म करिजे लघु लेंकरानें ?'।
बोलूनियां मग धनू धरिलें करानें॥
तें व्यापिलें सकल सैन्य महा-शरांनी।
भीष्में, जसा पतित होय हुताश रानीं॥ ८ ॥

---

७ वसुदेवाचा ( ज्याच्या जन्मसमयीं देवानी आनक नावाची दुदुभी वाजविली होती ) ८ डाव्या हातानें शरसधान करणारा अर्जुन ९ भालू १० हे इद्रास उपद्रव देणारे राक्षस होते ११ वैश्वानरदानवकन्या पुलोमेचे पुत्र १२ म्हातारा १३ युद्ध कर १४ ( ब्राह्मण वेशधारी ) अग्नीस खाडव नावाचे वन अर्पण करून तृप्त करणाऱ्या अर्जुनानें १५ ब्रह्माड

तो स्तोम[16] येतां बहु सायकांचा । झालाचि पार्थ-व्यवसाय काचा ॥
काचावला[17] वीर पुढें धसेना । झाली नृपा ! सर्व भयांध सेना ॥ ९ ॥
पुष्प-वर्ण[18] नटला पळसाचा[18] । पार्थ सावध नसे पळ साचा ॥
पाहिलें जंव निदान तयाचें । तों दिसे वदन आनत याचें ॥ १० ॥

प्रतोद[19] मग ठेविला उतरला रथाधःस्थळीं ।
म्हणे, 'प्रबळ भीष्म हा, जय घडे न या दुर्बळीं' ॥
करी कमल-नेत्र तो प्रथित चक्र तें स्वीकरी ।
प्रमोद यम-नंदना बहु तसा यशस्वी करी ॥ ११ ॥

असा येतां देखे रथ-निकट तो श्यामल हरी ।
नृपा ! गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेम-लहरी ॥
शरातें चापातें त्यजुनि वदला गद्गद-रवें ॥
जगन्नाथें केलें मज सकळ लोकांत बरवें ॥ १२ ॥

ये रथावरि झणीं यदुराया । खड्ग देइन वि-कोश[20] कराया ॥
तोडिं मस्तक पडो चरणीं या । धन्य होइन सदाचरणी या ॥ १३ ॥
मारावें मजला असेंच असलें चित्तीं तुझ्या केशवा ।
तें मातें मग कोण रक्षिल पहा विश्वेश नाकेश[21] वा ? ॥
हा मुख्यार्थ जनार्दना ! मज गमे, भक्त-प्रतिज्ञा खरी ।
कीजे, सर्वजनांत होइल मृषा[22] हो आपुली वैखरी ॥ १४ ॥

हें भीष्मवाक्य परिसोनि जगन्निवासें ।
केलें विलोकन मृदुस्मित पीत-वासें ॥
वेगें फिरोनि चढला मग तो रथातें ।
पार्थाचिया पुरविणार मनोरथातें ॥ १५ ॥

१६ समुदाय १७ घाबरला १८ पळसाच्या फुलाप्रमाणें तावडा लाल झाला १९ चाबूक म्यानरहित २१ इंद्र २२ खोटी

# गजेंद्रमोक्ष

एक गजेंद्र आपल्या कळपासह चित्रकूट पर्वताखाली एका सरोवरात पाणी प्यावयास गेला. पाणी पिऊन बाहेर येत असता एका मगरानें त्याचा पाय धरिला. गजेंद्राने पाय सोडविण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केले; पण व्यर्थ ! शेवटी त्याने विष्णूचा धावा केला व एक कमळ आपल्या सोंडेने परमेश्वरास वाहिले. तेव्हा विष्णूने मगराचा वध केला व गजेंद्रास मुक्ति दिली, ती कथा या श्लोकात आहे.

चक्रायुध स्व-मरणार्तिस[1] जो हरी तो ।
धांवे चढोनि ख-ग-राज-भुजीं[2] अहो ! तो ॥
चक्रेंचि नक्र-मुख फोडुनि पाय हातीं ।
ओढी धरूनि हरि हा, विधि हें पहाती ॥ १ ॥

नक्रे तळ्यांत धरिला प्रबळोंचि हस्ती ।
तों 'ये' म्हणे व्यथित यूथप 'पद्महस्ती[3]' ॥
सत्कीर्ति तूं श्रवण-मंगल-नाम नाथा ! ।
सर्वेश आदि-पुरुषा ! गति दे अनाथा ॥ २ ॥

गजा दे जो मुक्ती त्वरित विभु नक्रासि दमुनी ।
मुनी ज्याला शास्त्री हरि म्हणति त्यालाचि नमुनीं ॥
कथा ते संक्षेपें कथिन बरि पक्षींद्र-गमना ।
मनामध्यें ध्यातों द्वि-रद-वर-दा ! दुःख-शमना !॥ ३ ॥

जळीं दांतें नक्र द्वि-रद-पद-मांसास्थि उकरी ।
करी प्राणत्यागा, सुमति सुचली तों झडकरी ॥
करी धांवा कीं वो सुलभ वर जो देव-निकरीं[4] ।
करीं घे अर्पाया कमल पद-पद्में सुखकरी ॥ ४ ॥

'नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी ।
हरी जो तापातें, उचलुनि कृपा-सिंधु-लहरी ॥

१ निजमरण दुःखास २ गरुडाच्या खांद्यावर ३ विष्णु ४ देवसमूहात

हरी वाटे काळा-करिस वि-पती[5] मृत्यु-भुजगा।
जगाचा तूं ऐसा धनि कवण तो ? पाव मज गा ॥ ५ ॥

वदे दुःखी तेव्हां म्हणउनि कळे देव-निकरा।
करावा तो मुक्त स्व-शरण गमे श्री-प्रियकरा ॥
करी चक्रा शस्त्रा प्रभु उचलि यानीं ख-गमनीं।
मनी साक्षी तो ये, गज जळ-ज घे जो स्व-नमनीं ॥ ६ ॥

असा मी सर्वां त्यां त्रि-दश-निकरां[6] वंद्य सकळां।
कळाया ही ये त्यासह, करि तया मुक्त विकळा ॥
कळा प्रेत-प्राय स्मरण करि त्यातें न अवधी।
वधी नक्रातें त्या अवसरिं कृपाब्धी निरवधी ॥ ७ ॥

मृताच्या त्या तोंडामधुनि पद तो हा झडकरी।
करीतें वोढेना, प्रभुच करुणा मागुति करी ॥
करी दों पायातें सह उचलि यानीं सुखकरी।
करीन्द्रा सारूप्य[7] त्वरित गति दे मुक्तिनिकरीं ॥ ८ ॥

स्तवी ब्रह्मा शंभु त्रि-दश-पति[8] तो मुक्तहि नवा।
नवां[9] भक्तीची हे गति दिधलि ज्याला अभिनवा ॥
न वाटे त्यां सर्वां हरिविण धनी आणिक जगा।
जगाया हे भक्ती प्रभुच म्हणती ईश मज गा ॥ ९ ॥

भुजा चारी पीतांबर-धर असी मूर्ति बरवी।
रवी जाणों हातीं रथ-चरण[10] ते दीप्ति मिरवी ॥
गदा एके हातीं जळ-ज-युग दोहीं शुभ करी।
करीन्द्रा वैकुंठ त्वरित हरि दे देव-निकरीं ॥ १० ॥

वदे तेव्हां सर्वां द्विरदवरद श्रीपति असा।
'असारीं संसारीं गजगति[11] असी गातचि असा ॥

---

५ गरुड ६ देवसमुदायास ७ सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता, ह्या चार मुक्तीपैकी सरूपता (सारूप्य) मुक्ति दिली, असा भाव ८ देवांचा राजा इंद्र ९ श्रवण कीर्तनादि नवविधाभक्ति १० रथचक्र, सुदर्शन चक्र ११ गजेंद्राला मिळालेली सद्गति

पहांटे हें गाय प्रतिदिनिंहि माझें चरित रे ! ।
तरे दुःखाब्धी तो न परम-पदाँहूनि उतरे ॥ ११ ॥

गजाची जे मुक्ती क्रमुनि इतरां शक्ति न जनीं ।
जनी गाती त्याला फळ परम या विष्णुभजनीं ॥
जनी भक्तस्वामी–करि भजक हो ! गातचि असा ।
असारीं संसारी म्हणुनि विनवी वामन असा ॥ १२ ॥

## स्फुट श्लोक

भर्तृहरिकृत नीति व वैराग्य शतकाच्या वामनाने केलेल्या मराठी रूपातरातून हे वेचे घेतले आहेत.

दिक्काल[1] यांहिं न पवे कधि भिन्नभावा ।
जी होय केवल अनन्त चिदेक[2] ठेवा ॥
आत्मानुभूतिच[3] असे बल एक जीला ।
माझी नमस्कृति तये स्तिमित–प्रभेला[4] ॥ १ ॥

बळानें काढूं ये मणि मकर-दाढेंत दडला ।
महा-सिंधू-लाटा-तरण करुं येई भुजबळा ॥
महासर्पातेंही सुम-सम धरूं ये निजशिरीं ।
परंतु क्षुद्राचें हृदय धरवेना[5] क्षणभरी ॥ २ ॥

प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे ।
तृषार्तांची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे ॥
सशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी ।
परंतू मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ ३ ॥

---

१ दिशा व काल याहीकरून भिन्न न होणारी २ केवळ ज्ञानस्वरूप ३ स्वकीय प्रत्यक्ष प्रतीति ४ शात व तेजोमय ५ समाधान करवेना

वरि कृमि-कुलें[६] झालीं ऐशा विगन्धि[७] नरास्थिका।
निरुपमरसें खातां लालायुता गतमांसका॥
सुरपतिस पार्श्वीं श्वा देखोनि होय न शंकिता।
गणति न कधीं क्षुद्र-प्राणी परि-ग्रह-फल्गुता[८] ॥ ४ ॥

साहित्य संगीत कला न ज्यांतें। लांगूल शृंगांवीण कीं पशू ते॥
तृणें न खाऊनहि वांचती हें। चतुष्पदांचें बहु भाग्य आहे॥ ५ ॥
वन-चरांसह शैलवनांतरें। निजसुखें फिरणें तरि ते बरें।
जरि घडे सहवासचि पामरीं। तरि जळो असणें सुर-मंदिरीं॥ ६ ॥

शास्त्रोपस्कृत-शब्द-सुंदर[९] गिरा ज्यांची असे द्यावया।
शिष्या ज्ञान समर्थ सत्कवि असे निर्द्रव्य राजाचिया॥
देशीं, भूपति-जाड्य[१०] तें, तरि कवि द्रव्याविणें ईश्वर।
रत्नाचें नुमजोनि मोल लघु की तो कुत्स्य[११] सांगे नर॥ ७ ॥

जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा। संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा॥
पद्माचा जो तंतु तो वारणाला। वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला॥ ८॥

आप्तांची बहु भीड, सेवकजनीं कारुण्य, विद्वज्जनीं।
निष्कापट्य, शठत्व दुर्जन-जनीं, संतोष कीं सज्जनीं॥
डंका शत्रुजनीं, क्षमा गुरुजनीं, नारी-जनीं धूर्तता।
ज्यांची हे स्थिति त्यापरीस असती ते शाहणे तत्त्वतां॥ ९ ॥

खरें वचन बोलवी, जडपणास कीं मालवी।
महोन्नतिस डोलवी, दुरित मारुनी चालवी॥
मनीं सुख अमोल वी, यश जग-त्रयीं कालवी।
अनेक गुण पालवी, सुजन-संगती झूलवी॥ १० ॥

---

६ कीटकाचे समुदाय ७ घाणेरड्या ८ प्राप्त वस्तूंचें तुच्छत्व ९ शास्त्रांनीं सस्कृत झालेली १० राजाचा मूर्खपणा ११ वाईट

आरंभितातिं खल विघ्नभयें न, येती ।
विघ्नें स्वकार्य तरि मध्यम सोडितातीं ॥
केलें जरी बहुत जर्जर विघ्न-घातें ।
प्रारब्धें[13] उत्तमजनीं न विसंबिजेतें ॥ ११ ॥

सु-नीति-पथ सेवणें मलिन कर्म मानेच ना ।
घडो मरण नावडे खल-जनां-प्रति प्रार्थना ॥
विपत्ति-समयींहि जो प्रकटवी च ना दीनता ।
भल्यांविण असें असि-व्रत[14] करूं शके कोणता ॥ १२ ॥

झाला क्षीण बहू क्षुधेस्तव जरी की व्यापिला वार्धकें ।
आली कष्टदशा घडो मरणही कीं तेज गेलें निकें ॥
ऐसाही मृग-राज[15] जीर्ण तृण तो भक्षील कीं काय हा ।
शौर्यें भेदुनि हस्ति-मस्तक शुभ-ग्रासींच ज्याला स्पृहा ॥ १३ ॥

मलिन रुधिरमांसावेगळें हाड दैवें ।
अवचट मिळतां तें श्वान संतोष पावे ॥
क्षुधितहि गज-हंता[15] जंबुकातें न मारी ।
अवसरिं समजावी क्षुद्रता आणि थोरी ॥ १४ ॥

उपजणें मरणें न चुके नरा । फिरत नित्य असे भवभोंवरा ॥
उपजला तरि तोच मला गमे । कुल-समुन्नति ज्यास्तव घे, रमे[16] ॥ १५ ॥

क्रोधें जळे मणि अचेतन[17] सूर्यकांत ।
ज्या लागतांच दिन-नायक-पाद-घात[18] ॥
संभावितांत गणना पहिली जयाची ।
साहेल तो पण कशी शठता दुजाची ॥ १६ ॥

सिंहाचा जो बाल तोही चपेटा । पंड़ा
मारी त्याला जो करी मत्त मोठा ॥

---

१३ आरंभिलेलें कार्य १४ तलवारीच्या धारेसारखे तीक्ष्णव्रत १५ सिंह १६ आनंद पावतें १७ जड १८ सूर्यकिरणाचा आघात

तेजस्वी जे वृत्ति ऐशीच त्यांची ।
तेथे कांहीं चाड नाही वयाची ॥ १७ ॥

तीं इंद्रियें सकल कर्महि धी[१९] तशी हे ।
अव्याहता,[२०] वचन तें नर तोचि आहे ॥
उष्मा[२१] नरा जरि धनोद्भव[२१] एक नाहीं ।
अन्य क्षणांत तरि होय विचित्र पाही ॥ १८ ॥

दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, की पुत्रही लालनें ।
वेदानध्ययनें[२२] द्वि-जाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें ॥
नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा[२३], लाज मद्यें फुका ।
शाठ्यें मित्रपणा प्रवास गमनें स्नेह, प्रमादें रुका[२३] ॥ १९ ॥

दुबलिकेत पसा यव इच्छितो । प्रभुपणी धरणी तृण मानितो ।
म्हणुनियां कृपणत्व उदारता। घडतसे समयोचित तत्त्वतां ॥ २० ॥

प्रजा हाच की वत्स भू-धेनुकेचा ।
नृपा तूं करी फार सांभाळ याचा ॥
स्ववत्साचिया जाण वात्सल्ययोगें ।
अभीष्टार्थ[२४] देईल हे भूमि वेगें ॥ २१ ॥

आधार तूं केवल चातकातें । कोणास हें स्पष्ट दिसे न नातें ॥
कां पाहसी अंबुद वाट कानीं । यावी अशी आमचि दीनवाणी ॥ २२ ॥

ऐकें चातक सावधान करुनी चित्ता सख्या वैखरी ।
आकाशी असती पयोद बहु तैसे सर्व नाही परी ॥
कांहीं वृष्टि करोनि पोषिति धरा कांहीं वृथा गर्जती ।
ज्यां ज्यां पाहसि दीनभाषणिं नको प्रार्थूंच सर्वांप्रती ॥ २३ ॥

विद्यासमन्वितहि दुष्ट परि त्यजावा ।
त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥

---

१९ बुद्धि २० जशीच्या तशीच २१ द्रव्याची ऊब २२ वेदाध्ययन न केल्यानें २३ सपत्ति २४ इष्ट वस्तु

ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं।
तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ॥ २४ ॥

लज्जेनें जड, दांभिक व्रतिपणें, कापट्य शौचें गणी।
शौर्यें निर्दय, आर्जवें लुडबुड्या, की दीन सद्भाषणीं ॥
मानेच्छा तरि मूर्ख, की बडबड्या वक्ता, निकामी भला।
ऐसा तो गुण कोणता खलजनीं नाहींच जो निंदिला ॥ २५ ॥

तें कां दुर्गुण लोभ जैं, पिशुनता जैं कां महापातकें।
काशाला तप सत्य जैं, मन मुरे तैं कां सुतीर्थोदकें ॥
काशाला जन जैं भलेपण असे, कां भूषणें कीर्ति जैं।
सद्विद्या जरि कां धनें, मरण कां दुष्कीर्ति लोकींच जैं ॥ २६ ॥

चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा।
पद्मावीण तळें, निरक्षर मुखीं जो साजिरा गोजिरा ॥
दात्याला धनलोभ, नित्य वसतें दारिद्र्य विद्वज्जनीं।
दुष्टाचा पगडा मही-पति-गृहीं, हीं सात शल्यें[२५] मनीं ॥ २७ ॥

मौनें मूक दिसे, वदे तरि महावाचाळ, पार्श्वीं फिरे।
तेव्हां धीट, तसा विवेकचि नसे जैं चालतां अंतरें ॥
शांतीनें तरि भ्याड, शांति न धरी तैं गांवढा, या परी।
सेवाधर्म असा अगाध कथिला हा जाण योगीश्वरीं ॥ २८ ॥

आरंभीं जे फार शेखीं न कांहीं। आधीं थोडी जे क्रमें फार पाहीं ॥
छाया पूर्वार्धा परार्धा दिनाची। तैशी मैत्री दुर्जनाची भल्याची ॥ २९ ॥

तृणें मृगाला सलिलें झषाला[२६]। संतोष हे वृत्ति महाजनाला ॥
तयांस निष्कारण तीन वैरी। किरात कैवर्तक[२७] दुष्ट भारी ॥ ३० ॥

विपत्काळीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व[२८] बरवें।
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे ॥

---

२५ मनात सलणाऱ्या वस्तु २६ माशाला २७ धीवर २८ सहनशीलपणा

स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्याव्यसन जें।
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे ॥ ३१ ॥

करीं साजे त्याग, श्रवण-युगली सच्छ्रवण जें।
मुखी सत्य, स्वच्छाचरण विलसे, शौर्यहि भुजे ॥
स्वशीर्षें थोराला नमन, विभवावांचुनि पहा।
भल्याचा कीं स्वाभाविक शुभ अलंकार-विधि हा ॥ ३२ ॥

संपत्काळी कोंवळें सज्जनाचें। होतें चित्त ज्ञाति पंकेरुहाचें[२९]।
आपत्काली शैलही आदळो कां। धाकेना जें वाजवी धैर्य-डंका ॥ ३३ ॥

तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त लोहावरी।
तें भासे नलिनी-दलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी ॥
तें स्वातीस्तव[३०] अब्धि-शुक्ति-पुटकीं[३१] मोती घडे नेटकें।
जाणा उत्तम-मध्यमाधम दशा संसर्गयोगें टिके ॥ ३४ ॥

जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच।
जे दे पतीस सुख फार कलत्र तेंच ॥
जो एकरूप सुखदुःखपणी गडी तो।
हा लाभ पूर्वसुकृताविण काय होतो ॥ ३५ ॥

वृक्ष फार लवती फलभारें। लोंबती जलद घेउनि नीरें ॥
थोर गर्व न धरी विभवाचा। हा स्वभाव उपकारपरांचा ॥ ३६ ॥

पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें हा।
रात्रीं विकास कुमुदांप्रति चंद्र दे हा ॥
अप्रार्थितां जलद दे जल या जनाला।
मुक्तार्थ[३२] की परहितोत्सव सज्जनाला ॥ ३७ ॥

हे तों सत्पुरुष स्वकार्य त्यजिती अन्यार्थही साधिती।
हे तों मध्यम जे निजार्थ करुनी अन्यार्थ संपादिती ॥

---

२९ पंकेरुहाचें ज्ञाति होतें, म्ह० कमलाप्रमाणें कोमल होतें ३० स्वाती नक्षत्रा
३१ समुद्रातील शिंपाच्या पुडात ३२ स्वार्थबुद्धिरहित

हे तों राक्षस जे स्वकार्यविषयीं अन्यार्थ विध्वंसिती।
जे कां व्यर्थ परार्थ हानि करिती ते कोण कीं दुर्मती ॥ ३८ ॥

क्षीरानें दिधले स्वकीय गुणही नीरास आत्माश्रयें।
त्या क्षीरास हुताशनें[33] श्रमवितां तें तोय मेलें स्वयें ॥
झाला ताप विशिष्ट अग्नि-वदनीं तें दुग्ध जेव्हां पडे।
तेव्हां धांउनि तोय शीतल करी मित्रत्व हें चोखडें[34] ॥ ३९ ॥

ज्यांचीं देहमनें तशींच वचनें पुण्यामृतें वोतिलीं।
कीं ज्यांहीं स्व-कृतोपकार-विभवें सर्वत्र विस्तारिलीं ॥
लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरूपरी वानिती।
चित्तीं तोषहि पावती सुजन ते नेणों किती नांदती ॥ ४० ॥

हेमाद्रि वा रजतपर्वत कायसे ते।
अंतीं तरू तरुचि केवळ जाण जेथें ॥
मानूं खरा मलय आश्रित वृक्ष ज्याचे।
कंकोल[35] निंब पद पावति चंदनाचे ॥ ४१ ॥

भाग्याला सुजनत्व भूषण असे, की मौन शौर्यास तें।
ज्ञानाला शम, त्या श्रुतास विनय, द्रव्यास दातृत्व तें ॥
अक्रोधत्व तपा, क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता।
यां सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्त्वतां ॥ ४२ ॥

वानोत निंदोत सुनीतिमंत। चळो असो वा कमला[36] गृहांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं। सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ ४३ ॥

आस्फालितांही[37] स्वकरें न राहे। चेंडू जसा तो उसळोंच पाहे ॥
विपत्तियोगें पडले जरी कां। तें स्थैर्य नोहे तरि साधुलोकां ॥ ४४ ॥

कीं तोडिला तरु फुटे अणखी भरानें।
तो क्षीणही विधु[38] महोन्नति घे क्रमानें ॥

---

३३ अग्नीनें ३४ चागले ३५ वृक्षविशेष ३६ लक्ष्मी ३७ आपटला असताही ३८ चंद्र

जाणोनि हें सुजन ज्या दुबळीक आली ॥
त्याशीं कधीं न करिती सहसा टवाळी ॥ ४५ ॥

खल्वाट[३९] चंड-किरणें अति तप्त झाला ।
छायार्थ ताल-तरु-मूल-समीप गेला ॥
तत्काळ थोर पडलें फळ तो निमाला ।
ये जेथ दैव-हत येइल तेथ घाला ॥ ४६ ॥

श्रीखंडाचीच[४०] काष्ठें करुनि शिजवितो पेंडि वैडूर्यपात्रीं[४१] ।
किंवा तो अर्क-मूला-स्तव[४२] कनकहलें[४३] नांगरीतो धरित्री ॥
केळी तोडूनि तो कीं त्वरित चहुंकडे पेरितो कोद्रवातें ।
जो या येऊनि लोकीं सुकृत न करितां आचरे दुष्कृतातें ॥ ४७ ॥

दारिद्र्य ज्यांजवळि अप्रिय बोलण्याचें ।
भांडार ज्यांजवळि वाग्रस-माधुरीचें[४४] ॥
स्व-स्त्री-परायण अनिंदक जेच त्यांहीं ।
भूभाग हे विलसती अति रम्य पाहीं ॥ ४८ ॥

त्याला वह्नि जळापरी, जलधि हा कीं ओहळाचे परी ।
मेरू स्वल्प-शिळेपरी, मृगपती तोही कुरंगापरी ॥
की तो सर्प फुलापरी, विष-जळें पीयूष-वृष्टीपरी[४५] ।
होतें सर्वहि यापरी वसतसे सच्छील ज्याचे घरीं ॥ ४९ ॥

अभिज्ञांस[४६] तों ग्रासिलें मत्सरानें । धनाढ्या प्रभू व्यापिलें दुर्मदानें ॥
शिरीं थोर मूर्खास अज्ञान ओझें । जिरालें निजांगींच पांडित्य माझें ॥५०॥

शिणोनि फिरलों महा-विषम-दुर्ग-देशांतरीं ।
तथा प्रभुहि सेविले न फळ लाधलें कीं तरी ॥

---

३९ डोक्याला टक्कल पडलेला ४० चदनाची ४१ रत्नजडित भाड्यात ४२ रुईच्या मुळासाठीं ४३ सोन्याच्या नागरानें ४४ मधुर भाषणाचें ४५ अमृत ४६ ज्ञात्यास

सशंक तरि जेविलों पर-गृहीं जसा कावळा ।
परंतु न दिसे मला कठिण आस हे दुर्बळा ॥ ५१ ॥

दिसे ज्या प्राणांची स्थिति जलज-पत्रोदक[४७] जसें ।
तयांसाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें ॥
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुर-धन-लोभास्तव वृथा ।
विलज्जें म्यां केली बहुतर मृषात्मस्तुति-कथा[४८] ॥ ५२ ॥

वदना रदनावलिनें[४९] त्यजिलें । शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें ॥
उठतां बसतां अणु शक्ति नसे । परि आस निरंतर माजतसे ॥ ५३ ॥

मी हा अहंकार सभोग गेला । तुल्यायुषीं[५०] स्वर्ग समीप केला ।
काठीविणें ज्या फिरणेंच नाहीं । तथापि धाके मरणासि देही ॥ ५४ ॥

आशा थोर नदी, मनोरथ तिचें पानीय, वीची तृषा ।
स्त्री-पुत्राद्यनुराग हे जलचरें जे पूर्ण कूलंकषा ॥
संसार-भ्रम भोंवरा गरगरी चिंताच जीचीं तटें ।
तीतें जे तरले मुनीश न कधीं ते पावती संकटें ॥ ५५ ॥

न जाणतां टोळ पडे हुताशीं । नेणोनियां मीन[५१] गिळी गळाशी ॥
अभिज्ञ आम्हीं विषयासि जेव्हां । सोडूंच ना मोह बलिष्ठ तेव्हां ॥ ५६ ॥

ते कंद काय अवघेचि जळोनि गेले ।
किंवा प्रवाह नदिचे अति शुष्क झाले ॥
कीं वाण आजि विपिनीं तरु-वल्कलांची ।
कां पाहताति वदनें न कळे खलांचीं ॥ ५७ ॥

होती वासर दीर्घ जे धन-पति-द्वारीं तया प्रार्थितां ।
नाना सौख्यभरें क्षणोपम मला जे लोटले नेणतां ॥
निःसंगत्वपणें धरूनि बसलों हे पर्वताची गुहा ।
आतां त्या दिवसांसि हांसत असें ध्यानावसानीं[५२] पहा ॥ ५८ ॥

---

४७ कमलाच्या पानावरील पाणी ४८ खोटी आत्मस्तुति ४९ दतपक्तीनें, ५० समवयस्.. ५१ मासा ५२ ध्यान सपल्यावर

व्याघ्रीपरी भय करीत उभी जरा रे ।
देहासि रोग करिती रिपुतुल्य मारे ॥
आयुष्य भिन्न-घट-नीर[५३] सरे तसें हे ।
पापें तथापि जन आचरिताति पाहें ॥ ५९ ॥

गेला तो नृप, ते प्रधान अवघे, ते पंडितांची सभा ।
गेली ते नगरी, तशा शशिमुखी ज्या तप्त-हेम-प्रभा[५४] ॥
गेला तो नृपपुत्र, त्या शुभकथा, म्यां देखिलें सर्व जें ।
तें जेणें स्मरणास योग्य रचिलें कालासि त्या वंदिजे ॥ ६० ॥

येतो वासर तोच, तेच रजनी, व्यापार नानापरी ।
प्राणी हे करिताति आयु सरतें हें नेणवे अंतरी ॥
तुच्छें चर्वित-चर्वणोपम[५५] सुखें जी तींच ती भोगितां ।
संसारीं न तिरस्कृती उपजते हे कोण निर्लज्जता ॥ ६१ ॥

लक्ष्मीनें जरि तुष्ट तूं, बहु सुखी मी वल्कलानें असें ।
दोघांचा परितोष तुल्य असतां, आधिक्य कांही नसे ॥
आशा ज्यास दरिद्र तोचि, समजे नैराश्य पै बाणतां ।
भाग्याचा नर कोणता मग बरें निर्भाग्य तो कोणता ॥ ६२ ॥

परिभ्रमण कां वृथा करिसि तूं मना स्थीर हो ।
स्वयें घडत जें जसें घडुं न अन्यथा काम हो ॥
अतीतहि[५६] नको स्मरूं न भवितव्य चिंता करी ।
सुखें अनुभवींचि भोग जइं येत तूझ्या घरीं ॥ ६३ ॥

जाले जीर्ण मनीं मनोरथ पहा मी वंचलों यौवना ।
होते जे गुण सर्वही विफल ते जाले गुणज्ञाविना ॥
युक्तायुक्त विचार काल न करी निःशंक सर्वात्मना[५७] ।
आतां हें सुचलें दुजी गति नसे गौरीशपायांविना ॥ ६४ ॥

---

५३ फुटलेल्या घड्यातील पाणी ५४ तापविलेल्या सोन्यासारखी आहे कांती ज्याची
५५ ज्याची पुनरावृत्ति होते अशी ५६ होऊन गेलेलें ५७ सर्व प्रकारें

वनीं रम्या वस्ती मृग संवगडे ते न विरळा।
फळें निर्वाहातें अनुदिनिं निजेलागुनि शिळा॥
पुरे ही सामग्री हरभजन जे इच्छिति तयां।
घरें कीं कांतारें[१८] गमति सम चित्ती शम जयां॥ ६५॥

---

# ९ रामदास

रामदासाचा जन्म शके १५३० या वर्षी झाला. हे जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. याच्या बापाचे नाव सूर्योपंत असून, ते गोदावरीतीरीं जाब गावी रहात असत. याच्या आईचे नाव राणूबाई. रामदासाचें पहिलें नाव नारायण असें होतें, पण रामाची भक्ति करूं लागल्यापासून यास रामदास असे नाव पडलें. हे मारुतीचा अवतार होते असें म्हणतात.

रामदास हे लहानपणापासून विरक्त होते. याच्या लग्नाची सर्व सिद्धता झाली असतां हे ऐनवेळीं पळून गेले. काही दिवस पंचवटींत राहून पुढें साताऱ्याजवळ चाफळ येथे जाऊन राहिले; स्वामी आजन्म ब्रह्मचारीच होते. शिवाजीराजे हे रामदासाचे शिष्य झाले व त्यानी आपलें सर्व राज्य स्वामीस दिलें, त्याचा स्वामीनी स्वीकार करून ते पुन्हां शिवाजीराजांस परत दिले व आपल्या स्वामित्वाची खूण म्हणून भगवा झेंडा लावण्यास सागितले काहीं हिंदूंत 'जोहार' म्हणण्याची चाल होती, त्या ऐवजी 'रामराम' म्हणण्याची चाल यानीं पाडिली.

रामदास हे साताऱ्याजवळ परळी नामक किल्ल्यात रहात असत. त्याठिकाणीं संतमंडळी फार जाऊं येऊं लागली म्हणून त्याला 'सज्जनगड' असें नाव पडलें. स्वामीनीं 'रामदासी' पंथ स्थापन केला, याच्या अनुयायास 'रामदासी' असे म्हणतात.

रामदासानीं 'दासबोध' 'समास आत्माराम' वगैरे विस्तृत ओंवीबद्ध ग्रंथ केले

---

असून ‘मनाचे श्लोक’ व स्फुट अभंगही पुष्कळ केले आहेत. ‘मनाचे श्लोक’ हे महाराष्ट्रातील आबालवृद्धाच्या चांगलेच परिचयातले आहेत. यांचा ‘दासबोध’ हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा असून, त्यातील उपदेश सर्व प्रकारच्या व सर्व दर्जाच्या लोकांस सारखाच लागू पडणारा व फार उपयोगी आहे. याची वाणी प्रेमळ, रसाळ व प्रासादिक आहे. भाषा साधी, सुगम व जोरदार आहे. याचे ग्रंथ म्हणजे व्यवहार-ज्ञानाचीं भांडारेच होत. माघ व. ८ शके १६३० या वर्षी स्वामी समाधिस्थ झाले.

## कवीश्वरस्तवन

हा उतारा दासबोधातील अत्युत्कृष्ट भागापैकीं एक आहे. ह्यात कविकृतीचे हृद्गत व कवीचे श्रेष्ठत्व अत्यंत मार्मिक रीतीनें विशद केले आहे.

**श्रीगणेशाय नमः ॥ आतां वंदूं कवीश्वर[1] । जे शब्द-सृष्टीचे ईश्वर । नातरी हे परमेश्वर[2] । वेदावतारी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना कळांचें[3] जीवन । नाना सद्विद्यांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥ की हे पुरुषार्थाचें[4] वैभव । कीं हे जगदीशाचे महत्त्व । नाना लाघवें[5] सत्कीर्तिस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्दरत्नांचे सागर । की हे मुक्तांचें[6] मुक्तसरोवर । नाना बुद्धीचे वैरागर[7] । निर्माण जाहले ॥ ४ ॥ की हे अध्यात्मरत्नांची[8] खाणी । की हे बोलके चिंतामणी । नाना कामधेनूंची दुभणी[9] । वोळली[10] श्रोतयांवरी ॥ ५ ॥ की हे कल्पनेचे कल्पतरू । कीं हे मोक्षाचे मुख्य पडिभरू[11] । नाना सायुज्यतेचे[12]**

---

१ या शब्दानें नुसते कवीच नाहीत तर एकदर ग्रथकार विवक्षित आहेत २ सर्व शक्तिमत्व या पदानें कवीचे ब्रह्मदेवापेक्षाही श्रेष्ठत्व दाखविलें आहे; कारण ब्रह्मदेवाच्या सृष्टींत मुख ते मुखच व कमल तें कमलच याप्रमाण वस्तु नियमित असतात, परंतु कविसृष्टींत मुख कमल होतें व कमल तें मुख होते. या वैचित्र्यामुळें कविश्रेष्ठत्व ध्वनित झालें आहे. ३ ग्रथलेखनानेंच नाना कलाचें अस्तित्व आहे, म्हणून कवीला ‘नाना कलाचें जीवन’ असे म्हटले आहे. ४ चतुर्विध पुरुषार्थाचें वैभव (महत्त्व) कवीच प्रसिद्धीस आणितात म्हणून ते पुरुषार्थाचें वैभव होत ५ कौशल्यानें ६ मुक्त म्ह० मोत्यें सरोवरापासून होतात, त्याप्रमाणें ह्याचे ग्रथ वाचल्यापासून मुक्त म्ह० ससारांतून सुटलेले होतात ७ रत्नाची खाण ८ ब्रह्मज्ञानरूपी रत्नाची खाण ९ दुग्धधारा १० वळली ११ अधिपति १२ मुक्तीचे

विस्तारू । विस्तारले ॥ ६ ॥ कीं हा परलोकींचा निजस्वार्थ । कीं हा योगियांचा गुप्त पंथ । नाना ज्ञानियांचा परमार्थ । रूपासि आला ॥ ७ ॥ कीं हे निरंजनाची[१३] खूण । कीं हे निर्गुणाची वोळखण । माया-विलक्षणाचें लक्षण । ते हे कवी ॥ ८ ॥ कीं हा श्रुतीचा भाव-गर्भ[१४] । कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ । नातरी होय सुलभ । निजबोध[१५] कविरूपें ॥ ९ ॥ कवि मुमुक्षूचें अंजन[१६] । कवि साधकांचें[१७] साधन । कवि सिद्धांचें समाधान[१७] । निश्चयात्मक ॥ १० ॥ कवि स्व-धर्माचा आश्रय । कवि मना[१८] मनोजय । कवि धार्मिकांचा विजय । विजयकर्ते ॥ ११ ॥ कवि वैराग्याचें लक्षण । कवि भक्तांचें भूषण । नाना स्व-धर्माचें संरक्षण । ते हे कवी ॥ १२ ॥ कवि प्रेमळांची[१९] प्रेमस्थिति । कवि ध्यान-स्थांची ध्यान-मूर्ति । कवि उपासकांची वाड[२०] कीर्ति । विस्तारली ॥ १३ ॥ नाना साधनांचें मूळ । कवि नाना प्रयत्नांचें फळ । नाना कार्यसिद्धि सकळ । कवींचेनि प्रसादें ॥ १४ ॥ आधीं कवीचा वाग्विलास । तरी मग श्रवणी तुंबळे रस । कवींचेनि मतिप्रकाश । कवित्वास होय ॥ १५ ॥ कवि व्युत्पन्नाची[२१] योग्यता । कवि सामर्थ्यवंताची सत्ता । कवि विचक्षणाची[२२] कुशलता । नाना प्रकारें ॥ १६ ॥ कवि कवित्वाचा[२३] प्रबंध । कवि नाना-धाटी-मुद्रा-छंद[२४] । कवि गद्य-पद्य-भेदाभेद[२५] । पद्प्रासकर्ते[२६] ॥ १७ ॥ कवि सृष्टीचा अलं-कार । कवि लक्ष्मीचा शृङ्गार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवि ॥ १८ ॥ कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नाना सुखांचें संरक्षण । ते हे कवि ॥ १९ ॥ कवि देवांचे रूपकर्ते । कवि ऋषींचें

---

१३ मायारहित ब्रह्माची १४ गर्भितार्थ १५ आत्मज्ञान १६ अंजनानें जशी दृष्टि स्वच्छ होते, तद्वत् ग्रंथकाराच्या कृतीनें मुमुक्षूस दिसतें म्ह० आत्मज्ञान होतें १७ ज्ञानप्राप्ति करू इच्छिणारास कविग्रंथ साधनभूत होतात, व सिद्धास म्ह० ज्ञानसंपन्नास त्यापासून समाधान होतें १८ आपल्या मनोरंजकत्वामुळे कवीचे ग्रंथ मनास जिंकतात म्ह० मनास इकडे तिकडे जाऊं देत नाहीत १९ भक्ताची २० मोठी २१ ज्ञात्याची २२ कुशल, ज्ञाते, सामर्थ्यवंत व कुशल म्हणून ज्यास म्हणावें ते कवि आहेत, असा भाव २३ कविता रचना २४ धाटी= शब्दरचनेची पद्धती, मुद्रा=लक्षणें, व्यंजक शब्द, छंद=वृत्तें २५ गद्यकाव्य व पद्यकाव्य असा भेद २६ निरनिराळ्या पदरूप कविता

महत्त्व वर्णिते। नानाशास्त्रांचे सामर्थ्यातें। कवि वाखाणिती ॥ २० ॥ नसता कवीचा व्यापार। तरी कैंचा असता जगदुद्धार। म्हणोनि कवि हे आधार। सकळ सृष्टीसी ॥ २१ ॥ नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं। कवीश्वरावीण तें नाहीं। कवीपासून सर्वेही। सर्वज्ञता ॥ २२ ॥ मागां वाल्मीक, व्यासादिक। जाहले कवी अनेक। तयांपासून विवेक। सकळ जनांसी ॥ २३ ॥ पूर्वी काव्यें होती केलीं। तरीच व्युत्पत्ति[२७] प्राप्त जाहली। तेणें पंडितता अंगी बाणली। परम योग्यता ॥ २४ ॥ ऐसे पूर्वी थोर थोर। जाहले कवीश्वर अपार। आतां आहेत पुढें होणार। नमन त्यांसी ॥ २५ ॥

## भक्तिनिरूपण

(दासबोध, द० २, स० ४)

नाना सुकृतांचें[१] फळ। तो हा नरदेह केवळ। त्याहीमध्यें भाग्य सफळ। तरीच सन्मार्ग लागे ॥ १ ॥ भगवद्भक्ति हे उत्तम। त्याहीवरी सत्समागम। काळसार्थक हाचि परम। लाभ जाणावा ॥ २ ॥ प्रेम प्रीतीचा सद्भाव। आणि भक्तांचा समुदाव। हरिकथा महोत्सव। तेणें प्रेम दुणावे ॥ ३ ॥ नरदेहो आलिया एक। कांहीं करावें सार्थक। जेणें पाविजे परलोक। परम दुर्लभ जो ॥ ४ ॥ विधियुक्त ब्रह्मकर्म। अथवा दया दान धर्म। अथवा करणें सुगम। भजन भगवंताचें ॥ ५ ॥ अनुतापें करावा त्याग। अथवा करणें भक्तियोग। नाही तरी धरणें संग। साधुजनांचा ॥ ६ ॥ नाना शास्त्रें धांडोळावीं। अथवा तीर्थें तरी करावीं। अथवा पुरश्चरणें बरवीं। पापक्षयाकारणें ॥ ७ ॥ अथवा कीजे परोपकार। अथवा ज्ञानाचा विचार। निरूपणीं सारासार। विवेक करणें ॥ ८ ॥ पाळावी वेदाची आज्ञा। कर्मकांड[२] उपासना। जेणें होइजे ज्ञाना। अधिकारपात्र ॥ ९ ॥ काया वाचा आणि मनें। पत्रें पुष्पें फळें जीवनें[३]। कांहीं तरी एक भजनें। सार्थक करावें ॥ १० ॥

---

२७ ज्ञान

१ पुण्याचें २ कर्ममार्गाचें प्रतिपादन करणारा वेदांचा भाग ३ जलानें

जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ । ऐसें न करितां निष्फळ । भूमिभार होय ॥ ११ ॥ नरदेहाचें उचित । कांहीं करावें आत्महित । यथानुशक्त्या चित्त-वित्त । सर्वोत्तमीं लागावें ॥ १२ ॥

## सच्छिष्य

( दासबोध, द० ५, स० ३ )

मागां सद्गुरूचें लक्षण । विशद केलें निरूपण । आतां सच्छिष्याची वोळखण । सावध ऐका ॥ १ ॥ सद्गुरुविण सच्छिष्य । तो वायां जाय निःशेष । कां सच्छिष्येंविण विशेष । सद्गुरु शिणे ॥ २ ॥ म्हणोनि सद्गुरु आणि सच्छिष्य । तेथें न लगती सायास । त्या उभयतांचा हव्यास[1] । पुरे एकसरां ॥ ३ ॥ सुभूमि आणि उत्तम कण । उगवेना पर्जन्येंविण । तैसें अध्यात्म-निरूपण[2] । नसतां होय ॥ ४ ॥ शेत पेरिलें आणि उगवलें । परंतु निगेविण गेलें । साधनेंविण तैसें झालें । साधकासी ॥ ५ ॥ जोंवरी पीक आपणासि भोगे । तोंवरी अवघेंचि करणें लागे । पीक आलियाहि उगें । राहूंच नये ॥ ६ ॥ तैसें आत्मज्ञान झालें । तरी साधन पाहिजे केलें । एक वेळ उदंड जेविलें । तरी सामुग्री पाहिजे ॥ ७ ॥ म्हणोनि साधन अभ्यास आणि सद्गुरु । सच्छिष्य आणि सच्छास्त्रविचारू । सत्कर्म आणि सद्वासना पारु । पाववी भवाचा ॥ ८ ॥ सदुपासना आणि सत्कर्म । सच्छिष्य सत्क्रिया आणि स्वधर्म । सत्संग आणि नित्यनेम । निरंतर ॥ ९ ॥ ऐसें हें अवघेंचि मिळे । तरीच विमळ ज्ञान निवळे । नाहीं तरी पाषांड[3] संचरे बळें । समुदायीं ॥ १० ॥ येथें शब्द नाहीं शिष्यासी । हें अवघें सद्गुरुपाशीं । सद्गुरु पालटी अवगुणांसी । नाना यत्नेंकरूनी ॥ ११ ॥ सद्गुरूचेनि असच्छिष्य पालटे । परंतु सच्छिष्यें असद्गुरुच पालटे । कां जे थोरपण तुटे । म्हणोनियां ॥ १२ ॥ याकारणें सद्गुरु पाहिजे । तरीच सन्मार्ग लाहिजे । नाहीं तरी होइजे । पाषांडा वरपडे

---

१ नाद, छंद २ ब्रह्मज्ञानाचें निरूपण ३ वितंडवाद, पाखंडमत

॥ १३ ॥ येथें सद्गुरूचें कारण । येर सर्व निष्कारण । तथापि सांगतं
ओळखण । सच्छिष्याची ॥ १४ ॥ मुख्य सच्छिष्याचें लक्षण
सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण । अनन्यभावें शरण । त्या नांव सच्छिष
॥ १५ ॥ शिष्य पाहिजे निर्मळ । शिष्य पाहिजे आचारशीळ । शिष
पाहिजे केवळ । विरक्त अनुतापी ॥ १६ ॥ शिष्य पाहिजे निष्ठावंत
शिष्य पाहिजे शुचिष्मंत । शिष्य पाहिजे नेमस्त । सर्व प्रकारी ॥१७
शिष्य पाहिजे साक्षेपी विशेष । शिष्य पाहिजे परमदक्ष । शिष
पाहिजे अलक्ष्य[4] । लक्षी[4] ऐसा ॥ १८ ॥ शिष्य पाहिजे अतिधीर
शिष्य पाहिजे अति उदार । शिष्य पाहिजे अतितत्पर । परमार्थ
विषयीं ॥ १९ ॥ शिष्य पाहिजे परोपकारी । शिष्य पाहिजे निर्म
त्सरी । शिष्य पाहिजे अर्थांतरीं । प्रवेशकर्ता ॥ २० ॥ शिष्य पाहि
परम शुद्ध । शिष्य पाहिजे परम सावध । शिष्य पाहिजे अगाध
उत्तम गुणांचा ॥ २१ ॥ शिष्य पाहिजे प्रज्ञावंत । शिष्य पाहिजे प्रेम
भक्त । शिष्य पाहिजे नीतिवंत । मर्यादेचा ॥ २२ ॥ शिष्य पाहि
युक्तिवंत । शिष्य पाहिजे बुद्धिवंत । शिष्य पाहिजे सतत । विचार
घेता ॥ २३ ॥ शिष्य पाहिजे धारिष्टाचा । शिष्य पाहिजे दृढ व्रताचा
शिष्य पाहिजे उत्तम कुळींचा । पुण्यशीळ ॥ २४ ॥ शिष्य असाव
सात्विक । शिष्य असावा भजक । शिष्य असावा साधक । साधनकर्त
॥२५॥ शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी । शिष
असावा परमार्थासी । वाढवूं जाणे ॥ २६ ॥ शिष्य असावा स्वतंत्र
शिष्य असावा जगन्मित्र । शिष्य असावा सत्पात्र । सर्व गुणें ॥ २७
शिष्य असावा सद्विद्येचा । शिष्य असावा सत्पात्र सद्भावाचा
शिष्य असावा अंतरींचा । परम शुद्ध ॥ २८ ॥ शिष्य नसाव
अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी[5] । शिष्य असावा संसारदुःखी
संतप्तदेही ॥ २९ ॥ जो संसारदुःखें दुखावला । जो त्रिविधतापें
पोळला । तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ॥ ३० ॥ बहुत दुःख
भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे । संसारदुःखाचेनि गुणें

४ इंद्रियातीत ब्रम्ह पाहणारा ५ जन्मल्यापासून श्रीमान् व सुखवस्तु

वैराग्य उपजे ॥ ३१ ॥ जयास संसाराचा त्रास । तयासीच उपजे विश्वास । विश्वासबळें दृढ कांस । धरिली सद्गुरूची ॥ ३२ ॥ अविश्वासें कांस सोडिली । ऐसीं बहुतेकें भवीं बुडालीं । नाना जळचरीं तोडिलीं । मध्येंचि सुखदुःखें ॥ ३३ ॥ या कारणें दृढ विश्वास । तोचि जाणा सच्छिष्य । मोक्षाधिकारी विशेष । अग्रगण्य ॥ ३४ ॥

## असच्छिष्य

शरण सद्गुरूसी गेले । ते सच्छिष्य ऐसे निवडिले । क्रियापालटें झाले । पावन ईश्वरीं ॥ १ ॥ ऐसा सद्भाव अंतरीं । तेचि मुक्तीचे वांटेकरी । येर मायिक वेषधारी । असच्छिष्य ॥ २ ॥ वाटे विषयांचें सुख । परमार्थ संपादणें लौकिक । देखोंदेखी पढतमूर्ख । शरण गेले ॥ ३ ॥ झाली विषयीं वृत्ति अनावर । दृढ धरिला संसार । परमार्थचर्चेचा विचार । मालिन झाला ॥४॥ मोड घेतला परमार्थाचा । हव्यास धरिला प्रपंचाचा । भारवाही कुटुंबाचा । काबाडी झाला ॥ ५ ॥ मानिला प्रपंची आनंद । केला परमार्थी विनोद । आंत मूढ मतिमंद । लाधला कामीं ॥ ६ ॥ सूकर पूजिले विलेपनें । म्हैसा मर्दिला चंदनें । तैसा विषयीं ब्रह्मज्ञानें । विवेकें बोधिला ॥ ७ ॥ रासभ उकरडां लोळे । तयास परिमळ सोहळे । उलूक अंधारीं पळे । तया केवीं हंसपंगती ॥८॥ तैसा विषयदरींचा[1] वऱ्हाडी । घाली अधः-पतनीं उडी । तयास भगवन्तीं आवडी । सत्संग कैंचा ? ॥ ९ ॥ वर्ती करून दांताळी । श्वानपुत्र हाडें चघळी । तैसा विषयीं तळमळी । विषयसुखाकारणें ॥ १० ॥ तया श्वानमुखीं परमान्न । मर्कटासि सिंहासन । तैसें विषयसक्तास ज्ञान । जिरेल कैचें ? ॥ ११ ॥ रासभें राखतां जन्म गेला । तो पंडितांमध्यें प्रतिष्ठला । न वचे तैसें अभकाला । परमार्थ नाहीं ॥ १२ ॥ मिळाला राजहंसांचा मेळा । तेथें आला डोंबकावळा । लक्षूनियां विष्ठेचा गोळा । हंस म्हणवी ॥ १३ ॥ तैसे सज्जनाचे संगतीं । विषयी सज्जन म्हणविती । विषय अभेद

---

१ विषयरूप खळग्यातील

चितीं। गोळा लक्षिला ॥ १४ ॥ कांखे घेऊनियां दारा । म्हणे मज संन्यासी करा। तैसा विषयी सैरावैरा। ज्ञान बडबडी ॥ १५ ॥ तैसे विषयी बापुडे। तयांस ज्ञान कोणीकडे?। वाचाळ, शाब्दिक, बडबडे वरपडे जाहले ॥ १६ ॥ ऐसे शिष्य परम नष्ट। कनिष्ठांमध्यें कनिष्ठ हीन, अविवेकी, दुष्ट। खळ, खोटे, दुर्जन ॥ १७ ॥

## गुणमाहात्म्य

(दासबोध, द० ९ स० ४)

पृथ्वीमध्यें लोक सकळ। एक संपन्न, एक दुर्बळ। एक निर्मळ, एक ओंगळ। काय निमित्तें ॥ १ ॥ कित्येक राजे नांदती। कित्येक दरिद्र भोगिती। कितीएकांची उत्तम स्थिती। कित्येक अधमाधम॥२॥ ऐसें काय निमित्तें झालें?। हें मज पाहिजे निरूपिलें। याचें उत्तर ऐकिलें। पाहिजे श्रोतीं ॥ ३ ॥ हे सकळ गुणापाशीं गती। सगुण भाग्यश्री भोगिती। अवगुणांस दरिद्रप्राप्ती। यदर्थी संदेह नाहीं॥४॥ जो जो जेथें उपजला। तो ते व्यवसायीं उमजला। तयास लोक म्हणती भला। कार्यकर्ता ॥ ५ ॥ जाणता तो कार्य करी। नेणता कांहींच न करी। जाणता तो पोट भरी। नेणता भीक मागे ॥ ६ ॥ हें तो प्रगटचि असे। जनीं पाहतां प्रत्यक्ष दिसे। विद्येवीण करंटा वसे। विद्या तो भाग्यवंत ॥ ७॥ 'आपुली विद्या न शिकसी। तरी काय भीक मागसी'। जेथें तेथें बुद्धि ऐसी। वडिलें सांगती ॥ ८ ॥ वडील आहे करंटा। आणि समर्थ धाकुटा। कां जे विद्येनें मोठा। म्हणूनियां ॥९॥ विद्या नाहीं, बुद्धि नाहीं। विवेक नाहीं, साक्षेप नाहीं। कुशलता नाहीं, व्याप नाहीं। म्हणोनि प्राणी करंटा ॥ १० ॥ इतुकेंही जेथें वसे। तेथें वैभवास उणें नसे। वैभव सांडितां आपैसें। पाठीं लागे ॥ ११ ॥ वडील समर्थ धाकटा भिकारी। ऐका याची कैसी परी। वडिला ऐसा व्याप न करी। म्हणोनियां ॥ १२ ॥ जैसी विद्या तैसी हांव। जैसा व्याप तैसें वैभव।

तोलासारिखा[1] हावभाव। लोक करिती ॥ १३ ॥ विद्या नसे, वैभव नसे। तेथें निर्मळ कैंचा असे। करंटपणें ओखटा दिसे। ओंगळ आणि विकारी ॥ १४ ॥ पशु पक्षी गुणवंत। त्यास कृपा करी समर्थ। गुण नसतां जिणें व्यर्थ। प्राणिमात्रांचें ॥ १५ ॥ गुण नाहीं गौरव नाही। सामर्थ्य नाही महत्त्व नाही। कुशलता नाही तर्क नाहीं। प्राणिमात्रांसी ॥ १६ ॥ याकारणें उत्तम गुण। तेंचि भाग्याचें लक्षण। लक्षणेंवीण अवलक्षण। सहजचि झालें ॥ १७ ॥

## शहाणपण

(दासबोध, द० १५, स० ३)

जेथें उदंड जाणीव। तेचि तितुके सदैव। थोडे जाणिवेनें निदैंव। होती लोक ! ॥ १ ॥ व्याप आटोप करिती। धक्के चपेटे सोशिती। तेणें प्राणी सदैव होती। देखत देखतां ॥ २ ॥ ऐसें हें आतां वर्ततें। मूर्ख लोकांस कळेना तें। विवेकी मनुष्य समजतें। सकळ कांही ॥ ३ ॥ थोर लहान बुद्धीपाशी। सगट कळेना लोकांशी। आधीं उपजलें तयाशी। थोर म्हणती ॥ ४ ॥ गुणेंवीण वडिलपण। हें तों अवघेंच अप्रमाण। त्याची प्रचीत प्रमाण। थोरपणीं ॥ ४ ॥ तथापि वडिलांस मानावें। वडिलें वडिलपण जाणावें। नेणतां पुढें कष्टावें। थोरपणी ॥ ६ ॥ याकारणें कोणीएकें। शहाणपण शिकावें विवेकें। विवेक न शिकतां तुकें[1]। तुटोनि जाती ॥ ७ ॥ तुक तुटलें म्हणजे गेलें। जन्मा येउनी काय केलें। बळेंचि सांदीस घातलें। आपणासी ॥ ८ ॥ ऐसें कोणीएकें न करावें। सर्व सार्थकचि करावें। कळेना तरी विवरावें[2]। ग्रंथांतरीं ॥ ९ ॥ शहाण्यास कोणी वहाती। मूर्खास लोक दवडूनि देती। जीवास आवडे संपत्ती। तरी शहाणें व्हावें ॥ १० ॥ अहो ! या शहाणपणाकारणें। बहुतांचे कष्ट करणें। परंतु शहाणपण शिकणें।

---

१ आपआपल्या पदवीप्रमाणें, दिमाखाप्रमाणें

१ वजन, महत्त्व २ शोधावें

हे उत्तमोत्तम ॥ ११ ॥ जो बहुतांस मानला । तो जाणावा शहाणा झाला । जनीं शहाण्या मनुष्याला । काय उणें ॥ १२ ॥ आपलें हित न करी लौकिकीं । तो जाणावा आत्मघातकी । या मूर्खाएवढा पातकी । आणीक नाही ॥ १३ ॥ आपण संसारीं कष्टतो । लोकांकरवीं रागेजोनि घेतो । जनांमध्यें शहाणा तो । ऐसें न करी ॥ १४ ॥ साधकां शिकविलें स्वभावें । मानेल तरी सुखें घ्यावें । मानेना तरी सांडावें । एकीकडे ॥ १५ ॥

## उत्तमपुरुष

( दासबोध; द० १८, स० ६ )

नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर श्रृंगारणें । विवेकें विचारें राजकारणें । अंतर श्रृंगारिजे ॥ १ ॥ शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केलें सज्ज । अंतरीं नसतां चातुर्यबीज । कदापि शोभा न पाविजे ॥ २ ॥ तुंद[1] हेकाड कठोरवचनी । अखंड तोले साभिमानी । न्याय नीति अंतःकरणीं । घेणार नाही ॥ ३ ॥ तरी शीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा । राजकारणें संवादा । मिळोंच नेणें ॥ ४ ॥ ऐसे लोंद[2] बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं । पापी अपस्मार जनी । राक्षस जाणावे ॥ ५ ॥ अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें । हटनिग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥ ६ ॥ बहुतचि करितां हट । तेथें येऊन पडले तट । कोणी एकाचा शेवट । झाला पाहिजे ॥ ७ ॥ बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजा भवानी । परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥ ८ ॥ अखंडचि सावधाना । बहुत काय करावी सूचना । परंतु कांहींएक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ ९ ॥ समर्थापाशीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान । निश्चळ करूनियां मन । लोक असती ॥ १० ॥ सकळ कर्ता तो ईश्वर । तेणें केला अंगिकार । तया पुरुषाचा विचार । विरळा जाणे ॥ ११ ॥ न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंग प्रकार । परीक्षणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १२ ॥

---

१ मस्त, हेकेखोर २ माजलेले, दाडगे

महायत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणें । अद्भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १३ ॥ देव ब्राह्मण आचार विचार । कितीक जनांस आधार । सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १४ ॥ यश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणांसि नाहीं सीमा । नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १५ ॥ इहलोक परलोक पाहणें । अखंड सावधपणें राहणें । बहुत जनांचे साहणें । देणें ईश्वराचें ॥ १६ ॥ देवांचा कैंपक्ष घेणें । ब्राह्मणांची चिंता वाहणें । बहुत जनांस पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥ धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । झाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥ उत्तम गुणांचा ग्राहक । तर्क तीक्ष्ण विवेक । धर्मस्थापना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥ सकळ गुणांमध्यें सार । तजविजा विवेक विचार । जेणें पाविजे पैलपार । अरत्र[3] परत्रीचा ॥ २० ॥

## समर्थपदवी

( दासबोध, द० १८, स० १० )

कोणी एका कार्याचा साक्षेप । कांहीं तरी घडे विक्षेप । काळसाह्यें तें आपोआप । होत जातें ॥ १ ॥ कार्यभाग होत चालिला । तेणें प्राणी सुखी झाला । विचारही सुचों लागला । दिवसें दिवस ॥ २ ॥ कोणीएक प्राणी जन्मास येतो । कांहीतरी काळ साह्य होतो । दुःखाउपरी सुख देतो । देव कृपाळुपणें ॥ ३ ॥ अवघाच काळ जरी सजे । तरी अवघेच होती राजे । कांहीं सजे कांहीं न सजे । ऐसें आहे ॥ ४ ॥ ऐकिल्यावीण कळलें । शिकल्याविण शहाणपण आलें । हें देखिलें ना ऐकिलें । भूमंडळीं ! ॥ ५ ॥ सकळ कांही ऐकतां कळे । कळतां कळतां वृत्ति निवळे । नेमस्त मनामध्यें आकळे । सारासार ॥ ६ ॥ श्रवण म्हणजे ऐकावें । मनन म्हणजे मनीं धरावें । येणें उपायें स्वभावें । त्रैलोक्य चाले ॥ ७ ॥ माझें होय तुझें नव्हे । ऐसी अखंड जयास सवे । न्यायनीति सांडून धांवे । अन्यायाकडे ॥ ८ ॥ आपुल्या थोर-

३ इहलोकपरलोकीचा

पणासाठीं । आचावचा तोंड पिटी । न्याय नाहीं ते शेवटीं । परम अन्यायीं ॥ ९ ॥ एकीकडे अभिमान उठे । दुसरीकडे उदंड पेटे । ऐसे श्रोते खरे खोटे । कोण जाणे ॥ १० ॥ म्हणोनि जाणते विचक्षण । ते आधींच धरिती नेणपण । मूर्ख टोणपा आपण । कांहींच नाही ॥ ११ ॥ आपणाहूनि देव थोर । ऐसा जयास कळला विचार । सकळ कांहीं जगदंतर । तेंही राखावें ॥ १२ ॥ सभेमध्यें कलह झाला । शब्द येतो जाणत्याला । अंतर राखों नाहीं शिकला । कैसा योगी ॥ १३ ॥ वैर करितां वैरचि वाढे । आपणास दुःख भोगणें घडे । म्हणून शहाण्याचें कुकडें[1] । कळों आलें ॥ १४ ॥ अखंड आपणा संभाळिती । क्षुल्लकपण येऊं न देती । थोर लोकांस क्षमा शांति । अगत्य करणें ॥ १५ ॥ अवगुणापाशीं बैसला गुणी । अवगुण कळतो तत्क्षणीं । विवेकी पुरुषाची करणी । विवेकें होते ॥ १६ ॥ उपाय, पर्याय, दीर्घ प्रयत्न । विवेकबळें नाना यत्न । करील तयाचें महिमान । तोचि जाणे ॥ १७ ॥ दुर्जनीं वेवदरून[2] घेतला । बाष्कळलोकीं घसरिला । विवेकापासून चेवला[3] । विवेकी कैसा ॥ १८ ॥ न्याय, पर्याय, उपाय । मूर्खास हें कळे काय । मूर्खाकरितां चिवडा होय । मजालसीचा[4] ॥ १९ ॥ मग ते शहाणे नीट करिती । स्वयें साहोनि साहविती । स्वयें करून करविती । लोकांकरवीं ॥ २० ॥ बहुत जनांस चालवी । नाना मंडळें हालवी । ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ॥ २१ ॥

## वेचें—उपदेशशतकांतील

तूंचि बापा ब्रह्म येर सर्व भ्रम । दृढ धरीं वर्म अंतरींचें ॥ १ ॥
अंतरींचें वर्म अंतरीं धरावें ॥ विचारें करावें दृढतर ॥ २ ॥
दृढतर होय श्रवण मननें । अद्वैतचि मनें विचारावें ॥ ३ ॥
विचारावें जनां भक्तीचें लक्षण । वैराग्य तें कोण कैसें आहे ॥ ४ ॥
आहे भक्ति कैसी विवेकें जाणावी । आवडी धरावी शाश्वताची ॥ ५ ॥

---

१ मर्म २ वेढून ३ भ्रष्ट झाला ४ सभेचा

शाश्वताची प्रीती विषयीं विरक्ती । नाशवंत चित्तीं जाणोनियां ॥ ६ ॥
जाणोनियां सर्व नाशवंत ऐसें । शाश्वतीं विश्वासे मन बुद्धी ॥ ७ ॥
बुद्धीचा निश्चय स्वरूपीं जाहाला । प्राणी विश्वासला स्वस्वरूपीं ॥ ८ ॥
स्वस्वरूपीं आस क्रिया तेचि भक्ती । पाहतां विभक्ती जेथें नाहीं ॥ ९ ॥
भक्तिपंथें जातां होय सायुज्यता । वाक्य हें तत्वतां दास म्हणे ॥ १० ॥

## मनाचे श्लोक

मना! सज्जना भक्तिपंथेंचि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ १ ॥

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा । पुढें वैखरी राम आधी वदावा ॥
सदाचार हा थोर सांडूं नये तो । जगीं तोचि तो मानवी धन्य होतो ॥ २ ॥

मना वासना दुष्ट कामा नये रे । मना सर्वथा पापबुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो । मना अंतरीं सार वीचार राहो ॥ ३ ॥

मना पापसंकल्प सोडूनि द्यावा । मना सत्यसंकल्प जीवीं धरावा ॥
मना कल्पना ते नको वीषयाची । विकारें घडे हो जगीं सर्व छी छी ॥ ४ ॥

मना श्रेष्ठ धारिष्ठ जीवीं धरावें । मना बोलणें नित्य सोशीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें । मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ ५ ॥

तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचे परी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ६ ॥

जनीं सर्वसूखी असा कोण आहे । विचारी मना तूंचि शोधूनि पाहे ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें । तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ७ ॥

मना मानसीं व्यर्थ चिंता वहातें । अकस्मात होणार होऊनि जातें ॥
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें । मतीमंद तो खेद मानी वियोगें ॥ ८ ॥

मना सर्वथा सत्य सांडूं नको रे । मना सर्वथा मिथ्य मांडूं नको रे ॥
मना सत्य तें सत्यवाचे वदावें । मना मिथ्य तें मिथ्य सोडूनि द्यावें ॥ ९ ॥

समर्थांचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भू-मंडळीं कोण आहे ॥
जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १० ॥

असे हो जया अंतरीं भाव जैसा । वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्यासि[1] रक्षीतसे चापपाणी । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ ११ ॥

सदा चक्रवाकासि[2] मार्तंड जैसा । उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥
हरीभक्तिचा घाव घालीं निशाणी । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १२ ॥

मना रे जनीं सौम्यमुद्रा धरावी । कथा आदरें राघवाची करावी ॥
नसे राम तें धाम सोडूनि द्यावें । सुखालागिं आरण्य सेवीत जावें ॥ १३ ॥

जयाचेनि संगें समाधान भंगे । अहंता अकस्मात येऊनि लागे ॥
तया संगतीची जनीं कोण गोडी । जिये संगतीनें मती राम सोडी ॥ १४ ॥

सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा । सदा रामनामें वदे नित्य वाचा ॥
स्वधर्मेंचि चाले सदा उत्तमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १५ ॥

मदें मत्सरें सांडिली स्वार्थबुद्धि । प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी ॥
सदा बोलणें नम्र वाचा सुवाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १६ ॥

नसे मानसीं दुष्ट आशा दुराशा । वसे अंतरीं प्रेम पाशा पिपाशा ॥
ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १७ ॥

दिनाचा दयाळू मनाचा मवाळू । स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू ॥
जया अंतरीं क्रोध संताप कैंचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १८ ॥

---

१ अनन्य भावानें शरण आलेल्यास २ चक्रवाकांच्या जोडप्याचा रात्रीं वियोग होतो व सूर्योदयाबरोबर भेट होते, असें म्हणतात; त्याच्या संकटनिवारणार्थ जसा सूर्य तसा भक्ताच्या संकटनिवारणार्थ रामचंद्र, असा भाव.

समस्तांमधें सार साचार आहे। कळेना तरी सर्व शोधूनि पाहें ॥
मना संशयो वाउगा तो त्यजावा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥१९॥

यथासांग[3] रे कर्म तेंही घडेना। घडे कर्म तें पुण्य गांठीं पडेना ॥
दया पाहतां सर्व भूतीं असेना। फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ॥२०॥

क्रियेवीण नानापरी बोलिजे तें। परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे। तया मानवा देव कैसेनि पावे ॥२१॥

विवेकें क्रिया आपुली पालटावी। अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ॥
जगीं बोलण्यासारिखें चाल बापा। मनीं कल्पना सोड संसारतापा ॥२२॥

विचारूनि बोले विवंचूनि चाले। तयाचेनि संतप्त तेंही निवाले ॥
बरें शोधल्यावीण बोलों नये हो। जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो ॥२३॥

जया मानला देव तो पूजिताहे। परी देव शोधोनि कोणी नपाहे ॥
जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी। जया मानली भक्ति जे तेचि मोठी ॥२४॥

तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले। तया देवरायासि कोणी न बोले ॥
जगीं थोरला देव तो चोरिलासे। गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ॥२५॥

नव्हे वाउगी चावटी काम पोटीं। क्रियेवीण वाचाळता तेचि मोठी ॥
मुखीं बोलिल्यासारिखें चालताहे। मना सद्गुरू तोचि शोधूनि पाहें ॥२६॥

मना संग हा सर्व सोडोनि द्यावा। अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महादुःख भंगे। जनीं साधनेंवीण सन्मार्ग लागे ॥ २७ ॥

## श्रीरामचंद्राचें ऐश्वर्य

असो ऐसा समुदाव। महामंडपीं बैसले सर्व ॥ सिंहासनीं देवराव। शोभत असे ॥ १ ॥ सुधापानें संतृप्त जाले। तैसे सर्वेही

३ पूर्णपणें

मिळाले ॥ तंव ते हरिदास आले । सर्वोत्तमाचे ॥२॥ देवापुढें साबडे[१] भक्त । गाती नाचती लज्जारहित ॥ देहभाव विसरोनि चित्त । सर्वोत्तमीं मिळाले ॥ ३ ॥ कुशळ गायक किन्नर । नृत्य करिती अपार ॥ तेणें वेढिलें राजद्वार । पुढें रीघ न फावे ॥ ४ ॥ टाळघोष मृदंग । ब्रह्मवीणे[२] वाजती उपांग ॥ हरिदास मिळाले रंग । तुंबळ लागले ॥ ५ ॥ गर्जती मृदंगकाहळें । आनंदें गाती उसाळें ॥ क्षणोक्षणीं धूसर उसळे । रक्तश्वेत सुगंध ॥ ६ ॥ साहित्य मृदंग टाळी । सर्वत्र वाजविती करताळीं[२] ॥ क्षणोक्षणां नाम कल्लोळीं । गर्जती सर्व ॥ ७ ॥ रुळती सकळांचिया गळां । जाईजुईचंपकमाळा ॥ नाना सुगंध परिमळा । कर्दम जहाला ॥ ८ ॥ पताका गरुड टकें[३] अपार । तेणें आच्छादिलें अंबर ॥ मेघडंबरें मनोहर । थडकती ठायीं ठायीं ॥ ९ ॥ पूर्ण चंद्राकार छत्रें । त्राहाटलीं चित्रविचित्रें ॥ गरगरां फिरती अपारें । नानावर्णें ॥ १० ॥ माहा निशाणें तळपती । दाढा विक्राळ झळकती ॥ डौल पहातां थरकती । रोमांच अंगीं ॥ ११ ॥ बहु दाटती सूर्यपानें । फटफट वाजती निशाणें ॥ वाद्यें गर्जती त्राणें । दीर्घस्वरें ॥ १२ ॥ टाळ मृदंग शंख भेरी । वाद्यें वाजती अंबरीं ॥ नानावाद्यांची भरोवरी । गर्जती डंके ॥ १३ ॥ ध्वज फडकती प्रचंड । वाद्यें वाजती उदंड ॥ तेणें घोषें ब्रह्मांड । संपूर्ण झालें ॥ १४ ॥ नाना रत्नांची फांकली प्रभा । तेणें डावरली[४] सकळ सभा ॥ लावण्य लाजली शोभा । देखोनि ते काळीं ॥ १५ ॥ झाली अत्यंत दाटणी । तेणें होतसे मंडप घसणी ॥ उभे वारिती वेत्रपाणी[५] । सभा घनवटली ॥ १६ ॥ सर्वेही टकमकां पाहती । पडली देहाची भ्रांती[६] ॥ सकळिकांच्या मनोवृत्ती । वेधल्या रामचंद्रीं ॥ १७ ॥ वदती वक्ते अनुभवाचे[७] । मस्तक डोलती श्रोत्यांचे ॥ तल्लीन सादर सर्वांगाचे[८] । श्रोत्र केले ॥ १८ ॥ दिव्य सिंहासनीं रामचंद्र । परमप्रतापी नरेंद्र ॥ सन्मुख

---

१ भोळे, प्रेमळ २ वाद्यविशेष ३ प्रकाशतो ४ प्रभामय झाली ५ छडीदार, चोपदार ६ विस्मृति ७ ज्याचें परमेश्वराशी तादात्म्य झालें आहे असे ८ सर्व इद्रियें तल्लीन, तन्मय झालीं असा भाव

उभा भीम कपींद्र । वज्रदेही ॥ १९ ॥ देवास आरती आरंभिली । सकल सभा गडबडली ॥ असंभाव्य वाद्यें लागलीं । मर्यादेवेगळीं ॥ २० ॥ रत्नदीप हेमताटीं । नीरांजनें लक्ष कोटी ॥ थाटें चालली दाटी । असंभाव्य झाली ॥ २१ ॥ दीप लागले अपार । बंबाळ जळती कर्पूर ॥ स्थळोस्थळी मनोहर । रंगमाळा शोभती ॥ २२ ॥ चंद्रज्योतींचे उमाळे । तेणें दिशाचक्र ढवळें[9] ॥ पूर्णचंद्र तये वेळे । राहटले[10] जैसे ॥ २३ ॥ धूसर उडवले अपार । तेणें ढवळलें अंबर ॥ मुखें तेजवटलीं थोर । उत्साह झाला ॥ २४ ॥ सकळ वाद्यें येक वेळा । नामघोषगजर आगळा ॥ आच्छादिलें भूमंडळा । धूसर तेणें ॥ २५ ॥ रत्नकीळा[11] भूमंडळीं । मुखें झळकती अंतराळीं ॥ सप्तरंग सभामंडळीं । उमटते झाले ॥ २६ ॥ रामाचेनि स्वामीपणें । मी ब्रह्मांड मानी ठेंगणें[12] ॥ त्रैलोक्यही वाटे उणें । महिमा वर्णितां ॥ २७ ॥

## करुणाष्टक

अनुदिन अनुतापें तापलों रामराया ।
परम दिनदयाळा नीरसीं मोहमाया ॥
अचपळ मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो धांव रे ! धांव आतां ॥ १ ॥

भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजन-जन-धनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपलीशी करावी ।
सकळ त्यजुनि भावें कांस तूझी धरावी ॥ २ ॥

विषय-जनित-सूखें सूख होणार नाहीं ।
तुजविण रघुनाथा ओखटें सर्व कांहीं ॥

---

९ प्रकाशमय होई १० एकवटले ११ रत्नाचें तेज १२ क्षुद्र

रघुकुळ-टिळका रे हीत माझें करावें ।
दुरित दुरि रहावें म्यां स्वरूपीं भरावें ॥ ३ ॥

तन मन धन माझें राघवा! रूप तूझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ॥
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचल भजन लीला लागली आस तूझी ॥ ४ ॥

चपलपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना ॥
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ।
म्हणउनि करुणा हे बोलतों दीन वाचा ॥ ५ ॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं ॥
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु ।
षडरिपुकुळ माझें तोडिं यांचा समंधू ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी ॥
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे
तुजविण मज नेती जंबुकी वासना रे ॥ ७ ॥

स्वजन-जन-धनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेत सांडोनि देती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ८ ॥

---

# १० आनंदतनय

या कवीसंबंधानें अद्याप निश्चयात्मक माहिती उपलब्ध नाहीं. तथापि हे कवि इ. सनाच्या १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात होते असा कित्येकांचा तर्क आहे. हे कर्नाटकात अरणी या इतिहासप्रसिद्ध गांवीं रहात असत. आनंदतनय व प्रसिद्ध कवि रघुनाथपंडित हे व्याही होते असे म्हणतात. पण रघुनाथपंडित हे सारस्वत ब्राह्मण होते असें 'महाराष्ट्रकविचरित्र' काराचें मत आहे.

आनंदतनयानी प्रसिद्ध व लोकप्रिय पौराणिक विषयावर लहान मोठीं वीस काव्ये केली आहेत, व दीडशेवर पदेही केली आहेत. यांची कविता श्लोकबद्ध असून, प्रासादिक व मनोहर आहे. याची भाषा प्रौढ व रसाळ आहे. स्थलविशेषी सुंदर अलंकारही आढळतात. मात्र भाषेच्या शुद्धतेकडे यांचे बरेच दुर्लक्ष झाले आहे. यमकें व अनुप्रास साधण्याकडे याचा ओढा विशेष आहे, तथापि त्यामुळे अर्थहानि झालेली नाही. एकंदरीत याची कृति हृदयंगम व स्थलविशेषी फारच उच्च प्रतीची आहे.

## ताटकावध

विश्वामित्रादि ऋषींच्या यज्ञकर्मात ताटका नामक राक्षसी फार विघ्ने आणीत होती. तिचा वध करण्यासाठी रामलक्ष्मणास आपले बरोबर पाठविण्यासाठी विश्वामित्राने दशरथाजवळ मागणी केली. काही वेळ काकूं करून अखेर दशरथाने रामलक्ष्मणास पाठविलें. पुढे रामाने ताटकेचा वध केला. तो प्रसंग येथें वर्णिला आहे.

( चूर्णिका )

**तो कोणेके अवसरीं ।**
**कनक निकेतनामाझारीं ॥**
**जैसा द्वि-ज-गणां[1]-माझारीं कळाधरू ।**
**कीं पद्मिनी[2]-स्तोम-गणीं होय सहस्र-करू ॥**

---

१ नक्षत्रसमुदायामध्यें चद्र २ कमलसमुदायामध्यें सूर्य

कीं भूभृत्कुळीं[3] निजृंभमाण हेमें[4]-धरा-धरू ।
दशरथ पृथ्वी-वल्लभ लखलखित सिंहासनारूढ विराजे ॥ १ ॥

तों आकस्मिक तीव्र सेवक सभाप्रांतीं नृपा वंदुनी ।
वार्ता सर्व निवेदिती द्रुतगती गाधेय[5] आला मुनी ।
पायीं वाजति पादुका चटचटां आपाद माथां जटा ।
वाटे धूर्जटि[6] पातला, दशरथें तो देखिला भूतटा ॥ २ ॥

( अश्वधाटी )

माला करी हृदय-भालासि तें भसित[7] ल्याला मृगाजिन कटीं ।
लोला जटा रुळति डोला परी परम कोलाहल ध्वनि उठी ॥
लीला अशी म्हणुनि नीलालका सुकृतशीला तयासि नमिती ।
आला मुनी निजघराला म्हणूनि मग झाला पुढें नरपती ॥ ३ ॥

( चूर्णिका )

जोडोनि करतल, सुर-सरिता-जल-विमल-हृदय[8] अज-तनय[9] ।
सविनय पुसे काय आज्ञा, अगा ! हे ! मुनि-कुल-प्राज्ञा ! ! भूत-
भविष्य-वर्तमान-त्रि-काल-ज्ञा, निगमागमें[10]-सार-पर-ज्ञा, जी जी ।
सकल-राज-संभार-अगणित-तुंग तुरंग-मत्तमातंग सौध- ॥
मंडित, चतुः-समुद्र-वलयांकित भूमी, हा विषय आपुला ।
जी स्वामी, मज दासाप्रत सांप्रत मनोरथ प्रकटिजे ॥ ४ ॥

( दिंडी )

'ऐक राया सौभाग्य-घनाकाशा । अम्हां काशासी[11] दार-धनी[12] आशा ॥
काय योगी गुंतती मोहपाशा ? । जिहीं वरिल्या संपत्ति अवीनाशा[13] ॥५॥

ऐक माझा वृत्तांत महीपाला । राक्षसांचा यज्ञांत उठे पाला[14] ॥
विघ्न करिती मोडून यज्ञशाला । येथ आलों यालागिं धी-विशाला ! ॥६॥

---

३ पर्वतामध्यें ४ मेरू पर्वत ५ विश्वामित्र ६ शंकर ७ भस्म ८ गंगाजलासारखें शुद्ध आहे अंतःकरण ज्याचें ९ दशरथ १० वेदपारगत ११ कशाला १२ स्त्री व संपत्तीच्या ठायीं १३ अक्षय्य मोक्षरूप संपत्ति १४ समुदाय

करूं शकतिल त्वत्तनय सुसंग्रामा। कीर्ति शोभा येईल रामग्रामा ॥
पुन्हां येतों घेऊनि राम ग्रामा। पूर्ण–कामा कल्याण–गुण–ग्रामा[१५]" ॥ ७॥
'पुत्र द्यावा' हा शब्द पडे कानीं। खेद मोठा भूपाळ मनीं मानी ॥
शून्य मानी त्रैलोक्य राजधानी। काय मागा हे थोर गमे हानी ॥ ८॥
म्हणे 'जी! जी! सर्वज्ञ तपोराशी। कसे देऊं या सांग किशोरांसी ॥
नाहिं केला अभ्यास धनुष्याचा। मार्ग नेणें कीं मंत्र–रहस्याचा' ॥ ९॥
राम नेदी म्हणवोनि मुनी–नाथा। पदें साकेताधीश[१६] नमीं माथां ॥
उठे कोपें गाधेय तूज गोथा[१७]। म्हणे राया निःसत्व वृथा चोथा ॥ १०॥
'माग' आधीं बोलोनि सरे मागें। भूप ऐसा देखिला नाहिं मागें ॥
'सुखें नांदें सूपुत्रपणें रागें'। करी डोळे विस्तीर्ण महा–रागें ॥ ११॥
'बरें येतों' म्हणवोनि उठे चाले। तदा झाला भूकंप धरा हाले ॥
वसिष्ठादी धांवोनि ऋषी आले। 'कासया हे उत्पात नृपा झाले?॥ १२॥
पुत्र देईं गाधेय–करीं आधीं। समाधानें कार्यार्थ बहू साधीं' ॥
गुरूवाक्यें परिसोनि सर्व साधी। कौशिकातें भूपाल समाराधी ॥ १३॥

## श्लोक

रघुपती दिधला मुनिकारणें। सह सुमित्र दुजा अवधारणें ॥
मग नरेंद्र म्हणे, 'ऋषि कौशिका। उभयतां प्रतिपाळ किजे निका॥ १४॥

'केवळ हे सुकुमार कुमार बहू रजनी–चर–भार[१८] वनीं।
युद्धमुखीं रिपु वध्य न यांसि असाध्य अबोध्य तिहीं भुवनीं ॥
नेणति हे पर-लोक विलोकन कोकनदा–सम[१९] पाणिपदें।
वंशि तुझ्या अवतंस मुलें, मज संशय हाचि कसा न? वदे' ॥ १५॥

---

१५ शुभ गुणाचें निवासस्थान, अशा १६ साकेतदेशाचा राजा दशरथ १७ सकट
१८ राक्षस १९ कमलासम

धांवतां नृपति तीव्र गती घे । लागती मुनिपदाप्रति तीघे ।
दीधला दशरथें सुत भावें । हांसिला मग मुनी अनुभावें ॥ १६ ॥

आनंदें मुनिवृंद सुंदर जयध्वानें[20] अयोध्यापुरा ।
आशीर्वादुनि साधु साधु वचनें आले तदा गोपुरा ॥
वाद्यें वाजति भेरि दुंदुभि सभासद्मीं गुड्यातोरणी ।
नारी आरतआरत्या करिति त्या जैशा रतीधोरणी ॥ १७ ॥

थोपितां[21] मुनिवरें सहसा रे । राहिले नृप जनादिक सारे ।
चालिला त्यजुनि दूर अयोध्या । शौर्यमण्डित समागमिं योद्धा॥१८॥

जातां नीट अचाट दाट अटवी[22] वाटे दिठीं[23] लक्षिती ।
पट्टी श्वापद कूट थाट नटती बोभाटती लक्षिती ॥
सिंह व्याघ्र वृकादि शूकर मृगें दंती दरीं राहती ।
वृक्षीं पक्षि सहस्र लक्ष फिरती, हें कौतुकें पाहती ॥ १९ ॥

एवं राम, मुनींद्र, लक्ष्मण तिघे गांभीर्य-लीला-गती ।
जातां कौतुक एक अद्भुत दिसे पक्षी नभीं लागती ॥
स्वैर श्वापदसंघ धांवति भयें दंती दिगंताप्रती ।
जाती लंघिति काननी ' कवण हा कोल्हाळ जी संप्रती ॥ २० ॥

वारा कां सुटला, निनाद फुटला, कां देश बोभाटला ।
मेघाच्या पटला-परी उमटला पांशू[24] नभीं दाटला ' ॥
बोले राम मुनीसि पाय नमुनी ' आज्ञा करा नेमुनी ।
काळातें दमुनी न सोडिन शरा क्षेमस्थिती कां मुनीं ?॥ २१ ॥

ऐसी व्याकुळ वाट कां ? मुनिवरा ! हे धांवती थाट[25] कां ? ।
मोठा घोर अचाट कानन-तटीं वंश क्षिती दाट कां ? ' ॥

---

२० जयध्वनीनें २१ थाबविता २२ अरण्य २३ डोळ्यानी २४ धूळ २५ समुदाय

' रक्षोरूप जुनाट कामिनि फिरे साधूजनीं कांटका ।
ऐकें चिन्मय-नाटका[२६] रघुपती आली दिसे ताटका ' ॥ २२ ॥

वार्ता ऐकति राम-लक्ष्मण असी तों धांवली कर्कसी ।
घोराकार कराल-दंष्ट्र-वदना[२७] तद्दृष्टि[२८] बालार्कसी[२८] ॥
हाडांच्या अळुमाळ[२९] डोलति गळां माळा कटीं कांबळा ।
जिव्हा लोळतसे मुखी लळलळां येते धरोनी बळा ॥ २३ ॥

येतां सन्मुख राक्षसी लघुलघु क्ष्मा-पाल-वंशाग्रणी[३०] ।
क्रोधें दुर्धर वीर राम उठला शिक्षावया तत्क्षणीं ॥
तूणीं बाण गुणीं धरोनि सहसा कर्णांत आणी रणीं ।
हाणी तों धरणीवरी उलथली, उत्साह धातांगणीं[३१] ॥ २४ ॥

लागतां हृदयिं बाण खणाणा । ताटका उलथलीच दणाणा ।
त्या ध्वनीस्तव रवींदु गळाले । यक्ष राक्षस पिशाच पळाले ॥ २५ ॥

नेणो कोसळला कडा, उमळला चंद्र-द्रुमांचा थवा ।
किंवा वज्र-निपात-पर्वत-तटीं मानी मनी माधवा ॥
होतां हृद्गत राम बाण मिरवे मानें विमानावरी ।
शोभे दिव्य शरीर भव्य वचनीं रामस्तुती आदरी ॥ २६ ॥

केला जयध्वनि नभीं तयिं निर्जरांनीं[३२] ।
वर्षाव फुल्लसुम निर्भर जर्जरांनीं ॥
थोंबे मुखें स्तविति गर्जुनि सज्जनांचे ।
आनंदनंदन कवी मज सज्ज नाचे ॥ २७ ॥

---

२६ पूर्ण ज्ञानमय असून ससाररूपी खेळ करणाऱ्या २७ जबडा २८ बालरवीसारखे आरक्त तिचे डोळे २९ विपुल ३० राजकुलामध्यें श्रेष्ठ ३१ ब्रह्मलोकात ३२ देवानीं

## श्रीकृष्णसुदामभेट

श्रीकृष्णाचा गुरुबंधु सुदामदेव हा एक गरीब ब्राह्मण होता. हा मोठा भगवद्भक्त होता. पुष्कळ काळपर्यंत श्रीकृष्णाची भेट झाली नाहीं, म्हणून एकदा त्याला भेटावे या हेतूने हा द्वारकेस गेला. जातांना यानें श्रीकृष्णास देण्यासाठी एक मूठभर पोहे नेले होते. या भेटीचे वर्णन या श्लोकात केले आहे.

कांही एक तटस्थ[1] होउनि सभाप्रांतीं उभा राहिला।
श्रीकृष्णें कमलेक्षणें प्रियसखा प्रेमादरें पाहिला॥
आधीं पाय नमूनियां, मग भुजीं आलिंगिला प्रेमळें।
स्नेहें पूर्ण सुधामयें निगदिलीं[2] वाक्यें महा कोमळें॥ १॥

मत्पुण्य तें पूर्ण फळास आलें। बारे! तुझें दर्शन आजि झालें।
स्मरूनियां तूं मज भेटलासी। सुधा-निधी-संनिभ वाटलासी॥ २॥

'दादा चला' म्हणुनि हात धरूनि देवें।
सिंहासनी बसविला मग वासुदेवें॥
आज्ञापिली जल-धि-जा[3] द्विज-वंदनातें।
हांसोनि ते नमितसे समजोनि नातें॥ ३॥

त्यानंतरें देव तया सुदाम्या। वार्ता विचारी विबुधा सुधाम्या॥
'आहे बरी कीं वहिनी सुवृत्ता?। बाळें बरीं कीं? वद ह्याची वृत्ता॥ ४॥

कांहीं आठवतें गड्या! शिशुपणीं शाळेंतलें खेळणें!।
नाना हास्यविनोद, मोद, सगडीं[4] कुस्ती करूं, हेळणें[5]॥
'मी' 'तूं' हा मज तूज भेद न जगीं, ते मूळ मैत्री भली।
येते की स्मरणासि? जाण सखया! पुण्यें बहू लाधली॥ ५॥

---

१ आश्चर्यचकित २ उद्गारिली ३ रुक्मिणी ४ मित्रासह ५ लीलेनें, विनोदाने

आम्हां भेटी आणिला काय मेवा ?।
तूं भू-देवा[६] ! देइं सर्वस्व-ठेवा।
जों जों देखे देव काखेंत बोळा।
तों तों त्याचा होतसे जीव गोळा ॥ ६ ॥

मग विभु[७] वसनासी त्याचिया हात घाली।
उकलुनि जंव पाहे, मुष्टि पोहे निघाली ॥
द्विज-वर दुबळा तो फार संकोच मानी।
हरि तरि बहु वानी पूर्ण भक्ताभिमानी ॥ ७ ॥

मजवरि सखया ! त्वां स्नेह-संभार केला।
श्रमवरि चिरकालें येउनी द्वारकेला ॥
शुभदिन दसरा हा, आजि वाटे दिवाळी।
न मज गमति, पोहे दीधल्या, वैभवाळी ॥ ८ ॥

---

# ११ श्रीधर

शके १६०० या वर्षी श्रीधर कवीचा जन्म झाला. हे जातीचे देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या बापाचे नांव ब्रह्मानंद असून ते नाझरें गावचे कुळकर्णी होते. याच्या आईचें नाव सावित्रीबाई. लहानपणापासूनच याची चित्तवृत्ति उदासीन होती, व अल्प वयातच यानीं संन्यास घेतला. जरी हे बहुधा तीर्थयात्रा करीत हिंडत असत, तरी याचे वसतिस्थान पंढरपूर होतें.

श्रीधरस्वामीनीं 'रामविजय', 'हरिविजय', 'पाडवप्रताप', 'शिवलीलामृत', 'ब्रह्मोत्तरखंड', 'जैमिनी-अश्वमेध' वगैरे ओंवीबद्ध ग्रथ केले आहेत. याच्या ग्रंथाची

---

६ ब्राह्मणा ७ कृष्ण

भाषा सरळ, सुबोध व रसाळ असल्यामुळें व विषय पौराणिक असल्यामुळें, यांचे ग्रंथ फार लोकप्रिय झाले असून, यांच्या ग्रंथांइतकी दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीच्या ग्रंथाची प्रसिद्धि, व प्रसार नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. यांच्या कवितेंत सुंदर रूपकें व उत्प्रेक्षा विपुल आहेत. याची वाणी प्रासादिक व मधुर असून, वर्णनशैली हृदयंगम आहे. शके १६५० सालीं श्रीधरस्वामी पैठण येथें समाधिस्थ झाले.

## श्रीसरस्वतीस्तवन

आता नमूं सरसि-जोद्भव-कुमारी[1] । जे विलसे सदा कवि-जिव्हाग्रीं॥ जीचे वरदें मूकही करी । वाचस्पतीसीं विवाद् ॥ १ ॥ जे आनंदसरोवर-मराळिका[2] । जे चातुर्य-चंपक-कळिका॥ जीचे कृपेची करून नौका । कवि-बाळका नेत परतीरा ॥ २ ॥ कृपें तुझे विरींची कुमरी[1] । जन्मांध होती महा जोहारी[3] ॥ अतिमूढ तो वेदार्थ करी । शक्र-पदीं[4] बैसे रंक ॥ ३ ॥ अंबे तूं कवि-हृदयाब्ज-भ्रमरी[5] । की निजानंदसागरीची लहरी ॥ वाग्वल्ली तूं बैसें जिव्हाग्रीं । विरूढें सफळ सर्वदा ॥ ४ ॥ विवेक-हंस शुद्ध धवळ । त्यावरी तुझें आसन चंचळ । तप्त-कांचन जैसें सुढाळ । तैसें निर्मळ निजांग तुझें ॥ ५ ॥ शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर । दिव्य मुक्तलग अलंकार ॥ निज-बोध-वीणा घेऊनि सुस्वर । गायन करिसी स्वानंदें ॥ ६ ॥ ऐकतां शारदेचें गायन । तन्मय विधि विष्णु ईशान ॥ अंबे तुझें सौंदर्य पाहून । मीन-केतन[6] तटस्थ ॥ ७ ॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा । सावित्री आणि मुख्य रमा ॥ तुझ्या चातुर्य-समुद्राची सीमा । त्याही कदा न पावती ॥ ८ ॥ अंबे तुझे गुण केवीं वर्णावे । केविं अर्कासी अर्की-सुमनें[7] पूजावें॥ अंबर कैसें मुष्टीत सांठवे । पालवीं बांधवे वायु कैसा ॥ ९ ॥ न करवे उर्वीचें वजन । न गणवे सिंधूचें जीवन ॥ सप्तावरणें भेदून । मशक केवीं जाऊं शके ॥ १० ॥ माझें मन

---

१ कमलोद्भव ब्रह्मदेवाची मुलगी सरस्वती ,२ हंसी ३ रत्नपारखी ४ इंद्रपदी ५ कवि-हृदयरूप कमलांत विहार करणारी भ्रमरी ६ ज्याच्या ध्वजेवर मत्स्याचें चिन्ह आहे असा मदन ७ रुईच्या फुलानें

मूढ चकोर। कुहूमाजीं[8] इच्छी रोहिणीवर[9] ॥ परी सरस्वती कृपाळू थोर। शुद्ध बीज[10] प्रगटली ॥ ११ ॥ बिजेपासून चढत्या कळा। तो चकोरासी अधिक सोहळा ॥ तैसीच एथें रघु-नाथ-लीला। चढे आगळा रस पुढें ॥ १२ ॥

## संतस्तव

आतां वंदूं संतसज्जन। जे वैराग्य-वनींचे पंचानन[1]। जे ज्ञानांबरींचे चंडकिरण। उदय अस्त नसे जयां ॥ १ ॥ जे भक्ति-सरोवरींचे राजहंस। जे कां अविद्याख्या-हुताश[2]। कीं ते पद्महस्ती विशेष। भव-रोग-वैद्य हे ॥ २ ॥ कीं जीव पावे आपुल्या स्वपदासी[3]। ऐसे मुहूर्त देणार जोशी। कीं ते पंचाक्षरी निश्चयेंसी। जे पंच-भूतांसी पळविती ॥ ३ ॥ कीं दैवीसंपत्तीचे भाग्यवंत। मुमुक्षूंसी करिती दरिद्ररहित। कीं सद्विद्येचीं अद्भुत। गोपुरें काय उंचावलीं ॥ ४ ॥ संत श्रोते चतुर पंडित। माझें बोलणें आर्ष[4] अत्यंत। जैसे सरस्वतीपुढें मूढ बहुत। वाग्विलास दावितसे ॥ ५ ॥ सूर्यापुढें जैसा दीप देख। जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक[5]। कीं कनकाद्री अति सुरेख। त्यासी अंलकार पितळेचे ॥ ६ ॥ कामधेनूस समर्पिलें अजाक्षीर। चंद्रासी सीतळ करी रंभापत्र। कल्पतरू कल्पिलें देणार। त्यासि निंबोळ्या समर्पिल्या ॥ ७ ॥ रत्नाकरापुढें काचवटी समर्पिली। तैसी माझी आर्ष बोली। परी तुम्हीं प्रीती ठेविली। प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ८ ॥

## वाल्मीकीची पूर्वपीठिका

वाल्मीकी पूर्वी द्विज-सुत। त्यजोनि आचार यज्ञोपवीत। किरातसंगें वाट पाडित[1]। अति उन्मत्त विषयांध ॥ १ ॥ महा-दुर्धर कानन। देखतां भयाभीत होय मन। पर्वत-दरी-माजी स्थळ करोन। सहपरिवारें वसे तेथें ॥ २ ॥ भोंवतें द्वादश गांवेंपर्यंत। पाळती

८ आमावास्येला ९ चंद्र १० शुक्ल पक्षातील द्वितीया

१ सिंह २ अज्ञानाचा नाश करणारे ३ आत्मपदासी ४ कठोर ५ डबक्यांतील पाणी

१ दरवडे घालीत असे, लुटालूट करी

राखोनि वाट पाडित। केल्या ब्रह्म-हत्या असंख्यात। नाहीं गणती इतर जीवां ॥ ३ ॥ मत्स्य धरावयालागीं बक । जैसा होऊनि बसे सात्विक । कीं मूषकालागीं बिडालक। बैसे टपत तयापरी ॥ ४ ॥ ऐसे करितां पापाचरण । तयासी आलें वृद्धपण। पुत्र झाले अति तरुण। परी आंगवण न सांडी ॥ ५ ॥ हाती शस्त्र घेऊनि वाल्ह्या। मार्ग लक्षीत जों बैसला। तों अकस्मात नारद प्रकटला। पूर्व-पुण्यें करोनी ॥ ६ ॥ चंद्र वेष्टिती नक्षत्रें जैसीं। भोंवतीं ऋषींची मांदी[2] तैसी । तों पाळती सांगती वाल्हियासी । जाती तापसी बहुसाल ॥ ७ ॥ वाटेसी धांवून आडवा आला । शस्त्र उभारूनी ते वेळां । दटावूनि ऋषीचा मेळा । उभा केला क्षणभरी ॥ ८ ॥ कीं स्वर्ग-पंथें जातां नेटें। जैसी यमपुरी लागे वाटे। की पुण्यें आचरितां उद्भटें। काम-क्रोध आडविती ॥ ९ ॥ असा वाल्ह्या म्हणे तयांसी। 'यात्रा[3] आणारे मजपाशीं। नाहीं तरी मुकाल प्राणांसीं। माझे हस्तेंकरोनि' ॥ १० ॥ मग पुढें होऊन ब्रह्म-नंदन। म्हणे, 'ऐक एक माझें वचन। तुज आलें वृद्धपण । पापें अपार घडली कीं ॥ ११ ॥ द्रव्य जोडिलें तुवां अपार । झाले दुष्कृतांचे संभार । तुझ्या पापासीं वांटेकर। कोणी आहेत कीं विचारीं ॥ १२ ॥ आलें तुज जवळी मरण। यम जेव्हां गांजील दारुण। तेव्हां तुज सोडवील कोण। पाहें विचारोनि अंतरीं ॥ १३ ॥ दारा पुत्र धन यौवन। बंधू सेवक आप्त-जन। शस्त्रें अस्त्रें चतुरंग सैन्य । न ये कामा ते वेळां ॥ १४ ॥ जीं जी कर्में प्राणी करिती। तितुकीं देव विलोकिती। सकल तत्त्वें व्यापून वर्तती। मग साक्ष देती परत्रीं[4] ते ॥ १५ ॥ यम-पुरीस चित्रगुप्त। पत्रें काढोनि वाचित। मग त्यासारिखा दंड करित। कोण तेथें सोडवील' ॥ १६ ॥ ऐसें बोलतां नारदऋषी। अनुताप झाला त्याचे मानसीं। वेगें आला निजसदनासी। स्त्रीसुतादिकांसी पुसत ॥ १७ ॥ 'जीं जीं पापें घडलीं मजलागीं । कोणी होतां काय त्याचे विभागी'। तंव ते म्हणती, 'आमुचे अंगीं। न लागती पापें सर्वथा ॥ १८ ॥ भाग्याचे वांटेकरी

२ समुदाय ३ द्रव्य वगैरे ४ परलोकीं

समस्त । पापें तुझीं तूं भोगीं यथार्थ ' । वाल्ह्या झाला सद्गदित । म्हणे, कैसा अनर्थ टाळूं आतां ॥ १९ ॥ हा नरदेह उत्तम पूर्ण । केवळ भगवत्प्राप्तीचें स्थान । म्यां आत्महित न करून । बुडालों कीं अंधतमीं ॥ २० ॥ यत्नें पुण्यक्षेत्र सरसावलें । तेथें कनक-बीज[५] पेरिलें । कनकामृताचें ताट घडलें । त्यांत वाढिलें तृण-बीज ॥ २१ ॥ सुधा-रस-कुंभ दैवें जोडला । तो नेऊन उकिरड्यांत ओतिला । चिंतामणी फोडोनि घातला । पायरीस अभाग्यें ॥ २२ ॥ असो ऐसा अनुतापें वाल्या । नारदापाशीं परतोनि आला । सद्गदकंठ अश्रु डोळां । साष्टांग घातला नमस्कार ॥ २३ ॥ ' तनुमनधनेंसीं अनन्य । स्वामी तुज मी आलों शरण । कृपेची नौका करून । तारी मज भवसागरीं ॥ २४ ॥ महाराज तूं धन्वंतरी । माझा भवरोग तूं दूर करीं । जळतों पाहोन विषयाभीतरीं । मेघ झडकरी वर्षें तूं ॥ २५ ॥ झालों मी अत्यंत क्षीण । पंचाक्षरी[६] तूं ब्रह्मनंदन । सकळ भूतें टाकी झाडोन ' । म्हणोनि चरण धरियेले ॥ २६ ॥ अष्ट-भावें झाला सद्गदित । मग मनीं विचारी ब्रह्म-सुत । रोग पाहूनि वैद्य निश्चित । दिव्य मात्रा काढी जेवीं ॥ २७ ॥ म्हणे हा अनधिकारी परम । राम ऐसें सांगे नाम । म्हणे हेंचि तुवां जपावें सप्रेम । मुख्य वर्म जाण पां ॥ २८ ॥ तें जीवन-नाम जपत । तेथेंचि बैसला ध्यानस्थ । अंगावरी वारूळ वाढत । ध्वनी उमटत आंतूनी ॥ २९ ॥ टोळपियाचा वृक्ष झाला । तों नारद बहुकाळें पातला । त्या तरूखालीं उभा राहिला । श्रवणीं ऐकिला नामघोष ॥ ३० ॥ वारुळ–छिद्रा–मधूनी । रामनामाचा मधुर ध्वनी । चातुर्य–समुद्र नारद–मुनी । जाणिला मनीं सर्व वृत्तांत ॥ ३१ ॥ मग उकरोनियां वारुळ । बाहेर काढिला तो पुण्यशीळ । दिव्यौषधी मस्तकीं मर्दूनी सकल । सावध केला तेधवां ॥ ३२ ॥ जैसा भूमी अर्क उतरला । तैसा श्री–गुरु–नारदें देखिला । धांवोनि लागे चरण-कमळा । पापा झाला संहारू ॥ ३३ ॥ नाम जपतां श्रीरामाचें । दोष गेले अनंत जन्मींचे । जैसे पर्वत तृणाचे । अग्नि–संगें भस्म होती

५ श्रोतन्यार्चे बी ६ मान्त्रिक

॥ ३४ ॥ जैसीं स्वप्नीं घडती दुष्कृतें बहुत । जाग्रतींत तीं मिथ्या-भूत । तैसीं रामनामें समस्त । पापें समूळ भस्म होती ॥ ३५ ॥ तोंवरीच तमाची दाटणी । जोंवरी नुगवे वासर-मणी । तोंवरीच मद कीजे वारणीं । जोंवरी सिंह देखिला नाहीं ॥ ३६ ॥ असो वाल्मीकी म्हणे श्री-गुरु-नाथा । मी कसा काळ क्रमूं आतां । नारद म्हणे श्रीराम-कथा । सविस्तर करावी ॥ ३७ ॥ मग वाल्मिकें रचिला ग्रंथ । तो भारद्वाज-मुखें समस्त । असंख्य ऋषी श्रवण करित । ब्रह्मानंदें करोनि ॥ ३८ ॥

## श्रोता आणि वक्ता

रोहिणी-रमणाचे किरण । लागतां चंद्रकांत द्रवे जाण । ना तरी परभृतांचें[१] मौन । वसंतागमनीं फिटतसे ॥ १ ॥ ना तरी दिनमणी देखोन । सूर्यकांतांतून पडे हुताशन । तेवीं श्रोता झालिया सावधान । निरसे जडत्व वक्त्याचें ॥ २ ॥ श्रोता झालिया दुश्चित्त । व्यग्र होय वक्त्याचें चित्त । निघत असतां कथामृत । कुंठित होतें अवधारा ॥ ३ ॥ गृहा पातलिया ग्राहक । तयाची पाहोनियां भूक । तैसेंचि तया अंशुक[२] । काढोनि दावी व्यवहारी ॥ ४ ॥ जरी स्नेहदीप पूर्ण असे । तरी पुढील पदार्थ दिसे । स्नेहत्वें मंदत्व दिसे । ही तों प्रचीत सर्वांसी ॥ ५ ॥ ना तरी कंठामाजीं निघे उत्थापनीं । जितका वायु तितकाच ध्वनि । मंद वायु होतां त्या लागोनी । शब्द सहजचि मंदावला ॥ ६ ॥ मुरली वाजती गोड । परी वाजवितांची पुरवी कोड । न वाजवितां निश्चल जड । अचेतन काष्ठ तें ॥ ७ ॥ श्रोतयाचें मन दुश्चित्त । गोड न लागेचि कथामृत । रोगें व्यापिला जो निश्चित । मिष्टान्न तया नावडे ॥ ८ ॥ चिंतोर्मिरहित जरी श्रोता । आशा-राक्षसी-वियुक्त वक्ता । तेथींची जी भगवत्कथा । तिचें सुख काय सांगूं ॥ ९ ॥ जरी पुण्य असेल गांठीं । तरी उत्तम श्रोत्याची पडेल गांठी । मग वक्त्याचे ओष्ठ-पुटीं । शब्दरत्नें विकासती ॥ १० ॥ श्रोता जोडलिया प्रवीण । वाग्देवी उल्हासे पूर्ण । पदोपदीं प्रेमार्थ गहन ।

---

१ कोकिलाचे २ वस्त्र

प्रसवे जाण अवधाना ॥ ११ ॥ श्रोता मिळतां अधम । वाग्देवी संतापे परम । होय अर्थाचें पतन । श्रवणरस सर्व आटे ॥ १२ ॥ तान्हयाचें स्तना मुख झगटे । तेणें तात्काळ पान्हा फुटे । तें निमालिया तेथेंचि आटे । दुग्ध सर्व ज्यापरी ॥ १३ ॥ त्यापुढें करावें व्याख्यान । तें वक्त्याचें मूढपण । जेवीं माळ-भूमीस कूप-खनन[3] । द्ररिद्र-सेवन काय व्यर्थ ॥ १४ ॥ की अंधासी दिधलें दर्पण । कीं बधिरापुढें केलें गायन । कीं रोगियासि मिष्टान्न । देवोनि काय साफल्य ॥ १५ ॥ की सुगंध तैल कुंजरा । अभ्यंग केलें अवधारा । की महाफळ समर्पितां वानरा । कीं चंपकमाळा खरासी ॥ १६ ॥ श्रोता मिळतां मतिमंद । वाग्वल्लीचा उपडे कंद । कैंचा तयासी श्रवणानंद । जरी वक्ता झाला व्यासदेव ॥ १७ ॥ प्रलय-काळीं जलधर । बळें वर्षतसे अपार । परी पालथे घटामाजीं नीर । बिंदुमात्र नसेचि ॥ १८ ॥ कोकिळेहूनि मधुर स्वर । ऐसे गाती किन्नर । त्यांसी ऐकणार बधिर । तरी काय सार्थक तयाचें ॥ १९ ॥

## श्रियाळचरित्र

करीं वीणा घेवोनि ब्रह्मसुत । शिवाजवळी आला अकस्मात । म्हणे हे विश्वंभर विश्वनाथ । तुझे भक्त देखिले बहु ॥ १ ॥ तरी कांतीनगरीं श्रियाळ । धीर गंभीर उदार सुशीळ । कीर्तीनें भरलें दिङ्मंडळ । सात्विक केवळ क्षमावंत ॥ २ ॥ तेणें घातलें अन्न-सत्र । झालीं वर्षें दहा सहस्र । इच्छा-भोजन-दान पवित्र । अतीतांप्रती देतसे ॥ ३ ॥ अवनीवरी जे अगम्य वस्त । भोजनीं मागीतली अकस्मात । ती प्रयत्नें आणोनि पुरवित । शिवभक्त थोर तो ॥ ४ ॥ ऐसें नारद सांगतां वर्तमान । त्याच्या गृहाप्रती पंच-वदन । कुश्चळ[1] अतीत-वेष धरून । येता झाला ते समयीं ॥ ५ ॥ आंगणीं उभा ठाकला येऊन । परम कोपी जेवीं दावाग्न[2] । दुष्ट वचन बोले कठीण ।

---

३ विहीर खणणें

१ विद्रूप, चिळसवाणें २ बणवा

रूपही संपूर्ण कुश्चळची ॥ ६ ॥ म्हणे, 'मज दे इच्छाभोजन । नातरी जातों सत्त्व घेऊन' । श्रियाळ–चांगुणा येऊन । पाय धरिती सद्भावें ॥ ७ ॥ आणोनि बैसविला आसनीं । त्याचीं क्रोधवचनें सोसोनी । षोडशोपचारें पूजा करोनी । कर जोडोनी ठाकती पुढें ॥ ८ ॥ 'मागा स्वामी इच्छाभोजन' । येरू म्हणे, 'नर–मांस देईं आणोन । तूं चोर हेर आणिसी धरून । त्याचें मांस न घें मी ॥ ९ ॥ धरूनि माझा उद्देश । विकत आणिसील मनुष्य । तें न घें मी निःशेष । सत्य सत्य त्रिवाचा' ॥ १० ॥ चांगुणा म्हणे, कर जोडून । 'मी आपुलें मांस देत्यें, करीं भोजन' । श्रियाळ म्हणे, 'मानेल पूर्ण । माझें मांस देतों मी' ॥ ११ ॥ येरू म्हणे, 'तुम्ही पवित्र तत्त्वतां । परी सर्व याचकांचे मातापिता । तुम्हां दोघांसी भक्षितां । अन्न–सत्र खंडेल ॥ १२ ॥ तरी तुमचा एकुलता एक स्नेहाळ । पंच वर्षांचा चिलया बाळ । बत्तीस लक्षणी वेल्हाळ । तो मज देईं भोजना' ॥ १३ ॥ ऐसें ऐकतां वचन । माया–मोह–जाळ दूर करून । म्हणती, 'अवश्य जा घेवोन' । मग सदाशिव बोलत ॥ १४ ॥ 'मी काय आहें वृक, व्याघ्र, रीस । भक्षूं तव पुत्राचें मांस । उबग न मानूनि विशेष । पचवूनि घालीं मज आतां ॥ १५ ॥ माया–मोह धरून । कोणी कराल जरी रुदन । तरी मी जाईन उठोन । सत्त्व घेउनी तूमचें' ॥ १६ ॥ अवश्य म्हणोनि पतिव्रता । उभी ठाकोनि बाहे निजसुता । म्हणे, 'बाळा चिलया गुणवंता । खेळाया कोठें गेलासी ॥ १७ ॥ तुजलागीं खोळंबला अतीत । बाळा माझ्या येईं धांवत' । ऐसें ऐकतां अकस्मात । बाळ आला धांवोनि ॥ १८ ॥ अतीतासी करूनि नमन । मातापितयांचे धरी चरण । माता म्हणे, 'तुझें पिशित–दान । अतीत मागतो राजसा' ॥ १९ ॥ बाळ बोले स्नेहेंकरून । 'हा देह म्यां केला शिवार्पण । अतीत होतां तृप्त पूर्ण । उमा–रमण संतोषेल' ॥ २० ॥ ऐसें ऐकतां झडकरी । बाळ घेतला कडेवरी । पाक–शाळे–भीतरी । घेऊनि गेली वधावया ॥ २१ ॥ चिलयासी चुंबन देऊन । हृदयीं धरिला प्रीतीकरून । बाळ म्हणे 'पुढती येईन । तुझ्या उदरा जननीये' ॥ २२ ॥ मायाजाळ सर्व सोडून । मन केलें वज्राहूनि कठीण । चिलयाचें शिर छेदून । काढिलें मांस

अंगींचें ॥ २३ ॥ आपणासी पुत्र नाहीं म्हणोनियां । शिर-कमळ ठेविलें पहावया । शरीराचा पाक करूनियां । उठवी भोजना अतीतातें ॥ २४ ॥ अतींद्रिय-द्रष्टा[३] श्रीशंकर । अनंत ब्रह्मांडींचा समाचार । सर्व ठाऊका सूत्रधार । कळलें शिर ठेविलें तें ॥ २५ ॥ उठोनि चालिला तत्काळ । धांवती चांगुणा-श्रियाळ । येरू म्हणे, 'कळलें सकळ । शिरकमळ ठेविलें ॥ २६ ॥ सर्व गात्रांत शिर प्रधान । तेंच कैसें ठेविलें वंचून'। तंव तीं दोघें धरिती चरण । 'तेंही पचवूनी घालितों ॥ २७ ॥ क्षोभ न धरावा अंतरीं । नेणतपणें चुकलों जरी । तरी सर्वज्ञा तूं क्षमा करीं । सत्त्व आमुचें राखावें' ॥ २८ ॥ मग बैसला आसनी येऊन । म्हणे शिर येईं बाहेर घेऊन । उखळांत घालूनी कंडण । मज देखतां करी आतां ॥ २९ ॥ अश्रु आलिया तुझे नयनीं ॥ की कष्टी झालिया अंतःकरणीं । तरी पुत्र गेला, सत्त्वास हानी । करून जाईन तूमच्या'॥ ३० ॥ अवश्य म्हणे नृप-ललना । शिर आणोनि करी कंडणा । सत्त्व पाहे कैलासराणा । अंतरीं सद्गद होउनी ॥ ३१ ॥ निज-सत्त्वाचें उखळ । धरिलें धैर्याचें करीं मुसळ । कांडीत बैसली वेल्हाळ । निर्धार अचळ धरूनियां ॥ ३२ ॥ अतीत म्हणे 'परम मंगळ । गीत गाय रसिक सुढाळ । खंती करितां पयः-फेन-धवल । दुरावेल जाण पां' ॥ ३३ ॥ ते सद्भाव-सरोवर-विलासिनी । कोमलहृदय नृपकामिनी । कीं निश्चयगंगा भरूनी । जात मर्यादा धरूनियां ॥ ३४ ॥ तिचें पाहतां मग वदन । काळवंडला रोहिणी-रमण। मृगशावाक्षी गुणनिधान। उपमा नाहीं स्वरूपातें॥ ३५॥ म्हणे 'कोमलांगा बाळा सुकुमारा । सुलक्षणा सुशीला नृप-किशोरा। सुहास्य-वक्त्रा राजीव-नेत्रा । येवोनी उदरा धन्य केलें ॥ ३६ ॥ तूं सुकुमार परम-गुण-वंता । माझे निष्ठुर घाव लागती माथां । तुज-वीण परदेशी आतां। दुबळी भणंग झालें मी' ॥ ३७ ॥ म्हणे, 'अतीत जेवोनि अवधारीं । जाऊं दे राज-द्वारा-बाहेरी । देह त्यागीन ते अव-सरीं । यावरी धीर न धरवे पैं ॥ ३८ ॥ कैलास-पंथ सखया लक्षून ।

---

३ इंद्रियास गोचर नाही तें पाहणारा

एकला जातोसि मज टाकून । तुझे संगतीं मी येईन । उभा राहें क्षणभरीं ॥ ३९ ॥ तूं मोक्षद्वीपाचें केणें[4] भरून । जासी कैलास-राज-पेठ लक्षून । तुजसंगतीं मी उद्धरेन । मज टाकूनि जाऊं नको ॥ ४० ॥ उदकावीण जैसा मीन । तैसी मी तान्हया तुजवीण । माझें हृदय निर्दय कठीण । लोकांत वदन केविं दावूं ॥ ४१ ॥ तुझी माउली मी म्हणतां । लाज वाटे रे गुणवंता । तुवां आपुली सार्थकता । करूनि गेलासी शिवपदा ॥ ४२ ॥ हें त्रिभुवन शोधितां सकळ । तुज ऐसा न दिसे बाळ ' । मग पचवूनि तें तात्काळ । ' उठा ' म्हणे अतीतातें ॥ ४३ ॥ अतीत म्हणे ' अवनी-पती । उठा तुम्ही यजमान माझे पंक्ती ' । ऐसें ऐकतां श्रियाळ नृपती । झाला चित्तीं संकोचित ॥ ४४ ॥ चांगुणा म्हणे ' नृपनाथा । सत्त्व राखावें सत्वर आतां । विन्मुख जाऊं न द्यावें अतीता । मनीं चिंता न धरावी ॥ ४५ ॥ नवमास वाहिला म्यां उदरांत । तुम्हांस जड नव्हे पैं प्रहरांत । पोटीचा पोटीं घालितां सुत । चिंता काय नृपश्रेष्ठा ' ॥ ४६ ॥ राव बैसला पंक्तीसी । ताट वाढोनि आणिलें वेगेंसी । अतीत म्हणे चांगुणेसी । ' तूंही येईं सवेगें ' ॥ ४७ ॥ अवश्य म्हणोनि झडकरी । येवोनि बैसली नृपसुंदरी । यावरी अतीत म्हणे, ' तुमच्या मंदिरीं ॥ अन्न न घ्यावें सर्वथा ॥ ४८ ॥ निपुत्रिकाचें न पाहावें वदन । मग तेथें कोण घेईल अन्न । दीपेंवीण शून्य सदन । पुत्रावीण तेविं तुम्ही ॥ ४९ ॥ नासिकेवांचोनि वदन । कीं वृक्ष जैसा फळावीण । कीं बुबुळांवीण जैसे नयन । शून्य सदन तुमचें तेवीं ' ॥ ५० ॥ तंव तीं दोघें बोलती सद्गद । ' एक होता तो अर्पिला सुत ' । चांगुणा म्हणे ' गेलें सत्त्व । अतीत विन्मुख जाईल आतां ॥ ५१ ॥ एक बाळ तो दिधला भोजनासी । आतां महाराजा सत्त्व किती पाहसी ' । ऐसें बोलतां चांगुणेसी । अद्भुत गहिंवर दाटला ॥ ५२ ॥ म्हणे ' सत्त्वही बुडालें सकळ । वृथा गेलें माझें बाळ ' । मग कंठ मोकळा करूनि ते स्नेहाळ । हांक फोडी चांगुणा ॥ ५३ ॥ नयनीं चालिल्या प्रेमाश्रु-धारा । म्हणे ' अहा शिव कर्पूरगौरा ' । दीर्घस्वरें

४ व्यापाराचा माल

बाहे उमावरा । ' पाव सत्वरीं या आकांतीं ॥ ५४ ॥ अहा झालें वंश-खंडन । न देखों पुढतीं पुत्रवदन ' । ऐसें ऐकतां अतीताचे नयन । स्रवों लागले प्रेमभरें ॥ ५५ ॥ बाहेर फुटली मात । वळसा थोर होत नगरांत । लोक दुःखें वक्षःस्थळ पिटीत । राज-किशोर आठवुनी ॥ ५६ ॥ विमानीं दाटले सुरवर । म्हणती ' धन्य पतिव्रता सत्त्वधीर । ईस प्रसन्न होवोनि श्रीशंकर । काय देईल तें न कळेची ' ॥ ५७ ॥ अतीत म्हणे चांगुणेसी । ' जें प्रिय असेल तुझें मानसीं । तें मज माग सद्गुण-राशी ' । यावरी सती काय बोले ॥ ५८ ॥ ' मज निपुत्रिक म्हणतील लोक । हा धुवोनि काढी कलंक ' । ऐसें ऐकतां कैलास-नायक । 'बोलावीं' म्हणे 'पुत्रासी' ॥ ५९ ॥ सत्य मानोनि अतीत-वचना । दीर्घ हांका फोडित चांगुणा । म्हणे, ' चिलया गुण-निधाना । येईं वेल्हाळा धांवोनी ॥ ६० ॥ अतीत तुजवीण न घे ग्रास । कोठें गुंतलास खेळावयास । माझें तान्हें तूं पाडस । सत्त्व राखीं येवोनियां ॥ ६१ ॥ तूं न येसी जरी धांवोन । तरी माझा जाऊं पाहे प्राण' । दशदिशा विलोकून । चांगुणा पाहे तेधवां ॥ ६२ ॥ मागुती हाक फोडी वेल्हाळ । तों जैसें उगवे मित्रमंडळ । तैसा धांवतचि आला बाळ । पाहे श्रियाळ स्नेह-भरें ॥ ६३ ॥ अतीत-स्वरूप टाकून । शिव प्रगटला निजरूप पूर्ण । दशहस्त पंच-वदन । दीनोद्धारण जगद्गुरु ॥ ६४ ॥ चिलया शिवें हृदयीं धरिला । निज अंकावरी बैसविला । श्रियाळ चांगुणा ते वेळां । पायांवरी लोळती ॥ ६५ ॥ सुर-वर सुमनें वर्षती अपार । दुंदुभि-नादें कोंदलें अंबर । आनंदमय झालें नगर । धांवती लोक पहावया ॥ ६६ ॥ शिवें आणविलें दिव्य विमान । श्रियाळ चांगुणा दिव्यरूप होऊन । चिलयासी सिंहासनीं स्थापून । छत्र धरिलें तयावरी ॥ ६७ ॥ सचिवांस निरवोनि राज्य-भार । विमानीं बैसलीं सत्वर । निज पदीं जगदोद्धार । श्रीशंकर स्थापी तयां ॥ ६८ ॥ कांतीनगरीं सौख्य अगाध । त्रिभुवनीं न मावे आनंद । श्रीधरस्वामी तो ब्रह्मानंद । अभंग न विटे कालत्रयीं ॥ ६९ ॥

---

# १२ अमृतराय

---

अमृतरायांचा जन्मशक १६२०, व हे देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होते, असें कै. वामन दाजी ओक याचें मत आहे. अमृतरायाच्या वडिलांचे नांव शंकर व आईचें नांव उमा होतें, असे 'महाराष्ट्रकविचरित्रकार' म्हणतात. याच्याविषयीं विश्वसनीय अशी माहिती उपलब्ध नाहीं. हे कवि शके १६७५ सालीं निवर्तले.

अमृतराय स्वभावाने रंगेल व विनोदी होते हे त्याच्या कवितेवरून दिसतें तथापि याचा परमार्थाकडे विशेष कल होता. हे शीघ्रकवि होते; व याची कविता बहुतेक वर्णनपर असल्यामुळें व तीं वर्णने हवी तेथे लागू पडण्यासारखी असल्यामुळें कथेकऱ्यास त्याचा फार उपयोग होतो. याची कविता कर्णमधुर प्रासयमकानी व अर्थालंकारानीं मंडित आहे. यांचीं वर्णने खुबीदार, व हृदयंगम आहेत. यानीं हिंदी भाषेंतही मराठी सारखीच सरस व मधुर पद्यरचना केली आहे. याच्या कवितेत ठिकठिकाणीं त्या त्या रसांचा परिपोषही चांगला झाला आहे. या एकंदर गुणांवरून मराठी काव्यवाङ्मयात याची पदवी बरीच उच्च आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

यानीं 'द्रौपदीवस्त्रहरण,' 'ध्रुवचरित्र,' 'शुकचरित्र,' 'सुदामचरित्र,' 'जीवदशा' 'रामचंद्रवर्णन,' वगैरे पन्नाससाठ लहान मोठीं प्रकरणें व १५० पदें केलीं आहेत. पदाशिवाय बाकीचे बहुतेक कटाव आहेत.

## द्वारका

(कटिबंध)

**चरती काम-धेनु-खिल्लारें[1], सुवर्ण-रत्न खचित धवलारें, फुललीं कांचनमय कल्हारें, कौतुक रचिलें हरि-मल्लारें[2], समुद्र-वलयित मलय-मेरुसम, निलय हरीचें, प्रलय संपल्या कुवलय उगवे, करुणा-लवाल, यादव-प्रवाल, वल्ली भली उगवली, कृष्ण-घन-कल्प-द्रुम फळली, कोमलता-सत्वें पालवली, मुक्ताफळें चौदेशीं स्रवलीं, अमृत-**

---

१ कळप २ मल्लनामक दैत्याचा शत्रु

फळें नम्रत्वें-लवलीं, सोम-वंश तेजें टवटवलीं स्थैर्यमंडपावरि सांठविली, यद्वासंतवसंत भेटतां शांती लवली, धवलीभूत प्रभा उद्भवली ॥ १ ॥

## द्रौपदीचा धांवा

द्रौपदीला दुःशासनाने कौरवसभेत ओढून नेले त्या प्रसंगाचे हे शब्दचित्र आहे.

( कटाव )

भगवंत निज-भक्तांचें निजनामें संकट वारी, करुणाकर कृष्ण मुरारी ॥ ध्रु० ॥ कौरव-सभेसि पांडव-नारी, छळितां कोणि नसे सहकारी, तेव्हां भक्त-राज-कैवारी, हृदयीं आठविला कंसारी, शत्रुसभेंत आधोवदनें, भयभीत मनें करुणावचनें, साति बोलियली, "ब्रह्मांडनायका, यदु-कुल-तिलका, तूंचि बंधु गण-गोत आप्त प्रिय मायबाप निजमित्र सोयरा, जीवप्राण तुजविण येथ मज कोण रक्षिता, सांग अनंता, कमला-कांता, अ-नाथ-नाथा, व्यापक तूं हृदय-स्थ[1] असोनी, न जाणशी हें अति-संकट दुर्घट वोढवलें, तुज कां न कळे, मज गांजिति हे दुर्जन, कोठें आहेसि न पावशि केविं जगीं, मजला अपमानिशि ये समयीं, झणि मोकलिशी, मी कवण कशी, मजलागुनि हे गति पाहिं विचारुनियां मनिं, तूं असतां शिरीं द्रुपद-सुता, अती पुनीता, पांडुसुतांची हे वनिता, कुरुळिं[2] धरुनि दुःशासन, वोढित दुष्ट कसा, शिष्टांचे सन्मुख, नष्ट कसा झोंबतसे वसना, भीष्म-द्रोणा, कर्ण-विकर्णा, संत-सज्जना, दुष्ट-दुर्जना देखत मी आंतुडलें[3] व्यसना, आझुनि काय सरो-रुह-नयना, माझी करुणा नयेचि कां तुज ? नाम स्मरतां, उडि घालुनियां, तांतडिनें गज[4] सोडविला, प्रल्हाद परोपरी वांचविला, ध्रुव बालक अचल-पदीं बैसविला, उपमन्यु कृपानिधि गौरविला, अतिहीन अजामिळ उद्धरिला, महिमा असि व्यास-मुनि वदला, अजि तो पुरुषार्थ कसा

१ अतर्यामीं राहणारा २ केंस धरून ३ सापडलें ४ गजेंद्रमोक्षकथा येथें लक्ष आहे

त्यजिला, हरि लौकरी ये, कणवाळपणें गरुडावरि बैसोन रक्ष मला, श्रम संकट नासुनि भक्तवत्सला, दीन-दयाळा, परम-कृपाळा, धांव गोपाळा ॥ १ ॥

### पद

प्राण्या भुलूं नको, नटूं नको । स्वहिता अंतरसी ॥ प्राण्या० ॥ ध्रु० ॥ हा देह पांचांचा पांचांचा । पांच जण नेतील । जीव हा अज्ञानी न्यायाला । धर्मदूत[1] येतील । हिशेब पापाचा पुण्याचा । चित्रगुप्त घेतील । केल्या कर्माचें फळ बापा । अवश्य ते देतील ॥ प्राण्या भुलूं० ॥ १ ॥ वेद-शास्त्रांचा उपदेश । निरभिमानी होय । राहें लीनपणें सर्वांशीं । जैसें पातळ तोय । क्षमा आत्मत्त्वें धरावी । अबोलनी जंव होय ॥ प्राण्या० ॥ २ ॥ वैभव जायाचें बा जायाचें । पाप-बळें जाईल । सत्ता श्रीहरिची श्रीहरिची । तो हिरोन नेईल । होईं सावध रे ! बा सावध रे । तरिच बरें होईल । क्षेमकल्याणा बा कल्याणा ! अमृतेश्वर देईल ॥ प्राण्या० ॥ ३ ॥

---

## १३ महीपति

---

अहंमदनगरापासून १८ कोसावर राहुरी तालुक्यांत ताहराबाद गांवीं शके १६३७ या वर्षी महीपति जन्मले. हे जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. यांचे वडील दादोपंत, हे त्या गावचे कुळकर्णी होते. हे प्रथम कुळकर्ण्याचें काम करीत असत, परंतु त्यात त्रासल्यामुळें ह्यांनीं तें काम सोडिले व लेखणी पांडुरंगास अर्पण करून यापुढें गांवकृत्यासंबंधीं लेखणी हातीं धरणार नाहीं अशी शपथ घेतली, असें म्हणतात. पुढें महीपतींच्या स्वप्नांत तुकोबा येऊन त्यांनीं त्यांस संतचरित्रें वर्णन करण्यास आज्ञा केली व आपला वरदहस्त महीपतींच्या मस्तकावर ठेवून गुप्त झाले, तेव्हांपासून महीपतींस कविताशक्ति आली, असें म्हणतात.

---

१ यमाचे दूत

महीपतींनीं 'भक्तविजय,' 'भक्तलीलामृत,' 'संतविजय,' 'संतलीलामृत,' 'कथासारामृत', 'गणेशपुराण', 'तुळशीमाहात्म्य', 'पंढरीमाहात्म्य', वगैरे पुष्कळ ओंवींबद्ध ग्रंथ केले आहेत. याची कविता प्रासादिक, सरळ, सुगम व रसाळ आहे. शके १७१२ या सालीं महीपति समाधिस्थ झाले.

## सावधान

रामदासाच्या चरित्रातील हा एक प्रसंग आहे. रामदास लहानपणापासूनच विरक्त होता. त्याची लग्न करण्याची इच्छा नव्हती. तथापि त्याचे लग्न करण्याचें त्याच्या आईबापांनी निश्चित केलें. विवाहविधीस सुरुवात झाली, नवरानवरी अंतःपट धरून उभी केली व मंगलाष्टकें सुरू झालीं, इतक्यात 'सावधान' या शब्दाने रामदासाच्या मनात एकदम प्रकाश पडून त्याला उपरति झाली व तो तत्काळ पळून गेला. तो प्रसंग येथें वर्णिला आहे.

**यावरी सूर्याजीपंत[1] आला। कांतेनें वृत्तान्त सांगितला। म्हणे अवतार-पुरुष पोटीं आला। दैवें लाधला पाहिजे ॥ १ ॥ यावरी म्हणे राणुबाई। याचें लग्न करावें लवलाहीं। गोंवूनि टाकिलिया पाहीं। मग राहील गृहीं सहजची ॥ २ ॥ सूर्याजीपंतासि मानलें वचन। मग सोइरा थोर पाहून। त्यानें लग्न-निश्चय केला जाण। उपाध्याय धाडून आपुला ॥ ३ ॥ सर्व सामग्री सिद्ध केली। सोइऱ्यांसि मुळें पाठविलीं। वस्त्रें भूषणें सिद्ध केलीं। वाजंत्री नेमिले तेधवां ॥ ४ ॥ वऱ्हाड सिद्ध जाहलें फार। लागले वाद्यांचे गजर। उष्ट्रें[2] घोडे रहंवर। चालिले फार तेधवां ॥ ५ ॥ रथीं बैसली वरमाये। तुरंगीं वर शोभताहे। मार्गीं दाटी बहुत होय। न मिळे भोये[3] चालावया ॥ ६ ॥ गांवाच्या सन्निध येऊनी। लग्न उतरलें उपवनीं। सोयऱ्यांसि कळतां तये क्षणी। न्यावया लागोनी ते येती ॥ ७ ॥ दोहींकडील वाद्यगजर। तेणें नादें कोंदलें अंबर। मग भेटले परस्पर। पूजिला वर निजप्रीतीनें ॥ ८ ॥ भरजरीसाज दीधला जाण। मग वांटिलो सुपारी पानें। सोइरे मिरवत गेले जाण। जानवसीं नेऊनी घातले ॥ ९ ॥ सिधा-**

---

१ रामदासाचा बाप २ उटें ३ जागा

साहित्य-सामुग्री-उपहार । वधूमाय पाठवूनि देत सत्वर । स्वरूपें दृष्टीसि पाहोनि वर । संतोष अंतरीं सकळांचे ॥ १० ॥ असो; क्रमोनि गेली राती । मग उदयासि पावला गभस्ती । दोहीं मांडवीं वाद्यें वाजती । हळदी लाविती वधूवरां ॥ ११ ॥ देवक-प्रतिष्ठा ब्राह्मण-भोजन । नाना परींचीं मिष्टान्नें । तृप्त जाहले वऱ्हाडीजन । आनंदे मन सकळांचें ॥ १२ ॥ तों अस्तमानासि पातला गभस्ती । मूळ जावया सिद्ध होती । रुखवताच्या पांट्या भरिती । मिरवत आणिती तेधवां ॥ १३ ॥ वस्त्रें भूषणें लेववोनि वरा । तुरंगीं बैसविला नोवरा । वरतें लक्षीत दिनकरा । वधुबापाच्या घरा चालिले ॥ १४ ॥ नोवरी आणिली बाहेरी । वाङ्निश्चयें पूजिली बरी । साखरपुडा घालिती पदरीं । आहेव-दोरासरी[४] लेवविती ॥ १५ ॥ वधूवरें आणोनि सत्वर । उभीं केलीं बहुल्यावर । मध्यें जवनिका[५] धरिली सत्वर । अष्टकें द्विजवर बोलती ॥ १६ ॥ दिव्यांचीं ताटें घेऊनि करीं । करवल्या अक्षता टाकिती वरी । उपाध्याय म्हणती ते अवसरीं । 'सावधान अंतरीं असावें' ॥ १७ ॥ एकाग्रचित्त ते होऊनि देख । कानीं ऐकती मंगळाष्टक । वधूवरेंही सुलक्षणिक । वैकुंठ-नायक रक्षिता ॥ १८ ॥ वधुवरांच्यामध्यें देखा । धरिली असतां जवनिका । भोवतें सर्व वऱ्हाडी लोकां- । सन्निध शालक पैं होते ॥ १९ ॥ तयांसि पुसे नारायण । वारंवार बोलती ब्राह्मण । म्हणती 'सावधान' 'सावधान' । हें कोणाकारण मज सांगा ॥ २० ॥ ऐकोन वराचें प्रश्नोत्तर । मेहुणे विनोदें देती उत्तर । 'सावधानाचें अर्थांतर । ऐका एकाग्र होऊनी ॥ २१ ॥ आजपासोनि तुमचे पाहीं । भव-बंद-बेडी पडतसे पायीं । म्हणवोनि वेगीं सावधान होईं । उत्तर तिहीं दीधलें ॥ २२ ॥ हृदय-आगटी-माजीं जाण । होता अनुताप कृशान[६] । पिशुनांचा शब्द-प्रभंजन[७] । त्याजकारणें लागला ॥ २३ ॥ तेणें प्रदीप्त जाहला अधिकोत्तर । अविद्या-विपिना जाळिलें समग्र । पोळलें मुमुक्षूचें अंतर । वैराग्यभरें करोनी ॥ २४ ॥ मग म्हणे चिंतातुरीं । 'मातापिता नव्हेति वैरी । मज गोऊं पाहती संसारीं ।

---

४ सौभाग्यदोरा, मंगळसूत्र ५ अंतःपट ६ अग्नि ७ शब्दरूप वारा

दुःखसागरीं बुडवाया' ॥ २५ ॥ आतां ॐ पुण्य व्हावया त्वरित । अवधी उरली असे किंचित । मग चित्तीं आठविला रघुनाथ । म्हणे 'सोडवीं त्वरित दयाळा ॥ २६ ॥ सकळ जनांची असे पद्धती । आपण गुंतले दुसऱ्यास गोंविती । एका तुजविण रघुपति । नाहीं मज सोडविता' ॥ २७ ॥ ऐसा आठव करूनि सत्वर । पडद्या आडोनि पळाला वर । पवन-वेगें अतिसत्वर । निमिषभर न लोटतां ॥ २८ ॥ ब्राह्मण वऱ्हाडी करवल्या पाहती । नोवरा नाहीं, पळाला म्हणती । घरा घरा एक बोलती । पडली भ्रांति सकळांसी ॥ २९ ॥ जानवस-घरामाजी पाहे । बैसली होती वरमाय । तिजला वृत्तांत कळतां पाहे । मोकलिते[8] धाये अट्टाहास ॥ ३० ॥ इकडे नोवरा गेला म्हणतां । उपाध्याय राहिले अष्टकें बोलतां । मंगळांत अमंगळ जाहलें आतां । अघटित वार्ता हे दिसे ॥ ३१ ॥ बिदोबिदीं[9] वऱ्हाडी धांवती । नोवरा कोठें गेला म्हणती । अश्वावर बसोनि स्वार धांवती । रानोरान पाहती चहूंकडे ॥ ३२ ॥ पहावया गेले होते फार । तेही परतोनि आले समग्र । म्हणती अंधार पडला असे घोर । गगनीं चंद्र मावळला ॥ ३३ ॥ सूर्योदय होतांचि जाण । पाहुनि आणूं त्याजकारण । सूर्याजीपंतासि बोलती वचन । शोक न करणें सर्वथा ॥ ३४ ॥ वऱ्हाडियांसमवेत ते समर्थी । वरबाप-वरमाय गेलीं गांवीं । पहावयासि धाडिले होते तेही । म्हणती शुद्धि[10] कांहीं लागेना ॥ ३५ ॥ ऐसी ऐकोनियां वार्ता । आक्रोशें रडती मातापिता । तों वडील पुत्र जाहला बोलता । म्हणे शोक वृथा न करावा ॥ ३६ ॥ सुखी असे नारायण । पुढें भेटेल तुम्हांकारण । तयासि रक्षिता रघुनंदन । जो अवतारगुण मारुतीचा ॥ ३७ ॥ तुम्हीं लग्न मांडिलें नसतें जर । तरी येथेंचि राहिला असता जन्मवर । जाहल्या गोष्टीसि साचार । उपाय अणुमात्र चालेना ॥ ३८ ॥ ऐसी सत्पुत्रें सांगतां कथा । संतोष पावलीं मातापिता । म्हणती असेल तेथें असो आतां । श्रीरामचंद्र । रक्षिता । त्यालागीं ॥ ३९ ॥

---

८ विलाप, आक्रोश करूं लागली ९ रस्तोरस्तीं १० शोध

# १४ शुभानंद

हे कवि इसवी सनाच्या अठराव्या शतकात होऊन गेले. याची ‘उद्योगपर्व’ व ‘भीष्मपर्व’ अशीं दोन पर्वें छापून प्रसिद्ध झाली आहेत. याचे हे ग्रंथ ओंवीबद्ध आहेत. यांची वाणी रसाळ असून, तींत प्रसाद चांगला उतरला आहे. याची रचना साधी व सुबोध असून मधुनमधून आलंकारिकही आहे.

## पंडित

विदुर म्हणे लोकविरुद्ध । कर्म नाचरती प्रबुद्ध । अधर्म असत्य निषिद्ध । नाचरे तोचि पंडित ॥ १ ॥ नित्य-नैमित्तिक फळाशा न धरी । क्रोध हर्ष दर्प नातळे तिळभरी । सुखदुःख पातलें तिळभरी । तोचि पंडित जाणिजे ॥ २ ॥ ऐश्वर्यकाळीं न फुगे मनीं । दुःख आलिया नाफळी[1] मूर्ध्नी । शीत उष्ण मानापमानी । तोचि पंडित जाणिजे ॥ ३ ॥ वर्णाश्रम-कर्म आचरण । धर्मार्थ अर्थ-परिग्रहण[2] । कामना सांडोनि करी दान । तोचि पंडित जाणिजे ॥ ४ ॥ स्वशक्ति ऐशी अद्वैतभक्ति । आगळा सोस न मानीं चित्तीं । परानुदुःख न मानिती । तोचि पंडित जाणिजे ॥ ५ ॥ परपैशुन्य नायके कानीं । परिसुनी न बोले वदनीं । स्नेह वाढवी सज्जनी । तोचि पंडित जाणिजे ॥ ६ ॥ अप्राप्य त्याची इच्छा न करी । गेलेयाचा शोक मनीं न धरी । आपत्काळीं धैर्य धरी । तोचि पंडित जाणिजे ॥ ७ ॥ नित्यानित्य विवेक । मनीं सांडिला संकल्प । सर्वदा आत्मा-उपासक । तोचि पंडित जाणिजे ॥ ८ ॥ अंतरीं बोधिला ब्रह्म-बोधें । बाहेरी चाले जनाचे छंदें[3] । मुख न विटाळे नीच शब्दें । तोचि पंडित जाणिजे ॥ ९ ॥ ऐश्वर्य आलेया संपूर्ण । निरभिमानें आत्मा सज्जन । भजोनि पावे समाधान । तोचि पंडित जाणावा ॥ १० ॥ आश्रय झालेया समर्थाचा । परोपकारीं वर्ते वाचा । चाळा लावी हरिभजनाचा ।

१ डोकें फोडीत नाहीं २ द्रव्य-दान-स्वीकार ३ लौकिक रीतीला अनुसरून

तोचि पंडित जाणावा ॥ ११ ॥ आपणासमान सर्वांतरीं । सुखदुःख मानी संसारीं । भूत-कृपाळ सदाचारी । तोचि पंडित म्हणावा ॥ १२ ॥ सर्वदा हरि-हर नामाचा जप । निववी दुर्जयाचा संताप । परातें नेदी पश्चात्ताप । तोचि पंडित जाणिजे ॥ १३ ॥ या नश्वर संसारीं । न तोडी धर्म-गळसरी । केल्या कर्मी कामना न धरी । तोचि पंडित जाणिजे ॥ १४ ॥ नित्यनैमित्तिक कर्मादिक । यथाशक्ति करी साधक । तें ब्रह्मार्पण करी सकळिक । तोचि पंडित जाणिजे ॥ १५ ॥ ब्रह्म जाणोनि अंतरीं । पाहुणेयापरी संसारीं । परद्रव्य-परस्त्रीपासूनि दुरी । तोचि पंडित म्हणावा ॥ १६ ॥ पक्षी आला आंगणा । पथिक आला पट्टणा । कमळपत्रींच्या जळकणा । संसारीं शाहणा त्यापरी ॥ १७ ॥

## सत्य

सत्यापाशीं तिष्ठती हरिहर । सत्यें तरिजे भव-समुद्र । सत्यें चाले हें चराचर । सत्यें भूतें पृथ्वी वाहे ॥ १ ॥ सत्यें वर्षे हें जीवन । सत्यें यज्ञ करी पचन । सत्यें विचरे महापवन । सत्यें आकाश हें उभें ॥ २ ॥ सत्यापरता नाहीं देवो । सत्याविणें स्वर्ग वावो । सत्यापाशीं वासुदेवो । सेवा करी निजांगें ॥ ३ ॥ शिबी, श्रियाळ, हरिश्चन्द्र नृपती । यांची पुराणीं वर्णिली कीर्ति । सत्य रक्षोनियां मुक्ति । निज सामर्थ्यें पावले ॥ ४ ॥ दैत्य[1] मारूं जातां सुता[2] । मृत्यु आला दैत्यनाथा । सुग्रीवातें मारूं जातां । वाळी प्राणें निमाला ॥ ५ ॥ चरणीं हाणितां रावण । झाला चिरंजीवी बिभीषण । सत्यवंतातें नारायण । पदोपदीं रक्षित ॥ ६ ॥ सत्य स्वधर्म रक्षणें । प्राणी परपार पाविजे पंथें तेणें । संजया ! भूतसृष्टि एके पणें । सत्यापासोनि चालतसे ॥ ७ ॥ सत्यापासोनि हिंडे सविता । चंद्रें औषधीसी अमृतता । सत्यापासोनि दाहकता । अग्निकर्म हें चाले ॥ ८ ॥ सत्यापासोनि सर्वभार । पृथ्वी वाहे हें सचराचर । सत्यापासोनि जलधर । मेघमाळा मोकळी । ९ ॥ सत्याचेंचि समर्थ बळ । सत्य रक्षोनि झाले देव सकळ । प्राप्त

१ हिरण्यकशिपु २ प्रल्हाद

झालीं पदें अढळ । सत्यापासोनि संजया ॥ १० ॥ शीतोष्ण सुखदुःख साहोन । सत्यें-करोनि विषयवारण । सत्यें करोनि इंद्रियें बंधन। सत्यें ब्रह्मा पाविजे ॥ ११ ॥ सत्येंकरूनि अंतराळीं । भ्रमती नक्षत्रें महामाळी । रुद्रादित्य वसुमंडळीं । विश्व देवादिक हे ॥ १२ ॥

## विषयतृष्णा

लोभें लोभासि होय वृद्धी । कोण तरेल तृष्णानदी । जो पावला ब्रह्मानंदीं । नैराश्य तो एक उतरला ॥ १ ॥ सिंधु नको न म्हणे जैसा । नदी प्राशितां, पुढती तैसा । काष्ठें वोपितां हुताशा[1] । नको न म्हणे तत्वतां ॥ २ ॥ तयापरी विषयात्मा मानव । विषयभोग भोगितां सर्व । तृप्ती न म्हणे दुर्जीव । पुढें पुढें मग धांवे ॥ ३ ॥ मृगें पाहती जळ फार । धांवतां पुढां दिसे नीर । भोगितां विषय पामर नर । पुढां पुढां सुख भोगी ॥ ४ ॥ माया तृष्णा तें वो नीर । मत्स्यरूपें सकळ जीव पामर । हिंडतां नेणती परपार । या अघोर भव-सिंधूचा ॥ ५ ॥ भोगीत असतां विषय-छंद । वय जावोनि झाला वृद्ध । अंतरीं तेव्हांही कल्पना-छंद । तृष्णा वृद्ध पैं नव्हे ॥ ६ ॥ मान हाले भरभराटी । चरणीं न चले धरी काठी । झुळझुळ लाळ वाहे ओठीं । परी तृष्णा पोटीं तरुणी ते ॥ ७ ॥ दंत पडोनि बोचरखेंडी । केंस पिकोनि झडली शेंडी । परी अंतरीं न सुटे विषयवोढी । तृष्णा गाढी तरूणी ते ॥ ८ ॥ करचरण वेगळे काढी । पाठ मोडोनि झाली घडी । सकळ इंद्रियांची प्रौढी । परी तृष्णा गाढी तरुणी ते ॥ ९ ॥ दृष्टि जावोनि झाला अंध । बधिरत्व पावला बुद्धीमंद । परी अंतरीं न सुटे विषयछंद । तृष्णा पोटीं तरुणी ते ॥ १० ॥ आप्त सुहृद् मित्रजन । गेले स्वर्गाप्रति सांडोन । परी न इच्छी पैं मरण । पाठीं तृष्णा तरुणी ते ॥ ११ ॥ विषयलोभिया भक्ति नाहीं । विषयलोभिया सत्य नाहीं । विषयलोभिया देव नाहीं । मित्र नाहीं लोभिया ॥ १२ ॥ नाहीं विषय-लोभिया कुळ । नाहीं विषयलोभिया स्थळ । विषयलोभी आंधळा केवळ । पापपर हेंही नाहीं ॥ १३ ॥

---

१ अग्निला

## भीष्मशरपंजर

शर-पंजरीं देवव्रत[1]। परी शिर खालीं लोंबत। म्हणे 'मज उशी द्या रे त्वरित। शिरासि टेंकण येधवां'॥ १॥ उत्तम उशी आणी दुर्योधन। पाहोनि बोले गंगा-नंदन। म्हणे 'पाहा माझें आंथुरण। उशी आणून तैशीच द्या'॥ २॥ भीष्में पार्थाकडे पाहोनी। म्हणे 'कृष्ण-सख्या! मजलागोनी। तूं तरी उशी दे आणुनी। ग्रीवा धरणी लोंबती रे!'॥ ३॥ मग पार्थें गांडीव चढवून। तीन बाणांची तिकटी करून। क्षणमात्रें शर सोडून। ग्रीवा उचलोन सांवरिली॥ ४॥ भीष्म म्हणे 'सु-लक्षणा! अर्जुना!। उत्तम उशी दिधली सुजाणा। विजय कल्याण वैकुंठराणा। तुजला रक्षू सर्वदाही॥ ५॥ स्वसत्ता स्वयें उत्तरायण। तंववरी मी न सोडीं प्राण'। ऐसे बोलतां गंगानंदन। ऐकोनि धन्य म्हणती सर्व॥ ६॥ तेव्हां दुर्योधन वैद्य आणीत। पाहोनि हांसे देवव्रत। 'मी समरांगणीं झालों मुक्त। आतां वैद्य कासया पैं'॥ ७॥ दोहीं दळींचे नृपवर। भीष्मासी अर्पिती पूजा-संभार। प्रदक्षिणादिक नमस्कार। करोनि जाती स्वस्थाना॥ ८॥ सकळ प्रजा अठरा याती। भीष्मदेवा येउनि नमिती। गांवोगांवींच्या नर, युवती। पाहों येती महाराज तो॥ ९॥ भीष्म होऊनि तृषाक्रांत। कौरवांसी उदक मागत। तंव ते सुगंध उदक आणीत। न घेची देव-व्रत तें तेव्हां॥ १०॥ म्हणे 'बोलावा रे अर्जुन!'। तों उभा ठाकला तो येऊन। म्हणे 'सखया! पाजवीं जीवन'। म्हणतां बाण लावी गुणीं॥ ११॥ भीष्मासमीप दक्षिणभाग पाहून। धरणी फोडिली मारोनी बाण। भागीरथीचें दिव्य जीवन। कारंजा तेथें लाविला॥ १२॥ धार मुखीं पडतां तात्काळ। तेणें सर्वांग झालें शीतळ। जाह्नवीतोय औषधी निर्मळ। दुःख सकळ विसरला॥ १३॥ भीष्म म्हणे 'रे पार्था!। अमित-तेज-गुण-भरिता!। श्री-रंग-प्रिय! सुभद्रा-कांता। धन्य वंश तुझेनी॥ १४॥ दुर्योधन पापें करुनि। स्वकुल

---

१ भीष्म.

टाकील जाळुनी । तुम्ही पांच पंडुतनय गुणी । भय नाहीं कांहीं तुम्हांतें ' ॥ १५ ॥ सुयोधनासी म्हणे देवव्रत । 'अजोनी तरी करीं स्वहित । मित्र करोनी पंडुसुत । सुखरूप नांदें कां ' ॥ १६ ॥ दुर्योधन दुराचार । सहसा नेदी प्रत्युत्तर । असो मग तो गंगाकुमर । नाम-माळा जप करी ॥ १७ ॥ तेव्हां अर्जुनाचें स्तवन । राजे करिती अवघे जण । भयें आणि आश्चर्येंकरून । कौरव तेव्हां कोंदले ॥ १८ ॥ असो यावरी तो महाराज कर्ण । पहावया आला भीष्मालागून । कंठ दाटला नेत्रीं जीवन । म्हणे ' तुजसीं स्पर्धा वाढविली ' ॥ १९ ॥ मग डोळे उघडोनी देवव्रत । कर्णासी करें कुरवाळीत । 'तूं मज भेटलासी येउनी येथ । इतुकेन तृप्त झालों मी ॥ २० ॥ मज नारदें सांगितलें येउनी । कुंतीपुत्र तूं सूर्यवीर्यें करुनी । तूं नीचाश्रयें निंदिसी वदनीं । भगवद्भक्तां पांडवां ॥ २१ ॥ येरवीं तुजसारिखा पवित्र । उदार सगुण गुण-गंभीर । तूं महाराज प्रताप-समुद्र । प्रतिअर्जुन दुसरा पैं ॥२२॥ तरी तूं पांडवांकडे जायीं ' । कर्ण म्हणे ' न घडे काळत्रयीं । मज हें वर्तमान सर्वही । पूर्वीच श्रीकृष्णें श्रुत केलें ॥ २३ ॥ पांडवां सांभाळी द्वारका-नायक । तैसा मी कौरवांचा रक्षक । आम्हां क्षत्रियांचें भाग्य देख । समरांगणीं पडावें पैं ॥ २४ ॥ आतां पांडवांतें जिंकीन । कीं समरांगणीं देईन प्राण । माझे अपराध भीष्मा पूर्ण । क्षमा करीं आतां यावरी' ॥ २५ ॥ मग नमुनी भीष्मचरण । स्वस्थळा गेला उदार कर्ण । तैसेचि कौरव संपूर्ण । स्व-शिबिरातें पैं गेले ॥ २६ ॥ मग तो श्रीकृष्ण द्वारकावासी । भीष्मासी म्हणे हृषीकेशी । 'शिष्यावीण गती कोणासी । नाहीं, तरी वचन ऐक ॥ २७ ॥ तुजप्रति मंत्रास्त्रविद्या आहे । ती पार्थासी अर्पी पाहे । सच्छिष्य अर्जुन नरावतार हे । म्हणोनी सांगणें तुज वेदमतें ' ॥ २८ ॥ ऐसें बोलतां श्रीकृष्णरायें । मग पार्थासी बोलाविलें भिष्माचार्यें । मंत्रास्त्रविद्या सर्व पाहें । अर्जुनातें दिधली ॥ २९ ॥ भीष्म म्हणे श्रीकृष्णातें । ' त्वां अंगिकारिलें पांडवांतें । तरी राज्यी स्थापिल्या धर्मातें । त्या हस्तें क्रिया करवीं माझी ॥ ३० ॥ धर्मराज तो माझा प्राण । कीं धर्ममार्गें याचें वर्तन । तूं कौरवांचें करिसी हनन । तें वर्म गहन मी जाणें ॥ ३१ ॥ युधिष्ठिर-

प्रतिष्ठापन । साधूचें करिसी प्रतिपालन । अवतरलासी मधु-सूदन । दुष्टदंडन करावया ' ॥ ३२ ॥ ऐसी ऐकोनि भीष्मस्तुति । प्रसन्न झाला लक्ष्मीपती । म्हणे ' भीष्मा ! घेईं वरदोक्ती । अक्षय मुक्ती तुज होऊ ' ॥ ३३ ॥

---

# १५ मोरोपंत

शके १६५१ या वर्षी या प्रसिद्ध कवीचा जन्म झाला. याच्या बापाचें नाव बापूजीपंत ऊर्फ रामचंद्रपंत पराडकर असून, हे जातीचे क-हाडे ब्राह्मण होते व बाबूजीनाईक बारामतीकर जहागीरदार याचे कारकून होते. मोरोपंतांनीं संस्कृत भाषेंत चांगलें प्राविण्य संपादन केले व ते पुराण सागूं लागले. याच्या पुराणावर खुष होऊन बाबूजी नाईक यानीं पंतास वार्षिक ५०० रुपयाचे वेतन दिले व आपल्याजवळ पुराण सागण्यास ठेविले.

मोरोपंताची काव्यरचना विपुल आहे. संपूर्ण ' भारत, ' ' भागवत ' ( दशमस्कंध व इतर फुटकळ आख्यानें ), ' हरिवंश, ' ' कृष्णाविजय, ' सव्वाशेंवर ' रामायणे ' आणि इतर पुराणातील फुटकळ आख्याने इतकी याची ग्रंथरचना आहे. हीं बहुतेक आर्यावृत्तात असून कांहीं इतरछंदोबद्ध आहेत. शिवाय, कांहीं साक्या व पदेंही केलीं आहेत. पंतानीं संस्कृत काव्येंही केली आहेत. मराठींत याच्याइतका ग्रंथविस्तार दुसऱ्या कोणत्याही कवीचा नसेल.

मोरोपंताची भाषा प्रौढ, शुद्ध परंतु संस्कृत-शब्दप्रचुर असल्यामुळे पुष्कळ ठिकाणीं क्लिष्ट आहे. याची वाणी रसाळ व प्रासादिक आहे. ह्याची कविता व्याकरणशुद्ध आहे. याच्या कवितेंत शब्दालंकार व अर्थालंकार विपुल आहेत. यमकें साधण्याकडे पंताचा ओढा विशेष दिसतो, आणि त्यामुळें तीतींच यमके पुनः पुनः आढळतात. शके १७१६ त हे निवर्तले.

## मंगलाचरण

श्रीमत्सद्गुरु नारद वाल्मीकि व्यास शुक कवीश मनीं ॥
आणुनि, नमितों भावें, जे मोहतमाचिया[1] रवी शमनीं ॥ १ ॥
श्रीश-श्रीकंठ-चरण[2] नमितों जे सर्व-सेवक-स्वरग[3] ॥
भलतेहि वर्ण होती श्रुतिमत[4] यनिष्ठ जेविं सुस्वरग[5] ॥ २ ॥
नमिला गजमुख ज्याचे सेवुनि मृदुमधुर बोल कानांहीं ॥
चुंबुनि शंभु म्हणे बा तुजसम आम्नाय[6] बोलका नाहीं ॥ ३ ॥
नमितों सरस्वतीतें जी कविकीरासि[7] पढवुनी वदवी ॥
जीचा प्रसाद देतो वाचस्पतिची जडासही पदवी ॥ ४ ॥
नमिला वैशंपायन सुखवी जनमेजया श्रवणसक्ता ॥
तैसाचि लोमहर्षणनंदन उग्रश्रवाहि जयवक्ता ॥ ५ ॥
हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांसि वंदितों भावें ॥
वाटे चरित्र त्यांचें कांही आपण तरावया गावें ॥ ६ ॥

## भीष्माचें ब्रह्मचर्य

भीष्म हा शंतनुराजाला गंगेपासून झालेला मुलगा होय. यानें आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा केली होती. एकदां याची सावत्र आई सत्यवती हिनें याला लग्न करण्याविषयी फार आग्रह केला, या वेळीं 'मी आपली प्रतिज्ञा मोडणार नाहीं' असें यानें उत्तर दिले. हा प्रसंग या आर्यांत वर्णिला आहे.

दीना होउनि देवी सत्यवती[1] पुत्रशोकतापानें ॥
भीष्मासि म्हणे 'साधो रक्षावें कुळ तुवां अपापानें ॥ १ ॥

---

१ मोहरूप अंधकाराच्या २ विष्णु व शंकर ३ सर्व भक्तांचे कल्पतरु ४ कानास मान्य कर्णमधुर ५ उत्तम स्वरांत गेलेले म्ह० गाइलेले ६ वेद ७ कविरूप पोपटास

१ भीष्माची सावत्र आई

धर्मं त्वन्माता मी धर्मज्ञा धर्मसेतु रक्षाया ॥
कथितें तें मान्य करीं, स्वाकारीं स्त्री स्वधर्म रक्षाया ॥ २ ॥
मी गुरु मदुक्तिनें या स्त्री स्वीकारीं नसे तुला पाप ॥
आपद्धर्म असे हा बा पद गुरुचें वरीं हरीं ताप ॥ ३ ॥
स्वजना हो तृप्ति तुझ्याठायीं, जैसी शिलीमुखां[2] बकुलीं ॥
कुरुकुळगृह न खचावें याला आधार तूंचि खांब कुळीं'॥ ४ ॥
भीष्म म्हणे 'माते त्वां धर्मचि कथिला, परि प्रतिज्ञा ते ॥
अत्याज्य; भीति सत्यभ्रंशासि[3] न बहु अरिप्रति ज्ञाते ॥ ५ ॥
म्यां ब्रह्मचर्य सुव्रतनियम स्वमुखें त्वदर्थ जो केला ॥
देह त्याज्य, परि न तो त्याज्य, न सेवील सुज्ञ ओकेला ॥ ६ ॥
त्यजितील पंचभूतें स्वगुणांसि, रवी छवीस[4] सोडील ॥
शीतत्वातें चंद्रहि, शक्रहि करविक्रमासि तोडील ॥ ७ ॥
उष्णत्व त्यजिल दहन, मर्यादेतेंहि सिंधु सोडील ॥
धर्मपर धर्मराजहि सद्धर्मप्रीतिलाहि तोडील ॥ ८ ॥
परि हा शांतनव तुझा सुत केवळ कृपण मान सत्य जितां ॥
मेल्याहि न टाकील प्राणासि न भीतमानस त्यजितां' ॥ ९ ॥

## सावित्रीचें आख्यान

**मद्र**देशच्या **अश्वपति**राजाची कन्या **सावित्री** ( सावित्री देवीचा अवतार ) हिनें **शाल्वदेश**च्या **द्युमत्सेन**राजाचा मुलगा **सत्यवान्** त्यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं **यम** जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असता, सावित्रीनें त्याच्या मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें; आणि सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्याची व राज्याची प्राप्ति, आपल्या

---

२ भ्रमरास ३ सत्याच्या भगास ४ प्रकाशास

बापास शंभर पुत्राची प्राप्ति, व आपणाला शंभर पुत्राची प्राप्ति, असे वर त्यापासून संपादिले, आणि शेवटी सत्यवानाचा प्राणही परत आणिला; हे ह्या आख्यानात सांगितलें आहे.

धर्म पुन्हां त्यासि म्हणे 'मार्कंडेया मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं सत्वाढ्या[१] आमुची जशी भार्या' ॥ १ ॥
मुनि त्यासि म्हणे 'होती सावित्री नाम अश्वपतितनया[२] ॥
तच्चरित श्रवण करीं, ऐकाया योग्य साधु पतितें[३] न या ॥ २ ॥
झाली भक्तसुता ती श्री-सावित्रीच[४] उद्धरायाला ॥
श्री[५] क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला' ॥ ३ ॥
अश्वपति म्हणे 'वत्से ! चिंता मज हेचि एक परमा गे ! ॥
झालीस दानयोग्या[६], परि कोणीही तुला न वर मागे ॥ ४ ॥
स्ववर पहा जा' ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिव[७] दाया[८] ॥ ५ ॥
अनुरूप वर विलोकुनि आली, तों त्या नृपा परमहर्षी[९] ॥
सांगत होता सुकथा श्री-नारद जो कृपापर महर्षी ॥ ६ ॥
ती दोघांतें वंदी, तो तीस ब्रह्मकायभू[१०] पाहे ॥
सस्मित असें पुसे कीं 'त्वत्तनया होय काय भूपा ! हे ? ॥ ७ ॥
कोठें गेली होती ? श्वशुरगृहाहूनि काय आणविली ? ॥
हा ! सचिवांनीं अजुनी दानोचितता इची न जाणविली' ॥ ८ ॥
भूप म्हणे, 'परिसावें तेंचि तुवां सर्व साधु-कुल-गीतें ॥
म्यां पाठविलें होतें स्ववर पहाया स्वयें स्वमुलगीतें' ॥ ९ ॥

१ सत्वगुण सपन्न २ मद्रदेशाचा राजा अश्वपति याची कन्या ३ पातकी ४ ब्रह्मदेवाची स्त्री ( जिच्या वरप्रसादानें अश्वपतीला सावित्री झाली होती ) ५ लक्ष्मी ६ उपवर, लग्नास योग्य ७ मंत्री ८ उपमाता ९ ब्रह्मानंदात निमग्न १० ब्रह्मदेवाच्या देहापासून जन्मलेला

सांगे ती सावित्री 'नृप द्युमत्सेन शाल्वपति[11] आहे ॥
जरि वृद्ध अंध रिपु-हृत-राज्य वनस्थहि न काळजी वाहे ॥ १० ॥
कुलशीलसत्वगुणनिधि तो पुत्रकलत्रमात्रपरिवार[12] ॥
परि वार[13] सर्व सम त्या, कीं मथिला स्वांतरस्थ[14] अरिवार ॥ ११ ॥
तो श्वशुर मानला मज, चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जरि लाजविति सख्या अनुसरली गौरी हरा, न त्या हरिला' ॥१२
नारद म्हणे, 'नृपा ! हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान् योजू अन्या, असे उणें न वरा' ॥ १३ ॥
भूप म्हणे, 'सर्वज्ञा देवा ! उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुलजवर जरि तरिहि तुला अयोग्य कां गमला !॥१४॥
काय उणें न धरावें अधनत्वें भूपजनवरा जीवीं ! ॥
कां न प्राशावें मधु मधुपानें कूपज-नवराजीवीं[15] !' ॥ १५ ॥
मुनि सांगे, 'वर्षांतीं येइल त्या भूपपुत्रका व्यसुता[16] ॥
अन्य वरू; वृतहि कच त्यजुनि वरी भूपपुत्र काव्यसुता[17]' ॥ १६ ॥
भूप म्हणे, 'न वरावा वत्से ! जरि सुगुणसागर लवायु[18] ॥
शीतल मंद सुगंधहि वद सेवावा कसा गरलवायू' ॥ १७ ॥
ती सुमति म्हणे, 'ताता ! न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न पतंगचित्तवृत्ति क्षणही रत्नीं त्यजूनि दीप रते ॥ १८ ॥
आयुष्य असो किति तरि मज तादितर पुरुष तुजसमचि राया ॥
मन न चळेलचि, येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥१९॥

---

११ शाल्वदेशचा राजा १२ मुलगा व बायको एवढाच ज्याला परिवार आहे १३ तथापि त्याला सर्व दिवस सारखेच वाटतात १४ अतःकरणातील कामक्रोधादि शत्रु समुदाय १५ विहिरीत जन्मलेलें नवीन कमल १६ वि+असुता म्ह० मृत्यु १७ काव्य (शुक्राचार्य) याची सुता (मुलगी) म्ह० देवयानी १८ लव+आयु=अल्पायुषी

देवर्षि म्हणे, 'त्यासचि दे साध्वीव्रतपरा सुता राया ॥
शुचि निश्चयाहुनि अधिक अमृतरस नसे परासु ताराया ॥ २० ॥
होतें सद्धर्माच्या कांसेला लागतां सदा शिव हो ! ॥
येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय[१९] तुम्हां सदा शिव हो' ॥ २१ ॥
गेला मुनि जो भगवत्कीर्ति-महाकामधेनुचा[२०] दुहिता ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवत्करीं दुहिता ॥ २२ ॥
वेद श्वशुर, श्वश्रू स्मृति, ती स्वाचारपद्धतीच[२१] सती ॥
मुनि म्हणति 'या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषामिषें वसती' ॥ २३ ॥
तो सत्यवान् म्हणे 'हे पितृराज्यश्री तपोवनांत पती ॥
हो आपन्मुक्त म्हणुनि बहुधा आपणहि या[२२] मिषें तपती ॥ २४ ॥
तत्सद्गुणें प्रमुदितें झालीं केवळ मनांत न तिघें ती
सकळें सदेवतापसवृंदेंहि[२३] तपोवनांत नति घेती ॥ २५ ॥
ती स्वमनांत म्हणे, 'तुज तनु रडविल सर्व काळ जीवा हे ॥
सोड इला वेड्या, बुध न कुसंगति धरुनि काळजी वाहे' ॥ २६ ॥
ऐसें चित्तीं बोले, मोजी उर्वरित[२४] दिवस माहिने ती ॥
नसतें तसें, तरि सुखें वय भोगुनि तदधिक श्रमहि नेती ॥ २७ ॥
उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं[२५] प्रियवाक् ती शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥ २८ ॥
फलमूलार्थ निघे पति, त्यासि म्हणे, 'मजसि सत्तमा ! न्या हो ॥
वन पाहेन, तुम्हां हे न प्रथमप्रार्थना अमान्या हो' ॥ २९ ॥

---

१९ शंकर २० भगवत्कीर्तिरूप कामधेनूचें दोहन करणारा २१ सद्वर्तनाची रीति २२ सावित्रीच्या रूपानें २३ देवांसह तपस्वी जनाचे समुदाय २४ बाकी राहिलेले २५ तन्नियमीं ( सावित्रीच्या व्रतांत ) ( जी ) तीव्रता ( होती ) ती प्रियवाक् ( मधुर भाषण करणारी ) रंभा शुकीं ( शुकाचार्याच्या ठायी ) न विलोकी.

चित्राश्व म्हणे, ' दयिते गमली वनसरणि[२६] काय कोमळ ती ? ॥
श्रमशिल शिबिकास्थाही[२७] दुर्गवनपथांत बायको मळती[२८] ॥ ३० ॥
येणारचि तरि साध्वी श्वश्रूश्वशुरांसि पूस मग ये, तें ॥
योग्य तुज मजहि, मानिति गुर्वाज्ञाधिक सुबुद्धि न गयेतें ' ॥ ३१ ॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्वपितृपाद साधु निघे ॥ ३२ ॥
पात्र भरूनि फळांनीं, काष्ठें फोडी वनांत, सत्वरतें[२९] ॥
पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनिवच मनांत सत्वर तें ॥ ३३ ॥
जों साध्वी हळुच म्हणे, ' हा ! नाथा ! नियतमानदा ! रुचिरा ॥
मूर्ति श्रमते, भ्रमते मति, कीं जी प्रियतमा न दारु चिरा ' ॥ ३४ ॥
तोंचि म्हणे तो, ' उठल्या करित्या स्मृतिहानि वेदना लागे ॥
शूलशत शिरीं, जाणों सखि ! अक्षम हा निवेदनाला गे ॥ ३५ ॥
तुझिया मृदुशीतांकीं शिर ठेउनि वाटतें निजावें गे ! ॥
त्वत्स्पर्श अमृत म्हणवुनि या मत्तापें पळूनि जावें गे' ॥ ३६ ॥
मांडी देउनि, पतिचें मस्तक हस्तकमळें सुधी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निजनिश्चय जो खरा सुधीर गडी ॥ ३७ ॥
सीता दशकंठा जसि, तशि सत्वें भी न तीव्रतापा हे ॥
तों पाशपाणिपुरुषाप्रति[३०] पतिपार्श्वी पतिव्रता पाहे ॥ ३८ ॥
क्षितिवरि पतिशिर उतरुनि सविनय झडकरि उठोनि कर जोडी ॥
नमुनि म्हणे, ' देव तुम्ही, अशि कैंची अन्यदर्शनीं गोडी ॥ ३९ ॥
केलेंचि धन्य दर्शनदानें येऊनि कानना मातें ॥
आजि ! देवेश ! निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ' ॥ ४० ॥

---

२६ रानातला मार्ग २७ पालखींत बसून जाणारी २८ त्रास होतो २९ सच्छील ३० पाश आहे ज्याच्या हातांत असा पुरुष म्ह० यम

देव म्हणे 'सति! यम मी;' 'का आलां?' 'न्यावया तुझ्या पतितें'॥
'हें दूतकार्य कीं जी;' 'जें सेवककृत्य वेगळें सति तें ॥ ४१ ॥
हा सत्यवान् सुकृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मी योग्यत्व स्वामीचें तें न सेवकानीकीं[३१]' ॥ ४२ ॥
अंगुष्ठमात्र पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी ॥
तैं 'हाय ! हाय !' म्हणती बहु सद्गदकंठ साश्रु नाकर्षी ॥ ४३ ॥
यातें बांधुनि घेउनि यमधर्म प्रभु निघे अवाचीतें[३२] ॥
भ्याला सतीस, बहुधा जें ब्रह्मलिखित बरें न वाची तें ॥ ४४ ॥
त्यामागें तीहि निघे धर्म म्हणे, 'भागलीस जा परत ॥
स्नेहऋण फेडिलें त्वां, करुनि स्वपतिक्रिया रहा स्मरत' ॥ ४५ ॥
साध्वी म्हणे, 'प्रभो ! पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥
स्वगुरुव्रतप्रसादें मद्गतिस न रोधितील हेति-कडे[३३] ॥ ४६ ॥
संत म्हणाति सप्तपदें सहवासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्रचि[३४] न व्यसनीं अन्याखिलमित्र संकटीं पडतें ॥ ४७ ॥
ऐसें सती वदे, तो बोल[३५] शशी, देव तोहि सागरसा ॥
प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि साग-रसा[३६] ॥ ४८ ॥
धर्म म्हणे, 'साध्वी ! बहु श्रमलीस, स्वाश्रमासि जा मागें ॥
जो मागशील तो वर देतों, घे इष्ट तें मला मागें' ॥ ४९ ॥
'देवा ! व्हावें चक्षुस्तेजस्संपन्न आश्रमामाजी ॥
मामाजी ऐसें द्या, मति साहेनाचि त्या श्रमा माजी' ॥ ५० ॥
'दिधलें' धर्म म्हणे, परि जातचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे पुनरपि 'जा वत्से ! घे वर दुजाहि मागूनी ॥ ५१ ॥

---

३१ चाकराचा समुदाय ३२ दक्षिण दिशेस ३३ शस्त्रें व डोंगराचे कडे ३४ सन्मित्र ज्याला आहे असा ३५ सावित्रीचें भाषण ३६ स + अग ( पर्वतांसहित ) रसा म्ह० पृथ्वी

ती सुमति म्हणे, ' राज्यभ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निजपद बहु काळ सासु[37] राहो तो ॥ ५२ ॥
' होइल जा ' धर्म म्हणे, परि करि अनुगमन सबहुमान सती ॥
की जी हंसी हंसावांचुनि मानील न बहु मानस ती ॥ ५३ ॥
धर्म म्हणे, ' गे ! बाई ! करिसी कां व्यर्थ या श्रमास तिजा ॥
वर घे नकोचि भार्गो, आलीस सुदूर, आश्रमा सति जा,' ॥ ५४ ॥
त्यासि म्हणे सावित्री, ' संपन्न असो पिता सु–तनय–शतें ' ॥
हा लक्ष्मीसुतकवि[38] किति लिहिल सतीचें उमासुत न यश तें ॥५५॥
उडुपा[39] उडुसें धर्मौदार्या लाजूनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सुयशीं पति न दिसे म्हणुनि अभ्रमु[40] रडे हो ॥५६॥
ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा ॥
सोडीना सोडविल्यावांचुनियां ती सती नवरदेवा ॥ ५७ ॥
देव म्हणे ' तूं स्वच्छा, स्वच्छायाशीच मागुती, सति ! घे ॥
वर घेउनि जा चवथा देतो मागोनि मागतीस तिघे ' ॥ ५८ ॥
' व्हा सुप्रसन्न, वत्से ! तुज हो सुत शत असें वदा, न्या हो ॥
सुयशोराशि स्वर्गी लज्जाप्रद सुरनगा वदान्या[41] हो ' ॥ ५९ ॥
भुलला धर्म द्युतिला, धृतिला, मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावी मागें म्हणवुनि म्हणे 'तथास्तु' तिला ॥ ६० ॥
हळुचि म्हणे सावित्री ' पावेन वरें करूनि संततिला ॥
तुमचा प्रसाद म्हणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ६१ ॥
तरि मत्पति मज द्या कीं, तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि सत्यगुणासक्तमानस त्यागी ॥ ६२ ॥

---

३७ स+असु=–असुसहित=जिवंत ३८ मोरोपंत ३९ चंद्राला ४० ऐरावताची स्त्री
४१ दात्या

रोमांचित धर्म म्हणे, 'बाई ! गातिल तुझा प्रभाव सती ॥
पतिशीं अविनाभावें[४२] वससिल, रविशीं जशी प्रभा वसती ॥६३॥
राज्य चतुःशत वत्सर करिल तुझा कांत सोडिला, जा गे ! ॥
हा त्वन्महिमा जागो, सीतेनें जेविं जोडिला जागे' ॥ ६४ ॥
तें वृत्त वर्तमान स्वल्पहि न तिच्या कळे वरापाशीं ॥
जातां यम, सावित्री धांवत आली कलेवरापाशीं ॥ ६५ ॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनियां स्वपतिशिर ती ॥
जशि[४३] चेतना धवांगीं होय, इची जीवितांत मति शिरती ॥ ६६ ॥
स्त्रीस म्हणे, 'सुभगे ! त्वां मृदु मांडी मांडिली उशी, रमला ॥
आत्मा निद्रेशीं, रवि मावळला लागला उशीर मला ॥ ६७ ॥
पुरुष श्याम महौजा[४४] ओढित होता बळेंचि मजला जो ॥
तो कोण, पुसेन तया नसतां स्वप्नोत्तमर्ण[४५] मज लाजो' ॥ ६८ ॥
'कथिन उद्यां, झाली बहु रात्रि; बळ असेल तरि उठा राया ॥
देत्यें हात, चला जी, घेत्यें फळभाजना कुठारा या ॥ ६९ ॥
भेटवित्यें ताताला मातेला, या उठा' असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे कलभाशि[४६] सांवरी कदली ॥ ७० ॥

आला प्रकाश नेत्रीं, अंधत्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ७१ ॥

मुनि म्हणती ' हा आला, नेत्रें उघडुनि पहा सदारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्रमुदित यांसह रहा सदा राया ॥ ७२ ॥

---

४२ वियोग न होता ४३ जशी धवांगी चेतना ( तशी ) इची मति जीवितांत शिरती होय ( हिच्या जिवांत जीव आला ) ४४ महातेजस्वी ४५ स्वप्नांतील उत्तमर्ण ( सावकार ) ४६ हत्तीच्या छाव्याला

दे आलिंगन, अंकीं घे, मस्तकपद्म हुंग वाराया ॥
आत्मात्मजतापातें[४७], दे आशी राजसत्तमा राया ' ॥ ७३ ॥
पुसतां विलंबकारण, चित्राश्व म्हणे शिरोव्यथाशयन' ॥
मुनि म्हणति 'हें नव्हे, वद वत्से, हो तूंचि आमुचे नयन' ॥ ७४ ॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अशेष साधुसद नमुनी ॥
तेव्हां झाले अतुल प्रीतिक्रीडेशि केलीसदन मुनी ॥ ७५ ॥
दुसरे दिवशीं प्रकृति[४८] प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
'या, राज्य करा, सचिवें वधिला, हरिली स्वभूमि ज्या पतितें' ॥ ७६ ॥
मुनि म्हणति 'अनुभवावें स्वस्थमनें राज्यपद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्रीयुक्त सदन ताराया' ॥ ७७ ॥
सिंहासनी बसविला सावित्रीच्या व्रतेंचि, हा नियम ॥
वरसामर्थ्ये म्हणा, परि गेला होता करूनि हानि यम ॥ ७८ ॥
सावित्रीनें केला उभयकुलोद्धार हा असा राजा ! ॥
कृष्णाहि अशीच, स्तुति येती न मुखासि या असारा जा ॥ ७९ ॥

## गांधारीचा दुर्योधनास उपदेश

पांडवांशीं युद्ध केल्याने नाश होईल, सबब युद्ध करण्याचा हट्ट सोडून, त्याच्याशीं सख्य करून त्याचा भाग त्यास द्यावा असा गाधारीने उपदेश दुर्योधनास केला तो यांत आहे.

गांधारी त्यासि म्हणे "वत्सा बहु कष्टतो दुरभिमानी ॥
कां त्यजिसि गुरूक्ति, इला आत्माधिक बहुगुणें सुरभि मानी ॥ १ ॥

---

४७ तुझें व तुझ्या मुलाचें दुःख याला ४८ प्रजा

अन्याय-कृष्णवर्त्मा[१] न स्पर्शो कीर्तिकापुरा तनया ॥
ज्या लोभा भजसी तूं, भजले नाहींत बा पुरातन या ॥ २ ॥
कामें कोपें लोभें नागविले अमित यांस जे भुलले ॥
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुष-हीर[२] ही उलले ॥ ३ ॥
न उगाचि मूकसा तूं चित्तांत धरूनि दंभ दर्प रहा ॥
बा ! दुरभिमान न बरा, देइल धनपतिकरींहि खर्पर[३] हा ॥ ४ ॥
अहित कथील तरि कसा गुरु ? बाप कसा तसीच आइ कसी ? ॥
नाइकसी गुरुवचन; क्षुद्रवचन बहु जपोन आइकसी ॥ ५ ॥
सत्यप्रेमें स्वामी न म्हणविती हे दयाभ्र[४] मामाजी[४] ॥
मी राजा ऐसें जें काय म्हणसि खेद या भ्रमामाजी ॥ ६ ॥
राज्यार्ध पांडवां दे, तूं घे राज्यार्ध, बहु तुला बा हें ॥
साम करीं, यश रुसलें, मुरडुनि तुज पाहतें मुला ! बाहें ॥ ७ ॥
निष्कंटक राज्य करिसि हा महिमा सत्य पांडवांचा रे ॥
सत्सख्य करूनि यशें धवल करा सत्यपांड[५], वांचा रे ॥ ८ ॥
भीष्मद्रोणाद्यार्य प्राणांतें सांडितील, न तयांतें ॥
सामर्थ्य असोनि अधिक बहु ते आहेत साधु नत यांतें ॥ ९ ॥
क्षुद्र शकुनि-दुःशासन-कर्ण, यश क्षुद्र-संग-रहितास ॥
कोणा होइल केला भूतबळें रुद्रसंगर हितास ? ॥ १० ॥
सर्व सहृत्तम कृष्णप्रभु, याची कांस धरुनि सर्व तरे ॥
तूं किति ? तरले याच्या नामें बहु सागरांत पर्वत रे ॥ ११ ॥
तुज पांडवजय दुर्घट, नारळ हरिजेल काय खर्वेतरें ॥
कृष्णोकें सख्य करीं, याचि उपायें अनिष्ट सर्व तरें " ॥ १२ ॥

१ अन्यायरूप अग्नि  २ पुरुषश्रेष्ठ  ३ खापर  ४ दयेचा मेघ भीष्म  ५ सत्यप+अंड (ब्रह्मांड)

## कुंतीचा स्वपुत्रांस निरोप

कौरवाशीं युद्ध करण्यास सज्ज झालेल्या आपल्या पुत्रास कुंतीने हा वीररसपूर्ण रोप पाठविला.

स्वरथीं चढोनि भगवान् मग जाय पुसावयासि आतेला[१] ॥
तेंचि वदूं, कोण रसिक गोघृत सोडुनि करील आ तेला ॥ १ ॥
सांगे सुयोधनाचें मत संक्षेपे यदूद्वह[२] सतीतें ॥
धर्मासि निरोप पुसे, सुतमार्दव आठवूनि हसतीतें ॥ २ ॥
कुंती म्हणे " वद असें त्या मत्तनयासि कमळनयना ! कीं ॥
परिसोत पूर्वज तुझा प्रेमें सुरगीत अमळ नय नाकीं ॥ ३ ॥
वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं[३] नव 'ट' ॥
वर्षोष्णसह[४] जटिलवर, तरि काय बहू तसे वनीं न वट ॥ ४ ॥
वर्णिति रिपूंत समरीं दाखवितां बाहुबळ जनां भाट ॥
ब्रह्मा[५] नामीं दुसरा योग्य क्षत्रा न जल-ज-नाभा ! 'ट' ॥ ५ ॥
सांग स्वसख्यासि असें, झाली त्वत्सूतकीं[६] गगनवाणी ॥
कीं 'कुंति ! हा अरि बघुनि पद साधिल, तुज सुखा मग न वाणी' ॥६॥
तें सत्य असो, तेंही जें युद्ध पुरांतका[७] महेशासीं ॥
मद्वीरसूत्वहि[८], श्री-स्त्री-कीर्त्यपहार-काम हे शासीं ॥ ७ ॥
भीमासि म्हण " द्यूतीं नेलें जिंकूनि वित्त भीमा जें ॥
तें न स्मरे; न तुमच्या वनवासालाहि चित्त भी माजें ॥ ८ ॥

---

१ कुतीला २ कृष्ण ३ विप्राच्या सेवेच्या योगाने नवीन 'ट' मिळविला म्ह० 'भट'च्या वजी 'भट्ट' झाला, असा भाव ४ पर्जन्यग्रीष्मादि सहन करणारे ५ नामीं दुसरा 'ट' ह्मा ( ब्राह्मणाला ) योग्य, क्षत्रिया न, असा अन्वय ६ तुझ्या जन्मकाळीं ७ त्रिपुरारि करावरोबरचें ८ माझें वीरपुत्र प्रसवणें

सलतें मनांत दुष्टें वोढुन नेली सभेंत कृष्णा तें ॥
स्मरली, त्वांहि उपेक्षा करितां, हरितां निरीस कृष्णातें ॥ ९ ॥
त्या स्मरणें मन पडलें तापीं बहु जेविं तळमळत डागें ॥
हृदयें मोह उघडिला, जैसा ग्रीष्मांत तळमळ तडागें ॥ १० ॥
दावावें यश जोडुनि कुळजानें सुप्रसन्नवदन कुळा ॥
प्रथम पुसोनि कुशल मग जगदीशा तूं असेंचि वद नकुळा ॥ ११ ॥
अयशस्कर तोक पळहि मळवाया धाम वा न रांगावें ॥
जरि न गमेचि, तरि सुखें चित्र-रचित-राम-वानरां गावें ॥ १२ ॥
हें क्षत्रियासि समुचित, ऐसाचि निरोप सांग सहदेवा ॥
जो पांचांत यशस्कर तो माजा पुत्र मूर्तमह[९] देवा ॥ १३ ॥
कृष्णेसि सांग कृष्णा तिळभरहि तुझें उणें न सोशील ॥
त्वां साहिलें असें पळमात्रहि सर्वसहा[१०] न सोशील ॥ १४ ॥
त्वां रक्षिलें, न झाले क्षम रक्षायाहि मत्तनय[११] नातें ॥
असते क्षम, चरणनखां स्पर्शों देते न मत्तनयनातें[१२] ॥ १५ ॥
जरि बुडविलीस माझ्या पुत्रांहीं व्यसन-गर्त-लीनांही ॥
तरि न विटलीस, यापरि सत्वें कोणीहि वर्तली नाहीं ॥ १६ ॥
किंबहुना सांग तयां समयीं जें काय चांगलें कांहीं ॥
कृष्णा, मन्मत हें कीं, यश रक्षावें, न आंग लेंकांही " ॥ १७ ॥

## कर्णाची स्वपक्षपरायणता

कर्ण हा कुंतीचा पुत्र होता, परंतु लहानपणापासून तो कौरवाबरोबर वाढला होता. पुढें कौरवपांडवांचें युद्ध व्हावयाचें ठरलें त्या वेळीं कृष्णानें त्यास पाडवांचा

---

९ मूर्तिमत आनद १० सर्व सहन करणारी पृथ्वी ११ माझे पुत्र १२ उन्मत्ताच्या नेत्रातें.

घेण्यास सांगितलें परंतु त्याने आपल्या हितकर्त्यांचा पक्ष सोडिला नाही. प्रसंगाचें यात वर्णन आहे.

श्रीकृष्ण म्हणे " कर्णा ! तूं कुंतीचा कुमार कानीन[1] ॥
त्वद्वदनोत्थ[2] न पडला अर्थिजनांच्या कधींहि कानीं न ॥ १ ॥
ऐसा वदान्य विद्वान् विश्रुत तूं शुद्ध विप्रजनदास ॥
चाल, भजोत भ्राते तुज, चातक भजति जेविं वनदास[3] ॥ २ ॥
चाल कसा, हो राजा मातेच्या मानसासि दे सुख गा ॥
यांचा तुज काकांचा सहवास, जसा सितच्छदा[4] सुखगा " ॥ ३ ॥
कर्ण म्हणे ' बा ! देवा ! वदसि स्नेहेंचि बा ! दयाळो ! हें ॥
भटकरगें[5] जोडावी स्पर्शमणीची कसी दया लोहें[5] ? ॥ ४ ॥
मातृत्यक्ता मजला राधाहस्तीं दिलें अधिरथानें ॥
मज पाजाया प्रेमें पय पळ धरिती तिचीं न थिर थानें ॥ ५ ॥
दुर्योधन नांवाचा, राजा मी, सर्वराज्यभोग मला ॥
मूर्त नरक नरकाविच्या हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला ॥ ६ ॥
संस्कार विवाहाऽविध केले माझे यथोक्त सूतानें ॥
निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि केविं सूतानें ? ॥ ७ ॥
श्रीकृष्णजी ! करावा कैसा विश्वासघात अवसानीं ॥
युद्ध कसें न करावें ? आम्हां हा युद्धलाभ नवसांनीं ॥ ८ ॥
तरि मग उरलें काय ? प्रभुजी ! त्याजिल्या जरि प्रतिज्ञा त्या ॥
नच सोडवेल देउनि धीर भरंवसा अरिप्राति ज्ञात्या ॥ ९ ॥
राज्य न करील, देइल धर्म मला उमजतांचि हें नातें ॥
देइन सुयोधना मी, तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें ॥ १० ॥

---

१ कुमारदशेंत झालेला पुत्र २ तुझ्या मुखातून निघालेला ३ मेघास ४ श्वेत पक्षास ५ वीराच्या हातातील लोहें म्ह० खड्गानें

आटोपिला न पहिला, तो आटोपेल काय गा ऊत ? ॥
जोडा यश, कवि होउनि रोमांच-व्याप्त-काय गाऊत ॥ ११ ॥
धारातीर्थीच मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें ॥
राज्यपदभोग नलगे, द्यावा देवा रणांत वध मातें ॥ १२ ॥
मज समजलें प्रभो हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र ॥
रवि काळ-रुद्र-दृष्टिसि न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र ? " ॥ १३ ॥
देव म्हणे " राज्य नको उपदेश अयोग्य काय हे महिम्या ? ॥
क्लीबाला कन्यासी, तुज कां द्यावी बळेंचि हे महि म्यां ? ॥ १४ ॥
धनदानें अनघाचा, तुमचा तैसाचि काम रणदानें ॥
म्यां पुरविजेल, द्यावीं स्वर्गें इतरें, न कां मरणदानें ? ॥ १५ ॥
जा, सर्व सिद्ध व्हा जरि आहे उद्युक्त मानस मराया ॥
सम रायास तुम्हांसहि भीमार्जुन वरद, शीघ्र समरा या" ॥ १६ ॥
कर्ण म्हणे " बा वचना मान्य न झालों म्हणों नको पावें ॥
वध्यें वधाचि म्हणतां प्रभुनें आग्रह म्हणोन कोपावें ? ॥ १७ ॥
सत्य उपदेश आम्ही वरिचेवरि भव्य हेतु झेलावे ॥
जाणोनि सर्व देवा लाविसि कां बोल ? हे तुझे लावे[६] " ॥ १८ ॥
श्रीकृष्ण म्हणे " बहुधा मरणाराचि हे समस्त सुपदेश[७] ॥
कीं तव हृदयें माझा हितहि स्वीकारिला न उपदेश " ॥ १९ ॥
कर्ण म्हणे " भेटि असो परलोकीं मात्र बा दयालो, कीं ॥
कलहीं स्नेह न राहे, हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं " ॥ २० ॥
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला सुचिर ॥
मुग्धासहि जडित[८]-कनक-मरकत-नग न गमला तसा रुचिर ॥ २१ ॥

---

६ खेळ  ७ सु+पद+ईश–राजे  ८ सुवर्ण व पाच यांनी जडित अलंकार

## वीरपुत्राची तेजस्विता

कौरवांचा सेनापति द्रोणाचार्य यानें चक्रव्यूह रचिला असता, तो फोडून जाऊन कौरवांचा पराभव करण्याचा अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु याने निश्चय केला, व त्याप्रमाणें त्याने चक्रव्यूह फोडिला. परंतु शेवटीं अभिमन्यूवर सर्व कौरव योद्धे तुटून पडले व त्यांनीं त्याला नि शस्त्र केले व तो मूर्च्छित पडला असता दु शासनाच्या मुलाने त्याचा वध केला. त्या प्रसंगाचें व वीरपुत्र अभिमन्यु याच्या पराक्रमाचें वर्णन यात आहे.

**तिसरे दिवशीं चक्रव्यूह सुदुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥**
**जो धीरवीरहीरप्रवरप्रकरें[1] करोनियां खचिला ॥ १ ॥**
**व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनीं[2] ॥**
**परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेविं रत्नसानु[3] जनी ॥ २ ॥**
**धर्म म्हणे, ' सौभद्रा दुर्भेद्य व्यूह यत्न चालेना ॥**
**व्यूहपुरःस्थितः अस्मत्-गुरु कुरुकटकेश लेश हालेना ' ॥ ३ ॥**
**अभिमन्यु म्हणे, ' चिंता करितां हे व्यर्थ काय हो तात ॥**
**या वाक्यें बहु लज्जित की हे तुमचेचि पाय होतात ॥ ४ ॥**
**तातें कथिला आहे दुर्भेद्य-व्यूह-भेदनोपाय ॥**
**शिरतों, भय काय मनीं ? आहेत सहाय राय हे पाय ॥ ५ ॥**
**व्यूहीं शिरेन शरसा, मागें परतेन एक पदही न ॥**
**युष्मत्पदप्रसादें होतिल युष्मत्सपत्न[4] मदहीन ' ॥ ६ ॥**
**धर्म म्हणे ' त्वद्रचितद्वारें आम्ही समस्त हे मागें ॥**
**येतों रक्षाया तुज द्यावें स्वस्थैर्य धैर्य हें मागें ' ॥ ७ ॥**

---

१ धैर्यवान् वीररूप हिऱ्यामध्ये श्रेष्ठ त्याच्या समुदायाने २ अनुजा (धाकट्या भावा) सह ३ मेरु ४ तुमचे शत्रु.

सौभद्र म्हणे ' शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज वा ॥
हरिपोत[५] दंतियूथीं, की दहनीं करुनियां पतंग जवा[६] ॥ ८ ॥
जें करिन आजि होइल पितृ-मातुल-सुचरितानुरूपचि तें ॥
क्रव्यादांला[७] खाया देइन उधळुनि बलें कुरूपचितें[८]' ॥ ९ ॥
ज्येष्ठ पित्याला देउनि अभय, म्हणे तो सुवीर सूतातें ॥
' हूं हांक रथ, म्हणावी माय सुभद्रा सुवीर-सू तातें' ॥ १० ॥
तो सूत सुमित्र म्हणे ' भो आयुष्मन् कुमार आपण कीं ॥
हांकिन हरि अरिवरि परि कुरुगुरुशीं गांठि, कठिण हा पण कीं'॥ ११॥
हांसुनि सौभद्र म्हणे, हटकीन हठें रणास भीमातें ॥
शक्राऽर्जुनकृष्णाशीं करितां समर न शिवेल भी मातें ॥ १२ ॥
द्रोणानीका मानू जन सागर, मजहि सत्वरा मकर ॥
घे काय न्याय[९]-पर-स्वच्छात्र-नदीज-सत्त्व रामकर[९]' ॥ १३ ॥
तन्निर्बंधें नीटचि चालविला रथ विमानसा सूतें ॥
देती प्रभूक्तिं[१०] श्रितमति, कुलजा जेविं मान सासूतें ॥ १४ ॥
भीमादि सबळ सर्वेहि ते उठले व्यूहकोट फोडाया ॥
इकडुनि कौरवकटकहि होय पुढें शत्रुसैन्य झोडाया ॥ १५ ॥
पावत असतां दोन्ही करुनि सुतुमुलाहवास[११] वध सेना ॥
व्यूहीं सौभद्र शिरे, चित्तेंहि जयांत वासव[१२] धसेना ॥ १६ ॥
प्रभुचा[१३] मर्मी हाणी सर्वांसही तीन तीन शर भाचा[१३] ॥
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा[१४] ॥ १७ ॥

५ सिंहाचा छावा ६ वेगाला ७ मांसभक्षक प्राण्यास ८ कुरु+उपचितें=कुरुसपादित सैन्यें ९ न्यायनिष्ठ असा आपला शिष्य जो भीष्म त्याचें सत्व परशुरामाच्या हातानें घेववेल काय ? १० धन्याच्या आज्ञेस ११ सुतुमुल+आहव=तुबळ युद्ध १२ इंद्र १३ कृष्णाचा भाचा अभिमन्यु १४ अतिबलाढ्य पशुविशेष

अंध म्हणे 'रे ! संजय ! हें त्या पौत्रासि वर्ष सोळावें ! ॥
लोळावें मांडीवरि, तेणें द्रोणादिकांसि घोळावें !' ॥ १८ ॥
संजय म्हणे ' म्हण अनृत, भिष्माचा एकला पणतु मुलगा ॥
करिता झाला गुहसा[१५] बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥ १९ ॥
कुरुसैन्यांत गमे ज्यापरि रंभाकाननांत[१६] वारा हो ॥
त्या विजयश्री देउनि परिरंभा[१७] कां न नातवा राहो' ? ॥ २० ॥
अक्षतधनु तोंवरि हें वीरशिरोरत्न नावरायाचें[१८] ॥
यास्तव सर्वंहि रक्षूं आजि करुनि यत्न नांव रायाचें ॥ २१ ॥
कर्ण करी चर्मांचे, श्रितविघ्नाचे जसे गणप टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर विशस्त्राहि त्या रणपटुकडे ॥ २२ ॥
त्या सौभद्रावरि बळसागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासनसुत धांवे निज-भुज-भुजग-प्रताप मिरवीत ॥ २३ ॥
युद्धचमत्कार रुचिर सुचिर प्रकटुनि महागद भ्राते ॥
अन्योन्यकृताघातें बा मूर्छा पावले अदभ्रा[१९] ते ॥ २४ ॥
आधीं उठोनि, उठतां सौभद्र-शिरीं प्रभो गदा घाली ॥
विवश करी ती, दुष्परिहार्या जेविं प्रभोगदाघाली[२०] ॥ २५ ॥
पडली जशी कराया प्रेक्षक-सुर-विरस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्रतनुहि ओकुनि सरुधिर समस्त कोप रिती ॥ २६ ॥

## अभिमन्यूविषयीं अर्जुनाचे विलाप

संशप्तक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि म्हणे ' कां कांपे मन कांपाविलें जरि स्वयें पर ते ॥ १ ॥

---

१५ कार्तिकेयासारखा १६ कदलीच्या वनात १७ आलिंगनास १८ आवरणार नाही
१९ पुष्कळ २० फार दुःखदायक अघां ( पातकां ) ची आली ( पक्ति )

कंठ गहिवरें भरला, शिरली हृदयांत केशवा ! धडकी ॥
येतें रडें वृथा कां ? बा माझी प्रकृति काय गा ! रडकी ' ॥ २ ॥
अर्जुन अस्वस्थहृदय जाय, गतश्रीक[1] शिबिर पाहून ॥
प्रभुसि म्हणे ' महदप्रियसूचक[2] बहु चिन्ह काय याहून ? ॥ ३ ॥
अतुलप्रताप लोकीं ज्या खलबलजलधिवाडवाभाचा[3] ॥
तो कृष्णा ! आज तुझा मज आला कां न आडवा भाचा ? ' ॥ ४ ॥
शिबिरी शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधोवदन ॥
तें पुत्ररत्न एकचि न निरखिलें सद्गुणर्द्धिचें[4] सदन ॥ ५ ॥
मृदुलप्रकृति न साहे सुतशोका जेविं न रविला पाला ॥
शिबिरीं करी परोपरि नारायणमित्र नर विलापाला ॥ ६ ॥
" जो बहु परपृतनांसी[5] गोपींसी बाळकृष्णसा रमला ॥
दावा हो ! सत्वर तो स्व-गुरु-वचन-गीत-कृष्णसार[6] मला ॥ ७ ॥
ज्याचा शस्त्रीं शास्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज ॥
काय तुम्हीं केला हो ! आणुनि तो भेटवाचि वत्स मज ॥ ८ ॥
बहुधा तुम्हीं धरुनि गुरु-कृत-चक्र-व्यूह-भेद-कामातें ॥
केलाचि पुढें; नाहीं तरि करिता स्पर्श खेद कां मातें ? ॥ ९ ॥
तुमच्या भुजशस्त्रांतें धिक् ! हा निःसार हो खटाटोप ॥
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा[7] टोप ॥ १० ॥
हर ! हर ! जाणों चुरिला तो बाळ करेणुंनीं[8] चरणपातें ॥
शिव ! शिव ! भरतिल कीं हो तो बाळक रेणुंनींच रणपातें[9] ॥ ११ ॥

---

१ निस्तेज २ मोठें अनिष्ट दर्शक ३ शत्रुसैन्यरूप समुद्राला वडवाग्निसारखें तेज आहे ज्याचें असा ४ सद्गुणाच्या समृद्धीचें स्थान ५ शत्रुसैन्याशी ६ ताताज्ञारूप गीतास हरिणासारखा वश ( म्ह० आज्ञाधारक ) ७ वाईट ८ बालहस्तीनी ९ रणातील पतनानें

कुंतीस काय सांगूं ? कृष्णेला दाखवूं कसें वदन ?
दुष्कर मला सुभद्रासांत्वन ! दुर्दर्श उत्तरासदन ! ॥ १२ ॥
याचें स्वरूप कळतें तरि पळ न विसंबितोंचि बाला हो ॥
शिव ! शिव ! म्हणेल मरणावधि वैधव्याधिमग्न[10] बाला हो ॥ १३ ॥
न म्हणे अमृतरस अधिक करि ज्याच्या बाप लालना कवि तो ॥
काय पितृपरिष्वंगज[11] जें सुख त्या बा पलाल[12] नाक वितो ॥ १४ ॥
कां माझें उर न उले ! कवि पवि कीं म्हणति तोक-शोकाला ॥
लोकां लाजे मन, कीं जेविं सुयश हारवूनि ओकाला ॥ १५ ॥
हा ! वत्सा ! रक्ताक्षा झाले त्वत्सुगुण आजि घातकसे ॥
बा ! वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ? ॥ १६ ॥
मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं विशिखजाल[13] वितत रणीं ॥
हें न घडतां, जळेन ज्वलनीं, होतांचि अस्तमित[14] तरणी" ॥ १७ ॥

## हंसकाककथानक

मद्रदेशचा राजा शल्य कर्णाचे सारथ्य करीत असता गर्वाने फुलून आत्मप्रौढी मिरविणाऱ्या कर्णाचा उपहास करण्यास्तव ही कथा शल्याने कर्णास सांगितली.

मग मद्राधीश म्हणे, 'कर्णा ! जें धर्मनीतिचें वतन, ॥
गोब्राह्मणशरणागत ज्यांहीं केलेंचि सर्वथा जतन ॥ १ ॥
संग्रामीं न पळाले, यज्वे[1], मूर्धाभिषिक्त जे राजे, ॥
ज्यांच्या शुद्ध यशासीं तुळितां क्षणही न चंद्रमा साजे ॥ २ ॥
त्यां राजर्षिवरांच्या वंशीं झालों, स्व-धर्म-पथ-गामी[2] ॥
सूत नव्हे, वर देउनि चालविता हा त्वदीय रथ गा ! मी ॥ ३ ॥

---

१० वैधव्यरूप आधीत बुडालेली ११ पित्याच्या आलिंगनापासून झालेले १२ तृणप्राय
१३ बाणाचें जाळें १४ सुर्यास्त होताच
१ यज्ञ करणारे २ आपल्या धर्मानें चालणारा

त्या मजही हित कथितां म्हणसी ‘हितशत्रु’ मत्तसा वदसी ॥
तुज मति मलिनाचि रुचे चोरा जसि कृष्णपक्षि चावदसी[3] ॥ ४ ॥
काककथा कथितों ती ऐकावी मग यथेष्ट वर्तावें; ॥
पडतां गिरिशिखरच्युतबृहदुपलें[4] कीं खलें न पर्तावें ॥ ५ ॥
पूर्वी सागरतीरीं साधुनृपाच्या पुरांत एक धनी ॥
सन्मान्य वैश्य होता, नांदे ज्याच्या स्वधर्मनीति मनीं ॥ ६ ॥
त्या धनिका वैश्याचे होते बहु पुत्र पौत्र गुणवंत ॥
त्यांतें आशीर्वादें गौरविती सर्वदा सदय संत ॥ ७ ॥
त्या वैश्यकुमारांचें भक्षी उच्छिष्ट एक काक सदा ॥
बाळक उदारमतिनें न वदति वाणी कदापि साध्वसदा[5] ॥ ८ ॥
देती वैश्यकुमारक मांसौदन सेवया वडे मांडे ॥
मधु घृत पायस[6] वायस खाय सदा, पक्षिपांसवें भांडे ॥ ९ ॥
सागरतीरीं तेथें आले दैवें कदाचित मराळ[7] ॥
जे मुक्ताफळ भोजन करिती, बिसतंतु भक्षुनि फराळ ॥ १० ॥
पाहुनि हंसांतें ते बाळ स्वोच्छिष्टपिंडपुष्टातें[8] ॥
म्हणती, ‘तूंचि विहंगा! सर्व खगश्रेष्ठ’ त्या सुदुष्टातें ॥ ११ ॥
गर्वें मूर्खपणें तो मानी बाळोक्त सर्व साचार ॥
अधिकचि माजे स्तवनें, न विचार करी मलीमसाचार[9] ॥ १२ ॥
गेला उडोनि गगनीं मग नीच सगर्व काक तो त्यांत ॥
साधूंत खळ जसा, कीं काचमणी परमशुद्ध मोत्यांत ॥ १३ ॥

---

३ चतुर्दशी, हें विलक्षण रूप केवळ यमक साधण्यासाठी केलेलें दिसतें! ४ पर्वताच्या शिखरावरून पडणाऱ्या बृहत् (मोठ्या) उपलानें (दगडाने) ५ भय देणारी ६ खीर ७ हस ८ आपल्या उष्ट्या अन्नावर पुष्ट झालेल्या (कावळ्यास) ९ मलीमस+आचार (दुष्ट वर्तनाचा)

जाणे त्या हंसांत श्रेष्ठ जया त्यासि तो म्हणे काक ॥
'दोघे उडों,' तुझें बळ पाहों दे मत्समीप ये ठाक ॥ १४ ॥
म्हणती हंस तयातें, गर्वभरें करिसि वायसा चार[१०] ॥
आम्ही मानस-वासी, सर्व-खगांचेहि राय साचार ॥ १५ ॥
रे बलिपुष्टा ! दुष्टा ! कैसें हंसासमेत उडशील ॥
साहस करितां सहसा स्पष्ट व्यसनार्णवांत[११] बुडशील ॥ १६ ॥
वायस बहु हंसाच्या हितवचनाची करून कुत्सा[१२], हें ॥
वदता झाला त्यांसीं पुनरपि तो गर्व-राशि उत्साहें ॥ १७ ॥
शतपात[१३] जाणतों मी उडेन एकैक पात शतगावें[१४] ॥
मजसीं उडतां अन्या खगमाचें पक्षवीर्य न तगावें ॥ १८ ॥
हांसोनि एक हंस ध्वांक्षासि[१५] म्हणे, 'तुझ्या गती शतशा ॥
आम्ही हंस समस्तहि एकचि गति जाणतों, दुज्या न तशा ॥१९॥
'जाणें एका गतिला, त्याचि गतीने उडेन आकाशीं, ॥
माने तिनें उडे तूं' बोले ऐसें मराळ काकाशीं ॥ २० ॥
तों बहु हांसती जे कीं आले होते मिळोनि तज्ज्ञाती[१६] ॥
शतविधि गतिहुनि अधिका, परि तुच्छा भासली अतज्ज्ञां[१७] ती ॥२१॥
हंस उडे तों त्यासीं स्पर्धेनें कावळा उडे व्योमीं, ॥
शतपात पातकालय[१८] दावी सांगों प्रकार किति तो मी ? ॥ २२ ॥
स्वज्ञातिश्रेष्ठाचें गतितांडव पाहतांचि काकांनीं ॥
हर्षभरें नभ भरिलें, 'का का का का' अशा स्वहाकांनीं ॥ २३ ॥

---

१० चेष्टा ११ संकट समुद्रात १२ अनादर १३ शभर प्रकारचीं उड्डाणें १४ चारशें कोस १५ कावळ्यास १६ त्याचे ( कावळ्याचे ) ज्ञातिजन १७ त्याला ( कावळ्याला ) माहीत नसलेली १८ पातकाचें घर ( कावळा )

मृदुपातें हंस उडे, काकाहुनि हीनशक्तिसा भासे ॥
ऐसें मुहूर्तभरि तो दावी, तों काक-मंडळी हांसे ॥ २४ ॥
हंसांसि काक म्हणती, ' हा हारविलाचि की भवज्ज्ञाती ॥
आयकिली दूरुनि त्या सर्व मराळोत्तमें अवज्ञा[१९] ती ॥ २५ ॥
मग पश्चिमदिग्देशीं शीघ्र शिरे हंस, काकही मळधी ॥
जिकडे होता कर्णा ! गंभीर अपार खोल तो जलधी ॥ २६ ॥
मागें धांवे वायस, हंस पुढें, सोडिला जसा तीर ॥
स्पर्धेंत काक नेणे कीं केवळ दूर राहिलें तीर ॥ २७ ॥
पक्षांचें बळ सरलें, गर्व मनींचा मनांतचि जिराला ॥
घे[२०] धाक काक, सागर सर्वत्र दिसे निराश्रय[२१] विराला ॥ २८ ॥
न दिसे अग[२२] नग[२३], मग तग[२४] गगनीं खग नीच काय काढील ॥
चित्तीं म्हणे ' समय हा मज काळाच्या मुखांत वाढील ' ॥ २९ ॥
अवलोकिला मराळें अत्यंतासन्नपतन[२५] पामर तो ॥
मग आणिलें मनीं कीं, ' यावरि म्यां न करितां कृपा मरतो ' ॥३०॥
ऐसें सत्पुरुषव्रत आठविलें, मग म्हणे मराळ, ' अगा ! ॥
बहुगतिचतुरा ! पतितें शत कथिलीं त्वां स्वयेंचि काकखगा ॥३१॥
तुंडाग्रें पक्षयुगें शिवसी काका ! क्षण क्षण जळाला ॥
या गतिचें नाम कथीं, दे टाकुनि सर्व संशय जळाला ॥ ३२ ॥
ये ये झडकरि, हा मी हंस तुझी वाट पाहतों करटा ! ॥
या लक्ष-योजनांबुधि-परतीरीं आमुचा असे घरटा ' ॥ ३३ ॥

---

१९ हेळणा २० धाक घे=धाबरला २१ आश्रयहीन झालेला (कावळा) गर्भगळित झाला २२ वृक्ष २३ पर्वत २४ मग तो नीच गगनी तग काढील ( टिकाव धरील ) काय २५ अगदीं पडण्याच्या बेतात आलेला

नेत्रीं नाकीं कानीं क्षारोदक, पक्ष जाहले ओले; ॥
केवळ विव्हळ दुर्बळ तो खळ आर्तस्वरें असें बोले ॥ ३४ ॥
'केली तुजसी स्पर्धा तत्फळ हें व्यसन पावलों सद्या[२६] ॥
शरणागतासि रक्षी हो कीर्ति तुझी जनांत अनवद्या[२७] ॥ ३५ ॥
सदया ! निजदेशाप्रति जरि मज नेशील तरि विभो ! मग मी ॥
शलभांहि नम्र होइन, बा ! सांगों काय मदधिकीं ख-गमीं' ॥३६॥
ऐसें वदे, रडे बहु, खाय गटकळ्या जळांत, करि का का ॥
धांवे मराळ, चरणीं कवळुनि काढी क्षणांत वरि काका ॥ ३७ ॥
वाहे त्या दीनातें पृष्ठीं तो ब्रह्मवाहनहि[२८] हंस ॥
घेउनि गेला सागरतीरातें सर्वसज्जनवतंस ॥ ३८ ॥
स्वसमातें अधिकांतें अवमानी दुष्ट काक तूंहि तसा ॥
तो बहुमत वैश्यसुतां धृतराष्ट्राच्या सुतांसि तूं हितसा ॥ ३९ ॥
तव दर्प सर्पसम शर हाणोनि उरीं हरील विष्णु रणीं ॥
ते उमजसील, न उरे व्याघ्ररवें वीर्य लेशाही उरणीं[२९] ॥ ४० ॥
लोकप्रसिद्ध सन्मत तेजस्वी कृष्ण[३०] चंद्रसूर्य तसे ॥
खद्योत[३१] प्राकृत तूं; ते त्वत्तेजांत लोपतील कसे ? ॥ ४१ ॥
ऐसें जाणूनि वृषा ! आटोपीं परम चंचला जिभली, ॥
कर्णा ! सावध सावध सावध रे ! गति नसेचि आजि भली ॥४२॥

## कर्णवध

भारतीय युद्धात कौरवाचा सेनापति या नात्याने कर्ण लढत असतां, अर्जुनाच व ह्याचा सामना झाला व त्यांत शेवटीं कर्ण मारला गेला. तो प्रसंग व त्या वेळच याचा कृष्णाबरोबर झालेला संवाद यात वर्णिला आहे.

---

२६ तत्क्षणीच २७ निर्दोष २८ ब्रह्मदेवाचें वाहन असूनही २९ मेंढरांत ३० कृष्ण व कृष्ण ( अर्जुन ) ३१ काजवा

राधापुत्र[१] बहु करी बाधा पार्थासि तेधवां त्याला[२], ॥
राधाहृच्चोर[३] म्हणे, ‘ बा ! धाक प्राप्त कां तुला झाला ॥ १ ॥

सावध होईं वीरा ! पुनरपि अस्त्रासि शीघ्र अभ्यासीं[४] ॥
पावेल कोण खळ जय संगर तुजसीं करूनि सभ्यासीं ?’ ॥ २ ॥

देतां धीर प्रभुनें, पार्थ मनामाजि धरूनि कोपातें ॥
अभिमंत्रुनि रौद्रास्त्रें, हस्तीं घे अहिवरोग्ररोपातें[५] ॥ ३ ॥

तों वृष भूमि-ग्रस्त-स्यंदन-चक्रासि उद्धरायातें, ॥
उतरे, स्वरथाखालें, करुनि असें तुमुल युद्ध राया ! तें ॥ ४ ॥

उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांहीं धरूनि चक्राचें ॥
परि पृथिवी सोडीना, जाणों व्रत घेतलेंचि नक्राचें ॥ ५ ॥

त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रांसि वृष म्हणे ‘ हाय ! ’ ॥
काय[६] करील ? न साहे तें, बहु मर्मींहि साहिले घाय ॥ ६ ॥

स्व-वधोद्यतार्जुनातें कर्ण म्हणे, ‘ बळ तुझें अनंत रहा ॥
स्वस्थ मुहूर्तभरि, रणश्रद्धा पुरवील गा अनंतर हा ॥ ७ ॥

रक्षावा धर्म बुधें, कुशलाचा धर्म हा निधी; राहें ॥
स्थिर जें करिसि निरायुधमथन[७] करिल धर्महानि धीरा ! हें’ ॥ ८ ॥

कृष्ण म्हणे, ‘राधेया ! भला बरा स्मरसि आजि धर्मातें ॥
नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि न स्वकर्मातें; ॥ ९ ॥

जेव्हां तूं दुर्योधन, दुःशासन, शकुनि एकमति झाला, ॥
कैसे कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्याला ॥ १० ॥

---

१ कर्ण २ अर्जुनाला ३ कृष्ण ४ योजना कर ५ सर्पश्रेष्ठवत् भयंकर बाणातें
६ मर्मस्थळीं बाण प्रहार सोशिले पण रथचक्र काढववत नाही, हा कमीपणा सोसवत नाही, असा भाव ७ ज्याच्या जवळ शस्त्र नाहीं त्यावर शस्त्राघात

जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ॥ ११ ॥

केले दग्ध जतुगृहीं[8] त्वां पांडव वारणावतीं जेव्हां ॥
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥ १२ ॥

अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ? ॥ १३ ॥

पूर्वी धर्म न रुचला त्यजिला निपटूनि तो जसा कुचला ॥
आतांचि बरा सुचला ? धर्मगृहा, सर्व व्हा परासु, चला ॥ १४ ॥

रक्षावा धर्म असा करिसी उपदेश, तरि असे मान्य ॥
रक्षितसो धर्मातें, आम्हांला धर्म ठाउका नान्य' ॥ १५ ॥

आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें, ॥
निश्वास वृषें लज्जावनतमुखें[9] सोडिला जसा नागें ॥ १६ ॥

न वदे कांहीच, रथीं वेगें तो सूर्यसूनु, चापातें ॥
जोडी बाण, कराया[10] मूर्छित शक्रासि सूनुच्या पातें ॥ १७ ॥

शर सोडिला रविसुतें, धीरजनेंहि स्वधीर, यामागें ॥
जो सोडिलाचि नव्हता व्यसनांत कधींहि; मणि जसा नागें ॥ १८ ॥

तो शर गर-धर-खर-सा, पविसा, रविसा स्मरारि[11]-सायक-सा ॥
पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि[12] नागनायकसा ॥ १९ ॥

त्या खर-शर-प्रहारें विव्हल झाला महेन्द्र-सुत राया ॥
जरि होता निकट कुशल मंत्री प्रभु बाणसर्प उतराया ॥ २० ॥

८ लाक्षागृहांत ९ लज्जेने ज्यानें नोड खालीं घातलें आहे त्यानें १० सूनुच्या पाते ( स्वपुत्र अर्जुनाच्या वधाने ) शक्रातें ( अर्जुनपिता इद्र त्यातें ) मूर्छित कराया ११ मदनशत्रु शंकराच्या बाणासारखा १२ वारुळात

ऐसा निज-भुज-विक्रम दावुनि सर्वां भटांसि शुद्धरणीं[१३], ॥
उतरे वृष दावाया[१४] भू-ग्रस्त-रथांघ्रिच्याहि उद्धरणीं ॥ २१ ॥
जों वृष करीत होता चक्रोद्धरणप्रयास तापार्थ[१५] ॥
राहुविमुक्तार्क[१६] जसा झाला गतमोह भासता पार्थ ॥ २२ ॥
देव म्हणे, ' पहिलें गुरुनाम, मग स्वधनु, बाण बरवे घे ॥
खंडीं शिर, रिपु पुनरपि जों रथरत्नाचिया न वर वेंघे' ॥ २३ ॥
योजुनि महास्त्रमंत्रित शर विजय म्हणे, ' जरि स्वगुरु सर्व ॥
तोषविले असतील, ज्ञानबळाचा नसेल तिळ गर्व ॥ २४ ॥
विधिनें जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा ॥
तरि या शरें वृष मरो, हरिचीच पुरो पुरो न तपनाशा[१७] ॥ २५ ॥
ऐसें म्हणोनि पार्थें ओढुनियां सगुण[१८] बाण कर्णान्त ॥
पाठविला काळें निजदूत तसा व्हावयास कर्णान्त ॥ २६ ॥
तो शर कृत्यानळसा[१९] दुर्घट[२०]–चक्रोद्धति–क्रियानळसा ॥
गांठी कुरु-बळ-विजय-प्रासादाच्या रविप्रभा[२१] कळसा ॥ २७ ॥
शाणनिशितमुख[२२] बाण प्राणभृदीड्यार्क[२३]–सूनुच्या अमळा ॥
खंडी नाळापासुनि[२४] कमळा मारुत तसा शिरःकमळा ॥ २८ ॥
सास्राश्रु[२५] शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं गळालें हो ! ॥
मग सकुसुमवृष्टि तनू; सधर्मभयशत्रुबळ[२६] पळालें हो ॥ २९ ॥

---

१३ धर्मयुद्धात १४ ( विक्रम ) दावाया १५ व्यर्थ श्रम करण्यास्तव १६ राहूच्या ग्रहणातून मुक्त झालेला सूर्य १७ ( कर्णपिता ) सूर्य त्याची आशा १८ दोरीसह १९ अविचारानें उत्पन्न केलेल्या राक्षसीच्या अग्नीप्रमाणें २० दुस्साध्य अशा चक्र काढण्याच्या कामी आळशी नाहीं अशास २१ रवीपासून जन्मलेल्यास (कर्णास) २२ साहाणेवर घांसून ज्याचे टोंक तीक्ष्ण केलें आहे असा २३ प्राणिमात्रांनीं ईड्य ( स्तुत्य ) अशा अर्काच्या (सूर्याच्या) पुत्रास २४ देंठापासून २५ आप्तांच्या अश्रूसह २६ धर्माच्या भीतिसह शत्रुसैन्य

कर्णशरीरापासुनि तेज निघालें दिवाकरीं शिरलें ॥
गुरुहृच्छोकतमावरि[27] जाणों सत्पुत्रसत्व तें फिरलें ॥ ३० ॥

## दुर्योधनाचा बाणेदारपणा

समरांगणीं चित होऊन मरणोन्मुख पडला असतांही दुर्योधनास कृष्णाचे मर्मभेदक शब्द सहन न होऊन त्यानें कृष्णाला समर्पक उत्तर देऊन हिणविलें व त्याचा अन्याय त्याच्या पदरात घालण्याचा प्रयत्न करून, आपण ऐश्वर्य भोगिलें व शेवटपर्यंत सार्वभौमत्व गाजविले इत्यादि सप्रमाण सिद्ध केले, तो प्रसंग यात वर्णिला आहे

केशव, ' म्हणे, 'सुभट हो ! मृतमारण हें तुम्हां नव्हे युक्त ॥
मेला तैंच गुरूचें[1] जेव्हां याणें विलंधिलें उक्त ॥ १ ॥
मेला दुर्जन, झालें बहु बरवें, सर्व वारिली पीडा ॥
खळ साधुपदा भोगित होता, बक जेविं हंसखगनीडा[2] ' ॥ २ ॥
या स्वाधिक्षेपें[3] तो नृप उठला धरुनियां मनीं राग ॥
आगस्करघातार्थी[4] पुच्छच्छेदार्तधी जसा नाग ॥ ३ ॥
कोपें कृष्णासि म्हणे, " आइक रे ! कंस-दास[5] दायादा ! ॥
निर्लज्जा ! कपटा तव हृदया तसि गांठि जसि नदा यादा[6] ॥ ४ ॥
या फाल्गुनासि सांगुनि कपट हळुच खूण दावुनी भीमा ॥
त्वां मोडविल्या माझ्या मांड्या त्वत्कैतवा नसे सीमा ॥ ५ ॥
जो धर्मयुद्ध दुर्जय वरुणा, धनदा, द्युपा,[7] यमा, रविला ॥
त्वां स्त्रीपूर्व[8] शिखंडी करुनि पुढें आपगेय[9] मारविला ॥ ६ ॥

---

२७ पित्याच्या ( सुर्याच्या ) हृदयातील शोकरूप अंधःकारावर

१ धृतराष्ट्राचें २ हंसाच्या घरट्यास ३ आपल्या निंदेनें ४ अपराध करणाराचा नाश करू इच्छिणारा ५ कंसाचा दास वसुदेव त्याच्या पुत्रा ६ जलचराला ७ इंद्रास ८ प्रथम जो स्त्री होता ९ नदीपुत्र ( भीष्म )

शिकवुनि धर्मा ‘ अश्वत्थामा मेला ’ असें अलीक रणीं ॥
गुरुघातार्थ वदविलें त्वां स्पष्ट, तुझी नव्हे भली करणी ॥ ७ ॥

तैसाचि अश्वसेनव्याळशर[10] च्छद्म करुनि चुकवीला ॥
मारविलें त्वां चक्रव्यसनी कर्णा अशाहि सुकवीला ॥ ८ ॥

आम्हां असें बुडविलें त्वां बहु निजधर्मनिरतकपटानें ॥
झांकिल कसें अनार्या ! स्ववदन यदु सुरसभेंत न पटानें” ॥ ९ ॥

देव म्हणे, “ गांधारे ! मेलासि सपुत्रबंधु तूं दुरितें ॥
मच्छलकर्म, सुदारुण वज्र तसें, बहु दृढासही चुरितें ॥ १० ॥

भीष्म द्रोण सुदुर्जय परि मेले हे तुझ्याचि पापानें ॥
ज्यां प्रबळां जोडावे हात जयंताचियाहि बापानें ॥ ११ ॥

होता सुरासुरनरोरगदुर्जय कर्णही जसा रुद्र ॥
व्यसनी पडोनि मेला की नव शीलानुवर्तक क्षुद्र ॥ १२ ॥

दुःशासन केश धरुनि कृष्णेस्सि जधीं सुयोधना कर्पी ॥
म्यां तेव्हांचि वधुनि तुज हृष्ट करावे सुयोध नाकर्पी ॥ १३ ॥

बहुतांनी विरथ करुनि वधिला अभिमन्यु एकला बाळ ॥
तें अघ करिल तुझी, जसि वृद्धाची निर्धनत्व आवाळ ॥ १४ ॥

केला घात अधर्मे असि मजवरि घालितोसि कां आळ ? ॥
व्यालसम पोषिला जो तो त्वद्धर्मचि खळा तुझा काळ ॥ १५ ॥

राजा म्हणे, “ विसरलों मी सांगा करुनि पाठ वेदा न ॥
पात्रा न दिलें ऐसें एकहि मजला न आठवे दान ॥ १६ ॥

---

१० खांडवनदहनसमयीं अर्जुनानें तक्षकपुत्र अश्वसेनाच्या आईचा वध केला. ते वैर धरून अश्वसेन गुप्तरूपानें कर्णाच्या बाणावर राहिला, परंतु हा बाण कृष्णानें युक्तीनें चुकविला, ही कथा येथें ध्वनित होते.

अखिलाहि भोगिली म्यां पृथ्वी, परमस्तकीं दिला पाय ॥
स्वंततर[11] कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिले काय ? ॥ १७ ॥
अभिमुख शस्त्राघातें समरमखामाजि वेचिलें काय ॥
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ १८ ॥
मद्भोग मदैश्वर्य प्रेक्षुनि वदले समस्त अरि, 'हाय' ॥
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ १९ ॥
सत्कारील सुरांचा ससुहृत्सुतसोदरा[12] मला राय ॥
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ २० ॥
ज्या वीरसू तयांला झाली मान्या जगत्रयी माय ॥
स्वंततर कवण मजहुनि आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ २१ ॥
प्रविहतसंकल्प[13] तुम्ही झालां सर्वहि बुडाल शोकांत ॥
सकळ सहायांसह मी प्रमुदित होईन वीरलोकांत" ॥ २२ ॥
या वाक्याच्या[14] झाली कुरुपतिवरि पुष्पवृष्टि अवसानीं ॥
सुर झाले हृष्ट जसे जन होतां कामपूर्ण नवसांनीं ॥ २३ ॥

## उत्तराविलाप

अंकी मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें, ॥
चुबुक[1] धरुनि बोलविते 'लिहिलें ऐसें कसें महापतितें ?' ॥ १ ॥
म्हणते 'मौन त्यजुनि स्मितपूर्वक एक बोल बोला जी ॥
ती कसि निवेल तुमच्या प्रियवागमृतींच नित्य लोला जी ॥ २ ॥
हा जन सखीसमाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला ? ॥
चुकले, क्षमा करावी, पसराया उशिर काय पदर मला ॥ ३ ॥

११ सु+अंत+तर=अधिक चांगला ज्याचा अंत झाला आहे असा १२ मित्र पुत्र बांधवासह अशा मला १३ ज्याच्या इच्छा नष्ट झाल्या आहेत असे १४ भाषणाच्या शेवटी
१ हनुवटी

नसतां उशी, उशीरव्यजन[2] पयःफेनशुभ्र मृदुशयन, ॥
कशि निज आली जरि शिर न मदंकीं, पदतळींहि हा शय न ॥४॥

अपराध कां करिल ? हे जाणे पतिदास्यधर्म साध्वी की ॥
अजि तीर्थबुद्धि[3] केवळ जी युष्मत्पीतशेषमाध्वीकीं[4] ॥ ५ ॥

नेत्रें उघडूनि पहा दासी तुमचीच हे, नव्हे अन्या, ॥
भलती स्पर्शेल कशी ? मी सत्य विराटनृपतिची कन्या ॥ ६ ॥

हा सातवा परिचया मास, पहा गणुनि लोटले साच ॥
इतुक्यांत कसे विटलां ? साधु म्हणति सख्य साधुसीं साच ॥७॥

आर्या कृष्णा देवी, आर्या कृष्णानुजा, पृथा आजी, ॥
यांवरि रुसलां कैसे जातां सोडूनि कां वृथा आजी ॥ ८ ॥

सहदेव, नकुळ, अर्जुन, भीम उभे आर्य, धर्म मामाजी ॥
हे तात काय जेथें न बहुमता दे मुखांत आमा[5] जी ॥ ९ ॥

श्रीकृष्णजी ! तुम्हांला पाहुनि, रचिला तुम्हां असाचि गुणें ॥
सुकुशल विधि, परि पडलें मुख्य प्रेमी गुणांच फार उणें ॥ १० ॥

कृप, कर्ण, चयद्रथ, गुरु, गुरुपुत्र क्रूर हे जसा काळ ॥
धिक् त्यांतें अन्यायें विरथ करुनि मारिला जिहीं बाळ ॥ ११ ॥

वीरा कोणा पांडव माधव तव हे न नाथ ! सा[6] मान्य ? ॥
मेलासि असाहि कसा सहसाचि जसा अनाथ सामान्य ? ॥ १२ ॥

अत्यद्भुतही सुखद न यांचा यांतेंहि न महिमा मातें ॥
सुखदा होइल, मारुनि रिपुला, विपुलाहि न महि मामातें[7] ॥ १३ ॥

---

२ वाळ्याचा पखा ३ तीर्थवत् पवित्र मानणारी ४ तुम्ही पिऊन बाकी राहिलेल्या मद्याच्या ठायीं ५ स्तन, जी मुखात आमा दे ( अशी सुभद्रा माता ) जेथें बहुमता न ( तेथें ) हे तात काय ? असा अन्वय ६ सद्दा ७ कृष्णातें

तुजवांचुनि वांचुनि सुख कैचें हा काय भार, तार मला ॥
ने, हंस मानसीं निजहंसीविण काय भारता ! रमला ? ॥ १४ ॥
उदकीं लवण, तसें हें करिलचि शोकांत उर विलीन सती ॥
असती मृदु तरि पळ या तापें लोकांत उरविली नसती ॥ १५ ॥
बहु अप्सरा सुरसुता आहेत मनोविनोदकुशला हो ! ॥
पाणिग्राह्यत्वातें[८] तोहि जन उशीर, हाहि कुश लाहो ॥ १६ ॥
येइन कशितरि सखयाप्रति पायांची न वाहुं दे शपथ ॥
न विसंवेल पळहि मज, आणिल तव शोक पुसत देशपथ ' ॥१७॥

## धर्मास राज्याभिषेक

' धर्मा ! राज्य कर अशा या विप्रांचें सभाजन[१] कराया ॥
संसारीं धन्य करिल तुज हे जसि मुनिसभा जनकराया ' ॥ १ ॥
या गुरुवरोपदेशीं कुंतीसुत शोक दैन्य सोडून ॥
प्राङ्मुख[२] कांचनपीठीं बैसे विप्रांसि हात जोडून ॥ २ ॥
तदभिमुख सुमणिकांचनपीठीं श्रीकृष्णसात्यकी बसले ॥
भीमार्जुन नृपमध्यें घालुनि कनकासनीं समुल्लसले ॥ ३ ॥
सहदेव-नकुल घेउनि दांतीं[३] सिंहासनीं पृथा वसली ॥
जसि काय देवहूती[४] योगयुगयुता[५] तदाश्रमीं वसली ॥ ४ ॥
अभिषेकाचें आल्या घेउनि साहित्य सर्वही प्रकृती ॥
पूर्वांग[६] भगवदुक्तें करिती धौम्यादि सर्व विप्र कृती ॥ ५ ॥
व्याघ्राजिन वेदींवरि, अंथुरिला पट तयाउपरि धवल ॥
धौम्यें धर्म बसविला त्याच्या द्रुपदात्मजा सती जवळ ॥ ६ ॥

---

८ अप्सराजनरूप वाळा व उत्तरारूप दर्भ हस्तग्रहणाचा लाभ घेवोत
१ पूजन २ पूर्वेस तोंड करून ३ हस्तिदताच्या ४ कपिल महामुनीची माता
५ योगमार्ग व कालस्वरूप यानीं सपन्न ६ राज्यारोहणाचें पूर्वकर्म

केला होम यथाविधि, तृषितज्वलनासि पाजिलें प्राज्य ॥
आज्य सुखें यजमानें, बहु निष्कंटक करावया राज्य ॥ ७ ॥
मग सांठविलें आहे ज्याच्या निःशेष विश्व हें उदरें ॥
कृष्णेसह धर्मातें अभिषेकी देवदेव तो सुदरें[7] ॥ ८ ॥
धृतराष्ट्रहि अभिषेक स्वकरें धर्मी दरेंकरूनि करी ॥
निजमस्तकीं शमाया संताप जसा करेंकरूनि[8] करी ॥ ९ ॥
अभिषेचुनि वृद्ध म्हणे ' दिधलें तुज सर्व राज्य पुत्रा ! म्यां ॥
जैसें पूर्वी कश्यपमुनिनें अभिषेक करूनि सुत्राम्या ॥ १० ॥
सर्व प्रकृतिहि धर्मा त्याचि कनकभूषिते दरें वरें ॥
रामाभिषेकसमयीं जेवि तसिच त्या महोत्सवीं हर्षे ॥ ११ ॥
धर्म पदीं बैसवितां श्रीमत्कृष्णें अशापदेवाद्यें ॥
बहु वाजविलीं दुंदुभि-वीणा-पणवानकादि जयवाद्यें ॥ १२ ॥
दिधलीं युधिष्ठिरानें त्या विप्रांला असंख्य धनदानें ॥
वाटे वांटाया निधि दिधले नवही तयासि धनदानें ॥ १३ ॥
हृष्ट ब्राह्मण वदले ' त्वां व्रत हें घेतलें न नव संतें ।
पूर्वी तसें पुढेंही सुखवावें जग, जसें वन वसंतें ॥ १४ ॥
विप्रांतें प्रकृतीतें धर्म म्हणे ' धन्य धन्य मी आजी ॥
गुण घेतां जरि आख्यारीति असी बहु विलक्षणा माजी ॥ १५ ॥
झालां प्रसन्न सर्वहि जरि तरि मजवरि करा प्रसाद असा ॥
होती जी धृतराष्ट्रीं त्या वृत्तीतेंचि वाढवीत असा ॥ १६ ॥
याचें प्रिय शासन तें माझें, याहूनि अन्य मी नाहीं ॥
न्हदवृद्धिनेंचि व्हावें तद्भजन करूनि धन्य मीनांहीं ॥ १७ ॥

---

७ उत्तम शखान ८ मोडनें ९ कुबेरानें

करुनि ज्ञातिवध असा म्यां न वहावाचि काय; परि साचे ॥
याचें शुश्रूषण मज हित, लोहा जेविं काय परिसाचें ॥ १८ ॥
किंकर पांचहि आम्ही, राजा धृतराष्ट्र, हे धरा याची ॥
कथिली वेदाज्ञासी राजाज्ञा हे मनी धरायाची' ॥ १९ ॥
सांगुनि सर्वांसि असें त्या नीति-प्रीति मति सुधा निधिनें ॥
भीमासि यौवराज्य प्राज्यस्नेहोत्सवें दिलें विधिनें ॥ २० ॥
सर्वज्ञा, सकळ-सुकवि-तिलका, प्रबळाहिताद्रिच्या[10] भिदुरा ॥
षाड्गुण्य[11], मंत्रनिश्चय यांचा अधिकार धर्म दे विदुरा ॥ २१ ॥
आयव्यय आणि कृताकृत यांच्या चिंतनीं परिज्ञानी ॥
संजय नियोजिला. कीं भ्रमवी श्री, न भ्रमे परि ज्ञानी ॥ २२ ॥
सैन्याधिकार नकुळा, ज्याच्या बाहूंसि शक्रपुर गातें ॥
त्या परचक्रवधाचा दिधला अधिकार शुभ्रतुरगातें[12] ॥ २३ ॥
देता झाला देवब्राह्मणकार्याधिकार धौम्यातें ॥
दे अधिकार स्वनिकट सहदेवातें सुसाधुसौम्यातें ॥ २४ ॥
कीं निधितें यक्षपसा त्यातें करि तोचि सर्वदा जतन ॥
सहदेव वृत्तिमंतचि[13], जाणों श्रीधर्मराज तो वतन ॥ २५ ॥
ज्यां ज्यांसि योग्य जें जें, सांगे त्यां त्यांसि धर्म तें कार्य ।'
सांगे युयुत्सुसंजयविदुरातें प्रार्थुनी असें आर्य ॥ २६ ॥
' नित्य प्रातःकाळीं संध्याकाळीं पुसोनि आर्यातें[14] ॥
बहु अप्रमत्त निरलस होऊनि करा प्रभूक्तकार्यातें' ॥ २७ ॥

---

१० बलाढ्य शत्रुरूप पर्वताच्या वज्रास ११ संधि, विग्रह, यान, आसन, द्वैध व आश्रय या गुणाचा समुदाय तें १२ अर्जुनातें १३ वतनदार १४ धृतराष्ट्रानें

## भीष्मनिर्याण

उघडुनि नयनें भीष्म, प्रेक्षुनि सर्वांकडे, म्हणे ' धर्मा ! ॥
आलासि बरा समयीं, वत्सा ! मी बहुत पावलों शर्मा ॥ १ ॥
वत्सा ! धृतराष्ट्रा ! तूं ज्ञाता, तुज पाठ चारही वेद ॥
भावि कदापि चुकेना, आतां कांहीं करूं नको खेद ॥ २ ॥
चिंतामणिची तापा जसि न, करुनि शर्महानि[1], दे शाला, ॥
सत्संगति तसि; न तुझ्या उल्लंघिल धर्म हा निदेशाला ' ॥ ३ ॥
इतुकें धृतराष्ट्राला सांगुनि, मग त्यासि आपगा-तनय ॥
नमि, ज्याचे रिपु वसले ज्यासह होऊनि आप[2] गात नय ॥ ४ ॥
' पांडव आहेत तुझ्या पदरीं, म्यां रीति म्हणुनि निरवावे ॥
आप्तत्व तुजपुढें बा त्रिजगज्जनका ! कशास मिरवावें ? ॥ ५ ॥
नारायणा ! त्वदाज्ञा होतां हा, जेविं मंडपा वेल ॥
उत्तम लोकासि तुझा सेवक होऊनि थंड पावेल ' ॥ ६ ॥
कृष्ण म्हणे, ' या लोकीं, म्हणसी होवूनि सज्ज, न वसूं; तें ॥
रुचलें; जा पाव सुखें भीष्मा ! तूं सुज्ञ सज्जन वसूतें[3] ॥ ७ ॥
मार्कंडेय तसा तूं पितृभक्त, मुनींद्र वर्णिती बा ! हे ॥
यास्तव मृत्यु तव वशीं आनत होऊनि भृत्यसा आहे ' ॥ ८ ॥
आज्ञा देतां देवें, भीष्मा प्रतिपाल्य जे सदा वपुसे ॥
पांडव, धृतराष्ट्र, विदुर सर्व सुहृद्वर्ग जे, तयांस पुसे ॥ ९ ॥
परिसा हो ! सर्व तुम्ही मागतसे भीष्म हा निरोपातें ॥
' लोभ न देवू सत्वा, दे जेंवि ग्रीष्म हानि रोपातें ॥ १० ॥

---

१ सुखनाश २ आप होऊनि ( =आप्त होऊन ) ज्यासह ज्याचे रिपु नय गात वसले असा अन्वय ३ वसुलोकातें

रक्षुनि शुद्धयशातें मेळवितें जेविं सत्य, यश तातें ॥
तेविं न मेळविलें; हो ! हेंचि करी दूर अत्ययशतातें[4] ॥ ११ ॥
भूतीं दया असो द्या; व्हा इंद्रियषडरिनिग्रहीं धीट ॥
सोडुनि अन्य पथ धरा निजधर्माचारमार्ग हा नीट ॥ १२ ॥
चैतन्य[5] सम पहावें, गुरु लघु देहें दिसो करी कीट ॥
ब्राह्मण सत्काराचा येवूं देवूं नका मनीं वीट ' ॥ १३ ॥
सर्वांसि पुसुनि शंतनुसुत तो राहे मुहूर्तभरि उगला ॥
फुगला सुखें, मनांत श्रीकृष्णाच्या धरूनि पदयुगला ॥ १४ ॥
झालीं क्षणें विशल्यें भीष्माचीं वीररससुधापात्रें[6] ॥
कृष्णप्रमुखांचींही झालीं रोमांचितें तदा गात्रें ॥ १५ ॥
भेदुनि मस्तक आत्मज्योति महोल्का[7] तसी शिरे व्योमीं ॥
मुनि वदले " या तेजीं तें आल्हादप्रदत्व, जें सोमीं " ॥ १६ ॥
रत्न–कनक–गंधांबर–माल्यांहीं भीष्मदेह तो भावें ॥
धर्म, विदुर शोभविती; जेणें सुकृतें[8] उगोंचि शोभावें ॥ १७ ॥
करुनि पुरावा[9] कृष्णागरु–कर्पूरादि–पुण्य–गंधाचा ॥
संस्कारिला यथाविधि देह चिताग्नींत सत्यसंधाचा ॥ १८ ॥
अपसव्य करुनि सर्वहि धृतराष्ट्रप्रमुख सज्जन चितेतें, ॥
वाटे गंगेत करिति यज्ञांतावभृथमज्जनचि[10] ते तें ॥ १९ ॥
गांगेयास व्यासें, गंगोदक नारदें दिलें, असितें, ॥
तेणेंहि[11], सुगति पाउनि,अरि बहु वर्णिति जयाचियां[12] असितें ॥२०॥

---

४ सकटाचें शत ( =अनेक सकटें ) ५ करी ( हत्ती ) कीट देहें गुरु लघु (मोठा लहान) दिसो, ( तथापि ) चैतन्य ( ईश्वरांश ) सम पहावें ६ वीर रसरूप अमृताची भाडीं अशीं ( गात्रें ) ७ आकाशातून पडणाऱ्या तेजस्वी ताऱ्यासारखी ८ ज्या देहानें स्वपुण्यानें सहज शोभावें ९ पुरवठा १० यज्ञांत अवभृथमज्जन=यज्ञसमाप्तिनंतरचें स्नान ११ कृष्णानेही १२ ज्या कृष्णाच्या खड्गातें

विश्व धवाळिलें जेणें स्वयशांहीं चंद्ररश्मिगौरांहीं ॥
त्यासि भरतभार्यांही[१३] सतिल जल दिलें, तसेंचि पौरांही ॥२१॥
प्रगटे जलदानाच्या अवसानी भूषणास्य-रुचि-रहिता[१४] ॥
करि परिदेवन[१५] दीना देवनदी नारदादि-मुनि-महिता ॥ २२ ॥
ती रोदन करित म्हणे, " भारतहो ! भूपहो ! अहो मुनिहो ! ॥
वाटे न जपुनि, न तपुनि, न नमुनि, कोणी श्रमी न होमुनि हो ॥ २३ ॥
जो शुद्धराजवृत्तें[१६] संपन्न, धनेकरूनि यक्षपसा ॥
कोणीहि कवि धराया ज्या न, जसा पारदास[१७] दक्ष पसा ॥ २४ ॥
प्रज्ञेनें वाक्पतिसा, संपन्न जसा महामुनि यमांनी[१८] ॥
मणिनी शेषशिरोगणसा साजे जो सदा सुनियमांनी ॥ २५ ॥
आचार्येंही गामें शस्त्रास्त्रांही न जो पराभविला ॥
वधिला शिखंडिनें तो, नवल कसें भंगिलें तृणें पविला ! ॥ २६ ॥
हें माझें हृदय मला भारत हो ! अश्मसारमय वाटे ॥
परमप्रियपुत्राच्या न विरहशोकेंरूनि जें फाटे " ॥ २७ ॥
ऐसा विलाप करितां समजावी वासुदेव गंगेतें ॥
मन शुद्धबोधदुग्धें क्षाली, शोकेंकरूनि रंगे, तें ॥ २८ ॥
" देवि ! नको शोक करूं, शुद्धयशा तो न तव तनय शमला ॥
श्रुत[१९] इतर असें करितें सत्कविवाणीस न वतन यश मला ॥२९॥
शुभदर्शने ! सुत तुझा पार्थशरांहीच पावला पतन ॥
' वत[२०] ' न म्हणावें, गेलें होतें, तें साधिलें पुन्हा वतन ॥ ३० ॥

१३ भरतवंशीय स्त्रियाही १४ अलंकार व आस्यरुचि ( मुखावरील तेज ) ही जिला नाहीत अशी १५ विलाप १६ राजा या नात्यानें केलेल्या पवित्र आचरणानें १७ पान्यास १८ शमदमादि साधनांनी १९ सत्कविवाणीस वतन करितें असें इतर यश मला श्रुत न, असा अन्वय २० ' हाय '

तुज सुतशोक शिखंडी, सिंहीला शश, कधीं न दे वधुनी ॥
विजयहि न वधी; की तो मृत्यु तयाच्या अधीन देवधुनी[२१]! ॥३१॥
जरि देवता समस्ता मिळत्या, करित्या रणीं न तच्छमना ॥
की तो होता ज्ञाता, साक्षात् स्मरहरतसाचि अच्छमना[२२] ॥३२॥
प्रसवश्रम भोगुनिहो, सुयश न मिळतां अ-वीर-सूचि[२३] रडे ॥
समर-हत-सुवीर-स्तुत-सुत-शोकभरें न वीरसू चिरडे" । ३३ ॥

## धृतराष्ट्राचें वनप्रस्थान

व्यास म्हणे, 'धर्मा! हा, मत होइल, न करितां तप कसा? रे ॥
तरुणपणीं गोड पुढें वृद्धपणीं विषय ते सपक[१] सारे ॥ १ ॥
दे आज्ञा. संपादू स्वकुलव्रत सेवटील, सुतपा हो ॥
न मगे वृथा; सुगतितें हा माझा अंध वृद्ध सुत पाहो' ॥ २ ॥
"मुनि गेल्यावरि, वदनें बोले तो धर्म मंद मंद नतें ॥
पावे निरोप देतां नंदा जें दुःख नंदनंदन, ते ॥ ३ ॥
जेवावें मग जावें. अन्य वर त्यजुनि, आजि याचि तसे ॥
स्तन्याला बाळ जसें, सानुज मी, नमुनि पाय, याचितसें" ॥ ४ ॥
विप्रादिकांसि भोजन देवूनि, करी स्वयेंहि मग विधिनें ॥
की लाविला असे हा अर्थिखगांचा[२] गृहस्थनग[३] विधिनें ॥ ५ ॥
कुंतीसह जेववली गांधारी हर्षली सुनारी ती ॥
की आदरी सखीची कन्येची दाविती सुना रीती ॥ ६ ॥
भोजन करूनि, बसला स्वस्थानीं स्वस्थ भूप, त्याजवळ ॥
ये धर्म चकोर जसा इंदुकडे घ्यावया प्रभाकवळ ॥ ७ ॥

२१ सुरनदी २२ शुद्धांतःकरणाचा २३ वीरपुत्र न प्रसवणारी
१ नीरस २ याचकरूप पक्षाचा ३ गृहस्थाश्रमरूप वृक्ष

धर्मासि म्हणे राजा, फिरवुनि सप्रेम पाठिवर हात ॥
वत्सा ! धर्मीं सादर, नित्य सदुपदेश आठिव, रहात ॥ ८ ॥
आत्मा संरक्षावा, मंत्र[४] करावा नृपोत्तमा ! गूढ, ॥
सुज्ञ पुरुष एकहि बहु, राजा ! न बरे सहस्रही मूढ ॥ ९ ॥
धर्म म्हणे " करिन असें; कथिलें त्वां नीतिसार सार मला ॥
त्यजुनि गुरूक्ता, इतरीं हा नच, अलि जेविं सारसा रमला" ॥१०॥
हित सांगुनि धर्माला राजा अंतःपुरांत तो गेला ॥
त्यासि म्हणे गांधारी, 'सांगावा मज विचार, जो केला ॥ ११ ॥
भूप म्हणे, 'पुत्रांचीं श्राद्धें करुनि, 'द्विजांसि तर्पूनी ॥
गांधारि ! शीघ्र निघतों, सर्वस्व ब्राह्मणांसि अर्पूनी ॥ १२ ॥
आज्ञा घ्यायाकरितां आधीं सर्व प्रजेसि आणवितों ॥
इतुकेंचि राहिलें, हें कर्तव्य युधिष्ठिरासि जाणवितों ॥ १३ ॥
धर्मासि नृपें सागुनि धर्मेंहि सकल जनासि, पाठविलें[५] ॥
वर्ण सकळहि आले, कीं प्रभुनें आपणासि आठविलें ॥ १४ ॥
नृप भेटुनि त्यांसि म्हणे, 'सज्जन हो ! जेविं वायुसह वास ॥
तेविं तुम्हासह भारत , अविट सदा यावदायु[७] सहवास ॥ १५ ॥
व्यासें, धर्मेंहि, दिली आज्ञा जाया तपावनास मज ॥
कीं आहे या सुज्ञा राया, जसि त्या तपोधना, समज ॥ १६ ॥
द्यावी तुम्हींहि आज्ञा मज; न करावी विचारणा कांहीं ॥
मत्परिणाम घडावा बहु बरवा, यांत वांकडें नाहीं ॥ १७ ॥
आहें सुतविरहाकुळ, उपवासक्षीण, या वयें श्रांत ॥
भ्रांत नसें झालों जों तों मी पाहेन आपुला प्रांत[८] ॥ १८ ॥

---

४ राजकारण ५ सागून पाठविलें ६ ब्राह्मणक्षत्रियादि चारी वर्ण ७ जिवत आहे तोपर्यंत
८ वनप्रदेश

गेलें या पाडुसुतीं सत्पुरुषवरीं युधिष्ठिरीं राज्य ॥
प्राज्य सुख मला झालें; ससितीं[९] दुग्धींच सांडलें आज्य ॥ १९ ॥
या[१०] पुत्रैश्वर्याहुनि तें पुत्रैश्वर्य होय फार उणें
हा कोठें, तो कोठें ? तदधिक सत्पुरुष धर्म कोटिगुणें ॥ २० ॥
रक्षिल तुम्हांसि हरिसा, विधिसा, हा धर्म वत्स राघवसा ॥
येथें नाहीं काम–क्रोधाहंकार–मत्सराघ, वसा[११] ॥ २१ ॥
हा निरविला तुम्हांला म्यां चिंतास्पर्शमणि-धन-न्यास[१२] ॥
बहु सावधान चित्तें संरक्षा नित्य या अनन्यास' ॥ २२ ॥
आधीं रोदन पुष्कळ, मग करुनि विचार, त्या सशोकांहीं ॥
ऋग्वेदी सांब द्विज वक्ता केला समस्त लोकांहीं ॥ २३ ॥
तो सांब म्हणे "राजा ! जें तूं वदलासि, तें सकळ साचें ॥
तव वचनाचें, जैसें प्रासादाच्या महत्व कळसाचें ॥ २४ ॥
कोणी प्रजांसि अप्रिय राजा, एकींहि जो उणा अंशीं ॥
कुरुकुळतिलका ऐसा झाला नाहींच भूप या वंशीं ॥ २५ ॥
तैसाचि हा युधिष्ठिर करिल बहुसहस्रवत्सर हितातें ॥
याची श्रितरहिता मति पावे, जें धेनु वत्सरहितातें ॥ २६ ॥
देवा ! ज्ञातिविमर्दी[१३] म्हणसी दुर्योधनास हेतू, तें ॥
न तसें, दैवचि कारण, ऐसें जन विनवितात हे तूतें ॥ २७ ॥
सुतपस्याचि करावी अस्मच्चिंता तुवां कदा न मनें ॥
देतों निरोप, करितों बा आम्ही सर्व हे तुला नमनें" ॥ २८ ॥
ऐसी आज्ञा देतां, बहुताचि तो जन मनीं असुख पावे ॥
हर्षे नृप, कीं त्याच्या चित्तांत तपोवनीं असु[१४] खपावे ॥ २९ ॥

---

९ शर्करायुक्ती   १० धर्माच्या ऐश्वर्याहून दुर्योधनाचें ऐश्वर्य   ११ वसति   १२ न्यास=ठेवा
१३ स्वजनाचा संहारक   १४ मृत्यु यावा

## सत्संगस्तव

सत्संग अतिश्रेष्ठ श्रेयस्कर म्हणुनि सुज्ञ या गाती ॥
यातें भजता सिद्धिप्राप्ति असें जी न योगयागा ती ॥ १ ॥
लीलेनें देतो जे सत्संग नता न दे पद पिता तें ॥
जरि राज्य दिलें केलें नच पुत्राचें वरें तदपि तातें ॥ २ ॥
सत्संगति करिताहे लीलालेशें करूनि जेंवि हित ॥
न तसे माता जाणे संसारामाजि मात्र जें विहित ॥ ३ ॥
सत्संगाची देती तसि इतरांची कधीं न तोख[1] दया ॥
दुःसह चिरकालामय[2] भव हा सत्संग होय ओखद या ॥ ४ ॥
सत्संग सिंह यानें दूर भयें कामनाग[3] सरकविला ॥
डोले भुलोनि खळजननाग गमे हाहि नागसर कविला ॥ ५
सत्संगतिप्रसादें बहु भगवद्भक्तिच्या भरी भरले ॥
सरले दोष सकल जन न तरावे जे कधींहि ते तरले ॥ ६ ॥
देतो सत्संग तसा बहु सुगुणमहत्व भक्तजनतेला ॥
सत्पुष्पसुगंध जसा मुदित करायास तज्ज्ञमन[4] तेला ॥ ७ ॥
जी हरिहरप्रसादीं कल्याणें वसति साधुसंगीं ती ॥
अघ शमतें सुख गमते मन रमतें जेंविं दिव्य संगीतीं ॥ ८ ॥
सत्संगमींच नाना दुःखार्त तथापि चित्त रंगतसे ॥
जलनिधितरंगवातें सत्संगें उठति चित्तरंग[5] तसे ॥ ९ ॥
स्पर्शमणि सुवर्ण करी दे स्पर्शमणित्व तो न लोहातें ॥
हा साधुसंग करितो साधु असाधुसि हरून मोहातें ॥ १० ॥

---

१ तोष, आनंद  २ फार दिवसाचा रोग, असा भव ( संसार )  ३ कामरूप हत्ती ४ तें जाणणार  ५ चित् ( ज्ञान ) तरंग

## कविस्तव

श्रीमद्भगवद्गीताव्याख्या[1] केली जनासि ताराया ॥
सारा या सद्ग्रंथा सेविति, संसारताप साराया ॥ १ ॥
ज्ञानेशा त्वत्कृतितें करिती ज्ञाते समस्तही प्रणती ॥
ज्ञानेश्वरी भवानी होय महामोह–महिष हे म्हणती ॥ २ ॥
भक्तिप्रताप लोकीं अत्यद्भुत याचि नामदेवाचा ॥
परमप्रिय भक्त, सखा की आत्मा आप्तकाम[2] देवाचा ॥ ३ ॥
भक्तिसुखाधिक मानुनि मुक्तिसुख कदापि याचिना, म्यां ते ॥
अत्यद्भुत आयकिलें सद्वृंदीं नमुनि याचि नाम्यातें ॥ ४ ॥
नमिला शमिलास्यप्रद[3] शांतिजलधि एकनाथ तो भावें ॥
शोभावे ज्याचें यश विश्वीं, ज्या देववृंद लोभावे ॥ ५ ॥
[illegible] ‘ सावधान ’ ऐसे सर्वत्र विवाहमंगली म्हणती ॥
[illegible]क[4] रामदासें आयकिलें; त्या असो सदा प्रणती ॥ ६ ॥
शिवराजास ज्ञानद जो, जैसा याज्ञवल्क्य जनकास ॥
तरले भवार्णवी बहु दृढतर त्याची धरूनि जन कास ॥ ७ ॥
भक्तिरसचि मूर्त असा करिति बृहस्पतिशतक्रतु कयास ॥
की वाटे भगवद्यश सुरभीपय, अमृत तक्र, तुकयास ॥ ८ ॥
साधुसभाप्राणप्रिय, ज्याचे निर्दोष, युक्तिमदभंग[5] ॥
भगवज्जनेतराचा करिती ज्यांतील उक्ति मदभंग ॥ ९ ॥
भगवद्भक्ति कराया बहुजड जीवांसि जो तुका शिकवी ॥
त्याच्या दुसरा धरणीवरि येइल कोण हो तुकासि[6] कवी ? ॥ १० ॥

---

१ ज्ञानेश्वरी ग्रंथ २ ज्याच्या इच्छा तृप्त आहेत असा ३ शमि म्ह० योगी त्यास नृत्य करावयास लावणारा ४ एकट्या रामदासालाच त्याचे रहस्य कळले ५ युक्तिमत्+अभंग ६ तुलनेस

श्रीहरिचीं बहु रचिलीं, देती जीं हर्ष नित्य नव चरितें ॥
भक्तिज्ञानरसभरित यत्कवन; जयांत एक न वच रितें[७] ॥ ११ ॥
वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ॥
प्रभुनें भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि[८] बोलविला ॥ १२ ॥
त्या महिपतितें पाहुनि, ऐकुनि, सच्चित्त कां न लोभावें ॥
शोभावें यश ज्याचें चिर, नमिला विष्णुदास तो भावें ॥ १३ ॥
श्री मुक्तेश्वर कविवर यातें कोण न शुभेच्छु वंदील ॥
बंदी[९] लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ १४ ॥
वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंदराजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सत्कीर्ति, सुमुक्ति, सुंदरा ज्याला ॥ १५ ॥
हरिविजयग्रंथातें मग आधीं श्रीधरासि वंदीन ॥
शिववंदनकामांहीं[१०] लंघावा प्रथम देवनंदी न ॥ १६ ॥
कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा ॥
भलत्या मुखांतुनि अशी सुरसखनि निघेल काय जी वाचा ॥१७॥
श्रीवाल्मीकिच झाला श्रीतुळसीदास रामयश गाया ॥
तरिच प्रेमरसाची खाणी वाणी तशीच वशगा[११] या ॥ १८ ॥
तद्वर्ति[१२] करुनि दीप, प्रभुपाशीं तच्छिवार्थ तो लावी ॥
कोणाच्या शांतीशीं हे माधवदासशांति तोलावी ॥ १९ ॥
श्रीरामभक्त मोठा ज्ञानी वाटे कबीर हित मातें ॥
दोहा तो रविच गमे हरिल तयाचा अबीरहि तमातें ॥ २० ॥
नरसिंहनाम महता, अहतामळकीर्ति, भक्त नागर[१३] हा ॥
' याच्या वैभवगानीं ' स्वमुखसहस्त्रा म्हणेल नाग ' रहा ' ॥२१

---

७ अर्थहीन, फोल ८ मुरलीसारखाच ९ भाट, स्तुतिपाठक १० शिवास वदन करण्या[illegible]
[illegible]र्मी ११ हस्तगत १२ वर्ति=वात १३ नागर जातीचा

# मदालसा

विश्वावसु नामक गंधर्वाची कन्या मदालसा हिला पातालकेतु राक्षसाने पाताळांत बंदींत ठेविली होती. त्या पातालकेतूचा ऋतुध्वज नामक राजपुत्राने वध करून तिला मुक्त केलें व पुढे तिच्याशी लग्न केलें, ती कथा या आर्यांत आहे.

पूर्वी होता राजा, नाम जया शत्रुजित् सदाधारा[1] ॥
यत्कीर्तिसुकृतिसेव्या, अमृतरसाची जसी सदा धारा ॥ १ ॥
त्याचा पुत्र ऋतुध्वज वरगुण[2], जैसा जयंत शक्राचा ॥
मदहर गजयूथाचा सिंह, तसा जो स्वशत्रुचक्राचा ॥ २ ॥
ज्या शुद्धतपोनिधितें[3] सानंद सदा सुरेशपुर गातें ॥
गालव शत्रुजितातें भेटे, आणूनि दिव्य तुरगातें ॥ ३ ॥
पूजेतें स्वीकारुनि गालव बोले असें, " अगा ? राया ॥
आलों तुज कळवाया दुःसह निजताप मी अगारा[4] या ॥ ४ ॥
कोणी दैत्य करितसे नित्य उपद्रव मदाश्रमीं बापा ॥
तापा साहों न शकें द्याया सुतप-क्षयावहा[5] शापा ॥ ५ ॥
पृथ्वीवलयाक्रमणीं अश्व अतिसमर्थ, म्हणुनि हा नांवें ॥
' कुवलय[6] ' विख्यात यशें होइल, विश्वेंहि यास वानावें ॥ ६ ॥
आज्ञा आतांचि करीं, सनया तनया स्वधर्मदक्षा या ॥
चढुनि कुवलयीं तेजें निजविप्रादि प्रजांसि रक्षाया ॥ ७ ॥
' जा, जोडीं यश; ' ऐसें नृप तनया, फुल्ल[7] करुनि गाल, वदे ॥
गाधिज जेविं दशरथा, आशी राजा तसाचि गालव दे ॥ ८ ॥

---

१ साधूचा जो आधार त्याला २ उमत्तगुणसपन्न ३ शुद्ध तपश्चर्येचा सांठा त्यातें ४ ह्या गृहास ५ उत्तम तपश्चर्येचा नाश करणाऱ्या ( अशा शापा द्याया न शकें व तापा साहों न शकें ) ६ कु म्ह० पृथ्वी वलय म्ह० कडें, मडल, हें नाव पडण्याचें कारण पूर्वार्धांत दिलें आहे ७ गाल फुगवून म्ह० आनदानें

१६

तो कुवलयाश्व जाउनि गालवमुनिसह तदाश्रमीं राहे ॥
तों सूकररूप[८] असुर मुनिचें धर्षण करावया पाहे ॥ ९ ॥
अश्वी चढोनि धांवे नृपसुत होवूनि तप्त कोपानें ॥
त्या सूकरासि ताडी चंद्रार्धाकार तीव्र रोपानें[९] ॥ १० ॥
निबिडांधकारगर्तीं[१०] सूकर घाली उडी, तयामागें ॥
रागें तो कुवलयही, पक्षीश्वर[११] वंचिला जसा नागें ॥ ११ ॥
करुनि प्रवेश, पाहे नृपसुत अतिरम्य शून्य परि पुर तें ॥
स्त्रीतें विलोकुनि पुसे, उत्तर ईक्षणाहि ती न करि पुरतें ॥ १२ ॥
ती स्त्री प्रवेशली ज्या प्रासादीं सत्वरा, तयामाजी ॥
निःशंक कुमार शिरे, द्वारीं स्थापूनि तो महावाजी ॥ १३ ॥
रत्नकनकपर्यंकीं पाहे तो रतिसमा नवी रमणी ॥
अवलोकिला तिणेंहि सहसा हा स्मरसमान वीरमणी ॥ १४ ॥
वृत्त प्रेमें पुसतां सुदती[१२] स्वसखीमुखाकडे पाहे ॥
ती बोले, 'पुरुषवरा ! वृत्त क्लेशद इचें असें आहे ॥ १५ ॥
गंधर्वांचा राजा विश्वावसु, जिष्णुचा[१३] सखा आहे ॥
त्याची मदालसाख्या कन्या धन्या, बहु प्रिया, बा ! हे ॥ १६ ॥
जो वज्रकेतुदानव तत्सुत पातालकेतु या नांवें, ॥
या पाताळीं वसतो, कळिकाळें ज्यासि मित्र मानावें ॥ १७ ॥
उद्यानगता हे त्या दुष्टें, हरिणी वृकें, तसी धरिली ॥
मत्प्रियसखी मदांधें, प्रकटुनि माया[१४] तमोमयी हरिली ॥ १८ ॥
येत्या त्रयोदशीचा निश्चय केला इला वरायाचा ॥
'शूद्र श्रुतिस, मज तसा हा' म्हणुनि इणेंहि बा मरायाचा ॥ १९ ॥

८ डुकराचें रूप ९ बाणानें १० दाट अंधकाराच्या खाड्यांत ११ गरुड १२ सुंदरी १३ इंद्राचा १४ मूर्छा जींत आहे अशी माया

पातालकेतु दानव मानवलोकीं वराहतनुधारी ॥
मुनिरक्षणार्थ कोणीं केला खरबाणविद्ध अविचारी ॥ २० ॥
तच्छोध करुनि सत्वर आलें तें वृत्त ईस कळवाया ॥
पळवाया चिंतेतें, दुर्जनवदनें समस्त मळवाया ॥ २१ ॥
हे प्रीतिमती झाली, दर्शन होतांचि, या तुझ्या रूपीं ॥
कीं मानसींच हंसी रमती, न रमे कदापि ती कूपीं ॥ २२ ॥
जेणें दानव वधिला त्याची व्हावी मदालसा भार्या ॥
कार्याकार्य न जाणे, यास्तव मूर्च्छेसि पावली आर्या ॥ २३ ॥
निजवृत्ति[15] सांग सुमते ! येथें आलासि कोणत्या कार्या ॥
तूं कोण ? देव किंवा दानव, गंधर्व, नाग कीं आर्या' ॥ २४ ॥
तो तीस म्हणे 'अमळप्रज्ञे ! करुनि स्थिर स्वचित्तातें ॥
श्रवण करीं पाठविलों मी मुन्यवनार्थे[16] शत्रुजित्तातें ॥ २५ ॥
आला सहसा दैत्य स्वीकारुनि उग्र रूप कोलाचें[17] ॥
म्यां हृदय भेदिलें निज बाणें त्या तापसार्तिलोलाचें[18] ॥ २६ ॥
होतां विद्ध पळाला, त्यामागें धावलों हयारूढ ॥
शिरला गर्तीं प्राणत्राणार्थी विप्रशत्रु तो मूढ ॥ २७ ॥
भ्रमलों तमांत बहु मी, मग झालों पाहता प्रकाशातें ॥
तुज पाहुनि पुसलें, परि न वदुनि आलिस इच्या सकाशातें ॥२८॥
तुज अनुलक्षुनि आलों या प्रासादांत कुंडले[19] ! सुमते ! ॥
मी सत्य मनुष्य मधुप, देवासुरपन्नगादि जे सुम[20] ते' ॥ २९ ॥
ती कुंडला म्हणे, 'तूं वीरा ! वदलासि सत्य, मन ईचें ॥
तरिच तुतें अनुसरलें; वरुनि सरा[21] वन वसेल न नईचें ॥ ३० ॥

१५ आपला धंदा १६ मुनीच्या रक्षणासाठी १७ डुकराचें १८ तपस्व्यांस त्रास देण्याच्या ठायी चटावलेल्याचें १९ मदालसेच्या सखीचें नाव २० पुष्पें २१ नईचें (नदीचे) वन (पाणी) सरा (सरोवराला) वरोनि न वसेल, म्हणजे नदी समुद्रालाच मिळणार, असा भाव

चंद्रातें पावुनियां तपनद्युति पावती अधिक कांती ॥
क्षांति श्रेष्ठा, धन्या भूति[२२] मिळे, धृति[२३] भटा, कविस शान्ती॥३१॥
त्वांचि अधम तो वधिला, कां मिथ्या कामधेनु बोलेल ? ॥
कन्याकरग्रह करीं, हर्षें गंधर्वराज डोलेल॥ ३२ ॥
राजकुमार म्हणे 'सति! मी आहें नाथवान्[२४] कसें स्वमतें ॥
हें कन्यारत्न वरूं? गुरुलंघन यांत मन्मना गमतें ॥ ३३ ॥
आलि म्हणे 'न वद असें, होसिल न इतें वरूनि अपराधी ॥
दैवी हे दुष्प्रापा, म्हणुनि करावी कदापि न परा[२५] धी ॥ ३४ ॥
नृपसुत म्हणे 'बहु बरें, देवीवचनहि अलंघ्य सांगाल ॥
विहितचि, तें कर्म करिल न गुरुजनाचे प्रफुल्ल कां गाल ?॥ ३५॥
या कुवलयाश्ववचनें हर्षे बहु सालि[२६] कुंडला भरली ॥
गंधर्वेश्वरकुलगुरु तुंबरुतें तेधवां मनीं स्मरली ॥ ३६ ॥
तो तुंबरु संपादी दोघांच्या सुविधिनें विवाहातें ॥
वंदूनि आखुवाहा[२७], हंसवृषभवाहसह[२८] विवाहातें[२९] ॥ ३७ ॥
तुंबरु गेल्यावरि ती स्वसखीतें कुंडला म्हणे 'आले ! ॥
त्वद्हृदयीं सद्गुण जे, ते सर्व सुखें वसावया आले ॥ ३८ ॥
सफळ मनोरथ झाले, स्वस्थ मनें जातसें तप कराया ॥
हेंचि परम मधुर मना, माझ्या अमृतहि गमे सपक राया ॥३९॥
स्वसखीतें आलिंगुनि, तत्पतितें नमुनि कुंडला गेली ॥
हेलिस्यंदनतुरगीं घेउनि हृष्ट प्रियें प्रिया केली ॥ ४० ॥

---

२२ उत्कर्ष २३ धैर्य २४ परतत्र २५ विपरीत बुद्धि २६ आलि ( सखी ) सह २७ उदीरवाहन गणपतीस २८ हसवाह ( ब्रह्मदेव ) व वृषभवाह ( शकर ) यासह २९ वि ( गरुड ) वाहन विष्णूतें

# भरतभेट

( हा उतारा 'बालमंत्ररामायणा'तला आहे. या रामायणाच्या प्रत्येक तेरा गीतींत 'श्रीराम जयराम जय जय राम' हा मंत्र साधला आहे. )

स्वश्रीस भरद्वाज प्रगटी रामानुजा सपरिवारा ॥
पूजी, न अहंकृतिचा लागों दे मानसास परि वारा ॥ १ ॥
सारा[1] जो विश्वाचा थारा नेता भवाब्धिच्या पारा ॥
त्या भरत चित्रकूटीं भेटे रामा क्षमादयागारा ॥ २ ॥
तो मरण दशरथाचें ऐकुनि सानुज सदार ' हा ! तात ' ॥
ऐसें म्हणे, दयाश्रित सानंद भवीं सदा रहातात ॥ ३ ॥
निज शोकें व्यसु[2] झाला जनक म्हणुनि फार पावला शोक ॥
तो करि पिंड-जलांजलि-दानादिक करिति जें सदा लोक ॥ ४ ॥
दयमानमानसा त्या प्रभुसि म्हणे पाय धरुनि तो भरत ॥
परत स्वपुरा ये बा ! याच पदीं मी पदीं दुजा न रत ॥ ५ ॥
त्या राजीवाक्ष म्हणे हा धर्म नव्हे लहान चवदावें ॥
सरतांचि वर्ष येइन वत्सा त्वां म्यांहि ' हा ' नच वदावें ॥ ६ ॥
श्रम राज्यभरोद्वहनें[3] श्रीगुरु ससचिव असे परि सहाय ॥
बा ! लाविशिल म्हणाया कामप्रमुखांहि तूं अरिस 'हाय' ॥ ७ ॥
द्विज रावणनिधनार्थी ज्ञाते तेथील तेहि भरतातें ॥
म्हणति वहावाचि दिला दुर्वहहि चतुर्दशाब्द भर[4] तातें ॥ ८ ॥
प्रयतमति म्हणे टळतां अवधी ज्वलनांत काय होमीन ॥
गंगाऱ्हदविरहातें[5] साहुनि वांचेल काय हो मीन ॥ ९ ॥

---

१ श्रेष्ठ आश्रय २ वि+असु=मृत ३ राज्यभार वाहिल्यानें ४ भार ५ गंगेच्या डोहा-पासून ताटातूट झाल्यामुळें होणारें दुःख

मजला श्रीचरणाब्जस्पृष्टा दे पादुका तरायास ॥
योगक्षेम-समर्था या हरितिल विरहकातरा[६] यास ॥ १० ॥
श्रेय प्रियभक्ताचें करि देउनि पादुका दयाजलधी ॥
कैकेयीतेंहि नमुनि राम म्हणे ' नच धरू तुझी मळ धी ' ॥११॥
वारासार करुनि तो भरत परतऊनि, ऐंद्रिकाकातें ॥
शिक्षुनि, तेथूनि निघे राम कराया प्रहृष्ट नाकातें ॥ १२ ॥
शमधन[७] अत्रि प्रभुतें पूजी त्याची महासती भार्या ॥
सीतेसि अलंकारी सत्कीर्ति जशी तशीच ती आर्या ॥ १३ ॥

## केका

तुझ्या बहुत शोधिले[१] अघनिधी पदाच्या रजें ।
न तें अनृत[२], वर्णिती बुध[३] जनीं सदाचार[३] जे ॥
असे सतत ऐकते[४], सतत बोलते[४], मीच ते ।
प्रमाण न म्हणों जरी उचित माझिया नीचते ॥ १ ॥
तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? की ।
कृपाचि सरली ! असेंहि न घडे जगन्नायकी ॥
नसेन दिसलों कसा ! नयन सर्वसाक्षी रवी ।
विषाद[५] धरिला म्हणों ! न[६] सुरभी विष क्षीर वी ॥ २ ॥
न पावसि, म्हणोनि मी म्हणतसें तुला आळशी ।
वरी न असदुक्ति हे, रविसखोत्थिता[७] आळशी ॥

---

६ कातरा=भितऱ्याला ७ शाति हेंच आहे धन ज्याचें

१ उद्धारार्थ शुद्ध केले २ खोटें ३ सद्वर्तनसपन्न ज्ञाते ४ ऐकणारे व बोलणारे ५ रोष, कटाळा ६ सुरभी क्षीर वी, विष न, असा अन्वय ७ रविसख (सत्राजित) याच्यापासून उत्थिता (निघालेली) अशी जी आळ (आरोप) त्यासारखी; स्यमतकमणि कृष्णानें चोरिला असा सत्राजितानें त्याच्यावर आरोप केला होता अशी कथा आहे

असंख्य जन तर्पिले, क्षुधित एकला जेमनीं[८] ।
चुकेल, तरि त्यास दे, परि वदान्य[९] लाजे मनीं ॥ ३ ॥
' अगा ! प्रणतवत्सला ! ' म्हणती त्या जनां पावलां ।
म्हणून तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां ॥
करूं बरि कृपा हरूं व्यसन दीन हा तापला ।
असें मनि धरा, खरा भरंवसा मला आपला ॥ ४ ॥
सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें[१०] ।
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें ॥
नता करुनि मुक्तही म्हणशि ' मी बुडालों रिणें ' ।
अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥ ५ ॥
कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें ।
परंतु हरि ! एकदां त्वरित दाखवा पावलें ॥
प्रसाद करणें मनीं जरि नसेल, हें आंवरा[११] ।
जया[१२] बहु तयास द्या, मज कशास ? मी हावरा ॥ ६ ॥
' दिलें फिरुनि घेतलें, ' अशी अकीर्ति लोकीं न हो ।
सुनिर्मळ तुझीं पदें कधिं तरी विलोकीन हो ॥
निजप्रियजनांकडे[१३] तरिहि दे हवाला; जशी ।
पडेल समजाविशी[१४], तशि करोत; कां लाजशी ? ॥ ७ ॥
अहा ! निपट[१५] धृष्ट मी; प्रभुवरासि ' कां लाजसी ' ।
म्हणें, तुज नसो तशी विकृति[१६], भाविकांला जशी ॥
परंतु अपराध हा गुरु म्हणोनि शिक्षा करीं; ।
असेचि धरिली नय–च्युत–दमार्थ दीक्षा[१७] करीं ॥ ८ ॥

---

८ जेवणात ( मूल धातु जिम=जेवणें ) ९ दानशूर. १० चिन्ह, घट्टा ११ हें इंद्रियपटुत्व १२ जया ( ज्याला हें इंद्रियपटुत्व ) बहु ( पुष्कळ असें वाटत असेल ) तयास द्या १३ भक्तांकडे १४ समजूत १५ केवल, पक्का १६ विकार, वाईट वाटणें १७ बाणा

सदैव अपराध हे रचितसें, असें कोटि, गा !।
स्वयेंचि कथितों, नसे तिळहि लाज मी कोटिगा[१८] ॥
अजांड[१९]-शत-कोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा।
न त्यांत अवकाश या स्थळ दिलें तदा कां दवा[२०] ॥ ९ ॥
दयाब्द[२१] वळशील तूं, तरि न चातकां सेवकां।
उणें किमपि; भाविकां उबगशील[२२] तूं देव कां ? ॥
अनन्यगतिका[२३] जना निरखितांचि सोपद्रवा[२४]।
तुझेंचि करुणार्णवा ! मन धरी उमोप[२५] द्रवा ॥ १० ॥
कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं[२६]।
तयांत अविशुद्ध[२७] मी, क्षलभ जेविं दावानळीं ॥
व्रणार्थ पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे।
स्मरादि रिपु मन्मनीं; अहि न काळ भेकां[२८] कसे ? ॥ ११ ॥
तरेन तुमच्या बळें भव-महा-नदी नाविका !।
तुम्हींच मग आतरास्तव[२९] मला सुदीना विका ॥
असे विदित वासही मज सदाश्रमींचा, करा।
दया, गुण पहा, सवे[३०] मज सदा श्रमीं चाकरा ॥ १२ ॥
धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ?।
न लाभ मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या आयसें[३१] ॥
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुंला ठेविती।

---

१८ कोडगा १९ ब्रह्मांडाच्या शभर कोटि २० वणवा; कृष्णावतारी कृष्णानें दयार्द्र होऊन गोपालास त्रस्त करणारा वणवा गिळिला, ती कथा येथें लक्ष्य आहे २१ दयेचा मेघ २२ कटाळा करशील २३ ज्याना शरण जाण्यास अन्य स्थान नाही अशास २४ पीडिलेले २५ पुष्कळ २६ नळराजाच्या ठायीं २७ मलिन, पापी २८ बेडकास २९ परतीरीं नेण्याचें भाडें, नोर ३० मज चाकरा सदा श्रमी सवे ( म्ह० सवय ) असा अन्वय ३१ लोखंड

गुणा न म्हणतां उणा, अधिक आदरें सेविती ॥ १३ ॥
'प्रभुस्तुति न ठाउकी, परि तिच्या महाकामुका[३२] ।
मला[३२] कृपण मारितो बहु सकाम हाका मुका' ॥
म्हणा मनिं असें, कसें प्रथम नीट ये लेंकरा ? ।
हळूहळु[३३] पटु स्वयें सुपथिं लावियेलें करा ॥ १४ ॥
'अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा ! हे' विधी[३४] ॥
श्रुतिज्ञहि[३४] म्हणे सदा, स्तविल आमुची केविं धी[३५] ॥
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ।
स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ? ॥ १५ ॥
'तुम्ही परम चांगले, बहु समर्थ, दाते; असें ।
सुदीन जन मी, तुम्हां शरण आजि आलों' असें ॥
पुन्हाहि कथितों, बरें श्रवण हें करा यास्तव ।
समक्ष किति आपुला सकललोकराया स्तव ॥ १६ ॥
किती श्रवण झांकिती प्रभुहि;[३६] काय ते पोळती ? ।
पुसाल जरि कोण ते ? पदरजीं तुझ्या लोळती ! ॥
बरें तुजचि सोसवे स्तवन; कृत्तिवासा[३७] गरा ।
न पी, तरि कसें घडे ? हितकरा ! दयासागरा ! ॥ १७ ॥
गमो मधुर हें विष-स्तवन, सेवितां माजवी ।
करी मलिन[३८] सद्यशोमुख, हलाहला लाजवी ॥
हरापरिस तूं बरा प्रभुवरा ! सदा जो पिशी ।
असा रस समर्पित्या[३९] अमृत आपुलें ओपिशी ॥ १८ ॥

३२ अत्यत स्तुतिप्रियाला मला ३३ स्वयें सुपथि लावियेलें (लाविलेले लेंकरू) हळूहळु पटु करा ३४ वेद जाणणारा ब्रह्मदेव ३५ बुद्धि ३६ समर्थ लोक ३७ चर्माचें वस्त्र धारण करणाऱ्या शकरानें हालाहल प्राशन केलें नसतें तर ३८ सत्कीर्तिरूप मुखाला काळिमा आणितें ३९ देणाऱ्याला

म्हणोनि कविता–सुता तुज समर्पितों साजरी ।
नसे बहु तशी गुणी कनक–पीत–वासा ! जरी ॥
तरी न इतरा वरी; हरि ! करीं इला किंकरी ।
मयूरहि[40] निजात्मजाग्रहविमुक्त, जैसा करी ॥ १९ ॥
जिणें रस पहावया प्रशिथिलीं[41] रदीं चाविलीं ।
सुवासहि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं ॥
तुम्हांसि शबरी[42] तशीं बदरिकाफळें दे, जुनी ।
कथा अशि असो, पहा स्वचरितें तुम्ही मेजुनी ॥ २० ॥
प्रभो ! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे ।
म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें ।
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें[43] ॥ २१ ॥
शिवे न तुझिया पदा अदयताख्य[44] दोष क्षण ।
प्रभो ! चुकतसों तरी करिशि तूंचि संरक्षण ॥
नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती ।
रुचे विषय; ज्यां मिळे अमृत, ते न मद्या पिती ॥ २२ ॥
म्हणा मज उताविळा, गुणचि घेतला; घाबरें ।
असो मन असेंचि बा ! भजक[45]–बर्हि–मेघा ! बरें ॥
दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें ।
धरील मन ? आधिनें बहु परिभ्रमे चाक–सें ॥ २३ ॥

---

४० मोरोपतालाही आपल्या कन्यारूप ग्रहापासून मुक्त कर नव ग्रहापासून जसा कमी अधिक त्रास होतो तसा कन्या असली म्हणजेही त्रास होतो, म्हणून कन्येला एक ग्रह मानिलें आहे ४१ ढिल्या दातानीं ४२ श्रमणा नामक भिल्लीण फार रामभक्त होती, तिनें उष्टी बोरें रामास दिलीं इत्यादि कथा येथें लक्ष्य आहे ४३ चातकानें ४४ निर्दयपणा नामक ४५ भक्तरूप मोरास आनददायक मेघरूप देवा

कृतांत–कटकामल–ध्वज–जरा[४६] दिसों लागली ।
पुरःसरगदांसवें[४७] झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ।
न हों जरि उतावीळा, स्वरिपु[४८] कापितो हा गळा ॥ २४ ॥

अवश्य करणें खरें प्रणतरक्षण स्वोचित ।
उशीर मग कां ? बसो कृपण मीहि कां शोचित ॥
नव्हे प्रभुवरा ! तुम्हां उचित एकटें धांवणें ।
कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें ॥ २५ ॥

तुझ्या गुणकथा महासुरभि, त्यांत ही रासभी[४९] ।
शिरे विषयवासना, जशि[५०] शुका अहीरास भी ॥
तशी न इतरांस भी, इस सदंडही[५१] हाकिती ।
तथापि बहु लाथळी; मग अदंड मी हा किती ? ॥ २६ ॥

खरी करितसे कशी तव जनींहि सत्ता पहा ।
इचा वध न निंद्य बा ! प्रबळ मूर्त सत्ताप[५२] हा ॥
'कथासुरभिचा रस स्वहित पुष्कळ स्वादुही' ।
म्हणे 'त्यजुनि[५३] कां मला निजधना, परस्वा दुही' ? ॥ २७ ॥

कथा–सुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती ।
शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती ॥
दुहोत भलते[५४] सदा, तरि न लेशही आटती ।
स्ववत्समल भक्षिती, परि न सर्वथा बाटती ॥ २८ ॥

---

४६ यमाच्या सैन्याची पाढरी ध्वजा हीच जरा (म्हातारपण) ४७ पुढें सरसावून येणाऱ्या रोगाबरोबर ४८ मृत्यु ४९ गाढवी ५० शुक्राचार्य हाच कोणी गवळी (अहीर) त्याला जशी ही भी, तशी इतरास (विश्वामित्रादिकास) न भी. शुकाची ब्रह्मचर्यव्रताबद्दल ख्याति आहे ५१ काठीनें युक्त असे लोक (म्ह० सन्यासी) ५२ साधुजनास हा मूर्तिमत ताप होय ५३ तुमची स्वसत्तेची वस्तु म्ह० माझें दूध टाकून परक्याची वस्तु म्ह० कामधेनूचें दूध तुम्हीं कां पितां ? असें खरी म्हणे ५४ कोणीही

किती वय ! कसें तप प्रखर ! काय विश्वास तो ! ।
ध्रुव[५५] ध्रुव खरा ! स्तवा उचित होय विश्वास तो ॥
कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी ? ।
प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो ! हरी ॥ २९ ॥

असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा ।
तयावरि दया, पचे वर असाचि द्या चाकरा ॥
वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे ।
पुसोनि अधिकार[५६] द्या, सुकर तें सदा साजिरें ॥ ३० ॥

तुझें कुशळ नाम बा ! हळुहळू मना आकळी[५७] ।
दुरत्यय असा महा खळहि त्यास भी हा कळी ॥
हरी व्यसन पाप हें; बहु कशास ? कायाधवा[५८] ।
परि त्वरित भेटवी तुजहि योग[५९]-माया-धवा ॥ ३१ ॥

तुझ्या समचि हें[६०] गुणें, अणु उणें नसे नाम, हा ।
दिसे अधिकही, तसा गुण तुला असेना महा ॥
सदैव भलत्यासही सुलभ; आणखी गायका ।
छळी न, न अधोगति क्षणहि दे जगन्नायका ॥ ३२ ॥

छळाल कृपणासि कां ? अजि ! दयानिधे ! कांपिती ।
भटास भट संगरीं, परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु अहो ! शरण्या[६१] ! तमी ।
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी ॥ ३३ ॥

---

५५ ध्रुव ह्याच खरा ध्रुव ( निश्चयी ) पुढें चिंतामणि कवीच्या ध्रुवाख्यानात ही कथा पहा ५६ पात्रता ५७ वश करितें ५८ कयाधूचा पुत्र प्रल्हाद त्यास ५९ मूलप्रकृतीचा स्वामी ( ईश्वर ) ६० नाम ६१ शरणागतावर दया करणाऱ्या देवा

तर्यी[६२] प्रभुवरा तसे सदय कां असे आज हो ! ।
विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज ! हो ॥
वनोवनिं फिरां पिशापरि, म्हणां अहोरात्र ‘ हा ’ ।
नसे कुशल भाषणीं परि असे कृपापात्र हा[६३] ॥ ३४ ॥

न जें प्रिय, सदोष तें, प्रिय सदोषही चांगलें ।
स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं[६४] रांगलें ॥
तुलाचि धरि पोटिशी कशि तदा यशोदा बरें ? ।
जरी मळविशी रजो[६५]-मलिन-काय तूं अंबरें ॥ ३५ ॥

प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे ।
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी ! वांकडे ॥
न निष्ठुर पिता, म्हणे मनिं ‘ न हो प्रजा टोणपी ’ ।
अपथ्य[६६]-रुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ? ॥ ३६ ॥

सदाहि हित नायकों; बहु अपाय केले करूं ।
तरी सकृप बाप तूं म्हणसि, ‘ नायके लेंकरूं ॥
कधीं न करिसी प्रभो ! भजक[६७]-बाळकोपेक्षण ।
न तूजवरि ज्यापरी पशुपपाळ[६८] कोपे क्षण ॥ ३७ ॥

खरा जनक तूं ; जनां इतर कोण हो ! देव वी ? ।
समीहित[६९] फळें जगा तव पदाब्ज दे देववी ॥
अशीच करुणा असो हरि ! कधीं न[७०] भंगो पिता ।
अशा मज असाधुला इतर कोण संगोपिता ॥ ३८ ॥

---

६२ रामावतारी रावणानें सीता नेली त्या वेळी ६३ मोरोपंत ६४ चिखलांत ६५ धुळीनें मळलें आहे शरीर ज्याचें ६६ ज्याला अहितकर पदार्थांची आवड आहे असा ६७ भक्तरूपी बालकाचा अव्हेर ६८ गोपालाचा राजा नंद ६९ वांछित ७० तुझें पितृप्रेम कधीही भग्न न पावो.

सुविद्य, धन मेळवी, वचन आयके, आंवरी ।
प्रपंचभर घे शिरीं, करि कृपा पिता त्यावरी ॥
असा जरि नसे, रुचे तरि न तो अभद्र[७१] क्षण ।
तसा तुजचि आवडे करिसि तूंचि तद्रक्षण ॥ ३९ ॥
पिता जरि विटे, विटो, न जननी कुपुत्रीं विटे ।
दयामृतरसार्द्रधी[७२] न कुलकज्जलें[७३] त्या किटे ॥
प्रसादपट[७४] झांकिती परि परा गुरूचे थिटे[७५] ।
म्हणूनि म्हणती भले 'न ऋण जन्मदेचें फिटे' ॥ ४० ॥
अशी तरि कृतज्ञता हरि ! तुझ्याच ठायीं अगा ।
सख्या ! अणुचि मानिसी करुनि सुप्रसादा[७६] अगा[७६] ॥
भुले सुकविवाग्वधू[७७] तव गुणा अनर्घ्यां नगा ।
म्हणेल जन कोण कीं यश पुनःपुन्हां तें न गा ? ॥ ४१ ॥
तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें यास्तव ।
प्रजापतिसुतत्व[७८] ये, करिति साधु ज्याचा स्तव ॥
स्वनीचपण मागिलें[७९], बहु दया अशी नारदा ।
स्मरे घडिघडी प्रभो ! भवपयोधिच्या पारदा[८०] ॥ ४२ ॥
तुझें यशचि तारितें; परि न केवळा तारवे ।
सहाय असिला असे, तरिच शत्रुला मारवे ॥
न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती ।
न अज्ञ-हृदयें तशीं तव यशो-रसीं रंगती ॥ ४३ ॥

---

७१ करटा ७२ दयारूप अमृतानें ओलें झालें आहे अत.करण जीचें ७३ कुळाला कलक लावणाऱ्या पुत्रामुळें ७४ कृपारूप वस्त्र ७५ अपुरते ७६ पर्वता एवढ्या अनुग्रहाला ७७ चांगल्या कवीची वाणीरूप मुलगी तुझ्या अमोल गुणरूप अलकारांला भुले ७८ केवळ भगवत्कथाश्रवणानें पूर्वजन्मींचा दासीपुत्र नारद पुढें ब्रह्मदेवाचा मानसपुत्र झाला, ती कथा येथें लक्ष्य आहे ७९ पूर्वजन्मीचें ८० पार नेणाऱ्या

बुडे, बुडवि सागरीं तरि[८१], सुकर्ण[८२]-धारा-विना।
सहाय नसतां स्वयें परतटासि ती दाविना ॥
सहाय भगवज्जनां तव सुकीर्ति जेव्हां करी।
तईच उतरी भवोदधितटीं जनां लौकरी ॥ ४४ ॥

सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो।
कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो ॥
सदंघ्रिकमळीं[८३] दडो; मुरडितां हटानें अडो।
वियोग घडतां रडो; मन भवच्चरित्रीं जडो ॥ ४५ ॥

न निश्चय कधीं ढळो; कुजन-विघ्न-बाधा टळो।
न चित्त भजनीं चळो; मति सदुक्तमार्गीं वळो ॥
स्वतत्त्व हृदया कळो; दुरभिमान सारा गळो।
पुन्हा न मन हें मळो; दुरित आत्मबोधें[८४] जळो ॥ ४६ ॥

मुखीं हरि! वसो तुझी कुशल-धाम-नामावळी[८५]।
क्षणांत पुरवील जी सकळ कामना मावली ॥
कृपा करिशि तूं जगत्रयनिवास दासांवरी।
तशी प्रकट हे[८६] निजाश्रितजनां सदा सांवरी ॥ ४७ ॥

दयामृतघना! अहो! हरि वळा मयूराकडे[८७]।
रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिक-स्तुत-पदा! कदा सांपडे?।
तुम्हां जड भवर्णवीं उतरितां न दासां पडे ॥ ४८ ॥

---

८१ नौका ८२ चागल्या नावाड्याशिवाय ८३ साधूच्या चरणकमलाचा आश्रय करो ८४ आत्मज्ञानानें ८५ सर्व कल्याणाचें निधान अशी तुझी नामावळी ८६ नामावळी ८७ मोराकडे; पक्षीं, मयूरपताकडे

## सज्जनप्रार्थना

माझा प्रेमा सुदामा हरिसख[१] दुबळा; शब्दसंदोह[२] जो, हे ।
साधूंपाशीं श्रुतीनें पदर पसरुनी, जोडिले स्वल्प पोहे ॥
या दीनोपायनातें[३] बुधजनभगवान् प्रीतिनें, फार गोडी ।
आणूनि श्रोतृवक्त्रीं भरिल, बहु दया मानुनी तेहि थोडी ॥ १ ॥

नसे तादृक् चेतो-हर गुण जरी, साधु तरि या ।
वरू, चूडारत्नीकृतविधुहि[४] जैसा धुतरिया[५] ॥
भले सद्विद्यांचे नद करिति ते लोभ, विहिरा ।
तयांचा मी; कर्त्यां जडहि घडिला शोभवि हिरा ॥ २ ॥

अभय दिधलें आहे, वाहे श्रुतिप्रतिभा झरा ।
विधुमणिचिया[६] सारा तारा[७]-प कारण पाझरा ॥
जडहि कविता जोडी, गोडी गुणीं हरिच्या धरी ।
सहज तुमचा हीना दीना प्रसाद समुद्धरी ॥ ३ ॥

प्रसाद तुमचा कळा-निधिहुनी गुणें आगळा ।
हरी नत-मनो-मळा, निजसुरद्रुमांचा मळा ॥
करी रत सदा बळानुज[८]-पदीं मना चंचळा ।
सुखेंचि पुरवी लळा, सुचित कीर्ति दे उज्ज्वळा ॥ ४ ॥

रामकृष्णचरणीं समर्पित । ग्रंथ; हो रसिकचित्त तर्पित ॥
न प्रमादभव दोष राहवू । सत्प्रमोदनयनोद[९] वाहवू ॥ ५ ॥

---

१ कृष्णमित्र सुदामा २ शब्दसमूह ३ दीनाच्या नजराण्याला या श्लोकातील रूपक सुदामचरित्रावरून घेतलें आहे ४ शिरोरत्न केलें आहे चद्रास ज्यानें तो शकर ५ धोतऱ्याला ६ चद्रकांतमण्याच्या ७ चद्र ८ बलरामाचा धाकटा भाऊ कृष्ण ९ उत्कृष्ट आनदाश्रु

# १६ रघुनाथपंडित

## नलदमयंती–स्वयंवराख्यान

या कविरत्नाविषयीं कांहींएक माहिती उपलब्ध नाही. यांचा 'नलदमयंती-स्वयंवराख्यान' हा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ जरी लहानसा आहे, तरी त्याच्या सर्वांगसुंदरत्वामुळें रघुनाथपंडितांच्या उज्ज्वल प्रतिभेची व वर्णनचातुर्याची वाचकांस पूर्ण ओळख पटते. या ग्रंथाचा विषय शृंगाररसप्रधान असल्यामुळें व त्या रसाचा परिपोष उत्कृष्ट झाला असल्यामुळें, सर्व सहृदय वाचकांस त्यांत सहज गोडी वाटते, व विशेषतः त्या रसाला अनुकूल अशी कवीची अत्यंत रसाळ व प्रौढ वाणी हिचें साहाय्य झाल्यामुळे हें काव्य अधिक चित्ताकर्षक झालें आहे. पंडितांनीं आपल्या कवितेला मनोहर यमकांनीं व नानाविध उत्कृष्ट अर्थालंकारानीं पूर्ण सजविली आहे. छंदोयोजना विविध प्रकारची असून फार मधुर आहे. शब्दरचना जरी संस्कृतमिश्रित व श्लेषमय आहे, तरी त्यांत क्लिष्टत्वाचा दोष नाहीं. या काव्यांत उद्यानांतील वनश्रीचें वर्णन, नलहंससंवाद, हंसदमयंतीसंवाद व नलदमयंतीच्या विरहावस्थेचें वर्णन हे भाग कवीच्या वाग्देवीचीं उत्कृष्ट विहारस्थळें होत. नल व दमयंती यांचीं स्वभाववर्णनें फारच मार्मिक व चमत्कारिक आहेत. हे कवि आनंदतनयाचे समकालिन होते व त्यांचें व्याही होते, अशी एक आख्यायिका आहे. परंतु हे जातीचे सारस्वत ब्राह्मण असावेत असा 'महाराष्ट्रकविचरित्र' काराचा तर्क आहे.

**पुण्य-श्लोक-नृपावळींत[1] पहिला होवोनि जो राहिला ।**
**तो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला[2] ॥**
**व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गाइला ।**
**जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥**

१ पवित्रकीर्ति–नृपांच्या पक्तीत 'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' २ राजा दुराचारी असला म्हणजे पृथ्वीला व तिला धारण करणाऱ्या शेषाला भार होतो असें मानतात; परतु ज्या अर्थीं त्या दोघांना विश्रांति होती त्या अर्थीं नल सदाचारी होता असें ध्वनित केलें आहे

इंद्रादिक वर असतां, कशी नल-सतीच होय दमयंती ? ।
सुंदर-सकल-वधूंत कशी न लसतीच होय दमयंती[3] ॥ २ ॥

कथा बोलूं हे मधुर सुधाधारा । होय शृंगारा करुणरसा थारा ॥
निषध-राजा नळ-नामधेय होता । वीरसेनाचा तनय महा-होता[4] ॥ ३ ॥
चौगुणीनें[5] जरि पूर्ण शीत-भानू । नळा-ऐसा तरि कला-निधी वानूं ॥
प्रतापाचा जो मावळे न भानू । तयासारीखा कोण दुजा मानूं ॥ ४ ॥

चंद्रासि लागति कळा उपराग[6] येतो ।
गंगेसि भंग[7] बहु पाण-उतारा होतो ॥
जें होय चूर्ण तरि मौक्तिक तें कशाला ।
नाहीं समान नळ-राज-महा-यशाला ॥ ५ ॥

वाजीचें मन जाणता, सकलही राजी शिपाई जया ।
याजी होउनियां द्विजांसि म्हणतो 'या जी, धनें घ्यावया' ॥
त्याजी तो धनदा-परी, सुकृत जें त्या जीव ऐसें गणी ।
गाजी तो नळ भूप हूरूप[8] धरुनी गा जी गुणींच्या गणीं ॥ ६ ॥

लोकबंधू[9] जो होय रवीऐसा । कुवलयाला[10] जो सुखद चंद्र जैसा ॥
सांग नोहे तो कुसुम-चाप[11] तैसा । निषध-रायाशीं तुल्यरूप कैसा ? ॥७॥

नाडीज्ञान जयाचें, सरोग-बंधू[12] चतुष्पद गणावे-।
सुत तेजी-तुरगीचे; नळसम सुंदर कदापि न म्हणावे ॥ ८ ॥

---

३ गर्व हरण करणारी ४ यज्ञकर्ता ५ चौपट; म्हणजे षोडश कलायुक्त चद्र जर ६४ कलानी युक्त होईल तर ६ ग्रहण ७ बहुभंग=पूर ८ हुरूप, उत्साह ९ लोकहित करणारा; सूर्यपक्षीं, प्रकाशानें लोककर्माचें नियमन करणारा १० चद्रकमलाला; नळपक्षीं, कु म्ह० पृथ्वी तिच्या वलयाला ११ मदन १२ कृष्णपक्षात कलांच्या क्षयामुळें क्षयरोगी जो चद्र त्याचे बंधु म्ह० धन्वतरी व तेजीतुरगीचे म्ह० अश्वरूपधारी सूर्य व घोडीचें रूप धारण करणारी त्वष्टयाची मुलगी 'सज्ञा' याचे सौंदर्यसपन्न पुत्र अश्विनीकुमार हे ज्याच्या नाडीज्ञानापुढें चतुष्पद गणावे

कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ।
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षांच्या[13] वक्षावरि विवर-लक्षास्तव रणीं ।
कळे राजेन्द्राची त्वरित शर-संधान-करणी ॥ ९ ॥

घाले धनी पुढिल याचक या नळाचे ।
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास जन मागिल देखियेले ।
त्यांहींच ते सकल पूरित-काम केले ॥ १० ॥

अशी अगणित-गुण-कीर्ति नैषधाची ।
फिरे भुवन-त्रयिं जान्हवीच साची ॥
असें असतां द्विज पांच सात याची ।
भेटि घेती वैदर्भ-राजयाची ॥ ११ ॥

बहु आशीर्वादासि तिहीं केलें । भीम-भूपें मग तया बोलिजेलें ॥
तुम्हीं आलां कोठून अशा बोलें । द्विजीं निषधा-पासाव म्हणीजेलें ॥१२॥

भीमराजा मग गिरा वदे ऐसी । निषधदेशीं नळ-राज-रीति कैसी ।
असें ऐकोनी वदति विप्र त्यासी । विप्रयासीं[14] वक्तृत्व ये जयांसी ॥ १३ ॥

हे वामनैक-पद[15] भूमि, नसोनि जंघी[16] ।
एके दिनींच दिन-राज नभास लंघी ॥
वारांशि[17] वानर-विलंघित होय तो कीं ।
लोकीं नसे नल-यशास्तुलना विलोकीं ॥ १४ ॥

जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनांची करी ।
जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनांभीतरीं ॥

---

१३ शत्रूच्या वक्ष.स्थलावर व्रण दृष्टीस पडल्यामुळें १४ कष्टाशिवाय १५ वामनाच्या पावला एवढी; येथे वामनावतार कथा लक्ष्य आहे १६ त्वरितगतीनें चालणारा १७ समुद्र

सोपा जो सकळां द्विजां, सुमतिचा सोपा, सदा लाभतो।
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो॥ १५॥
जो धैर्यें धर-सा, सहस्र-कर-सा तेजें तमा[१८] दूरसा।
जो रत्नाकरसा गभीर, शिरसा भूपां, यशोहारसा॥
ज्ञाता जो सरसावला नव-रसां-माझारिं शृंगारसा।
शोभे तामरसाक्ष तो नळ रसा-नाथ स्तवूं फारसा॥ १६॥
निषध-पति-कथा हे जे सुधेतें जयंती।
परिसुनि दमयंती रंजली रंजयंती॥
नवल मज न भासे चंद्र-वंशैक-शाली[१९]।
नल तरि वनमाळी[२०] भीमकी[२१] हेचि झाली॥ १७॥

नळ-राज-कथा सुधाचि[२२] साजे। दमयंती वर-वर्णिनी[२३] विराजे॥
मिळणी उभयांसि होय जेथें। अधिकारी अधिकानुराग तेथें॥ १८॥
कथा तेथिल ही होय असो ऐसी। हेर आला तो वदे नैषधासी॥
तुझ्या कथनीं वैदर्भराजयासी। प्रीति होती तनयाहि तयापासीं॥ १९॥
जें अंतरंग पिवळें सरसी-रुहाचें। भासे मनांत मज अंग तसें तियेचें॥
गोरोचना-परिस गौर असें गणावें। सोनेंच बावनकसी न कसें म्हणावें॥२०
असें बोले तो चार समाचारा। करी दमयंती नलमनीं विहारा॥
नोवरी हे मज होय कशी दारा। करूं लागे तैं भूप या विचारा॥ २१॥
विभूतीनें झांकला अनळ-सा तो। गुप्त दमयंती-विरह नृपा होतो॥
नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो। सागरानें तो काय सांगिजेतो॥ २२॥

---

१८ अज्ञानापासून दूर म्ह० अज्ञानरहित १९ चद्रवशात एकटाच शोभणारा २० कृष्ण २१ दमयती; पक्षीं रुक्मिणी २२ अमृत २३ उत्तम स्त्री, गुणग्रहण करणारी, श्लेषानें सुधा म्ह० चुना व वरवर्णिनी म्ह० हळद याची मिळणी झाली म्हणजे अधिक अनुराग म्ह० तांबडा रग याचाच प्रादुर्भाव होतो

रजनी दिवस गमेना नृपतिस संगीतही सुख गमेना ।
मन कोठेंहि रमेना म्हणोनि करि वन-विहार सह सेना ॥ २३ ॥
गंगा-तरंग-सम जो निज-देह-वर्णी । भृंगापरी रुचिर कांति जयास कर्णीं ॥
जंघाल[२४] जो पवन-संगतिची सवे घे । शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥२४
जो अंबरीं उफळतां खुर लागला हे । तो चंद्रमा निज-तनू-वरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व ने घे । शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥२५॥
सवें सेना भूपाळ निघालाहे । शींव लंघी उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवकांसि बाहे[२५] । फौज सारी बाहेर उभी राहे ॥ २६ ॥
पनस जंबू जंबीर विविध निंबे । कुंद चंदन माकंद सु-दाडिंबें ॥
तुंग नारिंगें विकसलीं कदंबें । वसति तेथें शुक-सारिका-कदंबें ॥ २७ ॥
लतेतळीं रुंद निरुंद कालवे । गळोनि तेथें मकरंद कालवे ॥
परागही सांद्र तयांत रंगती । फुलांसवें भृंग-तती तरंगती ॥ २८ ॥
उपरि सकंटक साचे परंतु साचे[२६] जयांत सुरसाचे ।
घोंस असे फणसांचे षण्मासांचे कितीक वरसाचे ॥ २९ ॥
तया वनीं एक तटाक तोयें । तुडुंबलें; तामरसानपायें[२७] ॥
निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥ ३० ॥
अमृतही पयही म्हणवीतसे । उभय होय तसी रुचि वीतसे ॥
मधुर सारस[२८] तें जल गा तसें । मधुर सारस[२९] यास्तव गातसे ॥ ३१ ॥
पीतां[३०] मरंद उदरं-भर-बंभरांचें । जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥
जें पद्म तेथिल सहस्र दळां धरीतें । प्रत्यक्ष सूर्यकिरणांस विसांववीतें ॥३२॥

---

२४ वेगवान् २५ बोलावी २६ गरे २७ तामरसाचा ( कमलाचा ) अनपाय ( अविनाश ) त्यामुळें निरंतर अमंद मरंद ( पुष्परस ) वाहे २८ सरोवराचे २९ सारसपक्षी ३० अन्वयः—जें ( कमल ) इंदिरेचें ( पद्मालया लक्ष्मीचें ) [ मंदिर तें ] मरंद पीतां उदरंभरबंभराचें (भ्रमरांचें) सुंदर मंदिरही होय.

तया कासारा राज-हंस पाहे। राजहंसांचा कळप पोहताहे ॥
तयांसाठीं हे वापिकाच[31] पोहे। नळें केली हें कोण म्हणे नोहे ॥ ३३ ॥

तया हंसांचे देह कांचनाचे। पक्ष झळकती वीज जशी नाचे ॥
रंग माणिकसे चंचुचे पदांचे। जसे अधरींचे भीमकन्यकेचे ॥ ३४ ॥

त्यांतील एक कलहंस तटीं निजेला।
जो भागला जल-विहार विशेष केला ॥
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो।
पक्षीं तनू लपवि, भूप तया पहातो ॥ ३५ ॥

टाकी उपानह[32], पदें अति मंद ठेवी।
केली विजार वरि डौरहि, मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच, अशा उपायीं।
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं[33] ॥ ३६ ॥

तदितर खग भेणें वेगळाले पळाले।
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो।
कठिण समय येतां कोण कामास येतो ! ॥ ३७ ॥

न सोडी हा नळ भूमिपाळ मातें। असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥
हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें। स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ ३८ ॥

वधुनि माझी हे कनकरूप काया। कटकमुकटादिक भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तुला राया। काय नाहीं तूजला दया माया ॥३९॥

म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी।
कांता काय वदों नव-प्रसव ते सातां दिसांची तसी ॥

---

३१ पाणपोई ३२ जोडा ३३ पाय धरून पकडलें असा भाव

पाता[३४] त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ।
हातांमाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥ ४० ॥

सखे माझे परतोन घरा येतां । तुवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां । कशी होशिल तें आठवितों आतां ॥४१॥

थोर होतिल बाळकें तुझीं बाळे । तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोकशाळे । मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥ ४२ ॥

सदय हृदय याचें भूप हा तापहारी ।
म्हणुनि परिसतां मी होय येथें विहारी ॥
मजहि वध कराया पातकी पातला जो ।
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ! ॥ ४३ ॥

येणेंपरी परिसतां अति दीन वाचा ।
हेलावला नल पयोधि दया-रसाचा ॥
सोडी, म्हणे ' विहर जा अथवा फिराया ।
राहें यथा-निज-मनोरथ हंसराया ' ॥ ४४ ॥

सुटुनि खग पळाला बैसला शाल-शाखे ।
क्षणभरि निजदेहीं मुक्ति-विश्रांति चाखे ॥
स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले ।
कवळिति निजबंधू बाष्पबिंदू गळाले ॥ ४५ ॥

विसांवा घे कांहीं, उडुनि लवलाहीं परतला ।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणिबंधीं[३५] उतरला ॥
म्हणे हंस क्षोणी-पतिस, " तुज कोणी सम नसे ।
दयेचा हा ठेवा तुजजवळि देवा बहु वसे " ॥ ४६ ॥

---

३४ पालनकर्ता ३५ मणगटावर

ऐक राया ! तूं थोर दया–सिंधू । नीति–सागरही, तूंच दीनबंधू ॥
निखंदूनी[३६] बोलिलों नको निंदू। सकल, वदसी, तरि पाय तुझे वंदूं ॥४७॥
किती रावे असतील तुझे धामीं । किती कोकीळा सारिका तसा मी ॥
चित्त जडलें हें तूझिया लगामीं। नृपा स्वामी मज योजि तुझ्या कामीं ॥४८॥

'हें पांखरूं मजसि येइल काय कामा'।
ऐसें नृपा न वद पूरित-लोक-कामा ॥
मोलें उणें व्यजन[३७] तें धरितां पुढारीं ।
छाया करी, तपन-दीप्तिसही निवारी ॥ ४९ ॥

वर–नृपति विराजे भीम हें नाम ज्याला ।
वर दमन ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
वर–सुत दम नामा, दांतनामा द्वितीय ।
वर–तनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ ५० ॥

तेजोनिधीस तनया यमुना जसी ते ।
सीता जशी सुजनका, जनका तसी ते ॥
ते आवडे, सुतहि ते न तसे तयाला ।
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ! ॥ ५१ ॥

राया तिचें मुख सुधाकर या द्वयाला ।
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असता नसता कलंकी ।
हा चंद्र हें मुख, असें मग कोण शंकी ॥ ५२ ॥
चांफेकळीपरिसही सरलत्व नाकीं ।
जीचा धरी अधर विद्रुम-भावना[३८] कीं ॥

---

३६ खोंचून, निर्भत्सना करून ३७ छत्री ३८ पोंवळ्यासारखा रक्तवर्ण

भासे मनांत मज बिंब[३९] फळ-भ्रमानें ।
कीं सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें ॥ ५३ ॥
धाता करींच करिता, मृदु हे न होती ।
या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला[४०] रस पूर्ण केली ।
ओतीव, हे न घटिताकृति बोलिजेली " ॥ ५४ ॥
ऐशीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ।
विश्रांतिही विरहखेदहि फार झाला ॥
आधार हा मज म्हणोनि गणोनि डोले ।
झाला सवेंचि विरही नळराज बोले ॥ ५५ ॥
" वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ।
चालून मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
चक्रापरीच[४१] सजलों असतां फिराया ।
हंसा[४२] ! तुझा उदय होय सुखी कराया ॥ ५६ ॥
भृंगें विराजित नवीं अरविंद-पत्रें ।
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ।
आहा ! वृथा उतरलों, भिजलों, विलोकीं ॥ ५७ ॥
हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ।
म्यां मानिला निटिलदेश[४३] तिचाच साचा ॥
शंख-द्वयीं[४४] धरुन कौंकुम कीर-वाणी[४५] ।
लावावया तिलक लांबविला स्व-पाणी ॥ ५८ ॥

---

३९ तोंडले ४० शृंगार ४१ चक्रवाकाप्रमाणें ४२ हंसपक्षी, श्लेषानें सूर्य ४३ कपाळ ४४ कानशिलाचीं दोन हाडे ४५ खरोखर

भला माझा तूं हंस गडी राया। विरह-दुस्तर-विस्तार निस्तराया॥
चित्त ने घे मज तूज जा म्हणाया। तेंचि वाहन तरि तूं करी फिराया॥५९॥
असें बोलेोनी नळें रंजवीला। अंजुळीमाजी हंस बैसवीला॥
गमे चंपक-कुसुमौघ-हार झेला। पाठवाया युवतीस सिद्ध केला॥ ६०॥
त्वरित पुनरागम असो तुझा येथें। झेंप घालीं सुखरूप गगनपंथें॥
नको विसरूं आम्हांसि असों येथें"। वदुनि धरिजे गहिंवरा महीनाथें॥६१॥
'बरें येतों' म्हणऊनि हंस बोले। उडुनि जातां बहु शकुन तया झाले॥
पवन-चंचळ मधुबिंदु मुखीं आले। वामभागीं उभयतां गरुड गेले॥ ६२॥
उडत होते खग वायसादि जाणा। तयां भासे तैं हंस तो ससाणा॥
नभा मानुनि कीं निकषपाषाणा[४६]। स्वर्णरेखा तैं तेज मनीं आणा॥ ६३॥

खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली।
मृदु-पवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली॥
तदुपरि जव-शाली वेंघला चंद्र-शाला[४७]।
निरखि वितत-शाला[४८] राजधानी विशाला॥ ६४॥

सकल-भुवन-ललामायमाना[४९]।
मानाधिकें[५०]-विभव-धनिक-सदन-शत-विराजमाना॥
कलश-जनित[५१]-मुनि-चकित-जलधि-शरणाति—
विस्तृत-परिखांतरीपायमाना चंद्रशाला-विजित-सुर-विमाना॥
जिचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभचि माना।
लाविति ते जलदा निज माना। वासव-चाप जयांस कमाना॥
ऐसी कुंडिन-नामधेय-नगरी राज-हंसें पाहिली॥ ६५॥

---

४६ कसोटीचा दगड ४७ उच माडी ४८ जीमध्यें विस्तृत वाडे आहेत अशी ४९ भूषणभूत ५० अमित ५१ घटज अगस्त्य ऋषीला भ्यालेल्या सागराचें रक्षण करणाऱ्या परिखा (खदक) त्यांनीं अतरीपायमाना म्ह० बेटाप्रमाणे वेष्टिलेली

तेणें तसें नगर तें धरितां निडारीं[५२]। तेथें विलास-वन एक दिसे पुढारी॥
जेथें सुशीतळ महीतळ सांद्र साई। जाई जुई फुलमयी बहु आंबराई ॥ ६६॥
तो मंडलाकृति फिरे उतरावयाला। भैमी-मुखेंदु-परिवेष[५३] म्हणों तयाला॥
तेथें महीवरि असा खग बैसताहे। कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे॥६७॥
जो बैसतां चपळ पक्षपुटीं धरेला। हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला॥
पाहे तया खगवरासि वरानना हे। मानी मनीं नवलही, मग बोलताहे॥६८॥

‘असा पक्षी लक्षी बहु—विहग—लक्षीं न मिळता।
सुवर्णी जो वर्णीं वद कवण वर्णी कवयिता॥
अगाई हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी।
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी’॥ ६९ ॥

ऐसें वदे मग तयास धरावया हे।
तैं होय हंसगमना पहिलीच[५४] आहे॥
वाजेच ना वलय, नूपुर-नाद नोहे।
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ?॥ ७० ॥

हे मंद—मंद—पद सुंदर कुंद—दंती। चाले जसा मद—धुरंधर इंद्र—दंती॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते। निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते॥७१॥
गवसलाच असा खग भासला। तंव तदीय सखीजन हांसला॥
मग सवेंच बुझावुनि हांकिला। उडविलाचि पिटाळुनि लाविला॥ ७२॥
‘हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हांला।
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हां उडवाल तया विहगाला॥
जा परत्याच, तुम्ही नलगेच, असें वदुनी नृपराजसुता ते।
राहविला सखिचा जन, आपण—मात्र तयास धरूं मग जाते॥ ७३॥

---

५२ दृष्टीत ५३ दमयंतीच्या मुखचंद्राचें खळें ५४ पहिलीच जी हंसगती होती ती हंसगमना म्ह० हंसाकडे जाणारी झाली

रागेजली[५५] अरुण-कांति विराजवीते ।
हे एकली सुतनु चंद्रकला तशी ते ॥
गेली हळूच, कलहंस समीप केला ।
कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥ ७४ ॥

मद्-गज-गमनेनें मागुती चाल केली ।
विनत-तनु-लता हे तत्समीपास गेली ॥
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं ।
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ७५ ॥

हंसें तदा चतुरसंमत युक्ति केली ।
ते चालवीत सुतनू बहु दूर नेली ॥
छाया[५६] तियेशि दुसरी तिसरी वनाळी ।
जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी ॥ ७६ ॥

भूमि-भागीं फिरणार तूं, तुला मीं । कसा सांपडेन सांग गगन--गामी ॥
ाळ बाळे ! जरि होय चंद्रकामी । हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥ ७७ ॥

ासो, सांपडतों तुझ्या करामाजी । पुन्हां सुटका करिशील काय माझी ॥
ासा पातेजूं[५७] ? बाळबुद्धि तूझी । स्त्रीस्वभावें बहु आणशील बाजी[५८] ॥ ७८ ॥

चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ।
तरि न धरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा ॥
पळुनि तिज निखंदी तीस तो खेद नाहीं ।
शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ॥ ७९ ॥

ोण तूं गा कोठील कवणियाचा ? । कसा झाला तव देह सोनियाचा ॥
ाशी आली ही तूज मनुज-वाचा ? । काय भाग्योदय सांगुं या वनाचा ॥ ८० ॥

---

५५ रागावली ५६ निला सोबतीला तिची छाया व वनराजि होती ५७ विश्वास ठेऊ
५८ सकट

धरिल पाहिल सोडील असा पाहीं। मजवरता विश्वास तुझा नाहीं॥
असो, पुसतें ते सांग कथा कांहीं। जाई अथवा मग याच वनीं राहीं॥८१॥

असें बोलोनी मौन धरुनि राहे। काय बोले तो हंस, असें पाहे॥
तदा त्याचा वचनौघ असा वाहे। राजकन्ये! तूं आयकें गिरा हे॥८२॥

मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें[५९]।
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें॥
आम्ही असों नृपसुते तरि कांचनाचे।
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे॥ ८३॥

जो[६०] मानसीं विहरतो, विहरो, परी तो।
कां आमुची कुलसती असती करीतो?॥
राखीं नळा! निज-यशो-मय-हंस राया!।
आलों महीवर फिराद[६१] अशी कराया॥ ८४॥

मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौघ-पाशीं।
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे?।
लोकेशता विभवही चतुराननाचे[६२]॥ ८५॥

एकांत लेखनहि वाचनहि करीतो।
माझी तनु-द्युति समीप तदा धरीतो॥
याकारणें नळ मला बहु आप्त मानी।
तो सांगतां निज-मनोरथ होय कानीं"॥ ८६॥

---

५९ सुवर्ण कमळें ६० नळाचा कीर्तिरूप हंस मानसांत विहार करितो तो खुशाल करो, परंतु तो आमच्या सुवर्णकांतित्वाबद्दलच्या कुलकीर्तीचा नाश कां करितो? त्याला कह्यांत ठेव, असा भाव ६१ फिर्याद ६२ ब्रह्मदेवाचें

आधींच नैषध-कथा नवनीत-भेला[६३] ।
होता अलंकरण-रूप इच्या जिभेला ॥
हंसोदयें[६४] विघरतां अधरीं धरी ते ।
स्वीकारितां वचन तें मग आदरीते ॥ ८७ ॥

" नळें तुजशीं एकांत काय केला ? । तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥
तया बोलोनी निववीं या भुकेला । ऐकवावा मज म्हणुनि नायिकेला ॥८८॥
निषधराजीं हे फार दिसे राजी । असें हंसें जाणोन मनामाजी ॥
बोलिजेली नळ-राज-कथा हे जी । भला हेजीब[६५] तीशि म्हणे हे जी ॥ ८९ ॥

" नळ म्हणाला मज सहज धरुनि बाहीं ।
तुला कोठेंहि बंक अटक नाहीं ॥
सकळ भुवनें तरि फिरुनि राजगेहीं ।
एक नवरी मज योग्य बरी पाहीं ॥ ९० ॥

एकांत हाच वदला मज जाण बाळे ! ।
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ! " ॥
येणेंपरी परिसतांच तया अनन्या ।
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ ९१ ॥

"मी जाण देवनळही[६६] स्वकरीं धराया ।
सांगेन काय ? चतुरा ! मज लाज जाया ॥

---

६३ लोण्याचा गोळा ६४ सुर्योदयें; पक्षीं; हसाच्या आगमनानें ६५ दूत
६६ (अन्वय-१)—काळें करूनि जोंवरि लेखीं सुख होय (तोंवरि) देवनळ ही स्वकरी धराया (योग्य आहे असें) मज लाज जाया मी सागेन काय ? अर्थः—मला नळ वरीपर्यंत देवनळ (बोरूची लेखणी) हातीं धरून पत्रद्वारा मनोगत कळवून सुख करून घेतलें पाहिजे. मला ज्यास्त स्पष्ट सागण्यास लाज वाटते. तू चतुर आहेस. तू सर्व समज. (अन्वयः २) देवनळ ! या (व) ही (दमयती) जाया (स्त्री म्हणून स्वकरी धरा हें) मी काळेकरून सांगेन जाण; जों (जोंपर्यंत तो मला) वरी (वरील) तोंवरि लेखी सुख होय. यावरून असें

काळें करुन सुख जोंवरि होय लेखीं "।
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ ९२ ॥

श्लेषशब्दें इणें भाव सांगितला। नैषधाधीश तो नाथ मागीतला ॥
होय जाणीयली घे त्रपा-कंचुला[६७]। हंस बोलावया हालवी चंचुला॥९३॥

'गांठ्याळ जें हृदय सांद्र[६८] न होय ज्याचें।
नामेंचि देवनळ, कार्य नसे तयाचें॥
धत्तूर[६९] हा कनकनाम सदा धरितो।
होईल काय रसिका कनकापरी तो ? ॥ ९४ ॥

ती बोलते युवति, लाज मनीं दडाली।
होती तुवां विघरतां मन, ती उडाली॥
आतां वरूं नळवरासि तुला नवाजूं।
गाऊं तुझी स्तुति करूनि कशास लाजूं॥ ९५ ॥

परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें।
पतग-कुल-वतंसें[७०] अंतरीं ध्यायिजेलें ॥
पर-वश-हृदया हे नैषधें राज-हंसें।
म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें॥ ९६ ॥

'जशी रंजलि आहेस निषध-भूपीं। तसा तोही रंजला तुझ्या रूपीं ॥
दैव-घटने अन्योन्य व्हाल सोपीं। तुम्ही नांदालहि सत्य हें निरोपीं ॥९७॥

नळरहित वराशीं तूज योजूनि पाहे।
तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे !॥

---

ध्वनित केलें कीं 'तुला नळ आवडला काय ? असें तूं विचारिलें, तर स्त्रिया 'अमुक नवरा आवडला' असें कधीं सांगतात काय ? नाहीं; लज्जेनें तसें सांगत नाहीत. पण मला नळच इष्ट आहे असें तिनें दर्शविलें. या श्लेषमय पद्याची रचना फारच मजेदार आहे

६७ लज्जारूप चिलखत ६८ स्निग्ध ६९ धोतरा ७० पक्षिश्रेष्ठ हंसानें

अचतुर नर तोही जाहल्या जेविता[७१] कीं ।
सळमिसळ करीना सर्वथा क्षीर-ताकीं ॥ ९८ ॥

कशाला हें बोलणें ! काय एणें ! । तुवां वरिला नळ-राज तूंहि तेणें ॥
सफळ माझें हें येथवरी येणें । राजकन्ये नीरोप मला देणें ' ॥ ९९ ॥

असें जाउनि तूं बोल राजहंसा ! । तुझी दासी जाहलें राजहंसा ! ॥
नको चिंता तूं करूं अरिध्वंसा । ऐक शुभ्रांशू-वंशजावतंसा ! ॥ १०० ॥

नको पाहूं तूं नोवरी नळाशी । मीच भावें होईन सत्य दासी ॥
जरी यावें आतांचि तयापाशीं । गोष्ट भासे विपरीत लौकिकाशीं ॥१०१॥

' करुनि मज रवाना राजसे ! तूजसाठीं ।
नृपति निरखि माझी वाट आराम-वाटीं[७२] ॥
बसवुनि निजपाठीं तूज नेईन तेथें ।
परि चुकुर तुझे हे लोक होतील एथें ॥ १०२ ॥

येरीकडे नृपति धाडुनि राजहंसा ।
तो बैसला करित आपण तत्प्रशंसा ॥
येईल शीघ्र घटना करुनी तियेची ।
होईल भेटि मज आज तये प्रियेची ॥ १०३ ॥

तों चिन्हें शुभ पाहुनी नृप म्हणे ' लाभेल लाभावळी ' ।
आला सन्मुख राजहंस निरखी, बाहूयुगें आंबळी ॥
बोले मंजुळ वाक्य ' एथ बसलों त्वद्ध्यान लावूनि रे ! ।
झालें वृत्त समग्र सांगुनि करीं हंसा समाधान रे ' ! ॥ १०४ ॥

हंस बोले, ' नृपराज सु-गुण-सारा ! । माळ घालीते ती तुला उदारा ॥
तुझ्या ध्यानीं सलग्न जे विचारा । सत्य मानीं ती होय तुझी दारा ॥१०५॥

---

७१ जेवू लागला तर ७२ उद्यानांत

बरें येतों, बोलोनि पाय हातें । नमुनि चाले सप्रेम तो गृहातें ॥
नृप निघे तें सह–चमू निजपुरातें । हंस–वचनीं लावुनी अंतरातें ॥ १०६ ॥

असो; आल्या इजजवळि सख्या ऐशा । बोलती त्या मग तीस सकळ कैशा ॥
हंस धरुनी परिपूर्ण तुझी आशा । काय गेला तो उडुनि गगनदेशा ॥१०७॥

न रंजे कारंजें निरखुनि, फणीतें[७३] फणफणी ।
मुदेनें मोदेना नल–गुण–गणी जे गुणगुणी[७४] ॥
न बैसे जे सेजेवरि, न परिसे जे शुकगिरा ।
न नाहे, माना, हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १०८ ॥

गजबज बहु झाली, माय धांवोनि आली ।
धरुनि हृदयदेशीं तीजला सेज केली ॥
करिति विझणवारे त्या सख्या वेगळाल्या ।
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १०९ ॥

ते शीतळोपचारीं जागी झाली, हळूच मग बोले ।
'औषध नलगे[७५] मजला,' परिसुनि जननी 'बरें'! म्हणुनि डोले ॥११०॥

मूल उपवर हे जाहली इयेला । पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला ॥
असें ऐकूनी वधूचिया बोला । सँवराचा[७६] मग यत्न नृपें केला ॥ १११ ॥

निषधराजासी लिखित पाठवी तो । प्रतिद्वीपीं भूपतिसही लिहीतो ॥
अशा यत्नी लागला नृप अहो ! तों । पुढें परिसा वृतान्त कसा होतो ॥११२॥

ऋषी नारद असतां नभोविहारी । वैजयंती ज्या दिसे मनोहारी ॥
मणी रमणीय कनक–कलश भारी । सुरपतीचा जो सौध महा भारी ॥११३॥

तया प्रासादीं जाय ऋषी पाहे । सभा केली, देवेन्द्र बैसलाहे ॥
फार आदरिलें तया देवरायें । अर्घ्यपाद्यादिक करुनि विनतकायें ॥ ११४॥

---

७३ केंस विचरण्याच्या फणीला त्रासली ७४ गुणगुण, ध्यान करी ७५ नको; श्लेषानें 'नल गे' म्ह० मजला नल हेंच औषध पाहिजे ७६ स्वयवराचा

‘ उपवर दमयंती जाहली नोवरी ते ।  
कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥  
दृढ-तर-निज-लज्जा-गव्हरीं गुप्त केला ।  
जिवलगहि सखीला जो नसे सांगिजेला ॥ ११५ ॥

नवे तरणे नृप मुख्य तीजसाठीं । मोहिले, ते करिताति यत्न कोटी ॥  
कलह-वार्ता ही मानिताति पोटी । तया युवतीची आस तयां मोठी’ ॥११६॥  
असें नारद बोलोनि तो निघाला । जाय हृदयासी मानिल्या स्थळाला ॥  
थोर चिंता मग होय सुरेन्द्राला । म्हणे कैसी ती वरिल आपणाला ॥११७॥  
वरुण, पावक, यम, इन्द्र हे मिळाले । असे चौघेही रथारूढ झाले ॥  
महीलोकासी यावया निघाले । तया कुंडिन-नगरा-समीप आले ॥ ११८ ॥  
तंव तया चवघांस तया पथीं । निषध-नायक येत दिसे रथीं ॥  
तरुण सुंदर जो चतुराग्रणी । अतुल वैभव राजशिरोमणी ॥ ११९ ॥

नळाते पाचारी, सुरपति विचारी कुशल तो ।  
म्हणे, ‘ आम्हांपाशी तव गुरु विलासी निवसतो ॥  
खुणा ज्या ज्या त्याच्या तुजजवळि त्या त्या निरखितों ।  
खरा तूं तद्वंशी म्हणउनि तदंशी समजतों ॥ १२० ॥

तो वन्हि, तो वरुण, तो यम, इन्द्र गा मी ।  
झालों तुला सकळ हे विदित स्वनामी ’ ॥  
बोले महीरमण ‘ हा नळ चंद्रवंशी ।  
वंदी पदास तुमच्या तुमचाच[७७] अंशी ’ ॥ १२१ ॥

बोलताहे देवेन्द्र नृपवराला ।  
‘ नैषधा तूं आलासि स्वंवराला ॥

---

७७ राजा हा अष्टलोकपालाचा अंश असतो असें मानतात

समज आम्हीं तुजजवळि याचनेला ।
करूं आलों मनिं धरुनि कामनेला ॥ १२२ ॥
जे हे दिशापति[७८] विशाल-यशा ! अशांला ।
आशावशा[७९] कु-वलयांत दशा[७९] कशाला ॥
हा बोल तूं न वद, तूजसमीप येतों ।
आम्ही मखीं निजमुखीं *अवदान घेतों ' ॥ १२३ ॥
केला विचार हृदयीं नळ-राज यानें ।
' हा जीवही धनहि देइन निश्चयानें ॥
देवेंन्द्र दे जरि म्हणेल कदापि भैमी ।
ते देववेल मज काय ? करीन गै[८०] मी ' ॥ १२४ ॥
बोले सुराधिप नराधिपतीस राया ! ।
भैमी जशी मज वरील तसें कराया ॥
बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ।
तूं बोलका चतुर केवळ होस राजा ! ' ॥ १२५ ॥
मग हळुच सुरेंद्रा बोलिजे भूपतीनें ।
' मज निज-सुमनाची[८१] घातली माळ तीनें ॥
हृदय तरि तियेचें सान्द्र झालें सुवासें[८२] ।
चलित न करवे तें कोणत्याही प्रयासें ' ॥ १२६ ॥
पुन्हा बोले देवेंद्र नृपवरा, या । तुला झालें वश हृदय तिचें राया ॥
तरिच आलों हे याचना कराया । तुझ्या वाक्यें आम्हांसि ते वराया ॥१२७॥
दातव्यही स्ववश आपण जाणताही ।
पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥

---

७८ दिक्पाल ७९ आशाबद्ध दृष्टि *आहुति ८० काणाडोळा ८१ चांगल्या मनाची म्ह० मनानें वरिलें आहे ८२ सुगधानें, पक्षीं, (नळाची) चागली वसति तिच्या हृदयात झाली आहे

दाता असा शठ कसा ठकसा कदापी ।
जो याचकावरि दया न करीच पापी ॥ १२८ ॥

भांबावला धनमदें भलतेंच बोले ।
तो बोलही सरस मानुनि लोक डोले ॥
मांसेंकरूनि फुगला गळसाच भावे ।
ज्या दीन मीन धरितां वळसाच[८३] पावे ! ॥ १२९ ॥

असे परिसोनी बोल वासवाचे । तया नळराजा काय वदे वाचे ॥
'तुम्हीं ज्ञाते हो थोर थोर साचे। असां साक्षी तुम्हि माझिया मनाचे॥१३०

ज्यासि जेथें सामर्थ्य नसे त्यातें । कसें कार्या त्या तुम्ही सांगिजेते ॥
बाळ तान्हें उचलील काय जातें । बोलणाराचें मोल फोल जातें ॥ १३१

बोले सुरेंद्र, ' नृप-सौध सुखें फिराया ।
आकार गुप्त वर देइन देव-राया ॥
जाईं विदर्भ-वसुधेस, सुतेस शोधीं ।
आम्हांसि ते तरि वरील तुझ्याच बोधीं' ॥ १३२ ॥

' बरें ' म्हणोनि उत्तरें । रथावरोनि ऊतरे ॥
तया राजपुरीं शिरे । शोभा तेथील पाहतो ॥ १३३ ॥

प्राणापरीच हृदयीं नगरांतरीं तो ।
गुप्तस्वरूप नलभूप तदा धरीतो ॥
बंकीं[८४] रिघे, तंव तया दिसताति बंके ।
पंकेरुहास्य[८५] न दिसेच, तया न शंके ॥ १३४ ॥

तया राजसौधांतरीं । शोभा पाहे परोपरी ॥
कोठें आहे ते सुंदरी । धुंडावया लागला ॥ १३५ ॥

---

८३ गोता; सकट ८४ चौकींत, बके=पहारेकरी ८५ कमलवदन नळ

सुमनसेजेच्या पलंगीं । बैसलीसे तन्वंगी ॥
सख्या खेळताती संगीं । बहु अप्सरा त्या जैशा ॥ १३६ ॥

प्रगट तिजपुढारां जाहला राज-मौळी ।
पदर वरि न घेतां हार जैसा झळाळी ॥
निज-हृदय-निवासी काय बाहीर आला ।
निरखुनी दमयंती तेविं मानी तयाला ॥ १३७ ॥

गजबजोनि समस्त तिच्या सख्या । गज-गमा उठल्या तिजसारख्या ॥
पदर सांवरितां नृप-बालिका । झळकती हृदयीं मणिमालिका ॥ १३८ ॥

रामातें जनक-क्षमा-पति-सुता[८६], रामा[८७] जशी रेवती ।
कामारीस[८८] नगाधि-राज-तनया, कामासि जैसी रती ॥
या मानूनि तशी विदर्भ-दुहिता रामा मनीं भाविते ।
हा माझा हृदयाब्ज-सूर्य म्हणुनी त्या मानिनी बोलते ॥ १३९ ॥

कोण तुम्ही कवणाचे कोठुनि येथें कां आलां ? हो ! ।
काय निमित्तें दिधला मजला हा निज-दर्शन-लाहो[८९] ॥ १४० ॥
संभवलां कवणाचे वंशीं सांगा हो अकलंकी ।
उभे असां कां भागतसां हो या बैसा पर्यंकीं ॥ १४१ ॥

राजे असाल तरि धन्य वसुंधरा हे ।
शोभाल देव तरि नाक यथार्थ आहे ॥
भोगी[९०] तुम्ही उपजलां जरि नागलोकीं ।
खालीं[९१] असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ १४२ ॥

दुग्ध-पूर नसतां निजरूपीं क्षीर-सिंधु तो जैसा ।
वसंत आला नाहीं तरि तो उद्यान-भाग जैसा ॥ १४३ ॥

---

८६ जनकराजाची कन्या सीता ८७ बलरामाला ८८ शंकराला जशी पार्वती ८९ लाभ ९० नाग ९१ नाग जरी पाताळात असतो तरी तो जगत्कर्ता जो विष्णु त्याच्यावर आपलें फणाछत्र धरितो म्हणून अर्थात् तो सकळावर असतो

अमृत-कराचा उदय न होतां रजनी-समयो जैसा।
तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा ?॥ १४४॥

भूपाळ जो मम मनोमुकुरीं[९२] उभासे।
तो नैषधेंद्र तुमचा अनु-बिंब भासे॥
रूपें तशींच दिसतात दिगंतराळीं।
तीं हीं कशीं म्हणवितील तुम्हां निराळीं॥ १४५॥

सरस-द्युति-पद फुल शिरसाचें फुललें मृदु स्वभावें।
चालवाल किति दूर तयातें अदय हृदय मज भावे॥ १४६॥

कर्ण-युगल हें धन्य करावें सांगुनियां निज नांवें।
स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन स्वीकारावें॥ १४७॥

आहेस कीं सुखवती कमनीय-लीले।
निश्चित कीं हृदय होय तुझें सुशीले !॥
आतां नकोच अवलंब विलंबनाचा।
हेजीब[९३] मी समज मुख्य सुराधिपाचा॥ १४८॥

जो धरी निजकरीं शतकोटी। ज्यासि नम्र सु-मनः-शत-कोटी[९४]॥
तो सुरेंद्रहि तुला नत याची। हा असो वर, तुला न तयाची॥ १४९॥

बोले नृपाळ, 'पुससी मज वंशनामें।
यावीण सांग तटली तुझि काय कामें ?॥
आलों सुधांशु-मुखि ! जे घटना कराया।
तीतें विचारुनि, वरीं सुर-लोक-राया॥ १५०॥

बोले सुंदरी तयासी। 'स्ववंशनाम न सांगसी।
तरी आम्हीं पर पुरुषासीं। वदणें मर्यादा नोहे'॥

---

९२ मनोरूप आरशात ९३ दूत ९४ शतकोटी देव

तिचा पाहुनियां कोप । काय बोले नळभूप ॥
'चंद्र-वंशाचें हें रोप । माझें जाण राजसे ॥
महाजनाचा आचार । निज नामाचा उच्चार ॥
करूं नये हें साचार । शास्त्राधार आहे कीं' ॥
पुन्हा बोलते सुंदरी । 'चंद्रवंशी महीवरी ॥
बहु आहेत ते परी । नामें घेतां जाणवे ॥ १५१ ॥

मी वासुदेव ऐसें स्व-नाम मुर-हर[९५] वदे सकळवेदी ॥
आधार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी?' ॥ १५२ ॥

बोले नैषधेंद्र वाचा । काय 'नाम हेजीब इंद्राचा ॥
किती साक्षेप नामाचा । काय तेणें करिसी तूं ? ॥ १५३ ॥

केला काय अंगिकार । बोलूं इन्द्रासी निर्धार ?' ॥
तंव ते बोले सुकुमार । चंद्राकारवदनातें ॥ १५४ ॥

'ऐरावतावरि बसोनि विमानदेशीं ।
जो संचरे सुरपती सुखसंपदेशीं ॥
मी भूमिकेवरि असोनि, तयास कांहीं ।
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ? ॥ १५५ ॥

नळावेगळा भ्रतार । नलगे स्वप्नीं हें साचार ॥
ऐसा निश्चय विचार' । तंव राजेन्द्र बोलतो ॥
'टाकूनि इंद्राचा संभ्रम । धरिशी कां तूं नळभ्रम ? ॥
जाईल विश्राम-विभ्रम[९६] । नसता श्रम होईल ।
तुझें सौंदर्य पहावया । धरी सहस्राक्ष काया ॥
तया वरीं देवराया । नळमाया टाकुनी ॥

---

९५ सर्वज्ञ मुरारि ९६ सुखविलास

अथवा तुज तो मोहला । होऊं नेदी नैषधाला ॥
यास्तव त्याच इंद्राला । माळ गळां घालावी ॥ १५६ ॥

एणेंपरीच अनळासि यमाधिपासी ।
पाशीसही तरि वरीं' म्हणतां नृपासी ॥
आधार लेश न वदे नवसारसाक्षी ।
होते तयासि सुरनायक गुप्त साक्षी ॥ १५७ ॥

ऐसा अवंचक वदोनि नृपाळ आला ।
इंद्रादिकांसहि निवेदित वृत्त झाला ॥
पाचारिले मग महीन्द्र विदर्भभूपें ।
आले समस्तहि सभेसि सहर्षरूपें ॥ १५८ ॥

इंद्रादिक तेही अधिप । धरूनि आले नळरूप ।
सभे बैसले अमूप । जेथें भूप शोभती ॥ १५९ ॥

आला नळही भूपाळ । कीर्ति-रूपें जो विशाळ ।
तदा दमयंती वेल्हाळ । सखियां बोलते ॥ १६० ॥

'नळ-राज-हिरा वरिला । तोचि मनीं म्यां धरिला ।
सुर किंवा नर भला । न वरीं अन्यातें निश्चयें' ॥ १६१ ॥
ऐसें बोलोनी सुंदरी । बैसे शिबिकेभीतरीं ।
आली राज-सभांतरीं । बरोबरी शारदा[९७] ॥ १६२ ॥

बोले शारदा तियेला । 'ऐकें राजांच्या नामांला ।
मना येईल तयाला । माळ गळां घालीं तूं ॥ १६३ ॥

'हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावली कंधरीं ।
हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे आदरी ॥

---

९७ जिला सर्व राजाची माहिती असते व जी फार चतुर असते अशी स्त्री स्वयवर-वधूची सखी असे, तिला शारदा म्हणत

हा राजीव-दलाक्ष, सद्गुण-निधी, फारा जनांचा महा ।
थारा, हाच वरीं, रिपूंशि परते सारावयाचा, पहा' ॥ १६४ ॥

एणेंपरीच बहु भूप निवेदिजेले ।
हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥
जेथें वळी[९८] धरुनि पंचनळी[९९] बसे ते ।
तेथें विरिंचि[१]-तनये-समवेत येते ॥ १६५ ॥

'ज्याचीं पदें धरिति देव शिरोललामीं ।
स्वाराज्य[२] जो मिरवितो गजराजगामी ॥
जो वज्रपाणि, बहुलोचन,[३] कांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १६६ ॥

साहील कोण सजणे! बहु तेज याचें ।
मध्यस्थ[४] रूप धरितो हरिचें यमाचें ॥
स्नेहा[५] धरी, अधिक होय तमासि वारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १६७ ॥

संपूर्ण ते समज यास्तव[६] दक्षिणाशा ।
पाप्यास दंड धरितो, करितो विनाशा ॥
देहीं जया मिरवते घन[७]-कांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १६८ ॥

आधार[८] हाच सजणे बहु जीवनाचा[८] ।

---

९८ ओळ, राग ९९ पाच नळरूपधारी

१ शारदेसह २ स्वर्गाचें राज्य ३ या विशेषणानें इद्राचें कुरूप ध्वनित केलें ४ पूर्व व दक्षिण या दिशाचे स्वामी इद्र व यम त्याचा मध्यस्थ म्ह० आग्नेयी दिशेचा स्वामी अग्नि ५ तेल, या श्लोकात अग्नीचें असह्यत्व म्हणून अर्थात् अयोग्यत्व ध्वनित होतें ६ यमामुळें ७ काळा रंग या पदानें यमाचें कुरूप दर्शविलें आहे ८ वरुण

रक्षी[९] दयेंकरुनि मान ऋषीजनांचा ॥
यादांस फार म्हणती जन सौख्यकारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १६९ ॥
होतील[१०] नंदनविलास जयास तो हा ।
आहे धनंजयहि धर्महि जाण तो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजविता विहारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ' ॥ १७० ॥

शारदेस मग राजसुता हे । शारदेंदु–वदना वदताहे ।
' शेवटील नळ हा मज बाई ! । मानला बहु मनीं सुखदाई ' ॥ १७१ ॥

तेव्हां दमयंती सुंदरी । इंद्रादिकां नमस्कारी ।
तयां बोलली उत्तरीं । अमृतापरीस मधुर ॥ १७२ ॥
' माझा भीम जैसा पिता । तैसे तुम्ही जी ! तत्वतां ।
करा कन्यादान आतां । नळनाथाचे करीं ' ॥ १७३ ॥

सुर समस्त इच्या वरनिश्चयें । सुरस मस्त[११] असें वदले स्वयें ।
'नळवराशि वरोनि सुखी असे। तुज 'नको' जन कोण म्हणे असें? ॥१७४॥

मावेचना सुख मनीं कमनीय बाला ।
मायेसही विसरली न पुसेचि बाला[१२] ॥

---

९ वरुणाचा मुलगा बदी यानें आपल्या बापास ऋत्विज् प्राप्त करून देण्यासाठी कहोड वगैरे ऋषीस समुद्रात बुडविलें, त्याम यज्ञ सपताच वरुणानें सत्कारपूर्वक परत पाठविले ती कथा येथें लक्ष्य आहे १० या श्लोकात श्लेषानें नळामध्यें चारी देवाचे उत्तम गुण दाखविले आहेत ते असे, ( १ ) नदनविलास म्ह० इद्रपक्षीं नदनवनातील विलास व नळपक्षी आनद विलास; ( २ ) धनजय म्ह० अग्नि व नळपक्षीं धन जिकणारा म्ह० द्रव्यवान्, ( ३ ) धर्म म्ह० यम व नळपक्षी नीतिमान्, ( ४ ) रत्नाकरी विहारी म्ह० समुद्रवासी वरुण व नळपक्षी रत्नामध्यें खेळणारा, रत्नाकरी या पदानें येणाऱ्या वरुणाच्या अयोग्यत्वाचा परिहार ' तुज विराजविता ' या पदानें केला आहे ११ पुष्कळ १२ पित्याला

दूर्वादळीं कदलि[13]-बंध-मधूक-माळा ।
तीनें अलंकृत करी नळ-कंठ-नाळा ॥ १७५ ॥
चौघे श्रेष्ठ सुरेश्वर । देते झाले अष्ट वर ।
मस्तकीं ठेवोनि कर । दोन दोन एकेकें ॥ १७६ ॥
नृपाळाचे मांडीवरि बसुनि, मांडी हरिख[14] ते ।
तयां पाहों आले जन, सकळ झाले हरिखते ॥
महा-वाद्यें नाना निनदहि तनाना मग घडे ।
पिता तीचा पांटीभर घनहि वांटी बहु विडे ॥ १७७ ॥
राजा निरोपा तैं घेत । मग दमयंतीसमवेत ।
आपल्या नगरातें जात । नांदे आनंदभरें ॥ १७८ ॥

---

# १७ चिंतामणि

या कवीविषयीं कांहीएक माहिती मिळत नाहीं. यांनी केलेल्या ' ध्रुवाख्यानां '-तून हा उतारा घेतला आहे. याची कविता रसाळ आहे. भाषेच्या शुद्धतेकडे याचें दुर्लक्ष दिसते. कथेकरी या आख्यानातील दिड्याचा बराच उपयोग करितात, त्यामुळे हें आख्यान बरेंच प्रसिद्ध आहे.

## ध्रुवाख्यान

स्वायंभू **मनूचा** पुत्र **उत्तानपाद** राजा ह्यास दोन बायका होत्या. थोरलीचे नांव **सुनीति** व धाकटीचे नाव **सुरुचि.** सुरुचि ही राजास फार प्रिय होती. थोरलीचा मुलगा **ध्रुव** एकदा बापाच्या माडीवर जाऊन बसला, तें धाकटीस न

---

१३ केळीच्या दोरींत गुफलेली मधूक पुष्पाची माळ १४ हरिख माडी=आनद करी

साहून, तिने त्यास पायाने माडीवरून खालीं लोटले. तेव्हा ध्रुवास फार वाईट वाटून तो परमेश्वरास शरण गेला; तेव्हा त्याने प्रसन्न होऊन ध्रुवास अचल पद दिले. ही कथा ह्या आख्यानात आहे.

**सूर्यवंशीं[1] उत्तानपाद राजा । रूपवंती तयास दोन भाजा ॥**
**कनिष्ठेसी अत्यंत प्रीत-माया । पट्टराणीची पडों न दे छाया ॥ १ ॥**
**वरिष्ठेसी जाहला एक पुत्र । भक्तराज वैकुंठ[2]-पाळ-मित्र ॥**
**सु-कुमार आ[3]-कर्ण-पद्म-नेत्र । ठाण[4] माण रेखिलें जेविं चित्र ॥ २ ॥**
**पांच वर्षें लोटलीं ध्रुवा अंगीं । पिता ठाऊका नाहिं तयालागीं ॥**
**पुसे मातेसी भक्तराज योगी । तात कोठें तो सांग मला वेगीं ॥ ३ ॥**
**म्हणे माता तान्हया तोचि तूझा । धराधीश बोलती ज्यास प्रजा ॥**
**येरु बोले पाहीन पिता माझा । नको जाऊं मारील राजभाजा ॥ ४ ॥**
**पूर्वपुण्यें शुभ दिन ऊगवला । मुलांसंगें तो राजगृहा गेला ॥**
**राजदृष्टी सन्मूख उभा ठेला । पिता पाहे तों मोह झळंबला[5] ॥ ५ ॥**
**अनीवार मोहास पूर आला । ऊचलोनी मांडिये बैसवीला ॥**
**बाळशब्दें खेळवी तनूजाला । न साहे तें राणीस कोप आला ॥ ६ ॥**
**उचंबळे क्रोधाग्नि शिखा टाकी । कवण बोले बैसला राज-अंकी ॥**
**राव कैसा खेळवी कवतूकीं । ध्रुव राजा होईल धरालोकीं ॥ ७ ॥**
**धरोनीयां सापत्नभाव[6] चित्तीं । पदें लोटोनी पाडियला क्षीती ॥**
**रडत गेला माउली जेथ होती । अश्रुपातें हालवी नेत्रपातीं ॥ ८ ॥**
**म्हणे माता तान्हया काय झालें । कोण पापीयें तूज गांजियेलें ॥**

---

१ ज्या स्वायंभु मनूचा उत्तानपाद मुलगा होता तो सूर्यवंशीय वैवस्वत मनूहून निराळा असल्यामुळें ह्या कवीचा प्रमाद दिसतो २ विष्णूचा भक्त ३ कानापर्यंत गेले असून कमलासारखे आहेत नेत्र ज्याचे ४ स्थान आणि मान, म्हणजे सर्व अवयव प्रमाणात होते ५ मोहित झाला ६ सवतीमत्सर

मला रायें मांडिये बैसवीलें । राजभाजेनें पदें लोटियेलें ॥ ९ ॥
बुझावीतां माउली काय बोले । अम्हीं देवासी नाहिं पूजियेलें ।
येरु बोले तो देव कसा आहे । वसे कोठें तो सांग लवलाहे ॥ १० ॥
माय बोले सर्वत्र देव आहे । चराचर व्यापून विश्व राहे ॥
तयालागीं धुंडिती महा-योगी । पूर्व पुण्यें दरुषण[७] तयालागीं ॥ ११ ॥
तुझी बुद्धी काय बा वय सान । तुला कैसें देईल दरूषण ॥
ध्रुव बोले त्यागीन तरी प्राण । हरी देईना जरी दरूषण ॥ १२ ॥
उभा जैसा तैसाचि निघे वेगें । रडत पाठीं लागली माय मागें ॥
पुत्र गेला रायासि दूत सांगे । राय झाला घाबरा मोहसंगें[८] ॥ १३ ॥
सर्व सौख्याचें मूळ बाळ माझें । ध्रुव गेला घेणार राज्य-ओझें ॥
वनीं प्राण त्यागीन लोकलाजे । काय जीणें मारिलें दुष्ट भाजे ॥ १४ ॥
लवलाहीं लागला ध्रुवापाठीं । म्हणे बाळा ऐक बा एक गोष्टी ॥
बुझावीतों तुज धरुनि हनुवटी । तूजवीणें दाटला प्राण कंठीं ॥ १५ ॥
फीर मागें देईन एक गांव । ध्रुव बोले देईल देवराव ॥
पांच गांव दीधले फीर आतां । ध्रुव बोले मागेन जगन्नाथा ॥ १६ ॥
राय बोले देईन एक देश । ध्रुव बोले देईल जगदीश ॥
अर्ध राज्य दीधलें आण तूझी । ध्रुव बोले देवासि लाज माझी ॥ १७ ॥
सर्व राज्य दीधलें फीर मागें । ध्रुव बोले देइजे रमा-रंगें[९] ॥
स्नेह कां रे सोडिला ध्रुवा आजी । काळतोंडा जाहलों जगामाजी ॥ १८ ॥
ध्रुव बोले पितयास तात-देवा । आतां येतों मी लोभ असों द्यावा ॥
हरी-भक्तीचा लोभ कसा देहीं । अनुतापें कोंदल्या दिशा दाही ॥ १९ ॥

---

७ दर्शन, ह्या कवीनें शुद्धाशुद्ध, ऱ्हस्वदीर्घ स्वर इत्यादि गोष्टींकडे फार दुर्लक्ष्य केलें आहे
८ ममतेनें ९ लक्ष्मीचे रंजन करणारा विष्णु, त्यानें

सर्व भावें उभवून दोन बाही । म्हणे देवा दे भेट लवलाहीं ॥
निरंजनीं जावोनि उभा राहे । शोक आक्रोशें करूनियां बाहे ॥ २० ॥
दुरूनीयां अष्टाक्ष[१०]-सुता पाहे । तया दृष्टी सायुज्य[११]-पदा लाहे ॥
जवळ येवोनी पुसे बाळका जी । सान वय तूं कोण ह्या वनामाजी ॥२१॥
पूर्व वृत्तांत सांगे नारदासी । आयकोनी तोषला देव-ऋषी ॥
गुरू-मंत्रावांचोन देव कैचा । श्रुती साऱ्या बोलती अशी वाचा ॥ २२ ॥
सकल मंत्रांमाझारिं मुख्य साचा । मंत्र-राज द्वादश[१२] अक्षरांचा ॥
ध्रुवा कानी सांगोनि मुनी गेला । जपतांचि तो हृदयीं प्रगटला ॥ २३ ॥
चतुर्भुज सायूध घन-नीला । तया दृष्टी सन्मुख उभा ठेला ॥
दिव्य रूपा त्या ध्रुवें देखियेलें । नमस्कारोनी मनीं पूजियेलें ॥ २४ ॥
देव बोले तूं काय इच्छितोसी । धराधीश कीं स्वर्ग-भोग-वासी[१३] ॥
ध्रुव बोले मज भक्ति सदा देई । पद न दीजे ऊठवी दुजी आई ॥ २५ ॥
ध्रुव यानीं तो वाहुनियां नेला । ध्रुवस्थानीं[१४] तो अढळ बैसवीला ॥
चंद्र सूर्य नक्षत्र ग्रह तारा । सप्त-ऋषिही घालिती ज्यास फेरा ॥ २६ ॥

---

# १८ नरहरि

---

या कवीविषयीं कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं. यांच्या 'गंगारत्नमाले'तून हे दोन उतारे घेतले आहेत. यांची कविता साधी असूनही रसाळ व मधुर आहे, आणि कवितेंत प्रसादही आहे. यांची वर्णनशैली चागली मोहक आहे. सृष्टिसौंदर्याची वर्णने चांगलीं साधलीं आहेत. भूगोलदृष्टया यांची कविता महत्वाची आहे.

---

१० ब्रह्मदेवाचा मुलगा नारद  ११ मुक्तीचें पद  १२ 'ओं नमो भगवते वासुदेवाय' हा बारा अक्षराचा मत्र  १३ पाताळ  १४ अचलपदावर

## हिमाचल

जेथें असंख्यात अ-मर्त्य[1] येती। गंधर्व विद्याधर सिद्ध गाती॥
अ-गम्य जो पातकि मानवाला। हिमाचळीं त्या नर-पाळ[2] आला॥१॥
जेथें दिसे उंच पवित्र झाडी। स्व-पल्लवें स्वर्ग-मलासि झाडी॥
कोंदाटलीं पक्षि-रवें वनें तीं। बोलावुनी देवगतीस नेती॥२॥
हिमाचळी जें सुख देव यातें। न होय तें नंदनिं मंदवातें॥
कळेल कोणा महिमा तयाची। रामा, सुता ती गिरिजा जयाची॥३॥
करी व्याघ्र शब्दास एके ठिकाणीं। कडेलोट चाले खळाळोनि पाणी॥
पडे ओघ खालीं जळांचा कडाडे। न त्या साहतां ती महीही धडाडे॥४॥
कडे तूटले एक ठायासि खालीं। मदें मत्त-दंती-कदंबें निघालीं॥
तशा हस्तिना पाहतां शैलकाया। गमे मेघ जाती तळीं काय राया॥५॥
गुहेमाजि जे नीजले सिह त्याला। महत्तोय-शब्दें गमे शत्रु आला॥
प्रतिस्पर्धितेनें स्वयें गर्जताती। तया ऐकतां श्वापदें दूर जाती॥६॥
तपस्वी उभे राहिले एक-पायीं। तसे बैसले नेत्र झांकोनि कांहीं॥
नसे मांस देहीं त्वगस्थीच[3] राहे। दिसे एक डोई जटाभार वाहे॥७॥
किती[4] पर्ण भक्षोनियां राहताती। जितेंद्रीय कोणी सदा ब्रह्म ध्याती॥
किती वायु-भक्षी किती धूम्र-पानी। किती देह टाकोनि जाती विमानीं॥८॥
एक ठायिं ते वाहती झरे। कूटतूल्यही[5] बर्फ पाझरे॥
तूटले कडे श्वापदां नसे। मार्ग पाहतां भीति होतसे॥९॥
म्लान दीवसा ज्या वनस्पती। अग्निचे परी रात्रि दीसती॥
त्या मणि-प्रकाशीत वारुळी। बैसले किती थोर कुंडली[6]॥१०॥

---

१ देव २ राम ३ त्वचा व हाडें, अस्थिपजर ४ या श्लोकात तपश्चर्येचे प्रकार वर्णिले आहेत ५ पर्वताच्या शिखराएवढें ६ सर्प

चंदनाचिये वृक्षि वेष्टना । करुनि डोलवी कुंडली फणा ॥
जो कधीं नसे पक्षि पाहिला । नृप विलोकितां स्तब्ध राहिला ॥ ११ ॥
पर्वताचिये शिखरावरीं । शरभ बैसुनी ओरडा करी ॥
वैनतेयही[७] त्याच काननी । धरुनियां उडे सर्प आननीं ॥ १२ ॥
खालिं पाहुनी हस्ति केसरी । वरुनि घे उडी मस्तकावरी ॥
वानरें उड्या वृक्षि मारिती । तनय घेउनी पोटिशीं किती ॥ १३ ॥
पायिं चालतां सर्प थोरले । अजगरादि ते मत्त पाहिले ॥
पाहि जों पुढें व्याघ्र एकला । महिष फाडुनी खात बैसला ॥ १४ ॥

## गंगायमुनासंगम

गंगा होउनि पश्चिमाभिमुख त्या कालिंदिला[१] भेटली ।
जेथें तें स्थळ तीर्थराज म्हणुनी प्रख्यात या भूतळीं ॥
तेथें माधव लोक-मुक्ति-करितां प्रीती धरोनी वसे ।
तीर्थें ज्यांत अनंत तीर्थ दुसरें ऐसें न कोठें असे ॥ १ ॥
वेणीमाधव तीर्थराज म्हणती हो या प्रयागाभिधें ।
राहे कल्पतरूच कामद जना भूमंडळाच्या मधें ॥
पापांधार हरावया उगवला कीं सूर्य पृथ्वीवरी ।
तीर्थक्षेत्र हरिप्रिय त्रिजगतीं नाही दुजें यापरी ॥ २ ॥
सित-कृष्ण तोय भासे अद्यापी पावली जिथें संगा ।
पूर्वाभिमुखी होउनि यमुनेसह चालली पुढें गंगा ॥ ३ ॥
पाणी सुनिर्मळ जिचें अति रम्य भासे ।
मोठे लहान फिरती अगणीत मासे ॥

---

७ गरुड    १ यमुनेला

तैसेच कच्छप असंख्य जळांत कांही।
तीरीं बहूत रमती तप घ्यावयाही ॥ ४ ॥
भैरे अनंत फिरताति अगाध पाणी।
तेथील नक्रसमुदाय न अंत जाणी ॥
लाटांवरी भिडति येउनि उंच लाटा।
तीरास लागति न होय जळांत सांठा ॥ ५ ॥

एकापुढें एक सहस्र नावा। धांवोनि जाताति नसे विसावा ॥
तरंगवेगें वर खालिं होती। होड्या किती त्यांतुन पार जाती ॥ ६ ॥
भागीरथी शब्द करीत वेगें। येऊनि सारी यमुनेस मागें ॥
नेतां तिचा ओघ मिळूनि दोघी। प्रेमें पुढें चालति पूर्वभागी ॥ ७ ॥
भागीरथीचें अति शुभ्र वारी। काळी दिसे सूर्यसुताहि भारी ॥
दोघींमधें जें जळ लाल आहे। सरस्वती ती प्रकटोनि वाहे ॥ ८ ॥

आकाशापरि तोय त्यांत ढगसे फेनौघ[२] ते चालती।
उष्णें अग्नि तशा सशब्द लहरी विद्युल्लता हालती ॥
नावा त्यांत विमानपंक्ति तळिंचीं मोतीं जशा तारका।
रामा, विष्णुपदासि याचि धरि तूं चित्तीं सदा तारका ॥ ९ ॥
नरामर शतावधी पुलिनिं बैसुनी ते किती।
सुधा-रस-समान त्या अति अतृप्त तोया पिती ॥
सुकांत पुलिनांत ते पसरले दुहीं बाजुंला।
गमे जननि पाजवी पय धरोनि तेथें मुला ॥ १० ॥
मृदू सुखद वालुका लखलखीत शोभे बरी।
हिरे चुरुनि वोपिले म्हणुनि स्वच्छ तेजा धरी ॥

---

२ फेंसाळलेले प्रवाह

सुखें भरित मत्स्य ते वरिवरी उड्या मारिती ।
सुरां कळविती न ती वरि[3] जळीं आम्हां जी रती ॥ ११ ॥
मदांध गज आंतुनी करिति जी कराग्रें वरी ।
करेणु-सह चालतां दिसती पंकजांचे परी ॥
खळाळुनि जलौघ तो करित भोंवरे चालला ।
तयांत फिरती तरी करिति अप्सरांच्या कला ॥ १२ ॥
हिमाद्रिभव चातलां पवन पत्रपुष्पें जळीं ।
समर्पण त्रिवेणिच्या करि म्हणोनि झाला बळी ॥
तटानिकट भूरुह श्रमहर स्वयें वांकले ।
जनांसि सुख द्यावया सुजन संगतीच्या फलें ॥ १३ ॥
उभय बाजुनें चित्रतरूंची दाट लागली छाया ।
पांथस्थाला सुखकर मोठी श्रमहर मार्गी जाया ॥ १४ ॥
जंबु कंवठ सुरदारु नारळी केळी पोफळी अंबे ॥
फणस पेरु आणि लिंबतरूंच्या भरलें तीर कदंबें ॥ १५ ॥
सरल कुटजवटवृक्ष सातवण प्लक्ष[4] दाडिमी चांफा ॥
शाल ताल किति तमाल उंबर घालविती जनतापा ॥ १६ ॥
मंदारामल बकुल बिल्व कुट अशोक चंदन जाती ॥
वृक्षिं बैसले पक्षि सर्वदा भागिरथीगुण गाती ॥ १७ ॥
दूर जाउनी फीरली पुढें । स्वर्गवासिनी उत्तरेकडे ॥
उत्तरामुखी स्नानदुर्लभा । दर्शनेंचि दे माय सुप्रभा ॥ १८ ॥

---

३ स्वर्गीत ४ पिंपळ, पिप्री ५ चित्रकार्चे झाड

# १९ रामजोशी

हे कवि शके १६८४ या साली जन्मले. हे जातीचे देशस्थ ब्राह्मण व सोलापुरचे रहिवासी. हे स्वभावाने रंगेल असून पूर्वी तमाशा करीत असत. परंतु मोरोपताच्या सागण्यावरून हे कथा करूं लागले, असे म्हणतात.

यानी 'छंदोमंजरी' नावाचा छंद शास्त्रावर ग्रंथ केला असून, अनेक विषयांवर पुष्कळ लावण्या केल्या आहेत. याची कविता प्रौढ व मधुर असून, रसभरित, चटकदार व हृदयंगम आहे. याची भाषा अलंकारिक व मजेदार अनुप्रासानी मंडित आहे. जोशीबुवाची कवि या नात्यानें त्याच्या पूर्ववयातच चागली प्रसिद्धी झाली होती. आपल्या कीर्तनद्वारे यानी मोरोपंताची फार प्रसिद्धी केली असे म्हणतात. जोशीबुवास मराठी, संस्कृत, हिंदुस्तानी व कानडी या भाषाचे चागलें ज्ञान होते. बुवाच्या अंगीं वक्तृत्व, बहुश्रुतपणा व समयसूचकता हे गुण चागले होते. हे शके १७३४ त निवर्तले.

## उपदेशपर

( लावणी )

**भला जन्म हा तुला लाधला खुलास[1] हृदयीं बुधा। धरिसि तरि हरिचा सेवक सुधा॥ ध्रु०॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरी। जरा तरि समज धरी अंतरी। हटातटानें[2] पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं। मठाची उठाठेव कां तरी। वनांत अथवा जनांत हो कां मनांत व्हावें परी। हरीचें नांव भवांबुधि तरी[3]॥ चाल॥ काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लाकडें। हीं काय भवाला दुर करितिल माकडें। बाहेर मिरविशी आंत हरिशिं वांकडें। अशा भक्तिच्या रसारहित तूं कसा म्हणविशी बुधा। हरिरस सांडुनि घेसी दुधा**

१ शुद्धपणा। २ हटयोगादि साधनानी ३ नौका.

॥ भला० ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळकाम कोपला। आंतुनि बाहेर म्हणविशि भला। वित्त पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला। असें हरि म्हणतो नुमजे तुला। दांभिक वर संभावित अभ्यंतरिं नाहिंस बिंबला। बहिर्मुख नर नरका लाधला ॥ चाल० ॥ तूं पोटासाठीं करि खटपट भलतीशी। परि भक्तिरसाविण हरि भेटेल काय तुसी। काय मौन धरुनियां गोमुखिला जाळिसी। स्वार्थसुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला बुधा। न जाणसि कांजी म्हणसी सुधा ॥ भला० ॥ २ ॥ टिळाटोपिवर शिळा पडो या बिळांत करिशी जपा। तथापि न होय हरीची कृपा। दर्भमुष्टिच्या मधीं धरुनियां निर्भर पशुची वपा। जाळिशी तिळा तांदुळा तुपा। दंड कमंडलु बंड माजविशी मुंड मुंडिशी तपा। न सार्थक लटक्या साऱ्या गपा ॥ चा० ॥ ही वारवार तलवार येइल काय पुन्हा। ह्या दुर्लभ नर-देहांत ठेविशी कुण्हा। भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा। वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित्त न द्विधा। सदा हरि कविरायावर फिदा ॥ भला० ॥ ३ ॥

---

# २० हंसराज

हे साधु पुरुष शके १७२० त जन्मले हे गोदावरी तीरीं परभणी म्हणून गाव आहे तेथील राहणारे. जातीचे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्यांचे पहिलें नांव नारायण. परंतु पुढें दीक्षा घेतल्यानंतर ह्यास हंसराज असें म्हणत. हे रामदासाच्या शिष्य-परंपरेतील होत. ह्यानीं वेदांत विषयावर लहान मोठे मिळून अकरा ग्रंथ केले आहेत, व ते बहुतेक सर्व उपलब्ध आहेत. ह्याची कविता साधी व सरळ आहे.

## शांतवृत्ति

सत्वगुणाची शांतवृत्ति। क्षमा तितिक्षादयाशांति। विरक्ति श्रद्धादि संपत्ति। शमदमप्रकार ॥ १ ॥ श्रवण मनन सारासार।

मुमुक्षुता परमार्थ उद्गार । त्यागचि करी सर्व संसार । हेचि शांतवृत्ति ॥ २ ॥ सदा सत्संग आवडे । सच्छास्त्राचें अति कोडें । सर्व भूतीं आत्मता जोडे । हेचि शांतवृत्ति ॥ ३ ॥ ऐसें हें चिन्ह शांत-वृत्तीचें । हेलावे उठती सत्वगुणाचे । परि ते दानीं उत्पन्न सुखाचे । नाश पावतां दुःखा ॥ ४ ॥ तयासी केवळ सुख न म्हणावे । सुख दुःख वृत्तीनें शीणवावे । तस्मात् हे विकार जाणावे । सत्ववृत्तीचे ॥ ५ ॥ हे वृत्ति रजतमा निर्दाळी । पाडी परमार्थाचिये सुकाळीं । उद्भवतां मात्र होय वेगळीं । निमता मेळवी सुखा ॥ ६ ॥ तस्मात् उद्भवतां होतसे विकार । यास्तव केवळ सुख नोव्हे निर्विकार । एवं घोर मूढ शांत प्रकार । तीन त्रिगुणाचे ॥ ७ ॥

## उदासवृत्ति

या तिही वेगळी उदासवृत्ति । उगीच समानवृत्तीची स्थिति । त्रिगुणाची ही नव्हे उत्पत्ति । सहजपणें स्तब्धता ॥ १ ॥ इंद्रिय विषयाचें विस्मरण । विवेकादि । कांहीं नातळे मन । आळसादि नसतां सावधान । हे उदास वृत्ति ॥ २ ॥ स्तब्धता परी जड नव्हे । सावध परी न हेलावे । उगेपणही न स्मरावें । हे उदासवृत्ति ॥ ३ ॥ सुखाकार वृत्ति गोचर । अनुभवीतसे तदाकार । तेथें हेंचि सुख ऐसा उद्गार । तरी तया सुखा मुके ॥ ४ ॥ तेथें सुखरूप होऊनि असावें । आठवूं जातां भिन्न पडावें । परी ते सामान्यवृत्तिनें अनुभवे । मौनेंचि अंतरीं ॥ ५ ॥ पुढें वृत्ति उद्भवता करी मनन । म्हणे काय होतो सुखसंपन्न ? । तया सुखांतून हेलाऊन । वृत्ति उमटे ॥ ६ ॥ जीवना-वरून वायु जातां । किंचित् दूर धांवे शीतळता । तेंवी उगेपणा पासून निघतां । वृत्ति सुखाकार निघे ॥ ७ ॥ अन्य पदार्थी वृत्ति धरी । तेव्हां तें सुख हरपे निर्धारी । वायु जवीं जातां बहु दुरी । शीतळता लोपे ॥ ८ ॥ जरी तैसीच वृत्ति हेलाऊन । पुन्हा त्या सुखीं होय लीन । न अवलंबी पदार्थ आन । तरी ते सुख न लोपे ॥ ९ ॥ जरी वायु जळीं च भ्रमे । तरी शीतळता ते न निमे । तेवीं वारंवार

अनुक्रमें । वृत्ति उठे विरे सुखीं ॥ १० ॥ तरी सुख तें न वोहटे । तदाकारत्वें स्वयें भेटे । वृत्ति हेलाऊन पुन्हा आटे । तया सुखामाजी ॥ ११ ॥ ऐसिया सामान्य वृत्तिमाजी । निजात्म-सुख प्रगटे सहजी । ते काळीं अनुभवावया दुजी । वृत्ति नसे ॥ १२ ॥

---

# २१ भास्कर दामोदर पाळंदे

---

हे निबंधकार आणि कवि कृष्णातीरी मेणवली नामक गावी इ. स १८३२ त जन्मले हे जातीचे कोकणस्थ हिरण्यकेशी ब्राह्मण. भास्करपंताचे शिक्षण ठाणे व मुबईतील एलफिन्स्टन् पाठशाळेत झाले. यांनी विद्याभ्यास आस्थापूर्वक करून चांगल्याप्रकारची विद्वत्ता संपादन केली. अभ्यास पुरा झाल्यावर यानी सरकारी नोकरी पतकरिली. व शेवटी स्मॉलकॉजकोर्टाच्या न्यायाधीशाच्या पदास पोहोचले. यानीं विविध विषयावर उत्कृष्ट निबध लिहिले आहेत. तसेच विक्रमोर्वशीय नाटकाचे गद्यपद्यात्मक व गीतेचे ओवीबद्ध अशी भाषातरे आणि ‘ रत्नमाला ’ नावाचा उत्तम भक्तिपर स्वतंत्र पद्यग्रंथ लिहिला आहे. अर्वाचीन कविमालेत भक्तकवि हेच होत असें म्हणण्यास हरकत नाही. याची कविता मधुर व भक्तिरसप्रचुर आहे. हे कवि पुणें येथें इ. स. १८७४ त परलोकवासी झाले.

## परमेश्वरप्रार्थना

दयासिंधो देवा. अनुपम तुझी होय करणी ।
न साधे कोणाही रुचिर असली सृष्टि--सरणी ॥
कशी केली नेणों अमित सुखभांडार धरणी ।
दिली वाटे आम्हां प्रभु, तदुपभोगास वरणी ॥ १ ॥

अनाथाच्या नाथा, कृपण नसशी तूं वितरणीं ।
तरी द्यावी मातें स्थिति सतत देवा स्वचरणीं ॥

असे पापी मोठा म्हणुन न पडोंदे विसरणीं ।
झटो वाचा माझी अनिश तव कीर्तिप्रसरणीं ॥ २ ॥
उणें वाटे जें जें कर सकळ त्याची पुरवणी ।
असे ही दीनाची सतत तुजपाशीं विनवणी ॥
न होवो विश्वेशा भव--जलधि—मध्यें बुडवणी ।
सदा होवो देवा तव अवकृपेची चुकवणी ॥ ३ ॥
बसावें, गुंजावें, प्रभु तव पदाब्जीं भ्रमरसें ।
हंसावें, डोलावें, मग अमित सौख्यें अमरसें ॥
मधा प्यावें त्याच्या अनिश अमृताशीं सम रसे ।
सुधा तीही वाटे विरसचि अशा उत्तम रसें ॥ ४ ॥
दयामेघा देवा, द्रवसि तर संताप शमती ।
कराया वृष्टीतें प्रभु तुज असे काय कमती ! ॥
प्रभो, विश्वाधारा, जरि पतित मी मंद कुमती ।
तरी जाणें त्यांतें फलसि तुज जे दीन नमती ॥ ५ ॥
नृलोकीं जे मोहें क्षणिक सुखभोगांत रमती ।
सुखाची ज्यां वाटे नच इतर सीमा, परम ती ॥
धनादि--प्राप्तीच्या क्षणभर न यत्नीं विरमती ।
अशा मूढां द्यावी स्व-पद--भजनीं सुस्थिर मती ॥ ६ ॥
तुझ्या ऐश्वर्याची प्रभु ! तुजविना होय न-मिती[1] ।
जगद्वंद्या ! नाही नवल नर हे पाय नमिती ॥
अनंत ब्रह्मांडें अनिश न शिरे काय न मिती ?।
न ज्या जन्मान्ताची लिखित युग-वर्षायन--मिती[2] ॥ ७ ॥

---

१ गणना २ सख्या.

तुझ्या सामर्थ्याचें मनन करितां मान सरती ।
कळे गर्विष्ठांतें स्व-धन-बल-सीमा न सरती ॥
तुझे पायीं देवा अनुदिन असो मानस—रती ।
जशी कीं हंसांतें अभिमत असे मानसरती ॥ ८ ॥

## पृथ्वी

प्रभो, प्रणत-वत्सला ! बहुत पातकी दीन मी ।
निराश्रित अजाणता तुज सदैव चित्तीं नमीं ॥
चुकें तर पदोपदीं, पण न भीं नसे घाबरा ।
क्षमाच करिशील तूं भरंवसा मला हा बरा ॥ ९ ॥
अगाध महिमा तुझा बुधहि गावया नेणती ।
यथामति वदावया मजचि लाज ती कोणती ! ॥
पिईन परमेश्वरा विमल—कीर्ति-गानामृता ।
भिईन न कदापि मी मग पुढें जित्या वा मृता ॥ १० ॥
सुखास्तवच आमच्या अति अपूर्व केली धरा ।
कमी किमपिही नसे जिजमध्यें यशः श्रीधरा ॥
प्रशस्त पडली, सुखा विपुल देत आम्हांस ती ।
धरून हृदयीं जशी प्रियकरा स्वबाला सती ॥ ११ ॥
तिच्यांत अति सुंदर प्रभु, मणी बहू शोभती ।
सुवर्ण—रजतादि ते सकळ धातुही लाभती ॥
असोत पण ते, सदा उदक-अन्न ती देतसे,
अपार उपकार हा नच तिचा, तुझा होतसे ॥ १२ ॥
असंख्य दिसती नभीं रुचिर गोल जे प्रत्यहीं ।
तुझें यश कथावया उदित दैवतें सत्य हीं ॥

दिलीस गति ज्यांस जी सतत तीच संभाळिती ।
सुबोध करण्यास त्यां, स्वनियमां न जे पाळिती ॥ १३ ॥
तुझी कृति दिसावया, रवि तमास उच्छेदितो ।
स्वकीय किरणामृतें सकळ विश्व आल्हादितो ॥
अशेष तरु, जीव, यां भयद शीत तें नाशितो ।
तुझ्या प्रभु, कृपेमुळें सतत त्यांस तो पोशितो ॥ १४ ॥
शशी विमल—कांति जो गगनमंडळा भूषितो ।
अदृश्य असतां रवी, पथिक यांस संतोषितो ॥
पहा प्रतिदिनीं कसा क्षय—विवर्धना भोगतो ।
प्रभो ! तुजविना नसे किमपि, नित्य हें सांगतो ॥ १५ ॥
समुद्र, सरिता, गिरी, तरु जिवांस तूं निर्मिलें ।
विचित्र रचना तुझी बुधहि वर्णितां शर्मिले ॥
अ-नादि सकल-ज्ञ जो मुदित नित्य त्या मी नमीं ।
असो, प्रभु ! दयार्णवो पतित एक हा मीन मी ॥ १६ ॥

---

# २२ कृष्णशास्त्री चिपळूणकर

---

हे प्रसिद्ध पंडित, ग्रंथकार, व कवि इ. स १८२४ त जन्मले हे जातीचे आश्वलायन ब्राह्मण. याचे वडील हरिपंत यानी याचेकडून लहानपणी वेदाभ्यास करविला. १४ वर्षाचे झाल्यावर याना विश्रामबागेतील मराठी शाळेत घातलें. तेथे यानी अल्पकाळातच अलंकार, न्याय व धर्म या शास्त्रात पारंगतता मिळविली. पुढे पांच वर्षेपर्यंत शास्त्रीबोवानीं इंग्रजीचें चांगलें अध्ययन केलें. नंतर सरकारी नोकरी पत्करिली. ते अनुक्रमें भाषांतरकार, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल आणि वर्तमानपत्रे व पुस्तके याचे रिपोर्टर होते. हे वादविवादांत अत्यंत कुशल होते. अर्वाचीन

कविमालिकेंत याची पदवी फार उच्च आहे. याचा ‘ पद्यरत्नावली ’ नांवाचा काव्यग्रंथ प्रसिद्ध आहे याची वाणी विद्वत्ताप्रचुर, सरल, सरस व मनोहर आहे. इ. स. १८७८ त शास्त्रीबोवा पुणे मुक्कामी काळजाच्या रोगाने निवर्तले.

## हरिणान्योक्ति

मत्त असती जे धनाच्या मदानें । न दावीशी त्यां तोंड दीनवाणें ॥
आर्जवाचीं भाषणें मधुर खोटीं । करुनि तोषविसी न त्यां कधी पोटीं ॥१॥
गर्ववचनें ही परिसशी न त्यांचीं । धरुनि आशा त्यांचिया प्रसादाची ॥
घरा त्यांचीया करुनि येरझारा । न घालविशी तूं स्वीय काळ सारा ॥२॥
भूक लागलिया कोमला तृणातें । भक्षुनीयां तूं पावसी सुखातें ॥
स्वस्थ निद्रेशी घेशि झोंप येतां । चित्ति नाहीं तव काडिमात्र चिंता ॥ ३ ॥
अशी सौख्याची स्थिती प्राप्त व्हाया । योजियेलें त्वां कोणत्या उपाया ॥
काय कोठें त्वां तपश्चरण केलें । मृगा योगें ज्या भाग्य हें उदेलें ॥ ४ ॥
नवें कोमल उगवलें गवत दाट । स्वच्छ सुंदर वाहतो त्यांत पाट[1] ॥
मृगी ठायीं त्या एक देखियेली । जिच्या अंगी तारुण्य करित केली[2] ॥५॥
अशा पाहुनिया उत्तम स्थलातें । भूल पडली तैं मृगाच्या मनातें ॥
व्याध चापी योजुनी बाण राहे । आड जाळीच्या न तो त्यास पाहे ॥६॥
वनीं हिंडोनी शीण फार झाला । घाम अंगाला तुझ्या दाट आला ॥
बैस येऊनी स्वस्थ आश्रमांत । करी रोमंथा, नीज बा निवांत ॥ ७ ॥
दुष्ट भिल्लांचा इथें वास नाहीं । मुनी बसले हे शांत यांस पाहीं ॥
भूतमात्रीं हे दयेतें करीती । मृगा मनिंची बा सोड सर्व भीती ॥ ८ ॥
जाळें तोडुनियां बळें हरिण तो टाळोनि दावाग्निला[3] ।
व्याधाचे चुकवूनि बाणहि महा वेगें पुढें चालिला ॥

---

१ पाण्याचा झरा २ क्रीडा ३ वणव्याला

तो घाईंत उडी फसूनि पडला आडामधें[4] बापडा ।
होती सर्वहि यत्न निष्फळ, जरी होई विधी वांकडा ॥ ९ ॥

## वृक्षान्योक्ति

मार्गीं वाढुनि सांवली पसरिशी विस्तीर्ण कां तूं अशी ? ।
कां होशी फळयुक्त ? होउनि तसा कां वांकशी भूमिशी ? ।
तेणें ओढिति तोडिती जन तुला पाषाणही मारिती ।
वृक्षा सोस निमूट हाल अवघे, आतां न अन्या गती ॥ १ ॥

दावाग्नी खवळोनियां तरुवरा जाळावया जें वळे ।
जाती सर्व पळोनि कोकिल, शिखी, रावे तसे कावळे ॥
भक्षायास फळें चहोंकडुनियां एकत्र जे जाहले ।
येतां संकटकाळ होय जवळी ऐसा न कोणी मिळे ॥ २ ॥

जे भक्षूनि फळें सदैव पिकलीं स्वादिष्ट आनंदले ।
कोटीं बांधुनि त्यांत जे तुजवरी वर्षें बहु नांदले ॥
ते पक्षी करुणस्वरें विलपती, वृक्षा तटीं बैसुनी ।
पाडाया तुज थोर जोर करितां पूरास या देखुनी ॥ ३ ॥

तापानें पीडिले त्यां निववशि, करिशी तृप्त त्यां जे भुकेले ।
अर्थी देऊनियां त्वां अभिमत मनिंचें फार संतुष्ट केले ॥
ऐसी कीर्ती तुझी ही परिसुनि दुरुनी पातलों आश्रयातें ।
कांटे झाडें अम्हां हीं अडवुनि धरिती कां ? तरो वार यांतें ॥४॥

## यक्षसंदेश

कालिदासकृत मेघदूताच्या मराठीरूपांतरांतून हा वेंचा घेतला आहे. कुबेरानें एका यक्षाला स्वकर्तव्य-पराङ्मुखतेबद्दल हद्दपार करून रामगिरीवर बंदीत ठेविलें

---

४ विहिरीत

होते. तेथून त्याने एका मेघाबरोबर आपल्या बायकोस दिलासा देण्यासाठी जो संदेश पाठविला तो येथें वर्णिला आहे.

खिडकिंत पाहुनि तुला, चकित ती होतां विस्मय भावें ।
यापरि मधुरस्वरें तिला तूं आश्वासुनि बोलावें–॥ १ ॥

" पतिव्रते, मी तुझ्या पतीचा जिवलग मित्र असोनी ।
आलों आहें येथें त्याचा निरोप तुज घेवोनी ॥ २ ॥

प्रवासिकांतें स्वगृहीं जाया त्वरा करुनियां नित्य ।
तज्जायांतें सुखित करावें आहे हें मम कृत्य " ॥ ३ ॥

यापरि भाषण तुझें परिसुनी आनंदुनि ती फार ।
सीता जेवीं वायु-सुताचा, करिल तुझा—सत्कार ॥ ४ ॥

आयकेल ही तुझ्या मुखांतुनि कुशल-मयी मम वार्ता ।
निरोप पतिचा आणि गांठ हीं सम गणिती विरहार्ता ॥ ५ ॥

सांगावें मग तिला " तुझा पति रामगिरीवर राहे ।
खुशाल अससी कीं ? ऐसें तुज त्यानें पुशिलें आहे ॥ ६ ॥

तुम्हांसारखे बहुत गांजले जन जे दुर्दैवानें ।
त्यांनीं कुशल प्रश्नचि करिजे परस्परां पहिल्यानें ॥ ७ ॥

वाळुन गेला असे फार तो, तूंही कृश झालीस ।
विरह-ज्वर भाजितो तयातें, तूंहि तशी जळतीस ॥ ८ ॥

जसें तयाच्या तसें तुझ्याही न खळे जळ डोळ्याचें ।
तुम्हां उभयतां उत्कंठेचें दुःखहि समान साचें ॥ ९ ॥

अशी सर्वथा समदुःखा तूं प्राणसखी, तुज गे तो ।
दूरस्थहि मम सखा, मनेंची दृढालिंगना देतो ॥ १० ॥

सख्यांसमक्षहि उघडपणें जें वचन कथायाजोगें ।
तें सांगाया चुंबकलोभें[1] जो तव कानीं लागे ॥ ११ ॥
दुर्दैवें तो प्रियकर आजी फार दूर पडल्यानें ।
प्रेमभरित हें भाषण तुजला बोलत मद्वदनानें ॥ १२ ॥
कोमल वेलींमधें भासतें अंग तुझें सुकुमार ।
तसा पिसाऱ्यामधें शिखींच्या दिसे तुझा कचभार[2] ॥ १३ ॥
हरिण-बालकांजवळ उमगती चंचळ डोळे काळे ।
मंद नदीच्या लहरींमाजी तव भ्रूकुटींचे चाळे ! ॥ १४ ॥
लावण्य तसें तुझ्या मुखाचें अढळे पूर्ण शशांकीं ।
मत्त मतंगी मंदगती ही तूझी दिसते लोकीं ॥ १५ ॥
यापरि, सखये, दृष्टी पडतें कोठें कोठें कांहीं ।
परंतु तुलना पूर्ण तुझी ज्या, ऐसें एकहि नाहीं ! ॥ १६ ॥
सखे, प्रीतिच्या कलहें जणुं तूं मजवरि फार रुसोनी ।
बसालिस ऐसें चित्र शिळेवर रंगांनीं काढोनी ॥ १७ ॥
समजावाया ठेवुं लागतों जों पायांवर डोई ।
अश्रुजळें तों नयन भरूनी दिसेंचनासें होई ! ॥ १८ ॥
किती दुष्ट तरि दैव असावें न शके वदावया हें ।
याहि परीची, सखे, आपुली भेट जयास न साहे ! ॥ १९ ॥
स्वप्नीं पाहुनि तुजला, सखये, प्रेमें कवळायास ।
घट्ट उरीं, मी लांबवितांना आकाशांत करांस ॥ २० ॥
देखुनि वनदेवता दयेनें द्रवती चित्तीं फार ।
लतापल्लवीं अश्रु तयांचे गळती वारंवार ! ॥ २१ ॥

---

१ लोहचुंबक २ केशांचा कलाप

हिमाचलीच्या वनस्पतींचा घेउनि मधुर सुगंध ।
तेथुनि वायू दक्षिणेस जो वाहे निष्प्रतिबंध ॥ २२ ॥

तयास आलिंगितों, प्रिये, मी नित्य बहु प्रीतीनें ।
कीं, तो तुजला स्पर्शुनि आला असेल या बुद्धीनें ॥ २३ ॥

लांब रात्र ही क्षणासारखी लहान होइल केवीं ? ।
तीव्र उष्णता दिवसाची ही लयास जाइल तेवी ॥ २४ ॥

ऐशी चिंता उगिच करूनी त्यांत नसे फळ कांहीं ।
जरी जाणतों असें, तथापी ती मज सोडित नाहीं ॥ २५ ॥

जरी होतसे तुझ्या वियोगें मजला दुःख अपार ।
धीर धरितसें, पुढिल सुखाचा चित्तीं करुनि विचार ॥ २६ ॥

सखे शहाणी असती, यास्तव विवेक करुनी तूंही ।
अपुल्या आश्वासशील हृदया नानाविध हेतूंही ॥ २७ ॥

सदा कोण गे दुःखी ? अथवा कोण सुखी या लोकीं ?
सुखदुःखें ही चक्रन्यायें येती हें अवलोकीं ॥ २८ ॥

कार्तिकमासीं शाप संपतो माझा तुज हें ठावें ।
चार मास हे मिटुनी डोळे कैसे तरि कंठावें ॥ २९ ॥

खुणेवरुनि या एकांतांतिल निश्चय तुज होईल ।
खरा दूत हा माझ्या पतिचा, आहे तोचि खुशाल ॥ ३० ॥

विपरित जनीं वार्ता परिसुनि संशयांत न पडावें ।
विश्वासातें मजवरिच्याही किमपिहि न ढळूं द्यावें ॥ ३१ ॥

कोणी कोणी म्हणती, विरहें जातो स्नेह लयातें ।
हरिणलोचने, परंतु न खरें वाटे मत मजला तें ॥ ३२ ॥

प्रिय वस्तूंचा वियोग होतां न ढळे सत्यप्रीती ।
उलटी वाटे अधिकाधिकची ! ऐशी मम प्रचीती " ॥ ३३ ॥
प्रथम वियोगें पीडित सखिला यापरि आश्वासोनी ।
तिच्यापासुनी निरोप आणिक खूणहि बा घेवोनी ॥ ३४ ॥
परत झडकरी यावें तिकडुनि मजला सुखित कराया ।
वाट तुझी मी पहात बसतों येथेंची घनराया ॥ ३५ ॥

## विरहिविलाप

अहा कैसा झाला अवचित विधी निष्ठुर असा ! ।
प्रिया एकाएकी अ-मर-सदना गेलि सरसा ॥
मना, आतां कोणा कथिशिल जिवाच्या हितगुजा ।
सुखाच्या शब्दांनीं कवण निववू तापहि तुझा ? ॥ १ ॥

घरातें मी येतां, दचकुनि उठोनी हंसुनियां ।
विशाला नेत्रांही अमृत-रस-वृष्टी करुनियां ॥
न कां चित्ता आजी मधुर-वचनीं हर्ष करिशी ? ।
असे झाली माझ्या अगाळिक करें कोणाति अशी ॥ २ ॥

बुजालें दुःखानें स्मरण विषयांचें अवघियां ।
अनभ्यासें गेली मज सकळ विद्या त्यजुनियां ॥
जिचे डोळे काळे बघुनि मृगबाळेंहि झुरती ।
वसे चित्तीं देवी-परि सतत ती मात्र सुदती[1] ॥ ३ ॥

निघोनीयां जातां अवचित सखी मुक्ति-सदना ।
दयाशीला, वाटे, विसरलि दयाही सुवदना ॥

---

१ सुंदर दात आहेत जिला अशी

कटाक्षांहीं नीलांबुज-मद-हरांहीं मजवरी ।
कृपालेशानेंही प्रकट म्हणुनि आज न करी ॥ ४ ॥
पडायाच्या भीतीस्तव ममकरातें धरुनियां ।
विवाहीं पाषाणीं[2] चढलिस, सखे, तूं जपुनियां, ॥
कशी ती तूं, आजी चढशि मज सोडोनि, गगनीं, ।
करी ऐसी शंका हृदय शतधा, येउनि मनीं ॥ ५ ॥
तुझें जाणें, प्राणेश्वरि, परिसुनी स्वर्गभुवनी, ।
अलाफाते शंकां त्यजुनि करिती कोकिल वनी ॥
निमाली चिंताही सकल कमलांची अजि अहा ! ।
कशी आतां चंद्रा अतुल सुषमा[3] लाधलि, पहा ! ॥ ६ ॥
सखे, विद्युल्लेखा-स्फुरण-चपला[4] देउनि मला ।
सुरेंद्राच्या कांही दिवस उपभोगांस अतुला ॥
अहा ! मंत्रभ्रष्टक्षितिपतिस[5] लक्ष्मी त्यजि जशी ।
लया पुण्यें जातां, त्यजुनि तशि गेलीस मजशीं ॥ ७ ॥
असोनि त्वां भूमीवर चढविलें ज्या सुर-पदीं ।
प्रिया, नाथा, ऐशा अतिमधुर संबोधन-पदीं ॥
तया मातें कैशी धरणि-तल-धूलीत सखये ।
दिवस्था[6] होऊनी ढकलिशि; दया कां तुज न ये ? ॥ ८ ॥
अपूर्वा लावण्या, अनुपम सुशीला, सुविनया, ।
अपारा चातुर्या, अगणित कलांतेंहि, सुनया, ॥
गुणा ऐशा कोणा निरविशि, सखे, आणि मजला ? ।
नसे थारा त्यातें, मजहि दुसरा ज्ञात तुजला ! ॥ ९ ॥

---

२ विवाहसमयीं पाषाणावर पावलें टाकीत जाण्याचा विधि असतो तो येथें लक्ष्य आहे
३ सौंदर्य ४ विजेच्या चमकेसारखे क्षणिक ५ ज्याला मुत्सद्यांची सल्लामसलत नाहीं अमा ६ स्वर्गस्थ

प्रभा—पावित्र्यांहीं स्वसम तुज पाहून, दहना।
अला वाटे हेवा वनिं बहुत त्या कृष्णवदना॥
तयानें त्या रोषें, मज गमतसे जाळिलि तुला।
दया त्या केची ! जो स्व[७]-जननि-हि खाऊं न चुकला !॥१०॥

सुधा-स्पर्शें जेवी निवति नयनें जीस बघुनी।
जिचा कंठीं वाटे कर कमल-हारा-परि मनीं॥
करी जी उल्हासा अतुल, कविता सुंदर जशी।
तुला नाहीं कोठें मनुज-भुवनीं योग्य तिजशी॥ ११॥

न पाही स्वप्नींही पतिविण कधीं जी नर दुजा।
स्पृहा—युक्तें चित्तें, जित-कमल-नालोत्तम-भुजा[८]॥
सुशीला तूं ऐशी, परपुरुष[९] जो निर्गुण, तया।
कशी पाहूं जाशी, हरिण—नयने, सत्वरतया ?॥ १२॥

गुणांनी जी पूर्णा, अणुसम नसे दोषहि जिला।
अलंकारीं साजे, रस वसतसे जींत पहिला॥
मृदू जीचे वर्ण श्रवण—सुख[१०] देती परिसतां।
वसे ती पद्माक्षी जशि हृदयिं माझी सुकविता॥ १३॥

न जाणों दुर्दैवें अगळिक असे काय घडली।
जिच्या योगें ऐशी तवमनिं अढी थोर पडली॥
म्हणोनी सोडोनी मज, रुसुन गेलीस सदनीं।
सखी मुक्तीच्या तूं, असुनि विमला कीर्तिहि जनीं॥ १४॥

सुधातुल्यें हास्यें करुनि अभिषेकास मजला।
कटाक्षांनीं वर्षे जणुं मजवरी नीलकमलां॥

---

७ अग्नीला उत्पन्न करणारे लाकूड अग्नि जाळून टाकितो म्हणून त्याला स्वजननिभक्षक म्हणतात ८ कमलाच्या देंठाहूनही अधिक कोमल आहे भुज जिचा अशी ९ परमात्मा, ह्या शब्दावर श्लेष आहे १० कानाला सुखकर

मृगाक्षी, मांगल्य-प्रद, विधि-विधात्री, सुवदना ।
न सोडी चित्तातें क्षणभरिहि ती कुंद[11]-रदना ॥ १५ ॥
वसोनी पर्यंकीं दयितगुण गातां निजमुखें ।
दिनें नाही झालीं बहु निरखुनीयां तुज सखे ! ॥
न कां आजी देशी प्रतिवचनही एक मजला ? ।
असा कां माझ्याशीं अवचित अबोला धरियला ॥ १६ ॥
स्वरूपें काव्याच्या अजवरि सखे जे प्रकटले ।
विलास प्रीतीचे सरस अमृतातुल्य घडले ॥
तयांचा दुर्दैवें अवचित असा नाश घडतां ।
पुढें आतां कैशी मधुर मम होईल कविता ॥ १७ ॥
ती भाषणें मधुर जीं अमृतासमान ।
लावण्य तें रतिहि देत जयास मान ॥
तें शील ज्यास तुलना न मिळेचि कोठें ।
कोणास हर्ष गुण हे स्तवितां न वाटे ? ॥ १८ ॥

---

# २३ परशुराम बल्लाळ गोडबोले

हे लोकप्रिय कवि श्रीक्षेत्र वाई येथे इ. स. १७९९ त जन्मले. हे जातीचे कोकणस्थ हिरण्यकेशी ब्राह्मण. याचे प्राथमिक शिक्षण वाई येथेच झालें. नंतर यानी संस्कृताचा चागला अभ्यास केला. पुढे पुणें येथे मातुलाच्या पेढीवर हे कारकून होते. त्यांना लहानपणापासून कविता करण्याचा नाद असे व तो पुढे वृद्धिगत होऊन त्यानेंच ते प्रसिद्धीस आले. पुढें मराठी भाषेचा कोश करण्यासाठी नेमलेल्या शास्त्रीमंडळात यांची योजना झाली. मराठी क्रमिक पुस्तकरचनेच्या कामीं याची मदत

११ कुंदासारखे आहेत दात जिचे अशी

घेण्यात आली, व त्या पुस्तकात कविता घालण्याचें काम यानीच केले. पुढें यानींच नवनीत नावाचा मराठी काव्यातील वेच्यांचा ग्रंथ संपादन करून तद्वारा महाराष्ट्रीयास मराठी कवींची ओळख करून दिली. संस्कृत नाटकाचीं गद्यपद्यात्मक मराठीत रूपातरें करण्याचा उपक्रम परशुरामपंतानीच केला. यानीं केलेलीं उत्तरामचरित्र, मृच्छकटिक वगैरे नाटकाचीं भाषातरें उत्तम वठली, तीं फार प्रसिद्ध आहेत. माधव चंद्रोबाच्या 'सर्वसंग्रहा' चें संपादकत्व तात्याकडेच होते, व त्यानीं तें काम उत्तम रीतीनें केले. मोरोपंताच्या कवितेविषयीं याना फार अभिमान असे, व त्याच्या केकावलींतील हृद्गत तात्यानी 'केकादर्श' नामक ग्रंथात उत्कृष्ट रीतीने व्यक्त केलें आहे. शिवाय त्यांनी 'बालबोधामृत', 'वृत्तदर्पण', 'नामार्थदीपिका', व ऐतिहासिक स्फुट कविता वगैरे अनेक उपयुक्त ग्रंथ लिहिले आहेत. परशुरामपंताची वाणी रसाळ, भाषा प्रौढ व कविता प्रसादगुणयुक्त असून सरळ व हृदयंगम आहे. हे आपल्या वयाच्या ७५ व्या वर्षी निवर्तले.

## वर्षावर्णन

मृच्छकटिकाच्या मराठी रूपातरातून हा वेंचा घेतला आहे.

आनंदले नटति पाहुनि ज्यास मोर ।
त्रासोनि हंस नच ठाकति ज्यासमोर ॥
तें हें अकालिकचि दुर्दिन होय भारी ।
कामीजनास गगनासहि रोधकारी ॥ १ ॥

हा मेघ आर्द्र—महिषोदर-तुल्य[1] काळा ।
शंखाकृती धरि करांत बलाक—माला[2] ॥
विद्युत्प्रभा वसन पीत कसोनि हातें ।
वाटे दुजा हरिच आक्रमितो नभातें ॥ २ ॥

माधव–गात्र–श्यामल शुभ्र–बलाका–समूह–रचित–दर[3] ।
विद्युत्पीत–वसन हा शोभे अंभोद जेविं चक्र–धर ॥ ३ ॥

---

१ जलार्द्र म्हशीच्या उदारासारखा २ बगळे ३ शख

मेघोदरांतूनि जलाच्या धारा । भूमीवरी पडती झरारा ।
जैशा शुद्ध रजाताच्या तारा । विद्युत्प्रकाशें झळकती ॥ ४ ॥

कांही हंस मयूर काक बकसें वेगें उडों पाहती ।
कांही कांसव मीन नक्र सुसरी पाण्यामधें पोहती ॥
कांही पर्वत-वृक्ष तुंग-शिखर-प्रासादसे दीसती ।
वातें हालवितां नभीं घन असे नानाऽकृती शोभती ॥ ५ ॥

भासे कौरव—राष्ट्र—तुल्य नभ हें जे अंधकारा धरी ।
हर्षानें बहु गर्जना करि शिखी दुर्योधनाचे परी ॥
द्यूतीं निर्जित धर्मसा पिक[4] वनीं आला असे संप्रती ।
गेले स्त्रीसह हंसपांडव तसे अ-ज्ञात-वासा-प्रती ॥ ६ ॥

होऊनि शैल-शिखरा-वरि लंबमान ।
हे गर्जतात घन दुंदुभिच्या समान ॥
ऐकोनि शब्द उडती शिखि—पक्षवातें ।
कीं वीजिती[5] मणि-मय-व्यंजनीं[6] नभातें ॥ ७ ॥

पवनचि जवन तुरग ज्या, जल-मय-धाराचि शस्त्र-धारा ज्या ।
ज्या स्तनित[7]-दुंदुभि-ध्वनि शोभे विद्युत्पताक ज्या राजा ॥
तो मेघराज नेतो हरुनि नभीं कर-समूह चंद्राचा ।
राजा जसा स्वनगरा नेतो कर-भार अबल शत्रूचा ॥ ८ ॥

तडिद्वलाका यांच्यायोगें कर्बुर[8] झालेल्यानीं ।
गर्जुनि विरहि-जनांच्या चित्तीं क्षत केलें मेघांनीं ॥ ९ ॥

त्यावरि दुर्मति हताश बक हा पहा करितसे मार ।
'प्रावृट्' 'प्रावृट्' ऐसें बोलुनि, घाली क्षतांत खार ॥ १० ॥

---

४ कोकिल ५ वारा घालितात ६ पख्यानें ७ वाजविलेल्या ८ रोमांचित

मेघीं आर्द्र तमाल-पत्र-मलिनीं आकाश आच्छादिलें ।
वाणीं हस्तिस तेविं वारुळ-शता धारा-शतें भेदिलें ॥
शोभे वीज घनावरीहि, दिवटी प्रासाद-माथां जशी ।
चंद्राची हरिली प्रभा जलधरें, स्त्री दुर्बलाची तशी ॥ ११ ॥

ज्यांच्या पाठीवर बांधियले विद्युल्लेखा दोर ।
धांवुनि धाराधर हे खाली धारा सोडिति थोर ॥ १२ ॥

जाणों हे गज शक्राज्ञेनें रजताच्या दोरांनीं ।
ओढुनि नेती या पृथ्वीला वर अपुल्या जोरांनीं ॥ १३ ॥

विजेच्या चापल्यें क्षुभित घन निलाभ[9] वळले ।
महावातें अभ्यंतरिं उदधि जैसे खवळले ॥
तिही गंधोद्दामा[10] हरित-तृण-सस्यांकुरवती[11] ।
असे केली धारा-शत-शर-विदीर्णा वसुमती ॥ १४ ॥

मोरांनीं बहु आदरें धरुनि जो ये ये असा बाहिला ।
वेगें जाउनि जो बलाक-ततिनें सोत्कंठ आलिंगिला ॥
हंसांनीं निज-पंकजें त्यजुनियां त्रासोन जो पाहिला ।
तो हा मेघ दिशांस झांकित नभीं नीलांबरें राहिला ॥ १५ ॥

तारा गेल्या नाशाप्रती । जैशी दुर्जनावरी उपकृती ।
कांतवियुक्त युवती । तैशा भासती दशदिशा ॥ १६ ॥

पेटतां विद्युल्लताज्वलन । अंतरीं गेले संतापोन ।
वाटे विरघळलें गगन । जळरूपें पडतसे ॥ १७ ॥

उतरे चढेहि वर्षे गर्जे पाडी घनांधकारातें ।
प्राप्त-नव-श्री-पुरुषा-परि मेघ धरी अनेक रूपातें ॥ १८ ॥

९ नीलवर्ण  १० सुगधाने रमणीय  ११ धान्याचे अकुर

विद्युल्लतांनीं जळतेंच काय ?। धाराजळांनीं गळतेंच काय ?॥
बलाहकांनीं हंसतेच काय ?। वायुभ्रमें निःश्वसतेंच काय ?॥ १९ ॥
मेघोदरा भेदुनियां निघाल्या। पंकांतुनी जेविं मृणालि आल्या॥
धाराच चंद्र–व्यसनें हजारा। सोडीतसे हें दिव अश्रुधारा॥ २०॥

सज्जन-चित्त-सुनिर्मळ विजय-शर-समान कर्कशाकारा।
चंडानिल-संचोदित जलधर हे वर्षतात जलधारा॥ २१॥

सोडिति जलद्–जलाचे बिंदू बलरामवस्त्रसम काय ?
इंद्राच्या कोशांतिल घेउनि मुक्ताच टाकिती काय ?॥ २२॥

तमाल[१२]-पिष्ट-नीलांनीं, मेघांनीं नभ लिंपिलें।
संसक्त-शीत सुरभि वातांनीं उपवीजिलें॥ २३॥

विद्युज्जिह्वा लांबवूनी। जलधर हनुवटी खालवूनी।
इंद्रचाप भुज उभारोनी। जांभई देतें अंतरिक्ष॥ २४॥

ताडावरी कर्कश शब्द होतो। जळीं स्थळीं केवळ मंद हो तो।
जशा विण्याच्या झडतात तारा। तालानुसारें पडतात धारा॥२५॥

## दारिद्र्यप्रभाव

हा वेंचाही मृच्छकटिकांतून घेतला आहे.

ज्या माझ्या सदनांगणांत विमल द्वारप्रवेशी बली।
होते सारस हंस भक्षित सदा, तैशीच हे देहली॥
तेथें सांप्रत हीं पहा उगवलीं झाडें तृणें दीसती।
त्यांमध्यें पडतां बली, झटुनियां मुंग्या, किडे, भक्षिती !॥ १॥

भोगून दुःखे सुख शोभतें जनीं। घनांधकारांत दिवा जसा वनीं॥
सुखापुढें होय दरिद्रता नरा। असोनि देही मृततुल्य तो खरा॥ २॥

---

१२ पर्णविशेष

माझें मलाच घर तापद फार झालें।
क्षीणार्थ जाणुनि जनीं गृह वर्ज्य केलें ॥
गेला सुकोनि मद कालवशेंचि ज्याचा।
जातात भृंग कट[1] सोडुनि त्या गजाचा ॥ ३ ॥

नाहीं खरें विभव-नाश-ज दुःख मातें।
दैवानुसार मिळतें धन आणि जातें ॥
हें दुःख फार मज नष्टधनास, सारे।
झालेच मित्रपण सोडुनि पाठिमोरे ॥ ४ ॥

दारिद्र्य लज्जेचें कारण। लज्जा करी तेजाचें हरण ॥
निस्तेज पुरुषास अपमान। पदोपदीं होतसे ॥ ५ ॥

अपमान निर्वेदा[2] उठवी। निर्वेद शोकातें पेटवी।
शोक बुद्धीतें आटवी। निःशेषपणें ॥ ६ ॥

बुद्धीनें सोडिलें जयासी। नाश गांठी त्या नरासी।
अहो ! इतुक्याही अनर्थांसी। मूळ पाहतां दारिद्र्य ! ॥ ७ ॥

चिंतेचें घर हेंच[3], वैर दुसरें लोकांत होतें सदा।
निंदा मित्रजनांत, कारण निजद्वेषास हें सर्वदा ॥
जाया बुद्धि वनास देइ सहसा, जाया[4] सदा लाजवी।
शोकाग्नी हृदयस्थ हा, परि तनू जाळी न संतापवी ! ॥ ८ ॥

निर्द्रव्या पुरुषा न बंधुजनही साह्यास संतोषती।
त्याचे जे प्रियमित्र तेहि फिरती आपत्तिही वाढती ॥
जातें सत्व लयास शील-विधुची कांती क्षया पावती।
जें केलें जन-पाप-कर्म इतरीं तें त्याकडे लाविती ॥ ९ ॥

---

१ गंडस्थल २ उद्विग्नता ३ दारिद्र्य ४ पत्नी

त्याची संगत कोणिही न करिती त्या मान कोठें नसे ।
जातां तो धनिच्या घरा सुवचनें त्याला न कोणी पुसे ॥
थोरांपासुनि दूरदूर फिरतो लाजून दुर्वस्त्रक ।
वाटे निर्धनता मला खचित हें साव्हें महापातक ॥ १० ॥

दारिद्र्यमित्रा ! वससी शरीरी । माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी ॥
तुझ्याविशीं हें मज दुःख मोठें । मेल्यास मी जाशिल सांग कोठें ॥११॥

जेव्हांहि भाग्यक्षय दुर्दशा नरा । येते अशी काळकृता सुदुर्धरा ॥
घेतात मित्रेंहि अमित्रता तदा । कंटाळती लोकहि रक्त जे सदा ॥१२॥

वेगातें करितो तुरंग गमनीं चालावयाला अती ।
त्याचीं तीं परि पावलें नच तशी शक्तिक्षयें चालती ॥
तैशा पूरुष चित्त वृत्ति चपला चोहोंकडे धांवती ।
खिन्ना होउनि त्या पुन्हा परतुनी चित्ताप्रती पावती ॥ १३ ॥

---

# २४ पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी

---

हे प्रसिद्ध शास्त्री, ग्रंथकार व कवि पुणें जिल्ह्यात खेड तालुक्यातील कडूस नामक गावीं इ. स. १८४४ त जन्मले. हे जातीचे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण, कडूस येथील वृत्तिवान् व नानाफडणविसाचे आश्रित होते. यानीं व्युत्पत्ति, व्याकरण, व अलंकार या शास्त्राचे अध्ययन केले होतें. गरीबीमुळे याना नोकरी पत्करणें भाग पडल्यामुळें इ. स. १८६७ त वऱ्हाडांतील शाळाखात्यांत यांनीं सरकारी नोकरी स्वीकारिली, परंतु पुढें वडिलांच्या वृद्धापकाळामुळें याना नोकरी सोडून पुण्यास परत येणे भाग पडलें. यानी अनेक गद्य ग्रंथ व ‘ षड्ऋतुवर्णन, ’ ‘ कृष्णाकुमारी, ’ ‘ बोधामृत ’ वगैरे काव्ये केलीं आहेत. यानीं प्रासंगिक स्फुट कविताही पुष्कळ लिहिल्या आहेत. याची वाणी विद्वत्ताप्रचुर व प्रौढ आहे. संस्कृत शब्दाचा भरणा

विशेष असल्यामुळे जरी याची कविता स्थलविशेषी क्लिष्ट आहे, तरी ती विविध रसालंकारानीं पूर्ण मंडित असल्यामुळे उच्च प्रतीची आहे यात संशय नाही.

## शरदृतु

सदानंदातें जो सुखकर करी स्वादूभुत रसें ।
कराया रामा जो प्रिय विहृतिकर्मा म्हणतसे ॥
असे ज्याला प्रेमा कुसुमितवनी केलिविषयीं ।
शरत् श्रीकृष्णाचें चरित ऋतु दावी सुसमयीं ॥ १ ॥

हरिद्वस्त्रा नेसे बहु रुइफुली कांठ सरसे ।
अलि-श्रेणी[1] वेणी तिलक निटिलीं शोभत असे ॥
सुचंद्रातें घाली खुबकहि फुलें केतक दिसे ।
सुवर्णलंकारी शरदमलरंभोरु[2] विलसे ॥ २ ॥

रम्यप्रसन्नेंदुमुखी दिसे जे। शुभ्रांबरानें रमणी विराजे ॥
हो हंस कीं भूषित पद्मनेत्री। वाटे शरच्छ्री जणुं ही सुगात्री ॥ ३ ॥

ह्यामाजी ऐंद्रधनु न प्रगटे सुरंगी ।
नानापरी न घनही दिसती स्वभागीं ॥
व्योमीं कधीं फिरती मेघ रिते सुशुभ्र ।
शोभे सदंतरिव[3] निर्मल रम्य अभ्र ॥ ४ ॥

आ-तृप्ति-जीवन समग्र चराचराला ।
देऊनि ताप हरुनी बहु हर्ष केला ॥
हे मेघराज अजि निर्वसु[4] जाहलाशी ।
शोभाचही तुज दिसे जगतांत खाशी ॥ ५ ॥

रुचिकर लागुनि पचनी पडतें, अन्नोदक ज्यामाजीं ।
प्राबल्यातें पावुनि दिसते, सुंदर तनु ही ताजी ॥ ६ ॥

---

१ भृगाच्या पंक्ति २ शरत्सुंदरी ३ सज्जनाच्या अंत:करणासारखे ४ निर्धन

नर, पशु, पक्षी, सर्व प्राणी हुशार दिसती ताजे ।
प्रफुल्ल वल्ली मल्ली तरुवर सुरेख खुलती तेजें ॥ ७ ॥

ग्रामवनीं बहु कुसुमित वल्ली सुंदर दिसती दाट ।
सौंदर्यानें पूर्ण श्री को करून आली थाट ॥ ८ ॥

पुष्पवाटिका प्रफुल्ल होती, घमघम सुवास येतो ।
वरुनी मारुत झुळुझुळु येउनि सुखद तनूला होतो ॥ ९ ॥

जाई शोभे मंडपीं पुष्पिताग्रा । शेवंतीही शोभते पुष्पनम्रा ॥
झेडू, मर्वा, पाच, चांफा, गुलाब । मोतीयाही देतसे गंध लांब ॥ १० ॥

शुभ्र जाई शेवंति पातळातें ।
नेसुन कीं आलीच शरत्श्री ते ॥
झेंडुचे ज्या जरिकांठ गुलाबाचे ।
छटे मधि मधि मन मोहिते जनांचे ॥ ११ ॥

ह्या झेंडुच्या कितिक पुष्पित रम्य रांगा ।
बागांत आणिक घरोंघरिंही सुरंगा ॥
जाती तयांमधि अनेक सुरेख गोल ।
कीं गालिचे पसरले ऋतुनें अमोल ॥ १२ ॥

शोभेंत थोडिंच फुलें तुझियासमान ।
आहेत झेंडु ! पृथिवीवरि सत्य मान ॥
बारे, तुझ्यांत असता जरि कां सुवास ।
बागेमधें न मिळता इतरांस वास ॥ १३ ॥

पडोळीं, घोसाळीं, परवर, फळें मंडपतळीं ।
तशी शेंगावांगीं बहुमृदुल बागेंत कवळीं ॥
किती पेरू, केळीं, अतिमधुर सीता-फळ-तती ।
लता-वृक्षीं नाना फल-कुसुम-राजी विलसती ॥ १४ ॥

जिकडे तिकडे सुंदर शेतें, दिसती हिरवीं गार ।
सुलतालिंगित पर्वत तरुही दिसती सुरेख फार ॥ १५ ॥

क्षेत्रें अनेक दिसती रमणीय खाशीं ।
लक्ष्मी वनांत रमते परिपूर्ण हौशी ॥
हर्षें कृषीवल मधें करतात धंदे ।
पक्षी सहर्ष करिती स्थल पूर्ण नादें ॥ १६ ॥

कणसें हळु हळु नवीन निघती, शोभा त्यांची फार ।
कोमल दाणे दिसती सुंदर, सृष्टीचें तें सार ॥ १७ ॥

कणसांवरतीं नवीन दाणे, ओळीनें ते दाट ।
शरदें लोकां मौक्तिक-कणसें ताटीं अणिली भेट ॥ १८ ॥

कर्षक माळयांवर बैसूनी कोलाहल करिताती ।
गोफण धोंडे गुंगत हाणुन, पक्ष्यातें उडवीती ॥ १९ ॥

सकल सकल पक्षी रम्य वृक्षीं बसोनी ।
मग फल-रस-धान्यां भक्षिती थोर रानीं ॥
विमल जल नदीचें प्राशुनी खेळताती ।
उडत उडत हर्षें स्वेच्छ लीला करीती ॥ २० ॥

पशु नविन तृणातें भक्षुनी पुष्ट होती ।
करुन वर सुपुच्छा उच्च शब्दा करीती ॥
समद वृष नदीचें तीर हुंदाडिताती ।
भिडवुनि खर शृंगां मत्त झुंजा करीती ॥ २१ ॥

निर्झर मौक्तिक-शुभ्र-हार जणुं धरिती अंगीं सुरेख ।
हिरव्या वेषा करुनी सुलता आलिंगिति गिरि देख ॥ २२ ॥

नदीपात्रीं रमणीयता विशेष । स्वस्छ उदकें देतात मना तोष ॥
प्रसन्ना ह्या चालती नद्या वाटे । त्वरेनें कीं प्रिय-संगमेच्छु वाटे ॥ २३ ॥

सुज्ञाचिया संगतिनें विशुद्ध। होती खलांची कुमनें; प्रसिद्ध ॥
ऋतूचिया या सुसमागमें हीं। तैशीं जलें निर्मल शांत पाही ॥ २४ ॥

तुला सत्पात्राची सतत असते संगति बरी।
तसे दोन्ही भागी प्रबल असती रोधहि तरी ॥
जला चांचल्यातें धरुन असशी नीच-ग खरें।
स्वभंगा पावूनी फिरत असशी संभ्रम-भरें ॥ २५ ॥

जलाशयीं ह्या ऋतूंत कमलें प्रफुल्ल होती फार।
मधुकर गुंजारव वर करिती शोभा दिसते थोर ॥ २६ ॥

जलामध्यें सर्वदा असे स्थान। मधु-प-वृंदा सप्रेम देह मान ॥
कंटकाशीं आजन्म सख्य आहे। मुदित मित्रोदयिं पद्म तरी राहे ॥ २७॥

करी जागृत सन्मित्र करीं लोकां। येइ तुजही करण्यास पाहुनी कां ?॥
मिटिसि डोळे तरि तूंहि कुमुदिनी गे। कशी वाटत तुज लाज नसे सांगें ॥२॥

रत्नाकराचा सुत शांत कांत। श्रीचा असे बंधु कलानियुक्त।
सुधा-करांनी सुखवी अनेकां। अशा सवें पद्मिनि रुष्ट तूं कां ॥ २९ ॥

तुझ्या ठायीं पद्मिनी गुण अनेक।
परी त्यांचें प्राकट्य नसे स्तोक ॥
हाच हेतु श्री युक्त-रम्य-कोशें।
मधु-प-संघा पाळिसी सदा तोषें ॥ ३०॥

कर-स्पर्शें मातंग पद्मिनीस। भ्रष्ट करिती पाहून तें अलीस ॥
राग येई स्वप्रियाघर्षणानें। फोडण्या तच्छिर जाति जणूं मानें ॥ ३१ ॥

कर्णीं ताडित मधुपहि सध्वनि फिरून गंडीं जाती।
द्विज-दानार्थी तीक्ष्ण-ताडणा-प्रति नाहीं मानीती ॥ ३२ ॥

कंजांदोलीं बैसुनी हंसहंसी। झोला घेती वायु येण्या विलासी।
अंगीं घेती अष्टगंधी पराग। भृंगी-गीतें डोलती कीं सुराग ॥ ३३ ॥

रवि ह्या ऋतूंत तापद, करितो प्राण्यांस फार तो कष्टी ।
माध्याह्नीं उष्णानें, होती संपूर्ण कृष्ण मृग पृष्ठी ॥ ३४ ॥
धरितांचि दक्षिणाशा, तेजस्वी-प्रख्यही जरी द्युमणी ।
अपणा केवल नाहीं, स्वाश्रित दिवसां लघुत्वही आणी ॥ ३५ ॥
शुष्कपंका निर्धूलि भूमि शोभे । लतापुष्पी गुंजती भ्रमर लोभें ॥
मंद शीतल सद्गंध वात येतो । पांथ-जनता-चित्तांस मोहितो तो ॥ ३६ ॥
सौख्यकंदच तो होय शारदेंदु । कुमुदकुंदी चंद्रिका विशद विंदु ॥
मोद देती, चालतो मंद मंद । वात, घेउन मकरंद रम्य गंध ॥ ३७ ॥

---

# २५ बजाबा रामचंद्र प्रधान

---

या कवीचा जन्म इ. स. १८३८ त कोकणात दापोली येथें झाला. हे जातीचे कायस्थ प्रभु. याचें शिक्षण दापोली व पुणे येथें झाले. 'मॅट्रिक्युलेशन' ची परीक्षा उतरल्यावर यानी पुढे काही वर्षे अभ्यास केला, व नंतर सरकारी नोकरी धरून आपल्या विद्वत्तेच्या व बुद्धिमत्तेच्या जोरावर 'डे. एज्युकेशनल इन्स्पेक्टर' च्या हुद्यापर्यंत चढले. हे उत्तम मराठी लेखक व कवि होते. आंग्ल कवि सर वॉल्टर स्कॉटच्या 'लेडी ऑफ धि लेक' ह्या काव्याच्या धर्तीवर यानी 'देवसेनी' नामक एकच पण सहृदयानंददायी काव्य केले आहे. मराठी भाषेंत आंग्ल काव्यसाहित्याच्या परिणामाचें हें पहिलेच फल होय, असे म्हणण्यास हरकत नाही. या काव्यात कवींचें कल्पनाचातुर्य व सृष्टीसौंदर्याविषयींचे प्रेम ही स्पष्ट व्यक्त झाली आहेत. या कवींचा इ. स. १८८६ साली मुंबई येथे आकस्मिक अंत झाला.

## देवसेनी आणि जयसेन यांची भेट

पुरुष जवळ ऐसा पाहतां हे कुरंगी ।
दचकुनि भय पावे, लज्जिता अंतरंगीं ॥

इतर जन नसेही, संकटीं काय कीजे ।
वदन करुनि खालीं मौनिनी ते विराजे ॥ १ ॥

पुरुष पाहुनि ये भीति अंतरंगी । चित्त सहसा दचकेहि, कंप अंगी ॥
अधोवदनें झांकोनि दृष्टि राहे । कठिण संकट जाणोनि कष्टताहे ॥ २ ॥

धैर्य गेलें, मुखचंद्र उतरलाहे । चित्त घाबरलें, हृदय उडों पाहे ॥
करी चिंता करुं काय अगे बाई । धांव ठाकुरजी ! धांव चंडिकाई ॥ ३ ॥

अशी मुद्रा पाहोन गोरटीची ।
वीरराणा पांथस्थ वदे वाची ॥
भीरु बाले ! त्यज भीति दुःख आतां ।
होय, मानव मी, व्यर्थ तुझी चिन्ता ॥ ४ ॥

पिता प्रियकर पाहीन असा हेतू । धरुनि आली असशील कन्यके तूं ॥
परी आशा भंगोनि, अचंबाही । व्यर्थ उपजवितो भीति तुझे ठायीं ॥ ५ ॥

वनीं आलों मृगयेस जाण आजी । रात्र झाली मज तोंच तयामाजीं ॥
कुठें ठायां शोधीतसें विरामा । तोंच दैवें तव दाखविलें धामा ॥ ६ ॥

पाहुणा मी तरि आजि तुझ्या गेहीं । निराश्रितसा अपरात्र जाहली ही ॥
जरी तुजशी आतिथ्य याचियेलें । कसा करशिल अव्हेर दयाशीले ॥ ७ ॥

लज्जावती उत्तर दे न कांहीं । हाले न, तैशी वरतें न पाही ॥
पांथस्थ ऐशांत करी उपाया । नौकेंत तो पाहतसे रिघाया ॥ ८ ॥

नौकेमाजीं अग्रस्थानी दूर परी तो बैसे ।
योग्य रीति, मर्यादा, उत्तम शील त्यजील कैसें ? ॥ ९ ॥
सस्मितमुख जयंवत मानुनी उत्कंठितही भारी ।
चित्त परी साशंक पहाया चंद्रमुखी सुकुमारी ॥ १० ॥

स्वयें अवलें घेऊन करीं वेगें । नाव हळु हळु लोटीत जळासंगें ॥
भीरु युवती विसरोन देहभाना । स्तब्ध राहे तिज शब्द बोलवेना ॥ ११ ॥

चालविलें जलयान तयानें चित्त नसे अवधानीं ।
लक्ष न जाय अवश्यक कामीं नसतां तें स्वस्थानीं ॥ १२ ॥
सुविचारांनीं पुनरपि चंचल आवरि तो स्वमनाला ।
सदयहृदय बहु विनय धरूनी काय वदे सुशिलेला ॥ १३ ॥
बाले ! सुंदर तरुणी तूं ही, मी परपुरुष असें कीं ।
म्हणुनी वदनीं मौन तुझ्या हें चित्त असें मम शंकी ॥ १४ ॥
व्यर्थ परंतू शंका सारी जाणें तुझी सुशीले ।
दूषिल केशी रीति जनांची आतिथ्यादर बोले ? ॥ १५ ॥
एकाकीही कुलीन कन्या, पांथांतें स्वस्थानीं ।
सत्कारुनियां आदरितातीं, ऐकियलें त्वां कानीं ॥ १६ ॥

जाय जरिही तव तात इतर कामा । कुलोचित हें तुज नेईं मला धामा ॥
तुझ्या पदरीं उपकार बांधुनियां । त्वरें जाइन उदईक निजा ठायां ॥ १७ ॥
जणों मानवले बोल कन्यकेतें । करी किंचित् आयास बोलण्यातें ॥
पुन्हां लज्जा वदनास करी वायां । अर्धशंकित निर्भीडसें वदाया ॥ १८ ॥
"अहा" ऐसा जो शब्द बोलताहे । तोंच नौका थडकोनि उभी राहे ॥
मोहपाशीं पांथस्थ गुंतलेला । द्वीप सन्निध नकळेचि हें तयाला ॥ १९ ॥
नांव जेव्हां स्थिर होय, हे कुरंगी । भूमिवरतें उतरोन जाय वेगीं ॥
पाहि ऐसें पांथस्थ चपापोनी । म्हणे जाइल कीं एकली निघोनी ॥ २० ॥
परी पाहे साल्हाद नवल दृष्टीं । कुलिन सात्विक युवतीस उदककांठीं ॥
उभी राहे संकोच निवारोनी । वदे पांथस्था विनय सांवरोनी ॥ २१ ॥
अहो ! याजी उतरोनी चला गेहा । रात्र अथवा दिनरात सुखें राहा ॥
परी नाहीं प्रिय तात घरीं आला । घरीं एकुलती मीहि तया बाला ॥ २२ ॥
असो, घालविणें योग्य अतिथियाला । उचित नोहे हें तातकुलिनतेला ॥
तुम्हां तरि मी निजगेहिं नेत आहें । परी, इतुकें बोलोनि उगी राहे ॥ २३ ॥

असे सन्निध येतात जों गृहाचे । धाम पाही पांथस्थ सुंदरीचें ॥
क्षेत्र आंतिल बहु थोर नसें कांहीं । स्पष्ट सांगे एकांतवास हाही ॥ २४ ॥
अपरिचितसा पांथस्थ जाय गेही । नेत्र लावुनि जों भुवन सर्व पाही ॥
चित्त दचके, बहु नवल मनीं खोंचे । वीरपुरुषाचें धाम असे साचें ॥२५॥
व्याघ्र-शार्दुल-मृग-शशक-चर्म-भारे । रीस, जंबुक, वृक, अंथरिले सारे ॥
परी तेथें आश्चर्य तया भारी । स्तब्ध राहे रोखोनि दृष्टि सारी ॥ २६ ॥
दोन तेथें जीं पाहिलीं निशाणें । लिखित वरुतीं संज्ञीक याप्रमाणें—
"मालपुरचा ठाकूर बादशाही," । दुजावरतीं "जयपूर जय सवाई"
होय मानस उद्विग्न देखताहे । उभा कोठें ! हें कोण ! काय आहे ! ॥
देहभाना विसरोनि स्वस्थ ठेला । व्यर्थ शोधोनि श्रमावि कल्पनेला ॥२८॥

---

# २६ गणेश सदाशिवशास्त्री लेले

---

श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथे या विद्वान् कवीचा इ. स. १८२५ साली जन्म झाला. हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. प्रवेश परीक्षा झाल्यावर यानी 'एल्फिन्स्टन्' कॉलेजात अभ्यास सुरू केला, परंतु मुंबईची हवा न मानवल्यामुळें यास अभ्यास सोडणे भाग पडले. याचा काव्यव्यासंग जबरदस्त होता. यानी 'रघुवंशाचे पद्यात्मक भाषातर,' 'शिवाजी चरित्र,' 'कृष्णाकुमारी' वगैरे बरीच मोठीं काव्ये व इतर स्फुट कविता रचिली आहे. याची काव्यरचना विद्वत्ताप्रचुर, प्रौढ, रसालंकार-मंडित व मनोहर आहे. हे कवि इ. स. १८९८ सालीं निवर्तले.

## भाटांनीं केलेला अजस्तुतिपाठ

कालिदासकृत रघुवंशाच्या मराठी रूपातरातून हा व पुढील वेंचा घेतला आहे.

**गेली रात्र पहा विचार-चतुरा, ऊठ प्रभो ! लौकरी ।**
**क्षोणी-रक्षण-भार-हा अपुलिया ध्यायास खांद्यावरी ॥**

दोघे पूरुष योजिले कमल-जें दोहींकडोनी, तिहीं ।
खांदे देउनियां वरी उचलिजे, ऐसी असे गोष्ट ही ॥ १ ॥

त्यांतोनि एक तव तात असे कुमारा ।
एकीकडोनि धरितो उचलोनि भारा ॥
बाजू दुजी उचलण्या तुजलाचि तेणें ।
बा योजिलें म्हणुनि ऊठ अतां त्वरेनें ॥ २ ॥

निद्राधीन–मनें तुवां क्षणभरी लक्ष्मी तिरस्कारिली ।
तेव्हां खंडित-नायिके-परि[1] मनस्तापास बा पावली ॥
चंद्र त्वन्मुख-कांति-युक्त म्हणुनी त्याच्याकडे जाय ती ।
विश्रांत्यर्थ, परंतु तोहि बघ रे झाला फिका संप्रती ॥ ३ ॥

आतां मनोज्ञ नयनासहि पंकजांस ।
बा एकदांचि अजि येउ नवा विकास ॥
नेत्रांत गर्गर तुझ्या फिरताति तारा ।
पद्मांत भृंगततिका करि येरझारा ॥ ४ ॥

ऐसी विकासि कमलें अणि नेत्र यांचें ।
अन्योन्य साम्य घडुं दे नरवीर साचे ॥
कां कीं सहस्र-दल-बंधु नभःप्रदेशीं ।
येवोनि सूर्य कमलांप्रति हा विकाशी ॥ ५ ॥

प्रभातीं फुल्लांभोरुह-समुदयालागिं भजतो ।
तसा वृक्षांच्याही शिथिल कुसुमांलागिं हरितो ॥
तुझ्या श्वासामध्यें परिमल निसर्गेंचि वसतो ।
जणूं तत्प्राप्त्यर्थं स्फुट पवन हा यत्न करितो ॥ ६ ॥

---

१ मनोभग्न झालेल्या स्त्रीप्रमाणें

वृक्षांचीं नवकोमलारुण अशीं स्नेहांश[२]-शाली दलें ।
त्यांमाजी दंव शुभ्र मौक्तिकसरा ऐसें दिसे चांगलें ॥
हास्याची रुचि दंतकांतिसहिता आतां बहु पांढरी ।
जेवी शोभतसे, तुझ्या नृपसुता रक्ताधरोष्ठावरी ॥ ७ ॥

प्रतापनिधि सूर्य हा जरि न ये वरी अंबरीं ।
तरी अरुण सत्वरी अधिंच त्या तमा संहरी ॥
रणीं अतुलविक्रमी असुनि वीर तूं तत्वतां ।
न कारण रिपूंवरी रघुस[३] जावयाला स्वतां ॥ ८ ॥

पुष्पें गेलीं सुकोनि म्हणुनि विरलता फार हारांस आली ।
निस्तेजस्क प्रदीपावलि नृपतनया ! देख ही सर्व झाली ॥
जी जी वा त्वां उठावें म्हणुनि वदतसों रम्यवाक्यें, सुखानें ।
ती ती हा पंजरस्थ प्रकट वदतसे, देख रांवा[४] मुखानें ॥ ९ ॥

ऐसी बंदिसुतोक्त[५]-वाणि मधुरा ऐकोनियां जागृत ।
होवोनी, शयना त्यजी झडकरी तो भूपतीचा सुत ॥
जागा होउनि राज-हंस-विरुतें[६] गंगेचिया सैकता[७] ।
जेवीं सोडुनि सुप्रतीक उठतो, तैसा दिसे हा स्वतां ॥ १० ॥

## दर्शनीयस्थलनिर्देश

पुष्पक-विमानात बसून अयोध्येकडे जात असता रामाने सीतेला अनेक प्रेक्षणीय स्थलें दाखविलीं त्याचे येथें वर्णन आहे.

त्वच्छुद्धीस[१] वनीं करीत असतां शोकाचिया निर्भरीं ।
कांते ! नूपुर एक म्यां निरखिला दैवें धरित्रीवरी ॥

---

२ तेलकटपणाचा अंश ३ अजाचा पिता ४ पोपट ५ भाटानी केलेली ६ कलरवानें ७ वाळवट

१ शोधास

तो त्वत्पाद-वियोग-दुःखित जणूं बोलेच ना दुर्बळ।
ऐसें वृत्त घडे, जिथें जनकजे! तें हेंचि पाहें स्थळ ॥ १ ॥

ज्या मार्गे तुजला निशा[२]--चर--पती नेई बळें सुंदरी!।
त्या मार्गा वचनेंकरूनि वदण्या शक्ती नसे ज्यां बरी ॥
वाताकम्पित-पल्लवांगुलि--वशें त्या ह्या लतांनीं मला।
सीते! घोरवनी दयार्द्रहृदयें पंथा तुझ्या दाविला ॥ २ ॥

लागेना तव शोध यास्तव बहु मी व्यग्र हें अंतरीं।
जाणोनी हरिणी तृणा त्यजुनि ह्या, तोंडा करोनी वरी ॥
दृष्टी फेंकुनि दक्षिणेस अपुली त्यांनीं मला सूचना।
केली की, बघ या दिशेसचि असे बापा! तुझी अंगना ॥ ३ ॥

आतां हें अग्रभागीं हिम[३]--कर--वदने! माल्यवान् पर्वताचें।
आकाश-स्पर्शी ऐसें शिखर बघ दिसूं लागलें थोर साचें ॥
जेथें एकेच काळीं विमल नवजला सोडिले शीघ्र मेघें।
तैसें बाष्पोदकातें व्यथित बहुत म्यां होउनी त्वद्वियोगें ॥ ४ ॥

जो सीते! गंध चाले भिजुनि नवजलें मृत्तिका पल्वलांची।
वाणी सुस्निग्ध[४] मेघागम-मुदित अशा तें मयूर-व्रजाची ॥
नीपांच्या[५] रम्यपुष्पांतिल मृदुल असे तंतु बाहेर येती।
या गोष्टी याच शृंगी मज तव विरहें दुःसहा फार होती ॥ ५ ॥

येथे ऐकुनियां सरो-ज-नयने! मेघांचिया गर्जिता।
ज्याचा थोर उठे प्रतिध्वनि गुहेमाजी सखे! तत्वतां ॥
ऐशा वेळिं मिठी गळ्या मम तुवां गे घालिजे साध्वसें[६]।
तें येवोनि मनीं श्रमें दिवस ते म्यां कंठिले राजसे ॥ ६ ॥

---

२ रावण ३ चद्रवदने सीते ४ घन गभीर ५ वृक्षविशेष ६ भीतीने

रक्तें कंदलिचीं फुलें उमललीं जैं काननीं चांगलीं ।
पर्जन्यें भिजुनी क्षिती बहु तिची ती वाफ त्यां लागली ॥
तीं पाहोनि विवाहकालिक तुझीं धूमारुणें लोचनें ।
चित्तीं आठवुनी मला श्रम इथें झाले मृगांकानने ! ॥ ७ ॥

ज्यांच्याभोंवतिं फार दाट विलसे हें वेतसींचें कुल ।
तैसे सारस पक्षि देख दिसती लांबोनि किंचिच्चल ॥
त्या पंपा[७]-सलिला दुरून बघुनी ये खालतीं धांवुनी ।
श्रांता होउनि दृष्टि ही मम सखे ! पीतेच वाटे मनीं ॥ ८ ॥

जेथें आम्रतरू तुवां घटजलें मोठ्या श्रमें पोशिले ।
तोंडें ऊर्ध्व करोनि धांवति जवें जेथें मृगांची कुलें ॥
ती ही पंचवटी अजी बहुदिनीं संप्राप्त झाली असे ।
जीतें पाहुनियां मदीय हृदया आनंद गे होतसे ॥ ९ ॥

ज्यानें तो नहुषाख्य भूप पृथिवीमाजी बहू उद्धत ।
भ्रू-भंगें सहसा महेंद्र-पदवी-पासोनि केला च्युत ॥
येतां जो उदयास पंकिल जलें होती अती निर्मळ ।
पाहें आश्रम त्या अगस्त्यमुनिचा हा भूवरी सोज्ज्वळ ॥ १० ॥

चोहींकडे ज्वलन पेटवुनी दुपारीं ।
माथ्यावरी तपतसे जंव सूर्य भारी ॥
बैसोनियां मुनि सुतीक्ष्ण म्हणोनि हा कीं ।
पंचाग्निसाधन करी अबले विलोकीं ॥ ११ ॥

नांवेंचि हा विदित लोकिं सुतीक्ष्ण पाहें ।
हे जानकी ! प्रकृतिनें तरि सौम्य आहे ॥

---

७ सरोवरविशेष

नांवावरोनि न कधीं करिजे परीक्षा।
लक्षांत ठेविं सखये ! मम ही सुशिक्षा ॥ १२ ॥

हा मौनी म्हणुनी मम प्रणतिला अत्यादरें घ्यावया।
किंचिन्मस्तक डोलवूनि करुनी प्रत्युक्तिची सत्क्रिया ॥
गेलें जें निघुनी विमान मधुनी व्योमांत एकीकडे।
तेव्हां लावि मुनी पुनश्च अपुल्या दृष्टीस सूर्याकडे ॥ १३ ॥

आहे हा शरभंग-नाम मुनिचा संशुद्ध गे आश्रम।
जेथें दीन जनास सौख्य मिळतें अद्यापि सर्वोत्तम ॥
ज्यानें अध्वरिं फार होम करुनी अग्नीस संतर्पिलें।
शेखीं आत्मतनूसही शुचिमनें अग्नीमधें होमिलें ॥ १४ ॥

पांथांच्या बहुला श्रमास हरिती देवोनियां सावली।
क्षुद्बाधा हरितात्ति तेविं विपुलीं जे आपुल्या सत्फलीं ॥
वृक्षांच्या असल्या गणां अतिथिचा सोंपून पूजाविधी।
सत्पुत्रास पिता तसा त्यजि निजा देहा तपांचा निधि ॥ १५ ॥

दरीरूप ज्याचें असे तोंड थोर। निघे सर्वदा ज्यांतुनी शब्द घोर ॥
असे शृंगलग्ना महा मेघराजी। जणूं टक्करा मारितां पंक, याजी ॥ १६ ॥
असे माखला, या अशा चित्रकूटा। सखे ! देख तूं जो असे उंच मोठा ॥
वृषाचें बहु साम्य साजे यया जी। निघेना यया सोडुनी दृष्टि माझी ॥ १७ ॥

वाहे निर्मळ आणि सुस्थिर बहू पाणी जियेचें असें।
येथोनी बहु दूर यास्तव लघू तो ओघ जीचा दिसे ॥
आहे ही तटिनी समीप गिरिच्या मंदाकिनी–नामिका।
मोत्यांचा जणुं हार हा पृथिविच्या कंठांत शोभे निका ॥ १८ ॥

येथें हा गिरिच्या शिरीं जिवलगे ! देखें तमालद्रुम।
याचा पल्लव घेतला खुडुनि मी ज्या गंध ये उत्तम ॥

हे वैदेहि ! तई मनोहर असा कानावरी खोंविला ।
ईषत्पांडु[८] यवांकुरापरि तुझ्या वक्त्रीं बहु शोभला ॥ १९ ॥

शिक्षेवांचुनि शांत जंतु असती जेथें स्वतां सत्तम ।
पुष्पावांचुनि पादपांस नियमें येती फळें उत्तम ॥
ऐसा चित्तचमत्कृतीस करितो जेथील सीते ! क्रम ।
तो हा साधन सत्तपास वनिते ! उद्दाम अत्र्याश्रम ॥ २० ॥

गंगास्नान तशीं पवित्र कुसुमें हीं योग्य पूजाक्रमीं ।
हें जाणोनि महासती सुरनदी आणी स्वकीयाश्रमीं ॥
प्रातःकाळिं उठोनियां सुविधिनें स्नानास संसाधिती ।
सप्तर्षि स्वकरें सुवर्णकमलें तोडोनि आराधिती ॥ २१ ॥

पूर्वी श्याम असा प्रसिद्ध पृथिवीमाजी तुवां अर्चिला ।
हस्ता जोडुनियां व्रतीं पतिशुभासाठीं बहु प्रार्थिला ॥
पाहे तो वट हा महा फलभरें सर्वांगिं वेंटाळला ।
सद्गारुत्मत-पद्म-राग-मणिंच्या राशीपरी शोभला ॥ २२ ॥

मुक्ता-यष्टिच इंद्रनीळ-मणिनीं शोभे जशी वेढिली ।
किंवा शुभ्र-सरोज-पंक्ति खचिली इंदीवरानीं[९] भली ॥
श्वेता हंसतती जशी मिसळतां कादंबकांच्या गणीं ।
वा कृष्णागरुमिश्र पत्ररचना भूची दिसे चांदनी[१०] ॥ २३ ॥

छायेमाजिं दडोनि राहि तम जे तेणें जशी चंद्रिका ।
रात्रीं वेगळि वेगळी दिसतसे ती पाहतां जेविं कां ॥
किंवा शारद-मेघ-राजि गगनीं तीच्या स्वरंध्रांतुनी ।
आकाश स्फुट कृष्णवर्ण दिसते जैसें सखे ! लोचनी ॥ २४ ॥

---

८ किंचित् पांढरा ९ भृंगानी १० चंदनासारखी

किंवा शुभ्र विभूतिनें शिवतनू जी कां दिसे पांढरी ।
ती ही कृष्ण-भुजंग-भूषण-गणी होते जशी साजरी ॥
तैसा जन्हु-सुता-प्रवाह दिसतो गे पांढरा शुभ्र हा ।
त्याला हा यमुनौघ कृष्ण मिळुनि वाहे कसा तो पहा ॥ २५ ॥

गंगा सूर्यसुता नद्या उभयतां यांच्या महासंगमी ।
स्नाना जे करितात ते शुचिमनें प्राणांचिया निर्गमीं ॥
जीवात्मैक्य[११]-विभावना न करितां मोक्षास जाती त्वरें ।
त्यांचें मागुती या जगांत तनुला[१२] घेवोनि येणें सरे ॥ २६ ॥

पाहे ही नगरी गुहाख्य अमुचा जो मित्र त्याची, प्रिये ! ।
येथें मस्तकभूषणा त्यजुनियां बांधी जटा मी स्वयें ॥
तेव्हां तो सुमती सुमंत्र रडुनी ऐसें मुखें बोलला ।
की 'गे केकय-कन्यके ! अजि तुझा इष्टार्थ आला फला' ॥२७॥

ब्रह्माचें सर मानसाख्य सखये ! विख्यात पृथ्वीवरी ।
जेथें यक्ष-वधू-गण प्रतिदिनीं पानीय-केली करी ॥
त्यापासोनि निघे पवित्र सरयूनामें नदी ही तशी ।
अव्यक्तांतुनि बुद्धि जेविं निघते हें सांगताती ऋषी ॥ २८ ॥

यज्ञस्तंभ विशाल ह्या सरयुच्या तीरीं बहू शोभती ।
साकेता-जवळोनि[१३] निर्मल जलें हीची पहा वाहती ॥
इक्ष्वाकु-क्षिति-पाळ-हे अवभृथ-स्नाना सवान्ती[१४] जळीं ।
पूतात्मे करिती म्हणोनिच अती संशुद्ध ती जाहली ॥ २९ ॥

मातेच्या परिही वियुक्तचि असे मान्यें नृपानें धुनी[१५] ।
मी आलों वनवास भोगुनि असें ती मानसीं जाणुनी ॥

---

११ परब्रह्माशी जीवात्म्याच्या ऐक्याचा विचार १२ पुनर्जन्म टळतो १३ साकेत नगरी
१४ सोमसेवनानंतर १५ नदी

वातें शीत तरंगरूप कर जे त्यांनींच आलिंगिते ।
जाणों ही मजला, सुधांशु-वदने ! ऐसें मला भासतें ॥ ३० ॥
संध्या रक्त जशी तशी अवनिचीं मोठीं उडालीं रजें ।
त्यांतें पाहुनि, वाटतें मम मनीं कीं संभ्रमें वायुजें ॥
नंदिग्रामिं महोत्सवें कळविला वृत्तांत माझा बरा ।
ऐकोनी भरत त्वरें मजकडे येण्या निघाला खरा ॥ ३१ ॥
मारोनी खरदूषणाहि रिपुला येतां फिरोनी सखे ! ।
रक्षूनी तुज लक्ष्मणें मम करीं जैसें दिलें की सुखें ॥
आलों तातकृता खरी करुनि मी आज्ञा तशी मागुती ।
लक्ष्मी रक्षित काल ती भरत हा देईल माझ्या हतीं ॥ ३२ ॥

---

# २७ कान्होबा रणछोडदास कीर्तिकर

## जन्म. इ. स. १८४९

हे प्रसिद्ध डॉक्तर, ग्रंथकार व कवि मुंबई येथें इ. स. १८४९ त जन्मले. हे जातीचे सूर्यवंशी पाठारे प्रभु. मुंबईस उच्च प्रतीचे शिक्षण संपादून हे इंग्लंडास गेले व तेथें 'आय् एम्. एस्.' ही परीक्षा पास झाल्यावर हिंदुस्थानात येऊन यानी सरकारी नोकरी केली. यानीं बरेच गद्यग्रंथ व 'भक्तिसुधा,' 'विलापलहरी,' 'इंदिरा' हीं काव्यें व शिवाय काहीं स्फुट कविता लिहिली आहे. याची कविता साधी व रसाळ आहे. पुष्कळ वर्षे पेनशनचा उपभोग घेऊन हे इ. स. १९१७ सालीं निवर्तले.

## वेंचे—विलापलहरींतील

घरा यावें तेव्हां मज दिसतसे चंद्रवदनी ।
अतां कोठें गेली ? कुणि लपविली काय सदनी ? ॥

पहावें धुंडोनी सकल गृह खालीं वर तरी ।
दिसेना ती कोठें ! अनिश उठती दुःखलहरी ॥ १ ॥

कुठें पाहूं आतां सुमुखि तुझिया हास्यवदना ।
पडे कर्णी तूझें मृदुवचन येतांचि सदना ॥
करूं आतां वर्णश्रवण वद कैचें कमलिनी ।
विझालीशी ज्योती ! बहु तळमळें मी निशिदिनी ॥ २ ॥

अहोरात्री जीवा तरफड, न कांही गमत गे ।
जरा येतां निद्रा, दिससि मज स्वप्नीं जिवलगे ॥
तुझ्या संगें भार्ये सकल कुलसौभाग्य बुडलें ।
अकालीं त्वां जावें, कवण असलें पाप घडलें ॥ ३ ॥

रडोनी स्फुंदोनी नयन सुजले अश्रु गळती ।
निशी निद्रा नाही, तनु विरहवन्हीत जळती ॥
म्हणावें गेलीशी रुसुनि मशिं दावा करुनियां ।
कसें तैसें होई ? तुजसम न शांता भुवनिं या ॥ ४ ॥

सदा जी चित्ता दे सुख मधुर वाणी वदुनियां ।
महा माया लावी सतत सकलां दावुनि दया ॥
बहू ज्ञाती स्त्री ती परि तिज नसे गर्व तिळही ।
गुणां गाई तीच्या सकल बहु संतोषित मही ॥ ५ ॥

महा मिथ्या माया सकल जग साचें मृगजळ ।
उलाढाली होती विविध, परि लागे नचि पळ ॥
प्रभा जीची पूर्णा शशिसम पडे नित्य सुखदा ।
तिथें आतां झालें तिमिरमय; मी भोगिं विपदा ॥ ६ ॥

कसा अतुल भार हा विरहजन्य साहूं शिरीं ?।
कसा सखि तुझ्याविणें क्रमिन काळ या मंदिरीं ? ॥

कसें क्षणिंच अंतरे अमितसौख्यभांडार तें ।
जपोन उपभोगिलें सुधन दिव्य जे म्यां रतें ॥ ७ ॥

विनोद करुनी महा रमविशी तुझा ‘ सोबती ’ ।
प्रिये हृदयरंजने ! कवण हाक मारील ती ? ॥
न सोबत अतां मला विरहवह्नि वांचूनियां ।
जगेल तनु जोंवरी, स्मृति तुझी न पावो लया ॥ ८ ॥

## हिमालय पर्वत

ज्याच्या पादरजां सदैव धुविती शुभ्रौघ भागीरथी ॥
कालिंदी अति कृष्णनीर भरली गंगेसवें प्राक्पथीं ॥
ब्रह्माची तनया सदंघ्रि वसते, ब्राह्मां सुधा सौख्यदा ॥
पंचापीं नद सिंधुचा रत पदीं नांदे जयाच्या सदा ॥ १ ॥

कौटाळोनि वसुंधरे कटितटीं शोभे स्वयें मेखला ॥
जो शृंगीं धवलांगकांति नटला, सौख्यानिलें भारला ॥
जो गव्यूतिसहस्रदिव्य गगना भेदीत अभ्रांतरीं ॥
जाई वैभवशालि, पामर तया मी वर्णुं कोण्यापरी ॥ २ ॥

सौंदर्यें भरला पुरा, हिमनगा ! तूं भाससी रे मला ॥
वर्णूं ना तुज मी कवी म्हणवुनी वर्णूं कुणा मी भला ? ॥
वर्णाया तुजला अरे ! नखशिखीं आहेत नानापरी ॥
का वर्णूं वन-औषधी वसत ज्या तूझ्या दरीं गव्हरीं ? ॥ ३ ॥

का वर्णूं कवण्यापरी रवि सदा कांती तुझी शोभवी ? ॥
रश्मी सोज्वल पाडुनी तुजवरी त्यांहीं तुला गौरवी ॥
का वर्णूं तव उच्च दिव्य शिखरीं मेघांबरें केंवि तीं ॥
प्रेमें नांदुनि शीतदा जलसुधाधारा सुखें वर्षिती ? ॥ ४ ॥

'गौरीशंकर' नांदतो तवशिरीं साक्षात् किं तो शंकर ॥
गंगा खोंवुनि मस्तकीं धवलशा भेदी शिरें अंबर ॥
जाणे कोण किती सुखें तव शिरी 'किंचीन' गंगाश्रमीं ॥
नांदे पुष्पसमूह साधु-सुजनां जो इष्ट पूजाक्रमीं ॥ ५ ॥

येतां इंदु तुझ्या शिरी समुदया म्यां पाहवें लोचनी ॥
सौंदर्या तुझिया नगा! सुख परी ना तें अजी सेवनीं ॥
शोभा कल्पुं शके परंतु अवघी काया तुझी पांढरी ॥
पूर्णेंदुप्रतिभा सुरेख शिखरीं कैशी सुरम्या करी ॥ ६ ॥

सर्वांगीं फलपुष्पगंध भरला सौभाग्यशाली कसा ॥
शोभायुक्त दिसोन शीघ्र करिशी हृद्रोग तो नाहिंसा ॥
वाटे अद्रिशिरोमणे! उपवनीं तूझ्या वसेना जरा ॥
नाहीं राहुं शके उदास करि जें दुर्भाग्य या अंतरा ॥ ७ ॥

प्राशोनी तवजन्य शुद्ध पय तें रंजीतसिंगादिकां ॥
गंभीरादिक शूरवीर पुरुषां धारिष्ट यावें न कां? ॥
कां ना ये निजदेशसेवकजनां उत्साह, हिय्या, बळ? ॥
नाहीं काय तुझ्या विशुद्ध पयिं जें सामर्थ्य रक्षी कुळ? ॥ ८ ॥

कडे आजूबाजू, मधुनि चपला जाति सरिता ॥
बहू खोली खालीं, भय मनिं पडे मान करितां ॥
वरी धोधाटानें स्फटिक उदकस्फेन उडवी ॥
तुषारें नीराच्या रविकिरण तद्रंग खुलवी ॥ ९ ॥

ऐशा उच्च कड्यावरोन सरिते प्रेक्षा! पहाडीं कसे ॥
टांगोनी नवखंडदोर बलितें ओलांडितां शांतसे ॥
खालीं मृत्यु उभाच 'आ' पसरुनी जो कोसळूनी निरीं ॥
ये त्याचे तुकडेच होति, परि ना भीती तया अंतरीं ॥ १० ॥

गंगानीरसमागमोत्सुक जनां वाटे ' हरिद्वार ' तें ॥
मोक्षप्रापक मार्ग, धर्मसुरतां हें दिव्यसें भासतें ॥
कां तें भासुं नये ? –प्रशांत हिकडे देवेंद्र[1] तो केशव[2] ॥
ऐसे धार्मिक संत ब्रह्मि रमले त्यागोनि भूवैभव ॥ ११ ॥

वसे प्रभु न या स्थळीं, तरि दुज्या वसावा कुठें ? ॥
कुण्या स्थळिं असा प्रभुस्तवकरां उमाळा उठे ? ॥
विराट बळ आपुलें प्रभु कुठें दुजे दावितो ? ॥
बघे गिरिविशालता नर न होइ कां लीन तो ? ॥ १२ ॥

---

# २८ विष्णु मोरेश्वर महाजनि

---

हे सुप्रसिद्ध कवि पुणें येथें इ. स. १८५१ त जन्मले. हे जातीचे ऋग्वेदी कऱ्हाडे ब्राह्मण. ह्यांचें शिक्षण मुख्यत्वेकरून धुळें व पुणें येथें झालें. इ. स. १८६६ त हे डेक्कन कॉलेजात गेले व एम. ए. ची परीक्षा देऊन सरकारी नोकरींत दाखल झाले. यांचा विद्याव्यासंग जबरदस्त होता. महाराष्ट्रातील आधुनिक विद्वनात हे अग्रगण्य होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. हें उत्तम वक्ते असून मराठी भाषेचे एकनिष्ठ सेवक होते. कॉलेजात असतांनाच याना कविता करण्याचा नाद लागला. यानीं विविध विषयावर कविता लिहिली असून ती विविधज्ञानविस्तारादि मासिकात प्रसिद्ध झाली आहे. याच्या कविता विशेषतः प्रख्यात आग्ल कवि वर्डस्वर्थ याच्या कवितांचीं रूपातरें आहेत. याची कविता सरळ, सरस व रमणीय आहे. हे सन १९२३ सालीं निवर्तले.

## विश्वमंदिर

ईशें विश्व विशाल मंदिर पहा ऐसें कसें निर्मिलें ।
शोभा दाखविण्यास हेर रुचिरीं द्वारीं उभे ठाकले ॥

---

१ महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर २ बाबु केशवचद्र सेन.

येती प्रेक्षक जे तयांस बघुनी ते बाहती सत्वरीं;- ।
या हो या जन हो विलोचन-सुखा घ्या, या शिरा मंदिरीं ॥ १ ॥

या हो आंत, पहा चमत्कृति किती ! द्या इंद्रियां तर्पण ।
नेत्रां चित्र मनोहराकृति, तसें श्रोत्रांत मंजुस्वन ॥
द्वारीं मात्र करा प्रणाम शिरसा त्या ईश्वरातें अधीं ।
जो दे सर्व तुम्हां, तया स्तुतिसुमा अर्पा तुम्ही हो सुधी ॥ २ ॥

येणेंपरी नमुनियां जन आंत जाती ।
विश्वास पूर्ण धरुनी बहु सौख्य घेती ॥
वाहे समीर, मकरंद हरी फुलांचा ।
संताप सर्व शमवी झणिं मानसोचा ॥ ३ ॥

श्रवणनयन धाले लोटला मोदपूर ।
हृदयिं विकसले तें प्रेम विश्वास थोर- ॥
नयन गतिहि जेणें बद्ध केली पुरा तें ।
पटल गळुनि जातें; गूढ ना तें नरांतें ॥ ४ ॥

जें अगम्य मनुदृष्टिस होतें । विश्वकर्तृमुख आज दिसे तें ॥
प्रीतिचा प्रभु असेच भुकेला । हा प्रसाद मनुजांवरि केला ॥५॥

जे न वंदिति पदांस विभूच्या । भावही न धरिती वरि त्याच्या ॥
ते जरी प्रविशती सदनांत । त्यांस हा सुखनिधी न मनांत ! ॥ ६ ॥

## माधवीचें पुष्प

माधवीचें हें पुष्प डुले वातें । एकटें या वल्लीस शोभवीतें ॥
इतर पुष्पें केव्हांच गळुनि गेलीं । अहा गंधाची माधुरी निमाली ॥ १ ॥

नसे येथें एकही बंधु याला । नसे कलिकाही दुजी या लतेला ॥
एकमेकांचा सुखस्पर्श होतां । हंसति सुमनें, तो काल कुठें आतां ॥ २ ॥

रम्य सुमना! ही दशा दीनवाणी। पाहुनीयां लोचनीं येइ पाणी ॥
लतेपासुनि मी तुला खुडुनि टाकी। नको होऊं तूं मग्न असें शोकीं ॥ ३ ॥

जेथ गेले त्वद्बंधु तेथ जाईं। सवें त्यांच्या तूं गाढ झोंप घेईं ॥
जेथ लोपे तन्मूर्ति सुवासाची। तेथ विखुरीं पाकळया तुझ्या साची ॥४॥

असा होवो मद्विलय, जयीं होतें। क्षीण मित्रत्व, प्रेम लया जातें ॥
शिथिल होती जे प्रणयबंधनें तीं। सकल मित्रा यमदूत जयीं नेती ॥५॥

खऱ्या प्रेमाचें स्थान सखे जातां। पिता, भ्राता, सुत, दार तशी माता ॥
रहायाला इच्छील कोण मागें। शून्य ऐशा या जनीं मला सांगें ॥ ६ ॥

## सुशील भार्या

दृष्टिविषया जेधवां प्रथम आली। मूर्ति मोदाची गमे मला आली ॥
नयनसुख की देण्यास पाठवीली। देवकुमरी पाहोनि दृष्टि धाली ॥ १ ॥

नेत्रकांती ती तारकांसमान। कृष्ण कुंतल ते कृष्णरात्रिमान ॥
परी जाणें तीं इतर सर्व अंगें। साच मधुनें[1] निर्मिली की अनंगें ॥ २ ॥

रूप अनुपम, लावण्य तयीं नाचे। मोह घाली ते भ्रमवि चित्त साचें ॥
जाय तेव्हां हरुनीहि हृदय नेते। कशी स्त्रीची मोहनी कळों येते ॥ ३ ॥

रूप जैसें मन दिव्य गमे तैसें। कसा प्रणयें वदनेंदु तो विकासे ॥
सत्वशीला गति, धर्मपरा बुद्धि। मानसाची ही लाभलीच सिद्धि ॥ ४ ॥

सत्य भाषण आचरण सत्य तीचें। मुखीं झळके प्रेमही मानसींचें ॥
मला वाटे भवसागरा तराया। दिली देवें कीं हीच तरी[2] जाया[3] ॥ ५ ॥

क्षणिक दुःखें तीं बोध करुनि वारी। प्रणयकलहीं आणिते नयनिं वारी ॥
नर्मवचनें, स्मित मंद, मधुर वाणी। असे सर्वांची अहा प्रिया खाणी ॥ ६ ॥

---

१ वसतानें २ नौका ३ पत्नी

ूर्ण अवगत हो तिचें हृदय आतां। नसे अवतरली साच अशी कांता॥
ग्तुलधैर्या, ती शांत सहनशीला। हो न कष्टी भोगितां दुःखमाला॥७॥
ूरदृष्टी, औदार्य, विनय अंगीं। काय चातुर्यें शोभते कृशांगी॥
नेर्मिली ही संपूर्ण गुणनिधान। बोधवचनें करण्यास समाधान॥८॥
ारी विसरे पति आपुला पुमर्थ[४]। तरी आकळण्या त्यासही समर्थ॥
ेवकन्या जरी साच भासताहे। स्वस्थ चित्तें ती तरी दुःख साहे॥९॥

## कालमहिमा

कोठें गेले थोर पृथ्वीपती ते। सांगा गेले शूर कोण्या गतीतें॥
झाले गेले मृत्युपंथेंचि सारे। कां देखाना सर्व कीं हें असारें॥ १॥

त्यांची ती रणकीर्ति शत्रु-हननीं उद्दाम तें वर्तन।
त्यांचे ते मुशलापरी भुज, जयां भ्याले अरीचे गण॥
त्यांचा तो घनघोर शब्द चढवी आंगी रणाची रती।
तीं आरक्त विलोचनें, सकलही झाली कथामात्र तीं!॥ २॥

नाम काल तें थोर वाटलें। सु-कृति कीर्तनीं कर्ण कोंदलें॥
आज नष्ट तें, होय विस्मृती। कीर्ति लोपली काल-भक्ष्य ती॥ ३॥
तिमिर झांकितां गगनमंडला। तुटुनि अंबरीं क्षण झळाळला॥
केतु दीपवी जनविलोचना। तों गिळी तया तम, विरोचना॥ ४॥
नर हा किति दुर्लभ पाहे। क्षणभंगुर जीवित आहे॥
नरदृष्टि असे किति कोती। किति तो भ्रमला गणगोतीं॥ ५॥
किति गर्वभरें तो मनिं फुगला। क्षण एक असे बुद्बुद[१] तगला॥
चिरकीर्ति म्हणे मी मिळविन ती। रविचंद्र नभीं जोंवरि तपती॥६॥

---

४ पुरुषार्थ

१ बुडबुड्या सारखा टिकला

मोठालीं देउळें तूं धन वितरुनियां बांधिसी, आस ही कीं ।
राहो माझी सदाही अभिनव-रुचिरा कीर्ति साऱ्या त्रिलोकीं ॥
रे मूढा ! कीर्ति कैशी अमर विलसते, मर्त्य तूं नाशवंत ।
कोटींचीं कोटि वर्षें क्षणसम गमती काल आहे अनंत ॥ ७ ॥

पाहें हा भूमिभागीं उलथुनि पडला स्तंभ मोठा जयाचा ।
चौंबाजूंनीं जयाच्या विलिखित दिसतो लेख चारी लिपीचा ॥
सांगे तूं अर्थ याचा नृपति कवण तो, कोरिला हा जयानें ? ।
भाषावेदी विवादा करिति म्हणति 'हा अर्थ' ऐसें हटानें ? ॥ ८ ॥

गेला तो नृपती ! तदन्वय तसा ! सामंत कोठें अतां ।
त्याची ती नगरी सुरम्य वनिता झालाहि वाताहता[२] ! ॥
गेलें वैभव ये फिरूनि कसचें ? तो काल गालो हंसे ।
कालाचा महिमा अगाध समजें तल्लक्ष्य सारें असे ॥ ९ ॥

---

# २९ विठ्ठल भगवंत लेंभे

पुणें जिल्ह्यात ढमढेऱ्याच्या तळेगावी हे कवि इ. स. १८५० या वर्षी जन्मले. हे जातीचे शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण. यानीं लहानपणीं मराठी संस्कृत काव्याचें परिशीलन केलें व त्यामुळें त्याना कविता करण्याची स्फूर्ति झाली. यानीं 'शोकावर्त' व 'सुरतरंगिणी' अशीं दोन स्वतंत्र व सुंदर काव्यें केलीं असून स्फुट काव्यरचनाही पुष्कळ केली आहे. याची भाषा प्रौढ, संस्कृतशब्दप्रचुर असूनही सुबोध व मधुर आहे. याची कविता प्रसन्न व रसालंकारांनी पूर्ण नटलेली आहे. याची वर्णनशैली मार्मिक व फार मनोहर आहे. हे कवि जी. आय. पी. रेलवेच्या नोकरींतून निवृत्त झाल्यावर निवृत्तिसुखाचा उपभोग घेऊन इ. स. १९२० त निवर्तले.

---

२ उध्वस्त

## नर्मदा

भेडा नामक रम्य पर्वतचि हा, ही नर्मदा सुंदरी ?।
रम्यस्थान असें दुजें न नयनीं देखीयलें भूवरी॥
चित्तानंदद धौतधौत गिरिच्या शृंगांवरोनी झरे।
धों धों धांवत येउनी घुमविती श्रीशंभुचीं मंदिरें॥ १॥
स्वच्छंदें अतिरम्य गर्द हिरव्या झाडींतुनी तोषदा।
आली फोडित शुभ्र अद्रि-शिखरें जी स्वैरिणी नर्मदा॥
झाली केवळ दुग्ध-सिंधु-लहरी फेंसाळुनी या स्थळीं।
स्वर्गांतील यशें समस्त हरुनी जाणों जवें चालली॥ २॥
वाहे शुभ्र शिळांमधोनि गिरिच्या अत्युच्च रांगांतुनी।
सारा तो धवल प्रवाह विलसे अंभीं शिळा बिंबुनी॥
येतां नांव हळूहळू गमतसे, या भव्य कोटान्तरीं।
व्यूहीं सांपडलों, दरींत पडलों, वा खंदकाभीतरीं॥ ३॥
कोठें ये खडकीं खळाळत, कुठें गंभीर घोषा करी।
कोठें निम्न-जळीं तरंग-निकरीं पुष्पें झणी सावरी॥
कोठें शुभ्र विशाल रम्य पुलिना[१]-माझारिं वाहोनियां।
देई स्थान पुर-स्त्रियांसि सलिल-क्रीडा-सुखें घ्यावया॥४॥
नाना कोमल बिल्व, फुल्ल तरुही, ज्या पर्वतीं नांदती।
गौरी-शंकर-मंदिरें हळुच ती तेथोनि डोंकावती॥
शोभे दूरवरी प्रचंड-सिकता[१]-पात्रांतुनी नर्मदा।
झाली, नाशुनि पापराशि, सकलां जी सर्वदा शर्मदा[२]॥५॥
स्वच्छंदें लहरीवरी फिरुनियां ये गार वारा सखा।
लीलें हालवुनी प्रफुल्ल तरुतें दे सौरभाच्या सुखा॥

---

१ वाळवट २ सुखद

ठायी ठायिं मयूर नाच करिती, एक्या सुरें पांखरें ।
गाती, होय विलास–मंदिरचि हें श्रीनर्मदेचें खरें ॥ ६ ॥

गौरी–शंकर–दर्शना वरिवरी नारी–नरांचीं कुलें ।
येती, धांवति त्यांसवें दुडदुडां सानंदचित्तें मुलें ॥
सारा रम्य नदीप्रदेश गिरिच्या शृंगांवरोनी झणी ।
पाहातां क्षणिं तर्जनी[3] हनुवरी त्या ठेविती कामिनी ॥ ७ ॥

अद्रीच्या गुरु–गव्हरीं घुमत ये विस्तीर्ण ती नर्मदा ।
होती चूर्ण तरी इथें, उसळुनी लाटा सदा सर्वदा ॥
वेगें निम्नजळीं सदा गरगरा ते भोंवरे फीरती ।
घेरे घेउनि वृक्ष ते वरिवरी अंभीं बुडूं लागती ॥ ८ ॥

वाहे शुभ्र विशाल रम्य पुलिनामाझारिं तेथोनि ती ।
एकामागुन एक ये वरिवरी नाहीं तरंगां मिती ॥
भेटे वाहत येउनी खळखळां ती बाणगंगा तिला ।
रेवासैकतभाग रम्यचि दिसे जो संगमीं भेदिला ॥ ९ ॥

येई धांवत डोंगरावरुनियां श्रीबाणगंगा जवें ।
रेवा[4] वाहतसे जवेंचि, सरिता ती तज्जली कालवे ॥
अन्योन्यांवरि आपटोनि करिती कल्होळ नानापरी ।
फेणें धौत सुरम्य संगम असा आनंदवृत्ती करी ॥ १० ॥

नाना मीन तशाच पीन सुसरी पाण्यामधें पोहती ।
प्राणी ओढुनि नेउनी गिळुनियां ज्या तत्क्षणीं टाकिती ॥
पक्ष्यांचे फिरती नदीवरुनि जे नाना थवे अंबरीं ।
घेती तत्प्रतिबिंब ओढुनि, वृथा आशा खरी बावरी ॥ ११ ॥

---

३ हनुवटीवर बोट ठेवितात ४ हें नर्मदेचे त्या प्रांतातील विशिष्ट नाव आहे.

डोळे लावुनियां असंख्य बगळे तीरावरी बैसती ।
आले संनिध देखुनी गिळुनियां मीनांसि ते टाकिती ॥
हर्षें आमिष मत्स्य तेंवि गिळितां कंठीं शिरे हा गळ ।
साधूचा जरि वेष दुर्जन धरी, तो साधु कैचा ? खळ ! ॥ १२ ॥
झाडी गर्द तशीच उंच दुथडी लागोनि बिंबे जळीं ।
जाणों नेसुनि पैठणीच हिरवी ये नर्मदा माउली ॥
गाती सुस्वर सारिका, पिक, तसा चंडोल झाडीतुनी ।
बोले, तो स्तुतिपाठक क्षण गमे श्रीच्या मनोरंजनीं ॥ १३ ॥
चांदीचा जणु चूर हो उधळिला साऱ्या प्रदेशावरी ।
ऐशा थोर सतेज शुभ्र पुलिनीं यात्रा भरे साजिरी ॥
गर्दी होय विशाळ पात्र विलसे सेना-समुद्रा-परी ।
होई एकचि गर्जना, सुर तयें हेलावती अंबरीं ॥ १४ ॥
स्वच्छंदें फिरती असंख्य तरणी या रम्य पात्रांतुनी ।
आनंदें तरणीविहार करिती नाथांसवें साजणी ॥
सौंदर्यें भरला प्रदेश अवघा, आनंद येथें किती ।
जो तो भाग दिसे मनोरम, अहा ! गुंगोनि गेली मती ॥ १५ ॥

## वसंतश्री

शीतासवें शिशिर सोडुनि विश्व जाई । शौर्यें वसंतनृप सर्वहि राज्य घेई ॥
पर्णें गळूनि, नव कोमल पल्लवांच्या । वृक्षीं ध्वजा फडकल्या मधुराजयाच्या
आधीं फुले बकुल, नंतर मोतियाही । त्याच क्रमें कनकचंपक फुल्ल होई ॥
तो पारिजात करि मौक्तिक पोवळ्यांचा । वर्षाव, दे फुलुनि गंध गुलाब साचा
हे दोहदाविण[1] अशोकहि फुल्ल झाले । जाणों वसंतयश निर्मळ तें उदेलें ॥

१ गरोदर स्त्रीनें रक्ताशोकाला आपला पाय लाविला तर त्याला फुलें येतात असा समज आहे

झाले पलाशतरु रक्तचि कुड्मलांहीं[२] । पुष्पोद्भवें नटुनि सज्ज वसंत होई ३
वायु स्वयें शिरुनियां वनवंशरंध्रीं । वाद्यें सुमंगलचि वाजवि मोदकारी ॥
गुंजारवें भ्रमर गुंगुनि त्यांसवें ते । झाले विशंक नृपवादक मोददाते ॥ ४ ॥
मंजुस्वनें पिक न,भाटचि या नृपाचे । स्वारीमधें फिरति गात यशासि साचे
ही सारिका मधुर गान करूं निघाली । झाले मयूर नट नर्तक याचि कालीं
पुष्पान्विता नवलता जणुं पौरनारी । पुष्पांजली उधळिती झणि भद्रकारी ॥
जो झोकिला सुरभि दिव्य पराग त्यांही । तेणेंचि राजपथ रंजित होत पाहीं
ऐसा वसंत, तरुणीप्रियमित्र आला । रेवाप्रदेश अवघा रमणीय झाला ॥
आरक्तकोमलदलान्वित वृक्षमाळा । शोभे बहु धवल पर्वतमालिकेला ॥७॥
एकीकडे हरितवर्ण धरा विराजे । एकीकडे धवलपर्वतपंक्ति साजे ॥
एकीकडे क्षितिज भव्य नभोगणान्तीं । एकीकडे सुरनदीपरि नर्मदा ती ॥ ८ ॥
तें तीर दूरवर जें हिरवें विराजे । त्याच्यावरी चमकुनि दंव फार साजे ॥
छायाचि पैल विलसे नवपल्लवांची । वाहे अगाध मधुनी सरिता सुखाची ९
एकीकडे झुळझुळां कुरणांत वाहे । ओढा, जिथें हरित शैवल शोभताहे ॥
एकीकडे विलसते घन आंबराई । वारोनि ताप,पथिकां बहु सौख्य देई ॥१०
वत्सांसवें तरुतळीं बसल्याचि गाई । हें देखुनी निज सख्यासह गोप गाई ॥
आनंदल्या प्रियसख्या मुरलीरवानें । होई न कोण वश मंजुळ भाषणानें ११
एकीकडे वरिवरी स्मरसारिका ते । उच्चस्वरें करुनि मंजुळ गान गाते ॥
त्याच स्वनें मधुर कुकुटकुंभ गाई । नीलांबरामधुनि सोडुनि नाद देई ॥ १२
एकीकडे सहज वाहुनि मंदमंद । देहास दे सुरभि दक्षिणवात मोद ॥
एकीकडे रव मनोहर मक्षिकांचे । भोक्त्यांसि या बघुनियां मकरंद नाचे १३
रंगेल माधव फुलांप्रति रंग नाना । दे, तत्सुगंध करि लोल पुरांगनांना ॥
त्या चित्रवर्णकुसुमान्वित मंडपान्तीं । संकेतकोलि करिते वनदेवता ती १४

---

२ कळ्यानीं

रेवाजळीं गज करेणुसवें रमोनी। भार्येसि दे रुचिर पल्लव तो खुडोनी ॥
कांतेसवें विहरती मृग, चक्रवाक। कामोद्भवें करिल माधव विश्व एक १५

## चंद्रोदय

आनंद साक्षात् सकलां जनांचा। की पुंज साऱ्या विमलां यशांचा ॥
किंवा विलास प्रिय दिग्वधूचा। तो चंद्रमा ये वरि पौर्णिमेचा ॥ १ ॥
प्रेमानुरक्ता रजनीमुखातें। शशी करानें कुरवाळण्यातें ॥
ये, देखतां चोर घनांधकार। करप्रहारें करि त्यास चूर ॥ २ ॥
देखोनि शौर्य प्रियवल्लभाचें। झाली प्रसन्ना रजनी सती ते ॥
नीलांबरा नेसुनि सज्ज झाली। नक्षत्र-मुक्तावलि शीघ्र ल्याली ॥ ३ ॥
घालूनियां सुंदर जागजागी। सुगंधशाली कुसुमें शुभांगीं ॥
गुंजारवें मंगल गात गाणीं। नटोनि आली पतिसन्निधानीं ॥ ४ ॥
ये गार वारा तरुपल्लवांचा। ठेवा सुखांचा, प्रणयीजनांचा ॥
आनंद द्याया प्रियदंपतींतें। गाती प्रमोदें द्विज मंजुगीतें ॥ ५ ॥
पुष्पांजली ती प्रिय वल्लभातें। अर्पी शुभांगी अनुरक्तचित्तें ॥
आलिंगितां तो रमणी करांनीं। झाली प्रसन्ना म्हणि रूपखाणी ॥ ६ ॥
वृक्षांतरीं मर्मर शब्द होती। चाले प्रियांची गुजगोष्ट हो ती ॥
तो सुप्रसन्न द्विजराज ऐसा। विश्वीं न आल्हाद भरील कैसा ? ॥ ७ ॥
सुरत्नकूटीं उदयाचलाचे। चकाकती ते शुचि रश्मि ज्याचे ॥
करूनियां दुग्धविलेपनातें। सतेज मोदें करि जो वनातें ॥ ८ ॥
रेवा करी जो धवला करानें। चकाकती शुभ्र शिळा जयानें ॥
कुमुद्वतीतें म्हणिं देइ भद्र। तो दे सुखा, मंगलदीपचंद्र ॥ ९ ॥
प्रसन्न झालें जग चंद्रिकेनें। जणो सतीच्या भरलें यशानें ॥
प्रफुल्लवल्ली तरुवल्लभांतें। स्वपल्लवीं दाविति कौतुकातें ॥ १० ॥

विचित्रपुष्पान्वित पल्लवांचीं । वृक्षांतरीं लोंबति तोरणेंची ॥
आम्रावरी सुंदर मोहराची । शोभा दिसे खूण सुमंगलाची ॥ ११ ॥

शोभे जणों झालर मोतियांची । नक्षत्र-माला विमला जयासी ॥
नभोवितान[1] प्रियसंगमातें । योजी प्रभू मंगलमंडपातें ॥ १२ ॥

चंडोल तारस्वर तो कराया । लागे, सुखें कोकिल तोहि गाया ॥
त्या वंशरंध्रांतरिं वायु मोदें । आनंद दे मंगलवाद्यनादें ॥ १३ ॥

उत्फुल्ल ऐशा नवकुंजभागीं । दे गंध आनंदचि जागजागीं ॥
ते भृंग मोदें मकरंद नेती । गुंजारवें मंगलनाम गाती ॥ १४ ॥

वृंदारकांहीं[2] शुभमंगलातें । मुक्ताफळें ही भगणेंचि[3] हातें ॥
सानंदचित्तें उधळावयातें । आकाशपात्री भरिलीं पहा तें ॥ १५ ॥

## मातेचें प्रेम

आहे पैल समुद्र, तत्तल तुवां बा काय रे पाहिलें ।
किंवा तत्सिकताकणां निजबळें आहेस कां मोजिलें ॥
पाहें अंबर हें वरी, गणियली उंची तयाची तरी ।
नाहीं; धिक् ! गणिशी अगाध जननीप्रेमा कसा यावरी ॥ १ ॥

आकाशीं प्रभुचा निदेश वरुनी राज्यीं तयाच्या फिरे ।
त्या सूर्यासह दोन शब्द वदुनी आलास तूं काय रे ? ॥
स्वर्गीं इंद्रसभेंत तूं बघितली कार्यें सुरांचीं तरी ! ।
नाहीं; धिक् ! मग जाणशील जननीप्रेमा कसा यावरी ? ॥ २ ॥

पाहे तत्पर ते खपोनि जमवी रात्रंदिनीं जी मधा ।
ऐशी ती मधुमक्षिका त्रिभुवनी मान्या असे सर्वदा ॥

---

१ आकाशरूप आच्छादन २ देवानी ३ नक्षत्रें

तीचे ते श्रम सर्वही बुधवरा आहेत तीकारणें ।
मातेचें श्रम निष्कलंक अपुल्या बाळार्थची ! जाणणें ॥ ३ ॥
जाई तूं फिरण्या कुठेंहि जगतीं, भू-गर्भ-देशीं, जळीं ।
जाई उत्तर-दक्षिण-ध्रुव-पथें, वा तारकामंडळी ॥
नौकेमाजि बसूनियां जलनिधी ओलांडुनी जाय रे ।
प्रेमें वत्सलचित्र तें जननिचें संगें तुझ्या बा फिरे ॥ ४ ॥
प्रेमाचें अतिदिव्य कोमल असें वारें बघूं पाहसी ।
बुद्धीचे अति शुद्ध, सत्य, अवघे सिद्धांत तूं मागसी ॥
तूंतें शुद्ध, अगाध, वत्सल, असें बा पाहिजे चित्र रे ! ।
पाहे प्रेमळदृष्टि ती जननिची ब्रह्मांड जेथें भरे ॥ ५ ॥
ऐशी प्रेमळ दिव्यदृष्टि जग हें, निर्माण झालें जधीं ।
तेव्हां पासुनि नीतितें शिकवुनी विद्वान् करी धीरधी ॥
संतां यापरि दुस्तरा भवजली नौकाचि ती जाहली ।
धन्या इच्छितकामदा त्रिभुवनीं ही कामधेनू भली ॥ ६ ॥
वायूच्या पटलीं, धरातळवटी, नीलांबरीं सारिखें ।
शोभे ईश्वरवैभव, क्षण सुधी जे पाहती कौतुकें ॥
ऐसें अद्भुत तेज दे, करि कृपा ईशावरी जी भली ।
धन्या प्रेमळदृष्टि ती त्रिभुवनीं धन्याचि ती माउली ॥ ७ ॥

---

# ३० मोरो गणेश लोंढे

---

हे कवि पेण तालुक्यात वरसई गावीं इ स. १८५४ सालीं जन्मले. हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. याना लहानपणींच कवितेची गोडी लागली, व जरी अल्पवयातच नोकरी पतकरणें भाग पडलें, तरी यानीं आपला काव्यव्यासंग चालू ठेविला व

विविध विषयांवर पुष्कळ कविता लिहून 'बोधशतक,' 'बोधसुधा' वगैरे लघु-पुस्तकरूपानें प्रसिद्ध केल्या. यांची कविता साधी पण सुरस असून व्याकरणशुद्ध व बोधपर आहे. ह्यानीं पुष्कळ काळ पेनशनचा उपभोग घेतला. हे सन १९२० त निवर्तले.

## सूर्योदय

आरक्त रागें बहु पूर्व झाली । येईल आतां वर अंशुमाली ॥
जाईल सारें तम हें लयाला । प्रकाश वेढील पहा जगाला ॥ १ ॥
गेलीं पहा तीं किरणें नभांत । वर्णे सुवर्णासम वाटतात ॥
तेथून कांहीं फिरतात मागें । खालीं जणूं तीं बघतात रागें ॥ २ ॥
धनुर्धराचे बहु तीक्ष्ण तीर । ते भंगिती स्पर्श करून ऊर ॥
हीं भास्कराची किरणें उदार । लागून देती न कुणास मार ॥ ३ ॥
स्पर्शे पदार्थां नवरूप देती । तत्कांतिला उज्ज्वलतेस नेती ॥
आनंद त्यामाजि भरून देती । ही सज्जनांची अवघ्याच रीती ॥ ४ ॥
आनंदमूर्ती उदयास आला । पिटून लावी अवघ्या तमाला ॥
जीवित्व वाटे नव द्यावयाला । सृष्टींतल्या वस्तुगणांस आला ॥ ५ ॥
उठा मुलानोंहि पहा रवीला । भेटावया तो पसरी करांला ॥
उद्योग त्याला प्रिय फार वाटे । आलस्य त्यालागीं कधीं न भेटे ॥ ६ ॥
जो सर्वदा चालतसे नभांत । राहे न कोठें पळही निवांत ॥
विश्रांति ज्याला अगदीं न ठावी । त्याची मुला मूर्ति तुवां बघावी ॥ ७ ॥
नेत्रीं मुला सस्मित मूर्ति पाहीं । आनंदवृत्तीस धरी सदाही ॥
तयार जैसा रवि उद्यमातें । व्हाया तसें तूं वळवीं मनातें ॥ ८ ॥
हा सूर्य जैसा उगवे नभांत । सुज्ञान तैसें उगवो मनांत ॥
काळोख जैसा रविला न ठावा । ठावा तुला आळस तो नसावा ॥ ९ ॥

क्रमी क्रमानें रवि अंबराला । हा ज्ञानमार्गांत घडा मनाला ॥
सोडी न तो स्वीय कधीहि पंथ । तूं ठेव चित्तामधिं हेच रीत ॥ १० ॥

## तारुण्यांतील उमेदी

चल झडकरि जाऊं कीर्तिशैलीं चढून ।
सतत नियम ज्याचा काय त्याला कठीण ? ॥
चिरसमय रहावें आपलें नांव लोकीं ।
सकल बुधजनांतें हें मनीं आवडे कीं ॥ १ ॥

जनपदहित साधी मेळवी जो जयाला ।
स्वजनहित करूनी त्या सुकार्यीं निमाला ॥
जनपदहितकर्ता नांव हें त्यास लाधे ।
सकल जन तयाला नित्य गातात मोदें ॥ २ ॥

लवकर उतरूनी ज्ञानसिंधूंत यत्नें ।
निवडक वर काढूं सर्व चातुर्यरत्नें ॥
सविभव मिळवूं या ज्ञानरूपी निधानें ।
अधिक अवनिमाजी जी हिऱ्याहून मानें ॥ ३ ॥

गमन करूं पुढें या पाय मागें न घेऊं ।
सुमति करिं धरूनी सत्पथांतून जाऊं ॥
निजगुण निजकीर्ती वाढवूं नित्य नित्य ।
सुगुणचि सुख लोकीं कीर्ति सौंदर्य सत्य ॥ ४ ॥

वचन वदुं मुखानें आचरूं तेविं, हातें ।
करुनि वर कृतीला, मार्ग दावूं दुजातें ॥
सुमन गुतवुनी हें आपलें सत्कृतींत ।
जनपद बनवूं हा स्वर्ग यत्नें खचीत ॥ ५ ॥

## कोकिळ

बहुत मधुर ऐशा काढिशी तूं रवाला।
परिसुनि बहु लागे नाद माझ्या मनाला॥
टकमक बघतों मी कोठ कांही दिसेना।
मधुर कुठुन येई शब्द हेंही कळेना॥ १॥

तरुवरि दिससी ना पर्वतींही न पाहीं।
अवनितल रिकामा कल्पना होत नाहीं॥
झुडुप हलत नाही थोर आश्चर्य आहे।
खग न मजसि वाटे शब्द हा धांवताहे॥ २॥

जवळ रव निघावा तोंच तो लांब जावा।
परिसुनि मग कां हा जीव ना गोंधळावा॥
अवनितुनि निघे हा की दरींतून येई।
समजत मज नाहीं कीं नभीं जन्म घेई॥ ३॥

फिरुन फिरुन येई शब्द ऐकावयाला।
बहुत रिझवितो तो माझिया बा मनाला॥
जलद जलद चालें रूप पाहावयासी।
त्वरित पळुन तूंही फार तों दूर जासी॥ ४॥

बघुनि परि तुला मी पावलों फार तोष।
लवकर पळसी तूं कोकिळा हा न दोष॥
बसुनि परि कुठेंही गोड वाणीस काढीं।
परिसुनि रव माझें चित्त घेईल गोडी॥ ५॥

हरित बहुत ऐसे शोभती पंख ज्याला।
सुबक अमल चंचू लाजवी पोंवळ्याला॥

मधुर वदुन शब्दां तोषवी मानवांला ।
धरुनि जन अशाही कोंडिती की शुकाला ॥ ६ ॥

म्हणवुनि तुजलागीं धाक वाटे जनांचा ।
पळुन करिसि वाटे आसरा काननाचा ॥
परि न समचि मानीं कोकिळा सर्व लोक ।
धरुनि तुजसि द्याया इच्छितों मी न शोक ॥ ७ ॥

तरुवर सुफलांनीं युक्त झाले कितीक ।
कुसुमित दिसताती हे किती येथ देख ॥
झुळ झुळ झुळ आहे मंद वाहात वात ।
निज किलबिल शब्दें पांखरे बोलतात ॥ ८ ॥

सुरुचिर वनशोभा सोडुनी पिंजऱ्यांत ।
रुचि न तव मनाला राहणें दे निवांत ॥
मम मन न कधीं बा इच्छितें जें अनिष्ट ।
तुज बहु गमतें तें हो स्वचित्तांत तुष्ट ॥ ९ ॥

परि न सकळ माझ्यासारखे लोक पाहें ।
म्हणवुनि पिकराया दूर तूं दूर राहें ॥
बसुनि वरि तरूच्या गोड वाणी वदें तूं ॥
पुरविन मनिंचा मी येथ येऊन हेतू ॥ १० ॥

---

# ३१ पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेंठकर

हे कवि इ. स. १८५१ साली जन्मले. हे जातीचे देशस्थ (?) ब्राह्मण. हे इ. स. १८७४ सालीं बी. ए. झाले व सरकारी नोकरीत शिरले. यात हे 'डे. ए. इन्स्पेक्टरच्या, हुद्यापर्यंत पोहोंचले होते. यानी मराठी, कानडी, संस्कृत, गुजराथी,

उर्दू व इंग्रजी इतक्या भाषांचें अध्ययन केलें होतें. हे चांगले वक्तेही होते. यांनीं 'गंगावर्णन' नावाचें एक सुंदर काव्य लिहिलें आहे. यांची काव्यरचना उदात्त व मनोरंजक आहे. हे इ. स. १८७९ सालीं निवर्तले.

## हिमालय

ज्याशीं समग्र जगतींत तुलावयातें ।
नाहींच अन्य गिरि योग्य म्हणून ज्यातें ॥
अद्रींद्र हें प्रथित नाम जगीं मिळालें ।
तो हा हिमाद्रि बघतां मम नेत्र धाले ॥ १ ॥

घेऊनियां विमल काचमणी करांत ।
अत्यंत सूक्ष्म नयनें बघतां तयांत ॥
जैसा सभोंवतिल थोरहि भूमिभाग ।
त्या तेवढ्यांतचि दिसे प्रतिबिंबितांग ॥ २ ॥

तैसेंचि या क्षितितळीं जनतोषकारी ।
जे जे पदार्थ अति दुर्मिळ, रम्य भारी ॥
ते सर्व या क्षिति-धरेंद्र-तट-प्रदेशीं ।
होऊन एकवट, भूषविती तयासी ॥ ३ ॥

या कारणास्तवचि केवळ दर्शनानें ।
त्याच्या, समस्त धरणीतल पाहिल्यानें ॥
जें श्रेय दिव्य मिळणार, पहा नरांतें ।
तें सर्व, अल्प करितां श्रम, साध्य होतें ॥ ४ ॥

ज्या पूज्यबुद्धि हृदयांतरिं निर्मितात ।
ज्या पाहतां भय उचंबळतें मनांत ॥
ज्या दर्शनेंचि नरदृष्टिस रंजवीती ।
त्या या स्थळीं सकल वस्तु दिसून येती ॥ ५ ॥

अर्द्धींद्र हा भरत-वर्ष जनांस भारी ।
नानापरी घडतसे उपयोगकारी ॥
मर्यादितो प्रथम हा स्वतनुप्रसारें ।
हें उत्तरेकडुनि भारत-खंड सारें ॥ ६ ॥

याची सुभव्य हिमधूसर शृंगमाला ।
जी जाय भेदुनि पयो-धर-मण्डलाला ॥
ती, तीव्र-दक्षिण-समीर-समीरिता जी ।
वर्षाऋतूंत नव नील पयोदराजी ॥ ७ ॥

जाते वहात धनदेशदिशे, तियेतें ।
मार्गांत तूर्ण अडवून हिरून घेते- ।
द्याया समृद्धि जणुं या विषया अपार ॥
साराहि तज्जठर-संस्थित वारि-भार ॥ ८ ॥

येथें महार्ह उपयुक्तहि धातुखंड ।
रत्नें तशीच बहुतांपरिंचीं उदंड ॥
खाणींत सांपडति, यास्तव संपदेतें ।
न्यूनत्व या जनपदीं न कधींहि येतें ॥ ९ ॥

या पर्वतीं निखिल भारत-वर्ष-वासी ।
अत्यंत पावन असे गणिती जयासी ॥
ऐसे प्रदेश असती बहु त्या सभोंतें ।
जी भव्य सृष्टिरचना वसते, पहा ! ते ॥ १० ॥

होतां क्षणीं नयन-गोचर नास्तिकांतें— ।
देखील विश्वपति ईश्वर मानण्यातें ॥
होऊन बुद्धि, अवितर्क्य तदीय शक्ति ।
चित्तीं ठसून, उपजेल मनांत भक्ति ॥ ११ ॥

श्रीवामनैकपद सर्व वसुंधरा हे ।
व्यापी, तसें यश यदीय भरून राहे ॥
या भारताप्रति, अशांहि महानद्यांतें ।
हा देतसे हिमगिरीश्वर उद्गमातें ॥ १२ ॥

तत्रापि, त्याहि सुपवित्र महानद्यांत ।
गंगेसमान दुसरी न दिसे प्रतींत ॥
भोगी जसें अधिपतित्व पिता नगांचें ।
कन्या तसेंचि महिषीपद सागराचें ॥ १३ ॥

जेथें प्रकल्पित जटेंतुनि शंकराच्या ।
ही येतसे प्रथम दृष्टिपथा जनांच्या ॥
तेथें घडीभर बसून समग्र सृष्टि– ।
सौंदर्य भोंवतिल देउनि सूक्ष्मदृष्टि ॥ १४ ॥

जातां बघूं मग कितीतरि जागजागीं ।
चोहींकडील सुमनोहर भूविभागीं ॥
शोभा दिसे, विविध रम्य किती पदार्थ ।
देऊन दर्शन तिला करिती कृतार्थ ॥ १५ ॥

जैसे वसंतसमयीं मधुमाक्षिकेला ।
चोंहींकडून फुटल्या सुमवाटिकेला ॥
दैवें प्रवेश मिळतां, तिजला अपार ।
होतो प्रमोद, मनिं उत्सुकताहि फार ॥ १६ ॥

तैसेंचि मन्मनहि या बघतां नगातें ।
आनंद–सिंधु–लहरींत बुडून जातें ॥
जो या स्थळीं रुचिर वस्तुसमूह थाटे ।
तो पाहण्यास मज कौतुक फार वाटे ! ॥ १७ ॥

जातां दृष्टि प्रथमचि पहा या गिरीच्या तळातें ।
जें रानाचें वलय दिसतें रुंद त्याच्या सभोंतें ॥
त्या 'तार्यांनी' म्हणुनि वसतें देशभाषेंत नांव ।
लोकीं त्याच्यापरि न दुसरा सांपडे घोर ठाव ॥ १८ ॥

होती या उद्गम जवळच्या उंचभागीं जयांचे ।
त्या साऱ्यांही सलिल जमतें या स्थळीं निर्झरांचें ॥
या योगानें बहु दलदली थोर या घोर रानीं ।
होती, तापे रविहि वरती लंब-रूपी करांनीं ॥ १९ ॥

त्यानें येथें विपिन इतकें किरें माजून जातें ।
की त्यामध्यें स्थळ न गवसे पायही ठेवण्यातें ॥
कोठें माजे यवस, झुडुपें कंटकांचींहि कोठें ।
कोठें जाती सरळ गगनीं वृक्षही मोठमोठे ॥ २० ॥

कोठें होती अविरल बनें वेतसांची अफाट ।
कोठें साधारण गवतही वाढतें उंच दाट ॥
जागोजागीं पडुनि तरुंचीं जीर्णपर्णें, कुजून ।
जातां वाफा विषमय निघूं लागती त्यांमधून ॥ २१ ॥

त्यांनीं वातावरण भरतें भोंवतालील साचें ।
त्यायोगें या स्थळिं न घडतें राहणें मानवांचें ॥
ऐसें आहे तरिहि विविध श्वापदें क्रूर, चंड ।
रानीं या निर्भय चहुंकडे हिंडती ही उदंड ॥ २२ ॥

कोठें मत्त द्विरद फिरती थोर यूथेंकरून ।
कोठें व्याघ्रप्रवर करिती वास खिंडीमधून ॥
कोठें कुंजाश्रय करुनियां वन्य गाई रहाती ।
कोठें वस्ती करुनि तरुच्या कोटरीं ऋक्षजाती ॥ २३ ॥

यांतें स्वप्नामधुनिहि नसे मानवी शक्ति ठावी ।
तेव्हां तीपासुनि मरणभी केविं यांतें असावी ! ॥
हें सोडून प्रवितत-विषोद्गार-गंधी[1] अनूप ।
जातां कांहीं चढुनि वरती, या नगाचें स्वरूप ॥ २४

पूर्वीपेक्षां अधिक दिसतें सौम्य, पाहून ज्यातें ।
होतें दृष्टिप्रति सुख, महानंदही मानसातें ! ॥
जातां मार्गीं बघत लवण्यांतून दोहींकडे तें ।
येथें दृष्टी पडति हिरवीं गार विस्तीर्ण शेतें ॥ २५ ॥

कोठें त्यांच्यामधुनि दिसती ओघ हे निर्झरांचे ।
वाहे शुद्ध स्फटिकसदृश स्वच्छ वारी जयांचें ॥
कोठें कोठें मधुनि दिसती रम्य गांवें, तयांच्या ।
भोतीं ताट्या अविरल पहा लागल्या या फुलांच्या ॥ २६ ॥

चांफा, जाई, गुलतुर, गुलाबादिकांतें विकास ।
होतां, त्यांचा मधुर पसरे गंध दाही दिशांत ॥
कोठें सौगंधिक शतदलीं पद्मखंडें विकास ।
कासारांच्या धरिति सलिलीं त्यामधें राजहंस ॥ २७ ॥

आनंदानें प्रियसहचरीयुक्त राहून शांत ।
संसारींचीं सकळहि सुखें पूर्ण हे भोगितात ! ॥
जे उत्पत्ती धरिति समशीतोष्ण वा उष्णदेशीं ।
ते एकत्र द्रुम सकलही वाढती या प्रदेशीं ॥ २८ ॥

कोठें माळावरि उगवती देवदारू विशाल ।
कोठें ओकद्रुम[2] विलसती उंच, कोठें तमाल ॥

---

१ अतिशय विषारी वाफेनें भरलेलें  २ ओक नांवाचीं झाडें

पारंब्याही सुटुनि धरणीमाजि कोठें वडांच्य
जीं का त्यापासुनि उगवती अन्य झाडें तयांच्या ॥ २९ ॥
गुंफा होती निबिड, तरुणादित्य-तापार्त ज्यांतें ।
कस्तूरीचे मृग निपतती[3] प्रत्यहीं आश्रयातें ॥
ज्यांतें आलिंगिति मधुलता मुग्ध-शाखा करांनी ।
ऐसे आम्रद्रुमहि दिसती नम्र भारी फलांनीं ॥ ३० ॥
जो या स्थानीं सतत घुमतो कंदरांतून वारा ।
त्या मानून स्तनित, अपुला चित्रवर्णी पिसारा ॥
सारा प्रेमें पसरुनि, गलत्प्रेम-नेत्रांबु पूर ।
वृक्षस्कंधीं रुचिर करिती तांडवातें मयूर !॥ ३१ ॥
जी या स्थानीं निबिड जमते शीतकाळी हिमानीं ।
ती ग्रीष्मीच्या द्रुत वितळतां भास्कराच्या करांनीं ॥
मोठीं मोठीं हरित कुरणें वाढती या विभागी ।
त्यांच्यामध्यें चरति पशुंचे संघही जागजागीं ॥ ३२ ॥
कांहीं जागी हरिण चरति हे निजेच्छानुसारें ।
कोठें वन्यच्छगल इकडे, ग्राम्य कोठे खिलारें ॥
कोठें दृष्टी पडति बकरी, आत्मजांतुल्य ज्यांसी ।
शालीसाठी जतन करिती लोक काश्मीरवासी ॥ ३३ ॥

# ३२ कृष्णाजी नारायण आठल्ये

हे सुप्रसिद्ध ग्रंथकार व कवि इ. स १८५२ साली सातारा जिल्ह्यांत टेंभूगांवी जन्मले. हे जातीचे कऱ्हाडे ब्राह्मण यानी शिक्षण संपल्यावर शिक्षकाची नोकरी

३ जमतात

पतकरिली, परंतु याचे व मुख्य शिक्षकाचे न जमल्यामुळे त्यांनीं नोकरी सोडून देऊन, मोठ्या परिश्रमाने लोकाश्रयावर 'केरळकोकिळ' नांवाचे मासिक पुस्तक सुरू केलें. ते पुष्कळ वर्षे चालून शेवटी इ. स. १९१५ त बंद पडले. याच मासिकात याची कवित्वशक्ति व लेखनचातुर्य लोकाच्या निदर्शनास आले. यानी स्फुट कविता पुष्कळ लिहिली आहे. याची कविता सुगम व गोड आहे यमके व शब्द-लालित्य याकडे याचे विशेष लक्ष दिसते.

## तुफान

जवन पवन धांवे सायकाच्या गतीनें ।
नदिपति खवळे हा त्यांचिया संगतीनें ॥
अहह कहर केला आजि या फार वातें ।
बसति कितिक झोके आमुच्या तारवातें ॥ १ ॥
पुरुषभर उडोनी मागुती येत खालीं ।
खळ खळ जळ येतें आंत जैशा पखाली ॥
भरुनि भरुनि त्यातें श्रांत झाले खलाशी ।
सुजन सदुपदेशा जेविं देतां खलाशी ॥ २ ॥
उसळति लहरी या पर्वत-प्राय तुंग ! ।
बघुनि मति भयानें होतसे सर्व गुंग ॥
क्षणहि भरंवसा या येइना तारवाचा ।
विकल वदनिं चाले घोष चिंता-रवाचा ॥ ३ ॥
बघुनि मन थरारे सिंधुची उग्र मुद्रा ।
व्यसनसमयिं धांवें तूं दयेच्या समुद्रा ! ॥
फिरफिरुनि उठे हा घोर कल्लोळ लाटीं ।
विधि-लिखित कळेना काय आहे ललाटीं ! ॥ ४ ॥
बहुत कठिण घों घों वाहतो काय वारा ।
क्षणभरि गवसेना प्राणिमात्रां निवारा ॥

अटपुनि अवजारें फाटकीं छिन्न भिन्न ।
दिसति मनिं खलाशी जाहले फार खिन्न ॥ ५ ॥

म्हणति शरण आम्ही तार रे वायु-देवा ! ।
विसरुन चुकलीसे कोणती सांग सेवा ? ॥
नवस करुनि भावें फोडिती श्री-फलांतें ।
घडि घडि अठवीती बायकांतें, मुलांतें ॥ ६ ॥

डुलत डुलत तारूं आपटे एक बाजू ।
धरणि पडत जेवीं एक भारें तराजू ॥
प्रतिसमयिं तडाका अब्धिची लाट हाणी ।
हिकडुनि तिकडे हें खेळतें सर्व पाणी ॥ ७ ॥

किति तरि लहरीची होय मोठी कमान ।
वळण-सुद दिसे ती पर्वताच्या समान ॥
गगनिं जळ चढोनी होतसें छत्र काळें ।
वदन पसरलें हें खावया काय काळें ? ॥ ८ ॥

चढुनि चढुनि लाटा झांकिती सूर्यबिंब ।
स्थळ वसन भिजोनी जाहलें सर्व चिंब ॥
हुडहुडि भरुनीयां अंग झालें बधीर ।
अझुनि मनिं धरावा कोठपर्यंत धीर ॥ ९ ॥

अवजड परि जोरें डोलकाठीहि हाले ।
कर कर कर ऐसा सारखा शब्द चाले ॥
तट तट तट जाती दोरखंडें तुटोनी ।
शिव शिव ! हृदयीचा धीर गेला सुटोनी ॥ १० ॥

वरति दिसत सारें शून्य आकाश मात्र ।
जलमय भय वाटे खालतें सिंधुपात्र ॥

गगनि दिसत नाहीं एकही आज पक्षी ।
कठिण समय आला, ह्यांतुनी कोण रक्षी ? ॥ ११ ॥

तरु नगहि दिसेना येथ कैंची जमीन ।
सभय पळत जाती मोठमोठेहि मीन ॥
इतर जळचरेंही धांवती सैरवैरां ।
व्यसनसमयि हा हा ! टाकुनी लोभवैरा ॥ १२ ॥

गलबत खुटवीलें टाकुनी नांगराशी ।
तरिहि जलधिसंगें ना टिके संगराशीं ॥
अधिक अधिक वारा होतसे फार जोर ।
अहहह ! तुटला कीं, नांगराचाचि दोर ! ॥ १३ ॥

भडकुनि पवनानें स्वैर तारूं निघालें ।
किति तरि न कळे हें दैव घालील घाले ? ॥
जलद हल खलाशी टाकिती दूसरा हो ।
अझुनि तरि दमानें बापुडें स्थीर राहो ॥ १४ ॥

फिरुनि जरि हलाचा दोर तोडील वायू ।
तरि मग सकलांचें संपलें खास आयू ! ॥
गमत मम मना हा दोर नोहे हलाचा ।
प्रगट निवळ तंतू जीविताच्या बलाचा ॥ १५ ॥

घडि घडि जइं होतो वायुचा फार जोर ।
दचकुनि तुटला की, पाहतो काय दोर ॥
निशिदिनिं सकलांना लागला तोचि घोर ।
व्यसनसमयिं होतो नीचही फार थोर ॥ १६ ॥

रडुनि रडुनि झाला काय हो दीनवाणी ! ।
नयन सुकुनि गेले आटलें सर्व पाणी ॥

उगिच करुनि होतों स्वस्थ ऐसा विवेक।
नविन नविन तों तों संकटें एक एक ॥ १७ ॥

---

# ३३ गंगाधर रामचंद्र मोगरे

---

हे कवि इ. स. १८५७ साली शिरगाव ( ता. माहीम, जि. ठाणे ) येथें जन्मले. लहानपणापासूनच याना कविता करण्याचा नाद लागला. यानी स्फुट कविता पुष्कळ केली असून शिवाय ‘ अभिनव कादंबरी ’ या नावाचे बाणभट्टकृत संस्कृत ‘ कादंबरी ’ चें आर्याबद्ध रूपातर केले आहे, व तें प्रसिद्ध आहे ‘ मोगऱ्याचीं फुले ’ या नावाचें आपल्या स्फुट कवितांचें एक छोटे पुस्तक यानीं नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. याची भाषा प्रौढ व सरळ असून, कविता प्रासादिक व मनोहर आहे. हे कवि मुंबईस ‘ एशियाटिक सोसायटी ’ च्या लायब्ररीत कारकून होते. हे इ. स. १९१५ साली निवर्तले.

## प्रेमबंधन

महाश्वेता चंद्रापीडाला घेऊन कादंबरीकडे गेली. तेथे चंद्रापीड व कादंबरी यानीं एकमेकास पहाताच त्याचें एकमेकावर प्रेम जडले, तो प्रसंग येथे वर्णिला आहे.

केयूरक गेल्यावर चंद्रापीडा म्हणे महाश्वेता।
‘ किन्नर-भू बहु रम्या रमवी गंधर्व-पुरहि बहु चेता ॥ १ ॥
साधी असे स्वभावें महानुभावा सखीहि ती माजी।
अडचण नसल्यास तिला जाऊं भेटावया चला आजी ॥ २ ॥
तिजला म्हणे नराधिप ‘ भगवति ! मज हें विचारतां काय ?।
न्या वाटेल तिथें, हा संप्रति तुमचाच जाहला काय ’ ॥ ३ ॥
अश्वारूढ क्षितिपति तिजसह गंधर्वराज नगराला।
जाउनि, विचित्र शोभा पाहत कादंबरी-गृहा आला ॥ ४ ॥

बघुनि महाश्वेतेला धांवुनि घालुनि तिच्या गळां हात ।
कुशल, प्रश्न तिला करि हरिखुनि कादंबरी स्वचित्तांत ॥ ५ ॥

हंसीहि[1] कुमाराची देवीला सांगुनी कथा सारी ।
बोले ' गडे मला हा प्राणापेक्षांहि आवडे भारी ॥ ६ ॥

नर-मणि गुण-गण-निधि हा निज लावण्यें स्मराभिमान हरी ।
ह्यावरि लोभ सखे ! तूं मजवरि करिशी तसाच नित्य करी ' ॥ ७ ॥

आधींच पावली जी मोह तयाच्या विलोकुनी रूपा ।
स्व-सखी-वचनें स्वासन देउनि बसवी समीप ती भूपा ॥ ८ ॥

देवी मग मदलेखे-करवीं[2] धुववून राज-पुत्र-पदां ।
धुवुनी स्वयें सखीचे पाय बसे स्वस्थळी वरोनि मुदा ॥ ९ ॥

अन्योन्यांस पहातां अन्योन्यप्रीति मानसी जडली ।
चंद्रापीडचि न स्मर-पाशीं कादंबरीहि सांपडली ॥ १० ॥

सुदती सलज्ज वारंवार तयाच्या मुखाकडे बघुनी ।
वानी तिजनयनांची नरलोकाचीहि धन्यता स्वमनीं ॥ ११ ॥

रावहि पाहुनि तिजला भावी श्रम आपले सफल झाले ।
किन्नर[3] मिथुनेंही त्या उपकारचि आपणावरी केले ॥ १२ ॥

प्रेमें करीत असतां विनोद-संवाद ऐकमेकीशीं ।
तांबूल-दान-समयीं बोले कादंबरीप्रती हंसी ॥ १३ ॥

'आजी प्रेमपुरस्सर आपण सत्कारिजे स्वयें ज्याला ।
त्यास रुचेल तरी त्वां द्यावा पहिला विडा सखे त्याला ' ॥ १४ ॥

---

१ महाश्वेता २ ही कादंबरीची सखी होती ३ एका किन्नरमिथुनाचा पाठलाग करीत असता चंद्रापीडाला महाश्वेतेची गाठ पडली व त्यामुळेंच कादंबरीच्या भेटीचा योगायोग आला, म्हणून किन्नरमिथुनाने आपणावर उपकार केला, असें म्हटलें आहे

देवी सलज्ज बोले 'द्यावा त्यांना विडा तुधांच गडे ।
करचि सरे न कराया साहस तें, काय मी करूं तिकडे' ॥ १५ ॥
जातां हंसी मदिराचित्ररथांच्या निमंत्रणें तिकडे ।
बोले 'आज रहाया कवण स्थळ योजिलें नृपास गडे' ॥ १६ ॥
हंसत म्हणे मनिं ती जो सकल कुमारी-मनो-भवन-वासी ।
रम्यस्थान दुजें त्या देऊं मी कोणतें रहायासी ? ॥ १७ ॥
स्पष्ट वदे मग 'देउनि दर्शन मज, नाथ जो स्वयें झाला ।
मच्छ्रीचा तनुचाही, सांग रहाया रुचे तिथें त्याला ॥ १८ ॥
'क्रीडा-मणि-गिरि-वर ह्या स्थान रहायास दे' वदुनियां हें ।
हंसी गेली; क्रीडा-मणि-गिरि-वर नृपहि जाउनी राहे ॥ १९ ॥
देवी तयास झाली ज्या ज्या उपभोग्य वस्तु पाठविती ।
त्या सेवुनि मध्याह्नी बसला होता सुखासनीं नृपती ॥ २० ॥
तों मदलेखा नामें देवीची आपणाकडेच सखी ।
ये एक रम्य सुरुचिर घेउनियां हार, तो असें निरखी ॥ २१ ॥
संनिध येऊन राया वंदुनि परिचारिका म्हणे-'उदधि ।
देउनि अर्थिजनांतें वांटुनि सारा स्वकीय रत्ननिधि ॥ २२ ॥
जो हार शेष राहे, तो हा वरुणास देउनी तर्पी ।
वरुणहि चित्ररथा दे, चित्ररथ स्वात्मजेस तो अर्पी ॥ २३ ॥
देवीनें पाठविला तोच असे हा तुम्हांकडे हार ।
आहे क्षुद्र जरी हा तुमच्या रूपापुढें अलंकार ॥ २४ ॥
मोडावें मन तीचें करुनि अनादर तथापि याचा हें ।
नाहीं योग्य तुम्हांला, कीं पहिलाच प्रसंग हा आहे' ॥ २५ ॥
वदुनि असें मदलेखा घाली त्याच्या गळ्यांत तो हार ।
तिजसह गुण देवीचे वर्णुनि हर्षे कुमारही फार ॥ २६ ॥

ती गेल्यावर, देवी घेउनि कांहीं सख्या तिथें आली ।
सत्कारुनि तीस बसे भूवरि नृप, तीहि बैसली खालीं ॥ २७ ॥

तीस म्हणे नृप 'इतका आदर दासास पाहिजे कां या ? ।
लवहि नसे मजमध्यें गुण प्रसादास पात्र या व्हाया' ॥ २८ ॥

केयूरका तिनें मग चंद्रापिडा समीप ठेवून ।
कादंबरी स्वसदना जाय सर्वे निज सख्यांस घेऊन ॥ २९ ॥

हंसीचा थोरपणा, चैत्ररथीचा[४] महानुराग, तसें ।
तत्परि-जन-सौजन्यहि केयूरासह नृपाळ वर्णितसे ॥ ३० ॥

दुसरे दिवशी प्रातःकाली परतूनि जावया नृपती ।
आज्ञा घे देवीची, करुनी हंसीमुखें तिला विनती ॥ ३१ ॥

जातां निघून सविनय बोले देवीस तो नराभरण ।
'दासकथा वदतां तरि ह्याचें व्हावें कधीं कधीं स्मरण' ॥ ३२ ॥

कष्टेंच ती तया दे अनुमत मग जावयास राव निघे ।
ये गंधर्व-सुता-सह अच्छोदीं तों तिथें स्वसैन्य बघे ॥ ३३ ॥

मंत्रिसुतादिक सेना-पति सत्कारून बैसविति त्याला ।
गंधर्व-राज-धानी-वृत्त तयां तोहि सांगता झाला ॥ ३४ ॥

दुसरे दिवशीं तिकडे घेउनि केयूर विविध भोगां ये ।
'ये ये' म्हणून, जवळीं येतां आलिंगिलें तया रायें ॥ ३५ ॥

निज-विरहें अस्वस्था देवी ऐसें तदाननें कळतां ।
'आणा आणा सत्वर अश्व' असें राव जाहला म्हणता ॥ ३६ ॥

हय आणितांचि भृत्यी, संगें घेऊन पत्रलेखेला ।
गंधर्वराजनगरा चंद्रापीड त्वरा करुनि गेला ॥ ३७ ॥

---

४ चित्ररथाची मुलगी कादंबरी

तेथें निज-विरहानें हृदय जिचें शून्य जाहलें आहे ।
हिमसदनी निजलेल्या ऐशा कादंबरीस तो पाहे ॥ ३८ ॥
शिरतां सदनीं आधीं हंससुतेला करोनियां प्रणती ।
देवीजवळचि होतें आसन जें त्यावरी बसे नृपती ॥ ३९ ॥
मग केयूर वदे ' नृपहृदयचि जी होउनी दुजें राही ।
' तांबूलहि त्या दे जी आर्ये ती होय पत्रलेखाही ' ॥ ४० ॥
सत्कारून बसाया स्थळ तिजला स्वासनीच दे देवी ।
मोहुनि तद्गुणरूपा प्राणाधिक लोभ तीवरी ठेवी ॥ ४१ ॥
हर्षे स्वदर्शनें जी, भावि वियोगार्तिही जिला भय दे ।
कादंबरीस ऐशा श्लेषोक्तीनें मनुष्यपाळ वदे ॥ ४२ ॥
' कामरती हृदिकृत्वा[५] देवीला तीव्र ताप हा झाला ? ' ।
ऐकुन हें मदलेखा प्रत्युत्तर योग्य देतसे त्याला ॥ ४३ ॥
' होईल काय काय न हिजला कौमारभाव हा जडतां ।
झाला शंकावर्ती[६] नृप ही श्लेषोक्ति ऐकुनी पडता ॥ ४४ ॥
तत्प्रेम-पाश-बंधन मग कष्टें दूर सारुनी राव ।
बोले तीस, ' पहा हा तव-पद-सेवेस घे पुन्हां धांव ' ॥ ४५ ॥
कादंबरीस सोडुनि मग राहे राव जावया मागें ।
तेव्हां केयूरमुखें विनवुनि त्या एवढेंच ती मागे ॥ ४६ ॥
कीं, ' जातसां तरी जा, परि जा ठेवून पत्रलेखेशीं ।
कांहीं काळ इथें ती राहुनि येईल आपल्या देशीं ' ॥ ४७ ॥
' देवी-कृपा-प्रसादा उपभोगाया इथेंच राहो ती ' ।
ऐसें वदोनि नृपवर जाय जिथें आपली चमू होती ॥ ४८ ॥

---

५ हृदयाच्या ठायी ठेऊन ६ शकारूप भोंवऱ्यात

तिकडे पत्र पित्याचें देती आणूनी दूत भूपवरा।
त्याचा आशय हा कीं-पत्र पहातांच या निघून घरा ॥ ४९ ॥
वाचून पत्र, होउनि देवीविषयीं निराश राजमणी।
मंत्रिसुतावर सोंपुनि दळभार, स्वालयास जाय क्षणीं ॥ ५० ॥

---

# ३४ गोविंद वासुदेव कानिटकर

---

हे प्रसिद्ध ग्रंथकार व कवि इ स. १८५४ या वर्षी पुणे येथें जन्मले. हे जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण. एल्. एल् बी. च्या परीक्षेत उत्तीर्ण झाल्यावर यानीं सरकारी नोकरी धरिली व ती चागले प्रकारें बजावून, पुष्कळ वर्षे पेनशनचा उपभोग घेऊन, सुखवस्तु स्थितीत हे इ. स. १९१८ साली पुण्यास निर्वतले. यानी ' अकबर काव्य, ' ' नारायणराव पेशव्याचा मृत्यु, ' व ' संमोहलहरी ' अशीं मोठी काव्ये व अनेक स्फुट कविता व पदे केली आहेत. याची कविता सरळ, नवीन विचारानी परिप्लुत व रसालंकारमंडित आहे.

## परमेश्वराची लीला

( वेचे—संमोहलहरीतील )

अनंत विविधाकृति-प्रचुर विश्व तें, ही मही।
कशी घडविली प्रभो नसुनि कांहिं आधारही ? ॥
नसे विदित सृष्टिचें सकल गूढ कोणा नरा।
सुरेंद्र-वरुणादिकां न इतिहास ठावा खरा ॥ १ ॥
तुझी ऋषिसुरां नसे प्रभव-पीठिका ज्ञात ती।
श्रुतिस्मृतिहि आपुली प्रकट अज्ञता सांगती ॥
अनंत भुवनें स्वयें नटुनि विश्व, जो थाटला।
विराट म्हणती, असा प्रभु कसा कळावा मला ? ॥ २ ॥

यथार्थ तुज नाम दे श्रुतिहि ' विश्वकर्मा ' असें ।
सुतार रचितो जगीं चतुर राजवाडे जसे ॥
विशाल वनिं कोणत्या कवण वृक्ष वा छेदिसी ।
कुठें बसुनि तूं प्रभो ! भुवनमंदिरें बांधिसी ? ॥ ३ ॥

तमोमय अशा स्थळीं बसुनि गुप्त कां राहसी ? ।
गमे नवल, सांग ही सृजिलि सर्व सृष्टि कशी ? ॥
जडांत उपजे कसें कुतुककारि चैतन्य तें ? ।
अखंड भरला, दिसे तदपि कां न या दृष्टितें ॥ ४ ॥

सदैव फिरवीतसे गरगरां स्वयंत्रीं जयां ।
वसे हृदयिं ईश तो प्रभु समस्त भूतांचिया ॥
स्वयें करिसि काय तूं सकल सृष्टिचें नाटक ? ।
किती म्हणति की करी अखिल खेळ माया-ठक ॥ ५ ॥

जरी प्रथम एक तूं, मग अनेक होशी कसा ? ।
त्वदीय मनिं काम तो उपजला कळेना तसा ॥
वदे श्रुति खरें जरी, तुजसि आप्त-कामा कशी ।
मनीं उपजली तरी ' करिन सृष्टि ' इच्छा अशी ॥ ६ ॥

असा सतत घालि जो विमल सृष्टिच्या गोंधळा ।
अगा भयद गोंधळ्या ! नुमजती तुझ्या त्या कळा ॥
प्रयोजनविहीन कीं विविध खेळ हे चालती ? ।
असे सकळ भास वा म्हणुनि गोंधळे मन्मती ? ॥ ७ ॥

सहस्र अभिधा तया विबुध देति जो ना कळे ।
प्रचंड विणिती भलीं निबिड शब्दजाले बळें ॥
निरर्थक विशेषणें परिसतां करी मी स्मय ।
विषाद अति मानसीं उपजतो, गमे विस्मय ॥ ८ ॥

' जगद्विरचना असे दुरवगम्य ही सर्वथा ।
सुरांसहि न ठाउकी, करिशि शीण कां तूं वृथा ? ' ॥
प्रजापति अशी गिरा मधुर वेदकाळीं वदे ।
दिला मजसि त्यांतल्या रस न अल्प कां शारदे ? ॥ ९ ॥

## शनवारचा वाडा

पुढें भव्य वाडा पहा थोर आहे । पडोनी कसा पर्वतप्राय राहे ॥
किती उंच भिंती, किती भार जंगी । न भंगे गमे अंग ज्याचें सुरुंगीं ॥ १ ॥

प्रबळ, थोर, विशाळ विराजती । बुरुज, वेष्टिति सर्व सभोंवतीं ॥
गमति दिग्गज रक्षिति त्या गृहा । भयद वर्णहि नील असा पहा ॥ २ ॥

किती आंत शोभा ! किती गार वाटे । जनांच्या मनी, जाय जो त्याच वाटे ॥
चमत्कार जेथें असे सर्व ठाईं । तऱ्हेच्या मजेच्या किती थोर सोई ॥ ३ ॥

गजबजे जिकडे तिकडे किती । अमित सेवक संतत राबती ॥
भरुनि वैभव राहतसे सदा । करिति राज्य सुविप्र सुखें सदा ॥ ४ ॥

परि अहा ! स्थिति आज कशी घडे । न बघवे सुजनांस तिच्या कडे ॥
पळभरांत निवर्तति पेशवे । अहह ! कर्मदशा नच बोलवे ! ॥ ५ ॥

असे ध्वस्त सारें, न वाडा, न कांहीं । न हो पूर्विचा वासही आज राही ॥
पडे थोर मैदान वारा झळाले । मना त्या स्थळीं येति आतां उमाळे ॥ ६ ॥

स्थळीं राबती माणसें ज्या हजार । सदा सेवनीं स्वामिपादासमोर ॥
दिसे सर्व उध्वस्त पर्यस्त आतां । न कोणी विचारी पुसे तेथ जातां ॥ ७ ॥

महा शूर शिंदे तसे वीर अन्य । जिथें येउनी, बोलती ' विप्र धन्य ' ॥
जहागीरवाले, बडेजाव ज्यांची । घडे ज्या स्थळीं नित्य गर्दी अशांची ॥ ८ ॥

अहा ! त्या ठिकाणी पहायास जातां । विके भाजिपाला ! पडे भूस आतां ॥
वसे येथ काची तसा बागवान । विपत्ती सदा देइ काळास मान ॥ ९ ॥

वाड्यांत सुंदर असे नृपराजयाचें। मंदीर, वर्णन न हो करवे जयाचें॥
लक्ष्मी प्रसन्न असुनी करि वास जेथें। राहे उणीव कसली मग सत्य तेथें १०

महाल नारायणराव यास। शोभे तसा तन्नवयौवनास।
प्रत्यक्ष आनंद करी स्ववास। ऐसें गमे जेथ सदा जनांस॥ ११॥

सहस्र कारागिर त्या स्थलास। अनेक वर्षें करुनी प्रयास।
समस्त-चातुर्य-बळें सुशोभा। देती, अशी अप्रतिमा यशोभा॥ १२॥

कनकवर्ण मनोज्ञ चकाकती। बहुत यत्किरणें मग फांकती॥
किति विलक्षण हें चमके रुपें। धन अहा गणिती न किती खपे॥ १३॥

विलसणार सुरम्य रमापती। म्हणुनि लक्ष कुबेरच मापती॥
सतत तेथ मनोहर वा सती। जणुं रमा झिजुनी करि वास ती॥ १४॥

समान्तरें स्तंभ उभे पहा हे। नक्षींत-पक्षीजन-संघ राहे॥
वनांतुनी येति जणों घरा हे। ऐसें गमे प्रेक्षक यास मोहें॥ १५॥

सकळ वृक्ष अहा! सुरुचे कसे। रुचिर रंग तयां हिरवा असे॥
मधुनि राघु मनोहर कोरिले। जणुं जिवंत धरोनिच ठेविले॥ १६॥

भिंतीवरी कसब दाविति ते चितारी।
चित्रें विचित्र बहु काढुनि चित्तहारी॥
प्रत्यक्ष सर्व सृजिली जणु सृष्टि अन्य।
ऐसे गुणी करिति वास पुण्यांत धन्य॥ १७॥

हा जानकीसह वसे रघुराज येथें।
वांके कपींद्र हनुमान् दृढभक्ति जेथें॥
ते दुःखभागि वनिं पांडव शोभतात।
ती धर्ममूर्ति विलसे मनिं फार शांत!॥ १८॥

ती द्रौपदी; नकुल, तो सहदेव पार्थ।
तो वीर सुंदर धनुर्धर भीम सार्थ॥

तें घोर रान अति उंच विशाळ शैल ।
जे पांच बैसति अहा वन-वास-शील ॥ १९ ॥

वसे रुक्मिणीही वसे सत्यभामा । स्वयें सेविती प्रीतिनें सर्वकामा ।
वनीं कृष्णजी सौख्यशाली विराजे । स्वयें धेनु चारी, मुखी वेणु वाजे॥
दयार्द्र नारायण शेषशाई । लक्ष्मीसवें त्यावरि दृष्टि जाई ॥
समुद्रकन्या हरिच्या पदांतें । सेवीतसे जो हरि आपदांतें ॥ २० ॥
अशी चित्रमाला असे त्या महाला । पडावेंच की सौख्य नारायणाला ॥
महा भक्तिनें नित्य चित्रें पहावीं । न खंती परी जोडण्याला गमावी ॥२१॥

## कृष्णकुमारीचें बालपण

बोले बाला बोबडे बोल गोड । नाही साऱ्या भूवरी त्यासि तोड ॥
ऐकोनी ते अंबिकेच्या मनाला । आनंदाचा पूर की थोर आला ॥ १ ॥

ती बालकन्या रमणीय वाटे । तें हास्य तीचें किति गोड दाटे ॥
तें बाळसें शोभवि गाल रम्य । बाला गमे सर्व जनास काम्य ॥ २॥

घ्यावे मुके या किति बालकाचे । उद्गार ऐसे निघती मनाचे ॥
होई कधी तृप्ति न त्या सुधेनें । तैशीच त्या बालक-चुंबनानें ॥ ३ ॥

ते पाहुनी शुभ्र तसें विशाल । त्या सुंदरीचें रमणीय भाल ॥
वाटे विधीनें लिहिलें असावें । जें जें पुढें कीं तिजला घडावें ॥ ४ ॥

अति लहान सुरेख शिशू असें । जरि पुढें नयनी पडलें दिसे ॥
न इतकी जगतीत मनोहर । इतर वस्तु गमे तरि सुंदर ॥ ५ ॥

बघुनि रम्य पदार्थ मनास हो । द्रव न ये तरि तो नर काय हो ॥
सहज हर्ष तया नुपजे जरी । हृदय मानवि त्यास नसे तरी ॥ ६ ॥

लवकर सदा चालाया ती शिके जननीसवें ।
खुळ खुळ तिच्या पायीं वाळे विराजीत त्या रवें ॥

विविध करितां क्रीडा बाला गृहांत जशी रमे ।
जननिस तिच्या 'धन्या आहें' असें हृदयीं गमे ॥ ७ ॥
'खचित न असे धन्या माता मदन्य जगावरी ।
सकल, अथवा आहे मोठी तुझी करणी हरी !' ॥
निघति असले त्या भैमीच्या मुखांतुनि शब्द ते ।
सुख मग तिला चित्तामध्यें अपूर्वचि भासतें ॥ ८ ॥
असो; काळ जातां पुढें थोर झाली । तशी कांतिही वाढतां दिव्य झाली ॥
नभीं चंद्र जैसा कला भिन्न दावी । जशी कोंवळी वेल किंवा फुटावी ॥९॥

---

# ३५ वासुदेव वामनशास्त्री खरे

---

हे प्रसिद्ध इतिहाससंशोधक, ग्रंथकार व कवि इ. स. १८५८ या वर्षी रत्नागिरी जिल्ह्यात गुहागर येथे जन्मले यानी लहानपणीं मोरोपंताची बरीच कविता वाचली व तेव्हापासून यास कविता करण्याचा नाद लागला. शिक्षण सपल्यावर यानीं काही महिने पुण्यास "न्यू इग्लिश स्कुलात" नोकरी केली व नंतर 'मिरज हायस्कुलात' यास संस्कृत अभ्यापकाची जागा मिळाली यानी पुष्कळ महत्त्वाचे ऐतिहासिक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत याचें 'यशवंतराय महाकाव्य' व इतर स्फुट कविता प्रसिद्ध आहेत याच्या कवितेत प्रसादगुण विशेष आहे. कविता साधी पण सुरस आहे. हे इ. स १९२४ साली निवर्तले.

## मध्यरात्र

सामसूम जिकडे तिकडे गमे । स्वच्छ पाहुन नभाप्रत तो रमे ॥
तारका चमकती नभमंडळीं । कांति राजपथिं त्यांचि फांकली ॥ १ ॥
पारिजात फुलले सुरकाननीं । ही फुलें विलसती गमलें मनीं ॥
कीं हिरेजडित सुंदर सुंदरी । भूषणें विमलकांति निशा धरी ॥ २ ॥

शांतता त्रिभुवनास लाभली । प्राणिमात्र निजले निजस्थळीं ॥
पाहुनी कृपण काढि वैभव । आपुला गगनरत्न संचय ॥ ३ ॥
उंचसा गगनमंडप थोर हा । बांधुनी रुचिर आवडिनें पहा ॥
रात्र पाजळुन दीपक तारका । वाट पाहि पतिची अति उत्सुका ॥ ४ ॥
दोन बाजुस उभे अचल स्थिती । राक्षसांसम भयंकर दीसती ॥
राजमार्ग गतवस्तुंस पाहती । हर्म्य कान जणु देउन ऐकती ॥ ५ ॥
जे दिनीं गजबजाट करी महा । शांत या समयिं पूर्ण दिसे अहा ॥
अंधकार जलधी पसरे वरी । कीं बुडे सकल सृष्टि तदंतरीं ॥ ६ ॥
श्वान कारण नसूनहि भुंकती । भीरु मार्गगत लोक चपापती ॥
शब्द जो करितसे पद आपुलें । तो भयें श्रवुनि अंग थरारलें ॥ ७ ॥
ज्यांस नाहिं घरदार असे जन । दीन अंध पडतात पथांतुन ॥
थंडिनें प्रखर विव्हळ जाहली । इंद्रियें, उदरिं भूक धडाडली ॥ ८ ॥

## विक्रमादित्याची उज्जयिनी

पुरी पूर्वी गर्वें निरुपम निजैश्वर्य मिरवी ।
जिला वर्णू जातां थकति सुकृती संस्कृतकवी ॥
तिच्या स्थानीं आतां पसरत असे निर्जन वन ।
बघोनी हें झालें मम समयिं त्या दुःखित मन ॥ १ ॥
कोठें तें कांचनाचे कळस चमकती उंच देवालयांचे ? ।
हर्म्य प्रासाद कोठें असति ? विलसलें थोर ऐश्वर्य ज्यांचें ॥
कोठें त्या नाट्यशाला ? दिसति न नयना चंद्रशाला विशाला ।
रत्नांनीं पूर्ण गेले विपणि तळ जणों अब्धिचें तें लयाला ॥ २ ॥
प्रातःकाळीं नगर-वनिता कुंकुमाच्या सड्यांनीं ।
रांगोळ्यांनीं, अधिकच जयां देति शोभा झटोनी ॥

नाना यानीं बसुन गमना पौर जेथें करीत ।
नाना वेषीं फुलतिच, कुठें जाति ते राजपंथ ? ॥ ३ ॥
जेथें नाचति मोर, मंजुल रवें गातात जेथें पिक ।
वापींच्या तटिं खेळती सुखभरें चक्रांग, हंसादिक ॥
पुष्पांनीं लवल्या लता तरुवरां जेथें मिठी घालिती ।
उद्यानें दिसती न तीं वसति जीं क्षिप्रा नदीच्या तटीं ॥ ४ ॥

विद्या-धर्म सु-कर्म-तत्पर असे होते इथें ब्राह्मण ।
तैसे क्षत्रिय शूर मान-धन ते ज्यां जीव वाटे तृण ! ॥
अर्थोत्पादक वैश्य, शूद्र खपले सेवावया भूमिला ।
कोठें उज्जयिनीमधील जन ते गेले कळेना मला ! ॥ ५ ॥

जीस विक्रम पराक्रमी गुणी । तोपवी झटुन नित्य रक्षुनी ॥
राज-भक्ति-वश धन्य लोक ते । होति या नगरिं पूर्विं नांदते ॥ ६ ॥

लोकीं पावसि तूंच विक्रम नृपा धन्यत्व या जन्मुनी ।
काव्याभिज्ञ-जनांत तूंच पहिला, दात्यांमध्यें अग्रणी ॥
वाणी-कंठ-मणी कवीश्वर गुणी शाकुंतलाचा पिता ।
होता आश्रय पूर्ण पावत तुझा ! विद्वत्सभासंमता ॥ ७ ॥

श्रृंगार वीर-करुणा-रस-पूर्ण काव्यें ।
जीं कालिदास तुज ऐकवि नित्य नव्यें ॥
गंभीर सुस्वर रसाळ अशी सुवाणी ।
त्याची नृपा परिसली असशील कानीं ॥ ८ ॥

सांगाया[१] निजवल्लभेस वदला तो यक्ष जें जें घना ।
सीतेचा पतिला निरोप, रतिचा तो शोक भेदी मना ॥

---

१ कालिदासकृत मेघदूतादि काव्यें येथें लक्ष्य आहेत

ज्यातें ही कविच्या मुखेंच कविता ऐकावया सांपडे।
त्याचें भाग्य विशेष दुर्लभ जगी तो लाभ त्यातें घडे ॥९॥

ज्यांनीं गर्वभरें शिरें उचलली आकाश भेदावया।
जाती पर्वत उंच थोरहि असे ज्याच्या प्रभावें लया ॥
किंवा घोर अपार सागरजळें ज्याने बळें शोपिलीं।
तो हा धन्य अचिंत्य काल-महिमा स्व-च्छंद-चारी बळी ॥ १० ॥

महाकाल[२] रक्षावया सिद्ध नित्य। अवंतीस, हें बोलती लोक सत्य ॥
कसा काल नाशावया तीस पाहे!। अहो थोर आश्चर्य हें वाटताहे ॥ ११ ॥

कविवर चिर गाती कीर्ति ज्याची अमूप।
त्यजुन भुवन गेला विक्रमादित्य भूप! ॥
कवण रसिक भोक्ता आपणा होय आतां।
म्हणुन सुकविता ती पावली स्वर्गपंथा! ॥ १२ ॥

श्रीविक्रमानुज नृपाल उदार शुद्ध।
राज्यें प्रजा सुखवि भर्तृहरि प्रसिद्ध ॥
तो आपुल्या प्रियपुरास विनाशकाल।
येणार जाणुन असे वदला असेल ॥ १३ ॥

"ती रम्या नगरी महा नृपति तो सामंत चक्रावृत।
त्याची राजसभा विशाल, जवळी चंद्रानना त्या स्थित ॥
शौर्य गर्वित रा[illegible] पुत्र-गण तो, ते भाट, ती भाषणें।
ज्या काळें सगळें लया दवडिलें, माझा तया वंदनें ॥ १४ ॥

---

२ उज्जयिनीचा महाकालेश्वर

# ३६ नारायण वामन टिळक

या प्रसिद्ध कवीचा जन्म इ. स. १८६५ या वर्षी झाला. यानी संस्कृत व आग्ल काव्याचे चागले परिशीलन केले होते. यानी ख्रिस्तधर्माचा स्वीकार केला असून हे रे टिळक या नावाने प्रसिद्ध होते. धर्मातर केले असूनही याची उज्ज्वल स्वदेशप्रीति याच्या काव्यात पूर्ण व्यक्त होते. यानी आठ मोठी व शेकडो स्फुट काव्ये केलीं आहेत. हे सृष्टिदेवतेचे नि सीम भक्त होते. याच्या कवितेत प्रसादगुण विशेष असून कल्पनेचे विहार मनोहर आहेत. याची काव्ये सरस, रमणीय व हृदयंगम आहेत. हे इ स १९१९ त निवर्तले.

## कवि व कविता

न कळे कोठुन होते लतिकेच्या ठायिं पुष्प-परि-पूर्ती ।
न कळे केव्हां कैशी होते कविच्या मनाप्रति स्फूर्ती ॥ १ ॥
न कळे कोठुन येती द्विजराज नवे वसंत-काली ते ।
न कळे कोठुन येती धांवत नवशब्द भेटण्या कवितें ॥ २ ॥
न कळे कोठुन येतें शोभा द्यायास हास्य अधराला ।
न कळे कोठुन येतो प्रसाद कविच्या नवीन काव्याला ॥ ३ ॥
येतां पूर नदीला थांबे तो काय दोन हातांना ? ।
ऐसा कोण म्हणे जो थांब कवीला स्वकाव्य नातांना ॥ ४ ॥
घटपट लटपट झटपट खटपट ऐशा "उगाच शब्दां"–तें ।
जुळवाया कवि न, परी नरकपि खर्ची अमूल्य अब्दांतें ! ॥ ५ ॥
आलाप कोकिलांचे इतुक्या कालांत जाहले इतुके ।
निर्झर-गान गणावे कोणी वर्षांत जाहले तितुकें ॥ ६ ॥
तारांगणिं कवि खेळे, चंद्रासह करि विनोद-हास्यातें ।
वाणी प्रेमानंदें चुंबी त्याच्या प्रसन्न आस्यातें ॥ ७ ॥

बोलति फुलें तयासह, पक्षी करिती अनेक गुज-गोष्टी ।
"ये काढ चित्र माझें" सांगे त्या काम-रूपिणी सृष्टी !॥ ८॥

वर देवदूत बसले कविहृदयाच्या धरून कीलातें ।
इच्छा जैसी त्यांची तैशा काढी सुरम्य शब्दांतें ॥ ९ ॥

याचा गर्व कशाला ? बोलविता तो धनी निराळा हो ! ॥
कविच्या द्वारा रसिकां काव्य-रसाचा करून दे लाहो ! ॥ १० ॥

## साऱ्या जगांत फुलेंच फुलें

आकाशांत फुलें ! धरेवर फुलें ! वाऱ्यावरीही फुलें ! ।
माझ्या गेहिं फुलें ! मनांतहि फुलें ! भूगर्भि सारी फुलें ! ॥
माझें चित्त भुले सुगंधित भलें हें विश्व हो जाहलें ।
कोणाला कळलें किती पसरलें उद्यान हें शोभलें ! ॥ १ ॥

नक्षत्रें, सुमनें, विहंगम, मुलें, काव्यें, मणी हीं जरी ।
नांवें भिन्न, तरी फुलें सकल ही रूपें निराळी तरी ॥
घेतों ह्यांतुन थोडका रस पुन्हा त्याच्याकडे धांवतों ।
देवाला स्तवितों सदा भ्रमर मी पुष्पांमधें राहतों ॥ २ ॥

जातीच्या भ्रमरास "सोडुन फुलें ये फोड हीं लांकडें" ।
ऐसें कोण म्हणेल, कोण भलतें घालील हें साकडें ! ॥
देवानेंच जयास पुष्पहृदयीं खेळावया निर्मिलें ! ।
त्याला अन्य कृती रुचेल कुठुनी प्राणा जरी घेतलें ॥ ३ ॥

बोला "चंचल, हा क्षणांत गगनीं धांवे क्षणें भूवरी ।
ठायीं एक कदापि हा न वसतो, ही वृत्ति नाहीं बरी !" ॥
हांसा मानुनियां निरर्थ मम हो ह्या गोड गुंजारवा ।
विश्वेशा स्मरुनी फुलांत रमतों, भीतों न मी मानवा ! ॥ ४ ॥

फुलवितो अवध्याच जगाप्रती । मज गमे मजसाठीं जगत्पती ॥
मजसमान रसज्ञ नसे कवी । भ्रमर मी रस चाखुन सांठवीं ॥५॥
जाइन सोडुन ह्या जगताला । ठेवुनि हा मधुकोश तुम्हांला ॥
दिव्य मला भ्रमरा सुविलोला । स्वर्गिं मिळेल नवी सुममाला ॥६॥

## विरह

गगन नटलें हें तारांहीं मनोरम हो जना ।
असह परि हें देतें माझ्या मनाप्रति वेदना ॥
नच गवसते येथें तारा मला प्रिय ती जरी ।
असुनि नसुनी व्यर्था साऱ्या दुज्या मजला तरी ॥ १ ॥

मधुर कुसुमें ही उद्यानी स्मिता करिती किती ।
कितिक हंसती बोलावीती किती रसिकांप्रती ॥
परि सुमन ते माझें साधें दिसे न मला इथें ।
अरसिकचि मी येथें माझें न हो मन लागतें ॥ २ ॥

सतत नटली ही रत्नांही अनर्घ्य वसुंधरा ।
प्रिय मम परी रत्नांला ही न दे स्मयनिर्भरा ॥
मज म्हणतसे हें घे तें घे खरोखर ही पिशी ।
हिजसि न कळे सौंदर्याची प्रसू ममता कशी ॥ ३ ॥

सरस सरला सालंकारा नव्या गुणसुंदर ।
कृति मजपुढें मांडीती हे उदार कवीश्वर ॥
परि मज जिनें वेडा केला न ती मज दाविती ।
अरसिक पुरा अन्यीं मी हें कवीहि न जाणती ॥ ४ ॥

बुध म्हणाति की ह्या कालाच्या तटी दुसऱ्या वसे ।
प्रिय तुजसि तें जा तूं तेथें उपाय दुजा नसे ॥

मम मन परी गेलें आहे पुढें परतेल तें ।
कधिं तिथुन हें सांगा आधी मला बुध जाणते ॥ ५ ॥

## एक सुंदर कवि

चाल—" मलिनवस्त्र परिधान करितसे उदास होवोनी "

कवी ! खरा हो कवी ! गातसे सदैव कविता नवी ।
संसृति-कोलाहलें त्रासल्या जीवाला रंजवी ॥ ध्रु० ॥

पुनरावृत्ती दोष म्हणा-हो कुणी पाहिजे तरी ।
विविधार्थांची गिरा द्विजाची मनोहरा मज खरी ॥
मीच कशाला ? दिशा हांसती ! शिरा तरू डोलवी ।
एक विषय ठाउका द्विजाला परमेशाला स्तवी ! ॥ १ ॥

एका तरुला कुशल विचारी दुसऱ्याला हांसवी ।
करि रोमांचित एक लतेला दुसरीला लाजवी ॥
फुलांसंगती खेळे ओंव्या गाउन त्यां खेळवी ।
एक विषय ठाउका द्विजाला परमेशाला स्तवी ॥ २ ॥

क्षणांत वरती क्षणांत खालीं स्फूर्ति यास नेतसे ।
अंतर्यामी क्षणांत गातो हंसतो फूलचि जसें ॥
लीला याच्या सांगति की हा कवी खरा सत्कवी ! ।
एक विषय ठाउका द्विजाला परमेशाला स्तवी ! ॥ ३ ॥

निंदास्तुतिच्या सवद्यासाठीं रचना याची नसे ।
भक्तिरसी हा निमग्न झाला स्फूर्ति देव देतसे ॥
कविता माझी जळो ! मला हा पक्षिराय लाजवी ! ।
"हीच वृत्ति दे !" प्रभुपाशी हें मजकडुनी मागवी ॥ ४ ॥

# पर्वतारोहण

[ उन्हाळ्यात प्रभातसमयींचा वाईपासून पंचगणीपर्यंतचा देखावा यांत वर्णिला आहे. ]

पद—( चाल —नच दृष्टिस पडती ते सज्जन )

प्रिये ! प्रेरणे ! थांब गडे हा पहा लागला गिरी ।
अरसिके धांवसि कां वरिवरी ? ॥ ध्रु० ॥
हळू हळू चल चित्र काढूनी ठवू हृदयांतरीं ।
सखी तें रंगवील वैखरी ॥
पहा पहा हा उभा राहिला भास्कर वेळेवरी ।
बांधुनी मंदिल शिरिं भरजरी ॥
॥ चाल ॥ ही पूर्व दिशा गे गुलाल उधळीतसे ।
ही हंसे, सृष्टि गे पुलकित झाली दिसे ॥
रवि-कर-स्पर्शानें डोळे उघडीतसे ।
पहा पहा हा शकट आपणां घेउनि चढतो वरी ॥
इकडे पर्वत इकडे दरी ॥ १ ॥

हास्य गिरीला सोडुनि गेले ! निर्झर कीं वाळले ।
ग्रीष्में वैर कसें साधिलें ! ॥
रम्य आरसे सृष्टिसतीचे फुटले गे हरपले ।
गिरीचें अंगवस्त्र लोपलें ॥
॥ चाल ॥ हा वैभवनाशें खिन्न दिसेना जरा ।
हा गांभीर्याचा पुंज उभा साजरा ॥
घे यांतुनि थोडें अगा मना पामरा ! ।
पृथ्वीवर हा वसे परंतु सारी दृष्टी वरी ॥
इकडे पर्वत इकडे दरी ॥ २ ॥

नकळे हृदयीं काय परी हा उंच धरीतो शिरा ।
गुरु हा उन्नत दांभिक नरा ॥
न जाणतां मीं उगाच नांवें कां ठेवूं गिरिवरा ।
आंतलें ठाउक परमेश्वरा ॥
॥ चाल ॥ बाहेर दिसे जें ज्ञेय क्षेत्र मानवा ।
नच कांही झांकलें एक सृष्टिच्या धवा ॥
मग कां निंदेनें ही जिव्हा बाटवा !
पर्वतराया ! दुरुत्तराची क्षमा मला ह्या करी ॥
इकडे पर्वत इकडे दरी ॥ ३ ॥
घांट पाट हा जणुं शोभेचा वहात आला दिसे ।
कांची वनदेवीची वसे ॥
शूर शिपाई अपुला म्हणुनी सृष्टी ज्या देतसे ।
असा हा पट्टा गिरिचा असे ॥
॥ चाल ॥ कीं भांग सृष्टिच्या विगलित वेणीतला ॥
कीं अन्तःपट हा गिरि-दरि—युग्मांतला ॥
हा कुंकुम पडुनी ईषदरुण जाहला ।
वर खाली वा जाण्या पथ हा नर—जन्माचे परी ॥ *
इकडे पर्वत इकडे दरी ॥ ४ ॥
रंगदार गालिचे पूर्विचे गुंडाळुन ठेविले ।
जुने हे जागजागिं पसरिले ॥
ग्रीष्म भिकारी घरासि येतां ही सृष्टी यापरी ।
तयाच्या अपमानाला करी ॥
॥ चाल ॥ ही असली बैठक दरींत केली असे ।
कीं मलिन पटाला नेसुनि सृष्टी वसे ।
हीं तुटुनि तोरणें तुकडे पडले जसे ।

लाज कुठें तव ! जा जा ग्रीष्मा ! परत घरीं लौकरीं ॥
इकडे पर्वत इकडे दरी ॥ ५ ॥
प्रिये ! प्रेरणे ! रुसूं नको गे ! थांबविलें तुज जरी ।
'डोंगर दुरुन रम्य' सुंदरी ।
सहज-मनोहर सृष्टी येथें रुसुनी ग्रीष्मावरी ॥
दुःखद रूप असे हें धरी ।
॥ चाल ॥ तरि एकांतीं हिज भेटूं चल मग तुला ॥
समजेल हिच्या गे लावण्याची कला ।
मग म्हणशिल झाला श्रम झाला हा भला ॥
होइन वेडा तें पाहुनि मी सांभाळुनि तें धरी ।
इकडे पर्वत इकडे दरी ॥ ६ ॥

## शुष्क गुलाब

अक्षयतेच्या अलीकडे मज सोडून पैलतटाला ।
गेली माझी भगिनी वत्सर अर्ध जाउनी झाला ॥ १ ॥
चित्र तियेचें स्मृति[1]—मंजूषा उघडून मीं पाहीलें ।
प्रेमाश्रूंचे अंजलि त्याला दहा पांच वाहीले ! ॥ २ ॥
तिनें दिलेला ग्रंथ एक मीं न कळे कां उचलीला ।
नच वाचीला ! परंतु कितिदा उघडीला चाळीला ॥ ३ ॥
मधें तयाच्या विशीर्ण[2] झाला गुलाब दृष्टिस पडला ।
मला आणखी रडवायाला ! आजवरी जो दडला ॥ ४ ॥
हातीं घेउन तयास आधीं खळ खळ अश्रुजलाचे ॥
ओघ सोडुनी मार्ग करोनी दिल्या आपल्या वाचे ॥ ५ ॥

---

१ स्मरणरूप पेटी   २ सुकलेला

वदलों मग मी त्या पुष्पाला “ रंग तुझा पाहोनी ।
लाजत होती उषा ! परी तो गेला तुज टाकोनी ॥ ६ ॥
खरा सखा तो वायु गुलाबा वृक्षलतासुमनांचा ।
जसा असें मी जायापतिंचा त्यांच्या रम्य मुलांचा ॥ ७ ॥
परंतु तोही मनापासुनी तुला विचारित नाहीं ।
जो तव पूर्वी सौरभ कीर्ती दिशादिशांना वाही ॥ ८ ॥
रविनें पूर्वी लांबवुनी कर तुजला कुरवाळावें ।
क्षणोंक्षणीं गालांच्या वर्णा तुझ्या गड्या बदलावें ॥ ९ ॥
सृष्टीनें हिममिषें मनोहर नव मोत्यांची जाळी ।
घालावी तुजवरी हंसावें हर्षें त्वां त्या काळीं ॥ १० ॥
सदा करावें पुढें पुढें तव गाणें तुजला गावें ।
क्षणोंक्षणीं बिलगावें तुजला मधुपें सोडुन द्यावें ॥ ११ ॥
पंख कापती थर थर ! नाहीं शुद्धी निजदेहाची ! ।
मला आठवे कशी स्थिती हो रसलोलुप मधुपाची ॥ १२ ॥
तोच अतां जवळुनी जातसे परी शिवेना तुजला ।
ओळख याची तुझी न केव्हां असेंच भासे मजला ॥ १३ ॥
योग्य न आतां रहावया तूं असत्य अंध जगांत ।
खरोखरी ये ताईसंगें राही मम हृदयांत ॥ १४ ॥
बेत पूर्विचा मम भगिनीचा मजला ठाउक नाहीं ।
दया करी परि ती तुजलागीं येथें ठेउन देई ॥ १५ ॥
उषा वायु रवि मधुप सृष्टि ही अंध जाहली सारी ।
सख्या गुलाबा ! पहिल्यासरिसा रम्य मला तूं भारी ॥ १६ ॥
वेडे म्हणती मम बहिणीला कीं ती गेली मेली ।
खोटें सारें ! ती तर माझ्या हृदयमंदिरीं रमली ॥ १७ ॥

समानशीलीं सख्य तरी ये ताईजवळीं गाहीं ।
सख्या गुलाबा ! प्रीतिस कोठें मरण ऐकिलें नाहीं" ॥१८॥

## माझ्या जन्मभूमीचें नांव

श्लोक—मंदारमाला

सृष्टी तुला वाहुनी धन्य ! माते, अशी रूपसंपन्न तूं निस्तुला ! ।
तूं कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला ॥
ह्या वैभवाला तुझ्या पाहुनियां मला स्फुर्ति नृत्यार्थ होते जरी ! ।
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ॥ १ ॥

माते ! महात्मे तुझे, तत्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवी ।
श्रेणी ययांची सदा माझिया गे मना पूजनीं आपुल्या वांकवी ! ॥
यांची यशें ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी ।
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ॥ २ ॥

तूझ्या महोदार सारस्वताच्या महासागराचा जरी मीन मी ।
झालों, तरी ही तृषा मन्मनाची कधींहा कधींही न होणें कमी ! ॥
आई ! गुरुस्थान अंती जगाचें तुझें ! यांत शङ्का न कांहीं जरी ! ।
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी. तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ॥ ३ ॥

वारा तुझ्या स्पर्शनें शुद्ध झाला, मला लाधला ! भाग्य हें केवढें ! ।
माते ! स्वयें देशि जें अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढें ! ॥
तूं बाळगीशी मला स्कान्धिं अङ्कीं ! सुखाची खरी हीच सीमा पुरी ! ।
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी ! ॥ ४ ॥

---

# ३७ कृष्णाजी केशव दामले

हे कवि इ. स. १८६६ त जन्मले व १९०५ त मृत्यु पावले. हे जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण. हे ' केशवसुत ' या नावानें प्रसिद्ध आहेत. यांनी विविध विषयावर स्फुट कविता केली असून ती 'काव्यरत्नावली,' 'मासिक मनोरंजन' वगैरे मासिकातून प्रसिद्ध आहे. याची कविता सुरस, सरळ व सहृदयानंददायी आहे. याच्या कवितेंत प्रसन्नता विशेष दिसते. निष्ठुर काळाने याच्यावर इतक्या लौकर घाला घातला नसता तर मराठी काव्यवाङ्मयात अधिक महत्त्वाची भर पडली असती.

## वातचक्र

### पद

पर्जन्याचे दिवस उलगले ।
थंडीचेही बरेच गेले ॥
पिकें निघालीं; कारण नुरलें ।
सोंसाट्यानें वहावयाचें; म्हणुनि मरुद्गण खेळांत ॥
मग्न होउनी, चक्रावरतीं ।
आरोहुनि, सांप्रत हे जाती ॥
गरगर गरगर भरभर एका निमिषामध्यें गगनांत ॥ १ ॥

धूळीचे कण असंख्य उठती ।
पक्ष्यांचे पर तयांत मिळती ॥
गवताच्या त्या काड्याहि किती ।
थंडीनें गळलेलीं पर्णें जीर्णें उडतीही त्यांत ।
सृष्टीचा हा असा भोंवरा ।
फिरतो आहे पहा भरारा ॥
गरगर गरगर धरणीपासुनि चढत असे तो गगनांत ॥ २ ॥

वाग्देवी गे ! दे शब्दांतें ।
भोंवऱ्यांत या फेंकुनि, त्यांतें ॥
जरा जाउं दे निजधामातें ।
नरें मिळविलें अहह ! तेज तें पूर्वी होतें जें त्यांत ॥
म्हणुनी शाप न आतां मारी ।
आशीर्वचहि न आतां तारी ॥
तर गर गर गर त्यांस चढूं दे ताजे व्हाया स्वर्गांत ॥ ३ ॥

मीहि कशाला येथ रहावें ? ।
काय असे ज्या मीं चिकटावे ? ॥
वाटे गिरक्या घेत मिळावें ।
या पवनाच्या चक्रीं, होउनि लीन सच्चिदानंदांत ॥
जगत्द्रुमाचें पिकलें पर्ण ।
गलित असे मी अगदीं जीर्ण ॥
तर भर भर भर उडूं द्या मला शब्दासंगें स्वर्गांत ॥ ४ ॥

## दिवस आणि रात्र

दिवस बोलतो, "उठा झणीं !" । रात्र "विसांवा घ्या" म्हणते ॥
या दों वचनीं दिनरजनी । बहुत सुचविती मज गमतें ॥ १ ॥

दिवस सांगतो, "काम करा" । रात्र-"विचारा करा मनीं" ॥
दिवस बोलतो "मरा मरा !" । रात्र-"मजमुळें जा तरुनी" ॥ २ ॥

दिवस वदतसे, "पहा प्रकाश" । आंत शिरतसे परि अंधार ! ॥
रात्र बोलते, "पहा तमास" । परि आंत पडे प्रकाश फार ! ॥ ३ ॥

दिवस म्हणे "जा घरांतुनी" । रात्र वदे "या सर्व घरास" ॥
स्पर्धा लावी दिवस जनीं । रात्र शिकविते प्रीति तयास ! ॥ ४ ॥

नक्षत्रें जगतीवरलीं । दिवस फुलवितो, असे खरें ॥
पुष्पें आकाशामधली । रात्र खुलविते, पहा बरें ॥ ५ ॥
एकच तारा दिन दावी । असंख्य भास्कर परी निशा ॥
दिवस उघडितो ही उर्वी । रजनी अनंत आकाशा ॥ ६ ॥
दिवस जनांला देव दिसे । परि गद्यच त्याच्या वदनीं ॥
रात्र राक्षसी भासतसे । परि गाते सुंदर गाणी ! ॥ ७ ॥
"ही भूमी हा नरक" असें । वदे अदय दिन वारंवार ॥
"ही धरणी हा स्वर्ग असे" । गाते रजनी, जी प्रिय फार ॥ ८ ॥

## नैर्ऋत्येकडला वारा

जे जे वात नभांत या विचरती पुण्यप्रदेशावरी ।
नैर्ऋत्येकडला तयांत वितरी सौख्यास या अंतरी ॥
येतां तो मम चित्त हें विसरुनी प्रत्यक्ष वस्तूंप्रती ।
अर्धोन्मीलित[1] लोचनीं अनुभवी स्वप्नस्थिती मागुती ! ॥ १ ॥
तो वारा मम जन्मभूमिवरुनी येतो जवें वाहत ।
हें माझ्या हृदयांत येउनि सवें मी ठाकतों चिन्तित ॥
माझ्या जन्मधरेचिया मग मनीं रूपास मी आणितों ।
तीचे डोंगर उंच खोलहि नद्या डोळ्यांपुढें पाहतों ॥ २ ॥
मोठे उच्च, शिला किती पसरल्या सर्वत्र ज्यांच्यावरी ।
तुंगें ती शिरलीं यदीय शिखरें तैशीं नभाभीतरीं ॥
आस्वर्गात् चढती सदोदित महात्म्याचीं अशीं मानसें- ।
या दृष्टीपुढते पुनः बघतसे अद्रीश ते हो असे ! ॥ ३ ॥
ज्यांच्या रम्य तटांवरी पसरल्या झाड्या किती सुंदर ।
ज्यांच्या थोर शिलांतुनी धबधबां जाती तसे निर्झर ॥

---

१ अर्धवट उघडलेलें

वाणीचे कवि-दुर्दशा-मधुनियां ते ओघ यावे जसे–।
या दृष्टीपुढते पुनः बघतसें अद्रीश ते हो असे ! ॥ ४ ॥

त्यांचे उंच शिरांवरी विलसती किल्ले मराठी जुने ।
देवी पालक त्यांतल्या मज पुनः धिक्कारिती भाषणें ! ॥
" कोठें पूर्वज वीर धीर तव ! तूं कोणीकडे पामरा ! ।
ये येथें ! इतिहास-पत्र पडलें वाचूनि पाहीं जरा ! " ॥ ५ ॥

जागोजाग विराजती चलजलें पाटस्थलें तीं किती ।
केळी, नारळि, पोफळी, फणस ते, आंबे तिथे शोभती ॥
पक्षी त्यांवरुनी नितान्त करिती ते आपुलें कूजित ।
स्वप्नीं हें बघतां फिरूनि, मन हें होतें समुत्कण्ठित ॥ ६ ॥

जागोजागहि दाटल्या निबिड की त्या राहट्या रानटी ।
ते पाईरहि, खैर, किजळ, तिथें आईनही वाढती ॥
वेली थोर इतस्ततः पसरुनी जातात गुंतून रे ।
चेष्टा त्यांमधुनी यथेष्ट करिती नानापरी वानरें ॥ ७ ॥

जन्मस्थान मदीय सुंदर असें त्या माल्यकूटांतल्या ।
आनंदे वनदेवता मधुर जीं गानें भली गाइल्या ॥
मज्जन्मावसरास, तीं पवन हा वेगे पहा तेथुनी ।
मातें पोचवितो, तयां अपुलिया पंखांवरी वाहुनी-॥ ८ ॥

"गाऊं या ! हृदयांत या अमुचिया प्रीती असे दाटली ! ।
गाऊं या ! हृदयांत या अमुचिया कां स्फूर्ति ही वाढली ? ॥
वाग्देवीसुत जन्मला अपुलिया ग्रामांत, या लागुनी ।
जैजैकार करा, सुगं परिसवा हा मंगलाचा ध्वनी !" ॥ ९ ॥

वेगानें जगदुद्धरा-नदिचिया तीराहुनी वात तो ।
आशीर्वाद मदीय तातजननी यांचे मला आणितो ॥

वात्सल्यास तयांचिया परिसुनी माझ्या मनीं येतसे ।
'तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें' असें ॥ १० ॥

आईच्या नयनांत नित्य मग मी स्वर्गास त्या पाहतों ।
तातांकावरि नित्य मी मग जगद्राज्यासना भावितों ॥
कां हो यापरि वाढलों फुकट मी ? हा- हंत ! मी नष्ट हा ! ।
'तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें' अहा ॥११॥

जन्मा येउनि मी उगा शिणविलें आई ! तुला हाय गे ! ।
ताता भागविलें तुला फुकट मा मत्पोषणीं हाय रे ! ॥
वार्द्धक्यी सुख राहिलें, विसरणें तुम्हांस कोणीकडे ! ।
झालों कष्टद मात्र !-या मम शिरी का वीज ती ना पडे ॥१२॥

पुष्पें वेंचित आणि गोड सुफलें चाखीत बागांतुनी ।
जेथें हिंडत शैशवीं विहरलों निश्चिंत मी तेथूनी-॥
हा वारा ममताप्रसाद मजला आजोळचा आणितो ।
चित्तो विव्हल होत तें स्मरुनि, मी मातामहां वन्दितों ॥१३॥

बंधूचींहि मला तशीं पवन हा आशीर्वचें आणितो ।
चिंताग्रस्त तदीय पाहुनि मुखा अश्रूंस मी गाळितों ॥
भाऊ रे ! तुजलागिं लाविन कधीं मी हातभारा निज ? ।
तूंतें सेवुनि मी सुखें मग कधीं घेईन कां रे निज ? ॥ १४ ॥

श्वासांहीं लिहिलीं, विराम दिसती ज्यांमाजि बाष्पीय ते ।
प्रीतीचें बरवें समर्थन असे संस्पृष्ट ज्यांमाजि तें ॥
कान्तेचीं असलो मला पवन हा पत्रें अतां देतसे ।
डोळे झांकुनि वाचितां त्वरित तीं सम्मूढ मी होतसें ॥ १५ ॥

माझ्या जन्मधरेपुढें दिसतसे वारीश विस्तीर्ण तो ।
त्याचें रम्य तरंगताण्डव पुनः पाहूनि आल्हादतों ॥

जें हृद्रम्य तरंगताण्डव[1] मला तैशापरी वाटतें ।
अब्धेयावरतीं जसें क्षणिक हें अस्तित्व हो खेळतें ॥ १६ ॥
या अब्धीवरतूनि जात असतां बाल्यांत नौकेंतुनी ।
गाणीं जीं म्हटली मला निजविण्या वारिस्थ देवीगणीं ॥
त्यांचे सूर अतां अलौकिक असे जे वात हा आणितो ।
ते ऐकून अहा ! सुषुप्ति चिर ती घ्यायास मी इच्छितों! ॥१७॥
प्रीती या जगतांत कण्टकयुता ही एक वल्ली असे ।
शूलारोपणयूप[2] त्यावरिल ही कीर्तिध्वजा कीं दिसे ॥
तेव्हां या जगती नकोत मजला ते भोग भोगायला ।
वाटे नाटक शोकसंकुल असें जीवित्व हें याजला ! ॥ १८ ॥
देवी सागरिका तुम्ही तर अतां तीं गायनें गाईजे ।
त्यांच्या धुंद अफूगुणें किरकिऱ्या बाळास या आणिजे ॥
निद्रा दीर्घ, जिच्यामधीं न कसली स्वप्नें कधी येतिल ! ।
ती निद्रा निजतां न मन्नयन हे ओले मुळीं होतिल ' ॥ १९ ॥

## रांगोळी घालतांना पाहून

होतें अंगण गोमयें सकलही संमार्जिलें सुन्दर ।
बालार्कें अपुली प्रभा वितरली नेत्रोत्सवा त्यावर ॥
तीची जी भगिनी अशी शुभ-मुखी दारी अहा पातली ।
रांगोळी मग त्या स्थळीं निजकरें घालावया लागली ॥ १ ॥
आधी ते लिहिले तिनें रवि-शशी, नक्षत्र-माला तदा ।
मध्यें स्वस्तिक रेखिलें, मग तिने आलेखिलें गोष्पदां ॥
पद्में, बिल्वदळें, फुलें, तुळसही, चक्रादिकें आयुधें ! ।
देवांची लिहिलीं,-न तें वगळिलें जें चिन्ह लोकीं सुधें ॥ २ ॥

---

१ लहरींचे नृत्य २ वधस्तंभ

होती मंजुल गीत गात वदनें अस्पष्ट कांहीं तरी ।
गेला दाटुनि शांत तो रस अहा तेणें मदभ्यंतरी ॥
तीर्थें, देव, सती, मुनी, सुनृपती, देवी तशा पावना ।
अंतर्दृष्टिपुढूनियां सरकल्या संतोष झाला मना ॥ ३ ॥

चित्रें मीं अवलोकिली रुचिर जीं, काव्यें तशीं चांगलीं ।
त्यांही देखिल न स्मरेच इतुकी मद्वृत्ति आनंदलीं ॥
लीलेनें स्वकरें परंतु चतुरे तूं काढिल्या आकृती ।
त्या ह्या पाहुनि रंगली अतिशयें आहे मदीया मती ॥ ४ ॥

रांगोळीत तुझ्या विशेष गुण जो आर्ये! मला वाटतो ।
स्पष्टत्वें इतुक्या अशक्य मिळणें काव्यांत चित्रांत तो ॥
स्वर्भू–संग असा तयांत इतुक्या अल्पावकाशी नसे ।
कोणी दाखविला अजून, सुभगे! जो साधिला तूं असे ॥ ५ ॥

आदित्यादिक आकृती सुचविती दिव्यत्व तें उज्ज्वल ।
तैसें स्वस्तिक सूचवी सफलता धर्मार्थकामांतिल ॥
पावित्र्याप्रत गोष्पदें तुळस ही, शोभेस ही सारसें ।
पुष्पें प्रीतिस, चक्र हें सुचवितें द्वारीं हरी या असे! ॥ ६ ॥

तत्वें मंगल सर्व ही विहरती स्वर्गीं तुझ्या या, अये ।
आर्ये! तूं उपचारिकाच गमसी देवी तयांची स्वयें ॥
नातें, स्नेह, निदान ओळख जरी येथें मला आणिती ।
होतों मी तर पाद सेवुनी तुझे रम्य स्थळी या कृती ॥ ७ ॥

चित्तीं कल्मष ज्याचिया वसतसे ऐशा जनालागुनी ।
या चिन्हांतुनि हा निषेध निघतो आहे गमे मन्मनीं ॥
"जा मार्गें अपुल्या, न दृष्टि कर या द्वाराकडे वांकडी ।
पापेच्छूवरि हें सुदर्शन पहा आणील कीं सांकडी" ॥ ८ ॥

"आहे निर्मल काय अंतर तुझें? मांगल्य कीं जाणसी?।
लोभ-क्षोभ-जयें उदात्त हृदयी व्हायास कां इच्छिसी ॥
ये येथें तर, या शुभाकृति मनीं घे साच अभ्यासुनी"।
आर्यें स्वागत हें निघे सरल या त्वल्लेखनापासुनी ॥ ९ ॥

साध्याही विषयांत आशय कधी मोठा किती आढळे।
नित्याच्या अवलोकनें जन परी होती पहा आंधळे!॥
रांगोळी बघुनी इतःपर तरी होणें तयीं शाहणे।
कोठें स्वर्ग–समक्षता प्रगटते हें नेहमी पाहणें ॥ १० ॥

## सृष्टि आणि कवि

मी एकला फिरतसें बहुवार रानीं। यालागुनी न समजा मजला अडाणी ॥
आराधुनी विपिन-दैवत मी तिथूनी। त्याचीं प्रसाद-वचनें मनुजांस आणीं १
पाहूनि निर्झर, उरी कर वेंगुनीयां। मी ठाकतों, परि न मंद म्हणा जना या ॥
प्रत्येक मेघ वरता फिरतां नभांत। एकेक शब्द लिहितों मग पुस्तकांत ॥२॥
'पुष्पं वनांत कसलीं खुडितो फिरोन।' उद्योगमग्न जन हो मज हें म्हणा न ॥
नक्षत्रसें सुम मदीय करांतलें तें। सत्कल्पनापूरित असें सदनास येतें ॥३ ॥
पुष्पांमधें प्रगट होय न जें जराही। सृष्टींत एकहि रहस्य असें न कांहीं ॥
ज्याचा ध्वनी न उमटे खगकूजितांत। नाहीं निगूढ इतिहास असा जगांत ४
शेतांमधूनि सदनाप्रत पीक एक। नेतात पुष्ट बलिवर्द तुझे सुरेख ॥
तूझी जमीन दुसरें मज पीक देते। काव्यांत सांठवुनि ठेवितसें पहा तें ॥५॥

## कांट्यावांचुनि गुलाब नाहीं

कांट्यावांचुनि गुलाब नाहीं हें धर हृदयीं साच ॥
नैराश्याचा मग तुजला तो होइल न कधीं जाच ॥ १ ॥

सुखदुःखें हीं निश्चित ऐशीं असती नित्य जगांत ॥
सुखाकारणें झटतां पडतें दुःख पहा पदरांत ॥ २ ॥

छायेवांचुनि कधीं प्रभा ती कुणी पाहिली काय ? ॥
चित्र होतसे, जेव्हां छाया प्रभेस मिळुनी जाय ! ॥ ३ ॥

स्पृहणीय असें काय जगीं या एक असे ?–तर प्रीत ॥
हृदयभेदकर फार काय हो ?–तर तीच हें खचीत ! ॥ ४ ॥

अविकृत ऐसें नसेचि कांहीं, विकृतिरूप संसार ।
ओळखुनी हें सोडुनि देईं शोक दुःख अनिवार ॥ ५ ॥

## सिंहावलोकन

मुखा फिरवुनी जरा वळुनि पाहतां मागुती ।
कितीक हृदयें वदा चरकल्याविणें राहती ? ॥
'नको वळुनि पाहणें' म्हणुनि दृग् जरी आवरूं ।
धुकें पुढिल जाणुनी मन न घे तसेही करूं ॥ १ ॥

प्रदेश किति मागुते रुचिर ते बरे टाकिले ? ।
कितीक तटिनीतटें, श्रम जिथें अम्ही वारिले ? ॥
किती स्मृतिस धन्यतास्पद वनस्थली राहिल्या ? ।
जिथें धवलिता निशा प्रियजनासवें भोगिल्या ॥ २ ॥

सुखें न मिळतील तीं फिरुनि !–तीं जरी लाविती ।
मनास चटका, तरी नयन त्यांवरी लोभती ॥
परंतु हृदयास जे त्वरित जाउनी झोंबती ।
प्रमाद दिसतां असे नयन हे मिटूं पाहती ॥ ३ ॥

किती घसरलों !–किती चुकुनि शब्द ते बोललों ।
किती अनुचितामुळें पतित हाय हो जाहलो ! ॥
स्वयें बहकुनी उगा स्व–जन–मानसें टोंचिलीं ! ।
वृथा स्व-जन–लोचनी अहह आंसवें आणिलीं ! ॥ ४ ॥

चुकूनि घडलें चुको; परि "असें नव्हे हें बरें"।
वदूनिहि, कितीकदा फिरुनि तेंच केलें बरें॥
म्हणूनिच अम्हां पुढें घन तमिस्र सारें दिसे।
पुढे उचलण्या पदा धृति मुळींहि अम्हां नसे!॥ ५॥
'चुकी भरुनि काढणें फिरुनि हें घडेना कधीं'।
असें प्रकट होतसें अदय सत्य चित्तामधीं!॥
म्हणूनि अनिवार हें नयनवारि जे वाहतें।
असे अहह! शक्त का कवणही टिपायास तें?॥ ६॥

---

# ३८ चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे

हे कवि शके १७९२ या वर्षी नाशिक येथे जन्मले. हे जातीचे यजुर्वेदी ब्राह्मण. रोजगाराच्या निमित्तानें हे बडोदे संस्थानात आले मराठी प्राथमिक शिक्षण आटो-पल्यावर यानी काही वर्षे बडोद्यास व नंतर पुण्यास प्रवेशपरीक्षेपर्यंत इंग्रजी अभ्यास केला परंतु पुढें घरगुती अडचणीमुळे यास नोकरी पतकरणे भाग पडलें. हे हल्लीं बडोदे येथे चीफ मेडिकल ऑफिसरच्या कचेरीत कारकून आहेत.

यानी 'सोमनाथ,' 'खर्ड्याची लढाई' व 'कवितारति' अशीं तीन मोठीं काव्ये केली असून, शिवाय लहानमोठी पन्नासावर काव्ये केली आहेत, व ती बहुतेक 'करमणूक,' 'मासिक मनोरंजन' वगैरे पत्रातून प्रसिद्ध झाली आहेत, व त्यापैकीं बरीचशी प्रसिद्ध आंग्ल कविताच्या आधारानें रचलेली आहेत. याची भाषा प्रौढ, संस्कृतशब्दप्रचुर असूनही सरळ, सुबोध आणि रसाळ आहे. याची काव्यकृति घोंटीव व फार टापटिपीची असून रसालंकारयुक्त व हृदयंगम आहे. याच्या कवितेत प्रसाद व औत्सुक्य हे गुण विशेष आहेत.

## घनागमनोत्कंठा

कदा नवजलें तुझीं वरसतील पृथ्वीप्रती!।
कदा नदनद्यांतुनी उचमळोनि तीं धांवती!॥

कदा तरि वन-स्थली चमकतील पाचेपरी !।
जलार्द्र पवनें कदा डुलति रे तरूवल्लरी ! ॥ १ ॥

सु-तुंग-गिरिच्या शिरी सजल मेघमाला कदा।
करोनि अवलंबना वरसतील धोधो सदा ! ॥
कुडे, पळस, कंदली विविध जातिच्या औषधी ।
तुवां सतत न्हाणितां हरितशा बघें मी कधी ! ॥ २ ॥

कड्यावरुनियां उड्या धडधडा पयें टाकिती ।
करोनि गुरु-गर्जना निकट-देश नादाविती ॥
दुधापरि जलौघ ते मज पहावयातें कदा ।
उदंड मिळतील गा फिरुनियां उदारांबुदा ! ॥ ३ ॥

वना उपवनांतल्या भिजुनि भूमि वर्षाजलें ।
तयांवरुनि सांचती चहुंकडे कदा पल्वलें ! ॥
यथेष्ट जल त्यांतलें पिउनि, पूर्ण आनंदुनी ।
विनोदपर केधवां निघति दर्दुरांचे ध्वनी ! ॥ ४ ॥

प्रसन्न तरु-कोटरी कुणि तदीय शाखांवरी ।
विहंग जणु न्हाउनी बसति हर्षुनी अंतरी ॥
पिसें करिति चंचुनीं विमल, सुस्वरें कूजती ।
असे खग, असे तरू, मज पुन्हां कदा दीसती ! ॥ ५ ॥

कदा बकुल, चंपही, फुलुनि केतकी, मोगरे ।
गुलाब, निशिगंध, तद्विविध गंध तो विस्तरे ! ॥
प्रसन्न कमले कदा निज पराग ती गाळितीं ।
कदा मधुप तन्मधू लुटुनि घ्यावया धांवती ! ॥ ६ ॥

कदा बहर येउनी विपुल पारिजातांवरी ।
तदीय मधुगंध तो दरवळेल रे अंबरीं ॥

तदीय सुमनास्तरें हरित भूमिका झांकतां।
फुलें टिपुनि ध्यावया निघति केधवां योषिता ! ॥ ७ ॥

नवीन तृण खाउनी, तव नवामृत प्राशुनी।
रवंथ करिती सुखें हिरवळीवरी बैसुनी ॥
सुतुंदिल[1] वपू असे वृषभ, धेनुही वत्सला,।
फिरोनि मिळतील गा कधि तरी बघाया मला ! ॥ ८ ॥

अकिंचन कृषीवलां मिळुनियां तगाई-धनें।
तसें वृषभ, बीज, ही कृषि करावया साधनें ॥
फिरोनि इरलीं शिरी गरम घोंगड्या घालुनी।
स्वकर्मरत ते असे कधि बघेन शेतांतुनी ! ॥ ९ ॥

यदा मग कमोद ते लवुनि आपुल्या लोंगरें।
प्रमोद-कर मानसा वितरतील आमोद रे ! ॥
अनेकविध शस्य[2] तें चहुंकडेहि जोमावुनी।
तये नयनरम्यही फिरुनि हो यदा मेदिनी ॥ १० ॥

फिटेल अमुची तदा सकळ पांग, जी संप्रती।
अम्हांस बहु वृश्चिका-सदृश दंशुनी जाचिती ! ॥
स्वबंधुजन सर्व हा प्रगतिच्या पथा लागुनी।
स्मरेल सुख सेवितां त्वदुपकार रात्रंदिनीं ॥ ११ ॥

तरी अयि दयानिधे जलधरा ! अतां सत्वरी।
सुखप्रद अम्हांवरी सतत साउली तूं करीं !
करीं अमृतवृष्टि तूं लवकरी धरित्रीवरी !।
तुझ्याविण कुणी नसे इतर, जो अम्हां उद्धरी ! ॥ १२ ॥

मयूर जयघोष हे बघ तुझा करूं लागले !।

---

१ पुष्ट २ पीकें, पिकलेले धान्य

अनाथ निजलोचनी स्त्रवति शीतलाश्रू--जलें ! ॥
समस्त जन चातकापरि घना, तुला पाहतो ! ॥
उदीरित जयस्वनें गगनमंडपी वाहतो ! ॥ १३ ॥

## कुञ्जकूजन

कृष्णपक्षींचा चंद्र कलाहीन । पश्चिमेच्या क्षितिजांत होय लीन ॥
भागलेला जणु जरठसा प्रवासी । लागलाहे खालतीं बसायासी ॥ १ ॥
दीर्घसूत्री ती रात्र चंद्रजाया । पूर्वगोलातें त्यजुनि निघे जाया ॥
उदयसंधी येतांच आळशानें । स्वयें तंद्रा सोडोनि जशी जाते ॥ २ ॥
बालदिनकर तो उदयगिरिशिराला । प्रयासानें आरूढ जणों झाला ॥
मृदुल दुलईसम धवल धुकें त्यानें । निजकरांहो सारिलें आळसानें ॥ ३ ॥
अरुणकिरणें मंदोष्ण तयाचीं तीं । पडुनि, आकाशीं लाल छटा देती ॥
प्रेमरंगें जणु बाळरविचितारी । किरणकलमांनी गगनपट चितारी ॥ ४ ॥
सुखद त्याचें तें उष्ण पसरताहे । तरिहि कमती हेमंतशीत नोहे ॥
असुनि अर्थोष्मा, जेविं लोभियाचें । दैन्य म्हणुनी कधिंही न जावयाचें ॥५॥
अजुनि ठेवुनि निज गाल गालुशीतें । बिछान्यांतचि असतील आळशी ते ॥
अशा समयीं मधुमधुर ह्या रवानें । आळवितसे हा कोण गौरवानें ॥ ६ ॥
कुठुनि येते ही शब्दसुधाधारा । हिनें भरिला की निकट भाग सारा ॥
अहो ! बघताहें चकित लोचनांहीं । उगम हीचा तरि दिसत मला नाहीं ॥७॥
कोण तूं गा कोठील कवणियाचा । कुठें आहे तव वास वसायाचा ॥
कुठें केला अभ्यास गायनाचा । कोण झाला गुरुराय तुज तयाचा ॥ ८ ॥
असासि कलरव कीं काय सतारीचा । दिव्य सुस्वर कीं अमरसुंदरींचा ॥
मूर्तिमंतचि कीं सामवेद साचा । सांग मजला तें सांग सुधावाचा ॥ ९ ॥
जिच्यामाजीं प्रतिबिंब तुझें राहे । वस्तु लोकीं कोणती अशी आहे ॥
सरसहृदयीं मेघ तो स्वातिचाही । तुझ्या सरिचा जरि म्हणुं तरी नाहीं ॥१०॥

कर्णरूपी उघडिल्या शिंपल्यांत । वचनबिंदू जे तुझे उतरतात ॥
अमित सोज्ज्वलसे तयांचिये पाणी । रुचिर मोत्यासी गौणताच आणी ॥११॥
वेणुनादें माधवें मधुवनांत । ब्रह्म बिंबवुनी प्रणयिजनमनांत ॥
परमहर्षाचा परम लाभ त्यांतें । करुनि दिधला, ऐकोनि ठाउकें तें ॥ १२ ॥
परी त्याची अनुभूति मला नाहीं । न हो किंबहुना मना कल्पनाही ॥
आजि तूझ्या परिसोनि गायनातें । किमपि त्याचें अनुमान मला होतें ॥१३॥
काळसर्पाहुनि जे महा विखारी । असे दुर्जन, त्यांनाहि जिंकणारी ॥
चंद्रमणिसम रसिकांस झरविणारी । होय वाणी तव अमृतगर्वहारी ॥१४॥
पहा ! विस्मय चहुंकडे प्रसारीत । गाढ जिज्ञासा रसिकमनिं भरीत ॥
उष्णसंगें अनुराग संचरीत । गिरा विचरे ही पवनलकेरीत ॥ १५ ॥
उदासांचें औदास्यतम हरोनी । निराशांचें नैराश्य निवारोनी ॥
व्यथितहृदयांची व्यथा शांतवोनी । विलसते ते उल्हास उपजवोनी ॥१६॥
तरी अद्भुतरस असा निर्मिणारा । सरस मानस उचमळुनि आणणारा ॥
हेंच नंदनवन करुनि दाविणारा । कोण अससी तूं दिव्य गुणागारा ॥१७॥
गुच्छ जैसा काश्मीरगुलाबाचा । हरितपर्णामधिं गुप्त असे साचा ॥
तरी परिमळ चहुंकडे तयाचा तो । दरवळोनी रसिकांस मोहवीतो ॥१८॥
लपुनि कोठेंतरि विहंगमा तैसा । नादसंगम वितरोनि मधुर ऐसा ॥
गड्या मजला तूं वेड लावियेलें । तरी सांगे त्वां गेह कुठें केलें ॥ १९ ॥
असाधारण गुण असुनि असा अंगीं । कासया तूं बैससी गूढ जागीं ॥
वसत असतां कीं नित्य विजनवासी । येत आहे थोरवी गुणिजनांसीं ॥२०॥
दिव्य तेजोवलयांत विचाराच्या । लीन होउनियां कवी, सुधावाचा ॥
वदे नैसर्गिक काव्य, तसा तूंही । गासि गायन हें विस्मयप्रवाही ॥ २१ ॥
काव्य तूझें ज्यांतोनि उगम पावे । विषय लोकीं ते कोणते असावे ? ॥
लोलसलिलें कोणतीं उपवनें तीं । माळ, किंवा कोणत्या शैलपंक्ती ? ॥२२॥
रम्य देखावे नभोमंडलाचे । प्रेम किंवा तूझिया प्रियजनाचें ? ॥

अपरिचय की संसारविपत्तीचा। उगम आहे या काव्य निर्झरीचा ? ॥२३॥
अगा गंधर्वा ! अगा विहगराया ! । चित्तचातक हा आत्मवश कराया ॥
तुझ्या हृदयी कोणते तरि विचार। असति हृदयंगम जेहि काव्यसार ॥२४॥
ठाउका जो आनंद तव मनाला। लेश त्याचा देशील काय याला ॥
शिकवि शिकवी तव शब्दमोहिनी ते। ह्याहि जिव्हेतें सहजकर्कशेतें ॥२५॥
अरे! इतुक्यांतचि मौन असें कां हें। तुवां धरिलें? हें उचित तुला नोहे ॥
असुनि कवि मी तुज करित विनंती ही। आविनयें कां अवमानितोस तीही ॥
होय तूझा व्यवसायबंधु गा मी । सततवाङ्मन मी रसिकजनलगामी ॥
बघुनि तूझा गुण दिव्य, निरभिमानी। करी विनती ती सुजनपणे मानीं ॥२७॥
गुणविहीना गुणमणी गमति कांचा। गुणी हेवा करितात गुणिजनांचा ॥
परी गुणवान् गुणिजनांचा चहाता। विरल विरलचि तो सरलजन पहातां ॥
लक्ष पक्षी लक्षिले आजवेरी। रंगरूपें शब्देंहि मनोहारी ॥
परी करणारा यापरि बहारी। नाहिं नाही कुणि कुंजवनविहारी ॥ २९ ॥
अगा गंधर्वा ! तरी लताऽगारी। छेडि छेडी तूं फिरुनि रागदारी ॥
तिच्या श्रवणाचा, तुझ्या दर्शनाचा। लाभ झाल्याविण मी न हलायाचा।३०।
हाच वाङ्मधु हृदयांत सांठवीन। काव्यरूपें रसिकांस पाठवीन ॥
तरी तव ते बहुमोल बोल बोल। देइं दर्शन दृष्टीस या विलोल ॥ ३१ ॥
अहो ! परि हा भ्रम काय मला झाला। प्रार्थिताहें मी काय हें कुणाला ॥
वनेचर जो स्वातंत्र्यसुधास्वादी। कासया तो राहील मम उपाधी ॥ ३२ ॥
काय म्हणुनी शिकवील मला हा तो। आणि शिकवोनी काय कवी होतो ॥
कदा नोहे !-रससिद्ध कवी जो की। स्वयंभू तो अवतरत असे लोकीं ॥३३॥
स्वयं काव्यस्फूर्तीस पावणारा। स्वयं नादब्रह्मांत गुंगणारा ॥
शब्दसृष्टीचा चतुर विधाता तो। जगन्मोहन या खगापरी गातो ॥ ३४ ॥
कुठें वाणी या कुंजकूजनाची। कुठें माझी वैखरी खरतराची ॥
कुठें निर्मल जीवंत झरा तीचा। कुठें कर्दम मत्काव्यपल्वलींचा ॥ ३५ ॥

कुठें त्याचें निश्चिंत अंतरंग। कुठें माझे दुर्मनो—मनोभंग ॥
कुठें त्याचा स्वातंत्र्यवनविहार। कुठे जीवित परतंत्र हें असार ॥ ३६ ॥
निराशेनें जाहलों उदासीन। कवित्वाचा मद होय मनीं लीन ॥
गमे सारें जग जीर्णवन मला हें। ज्यांत एकचि मी जीव वृथा आहें ॥३७॥
अहो! इतुक्यामधि काय नवल झालें। प्रेम-बिंबचि की भानुचें-उदेलें ॥
आणि तेणें निमिषांत उपवनाला-। नव्हे!-आलें चैतन्य या जगाला॥३८॥
हृदयरूपी जो प्रेमकोश त्यातें। व्यक्त करुनी जणुं सर्व सहृदयांतें ॥
जडांलाही चैतन्य द्यावयाला। कुंजकूजन लागला गावयाला ॥ ३९ ॥
जसा त्याचा रव कर्णमनोहारी। तसा होई प्रतिरवहि सभोंवारी ॥
जणों उपवनही कुंजकूजनाचें। असुनि नादब्रह्मांत लीन नाचे ॥ ४० ॥
धन्य अससी तूं कुंजकूजना गा। गाइं गाई निजगान महाभागा ॥
तुझ्या गानें होईल खलभुजंग। वशहि तरि तो मग कां न रमारंग ॥४१॥
पंचमांतिल आलाप कोकिलांचे। नादसंयोगहि तंतुवादनांचे ॥
काव्यमकरंदहि महाकविजनांचे। वृथा येथें जाहले वृथा साचे ॥ ४२ ॥
परमसीमा ही दिव्य माधुरीची। मनुजवाणीतें कधि न कळायाची ॥
स्वाद हीचा रसिकांस जरी व्हावा। तरी त्यांनीं रव हाच आयकावा॥४३॥
जें जें निसर्गरमणीय म्हणोनि कांहीं। निर्माण होउनि जगीं विलसोनि राही॥
सौंदर्य तें नयनगोचर होय साचें। अज्ञेयशा भुवनसुंदर ईश्वराचें ॥४४॥
विश्वास ठेउनि मनांत असा विवेकें। विश्वास जे निरखिती प्रणयातिरेकें॥
तद्वैभवी असति लीनहि कौतुकानें। त्यांनाच ही कृति समर्पण आदरानें।४५।

## कविता—रति

अये कवि[1]-मनो-भवे! सहज-संभवे! स्वामिनी।
सु[2]-वर्ण-मय-देहिनी! नव-रसात्मके! भामिनी ॥

---

१ कविमनामध्यें उत्पन्न होणारी २ सुंदर रूपवती, श्लेषानें, सुंदर शब्दानी मंडित

प्रसाद[3]-मय-जीविते ! अनुविचार[4]-संचारिणी ।
चमत्कृति-विलासिनी ! रसिक-सन्मनो-हारिणी ॥ १ ॥
यदा भगवती गिरा परम मंजु वीणागुणां ।
स्वयें चलन देउनी करितसे तवाऽवाहना ॥
यदा मधुर साम तो म्हणति सर्व गंधर्व ते ।
मनोहर सुरांगना-वलय तें यदा नाचतें ॥ २ ॥
अशेष तव वैभवें करुनि वेद—पारायणा ।
यदा स्तवितसे विधी किमपि आदि—नारायणा ॥
यदा स्वरतरंग हे मिळुनि एकमेकांमधी ।
प्रसार बहु पावतो तव अनन्य नादांबुधी ॥ ३ ॥
यदाहि कविते ! तुझी परम माधुरी यापरी ।
उचंबळुनि राहते सकल देवलोकान्तरीं ॥
तदा त्यजुनि आपुली सहज-योग-निद्रा हरी ।
प्रसन्न नयनीं सुरांवरि सुधाभिषेका करी ॥ ४ ॥
अगम्य तनुवाङ्मनाप्रति असे जगन्नायक ।
असा निगम[5] गाति ते सुरपुरींतले गायक ॥
तथापि कविते ! प्रभू वशहि कीर्तनें जाहला ।
न कीर्तन तुझ्याविणें म्हणुनि साध्य तो तूजला ॥ ५ ॥
तुझी पडुनि मोहनी अवतरेहि साकार तो ।
स्वदासजन तारितो, खल अशेष संहारितो ॥
अये ! सकळही भयें चळचळा जया कांपती ।
करी वश अशा शिवा तुज मुळेंच लंकापती ॥ ६ ॥

---

३ प्रतिभागुणानें परिपूर्ण आहे जीवित जिचे अशी ४ विचारामागून तदनुसार उद्भव पावणारी ५ वेद

न मोहबल चालतें लवहि ज्या त्रिमूर्तींवरी ।
वशीकरण त्यांजला करिसि तूं जरी यापरी ॥
तरी मग अम्हां जनांप्रति अनेक मोहाकुलां ।
तुवां स्ववश केलिया नवल काय ! सांगे मला ॥ ७ ॥

प्रसाद घडतां तुझा, सहज नाभि-मूळांतुनी ।
अनन्य लहरी उठे, तनुस टाकि ते व्यापुनी ॥
तिच्या प्रसरणासवें सकल देह हेलावतो ।
क्षणैव चपलौघ कीं जणुं शिरांतुनी धांवतो ॥ ८ ॥

मुखामधुनि एकदां गद्‌गदा तदा ये ध्वनी ।
स्वयें उचमळोनि ये हृदय, नीर ये लोचनीं ॥
न काव्यविषयाविना इतर भानही राहतें ।
रसात्मक पदावली मग मनोहरा वाहते ॥ ९ ॥

करोत करणार ते किमपि जल्पना यावरी ।
रसज्ञ कविबंधु तो अनुभवील हें अंतरीं ॥
परंतु अनुभूति ही मजसि तीन वर्षें नसे ।
अहा ! प्रियजनावरी प्रियजनें रुसावें कसें ! ॥ १० ॥

तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला ।
तुझ्यास्तव न तीं पदें उपपदें मिळाली मला ॥
तुझ्यास्तव हुजूरचा जरी गुलाम झालों स्वतां ।
तुझ्यास्तवचि गांजलों तरि निबंधनातें अतां ॥ ११ ॥

तुझ्यास्तव न लोभतां विभवमार्ग मी टाळले ।
तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले ॥
तुझ्यास्तवचि हेलना मम गृहावधानीं घडे ।
तुझ्यास्तव जनाहुनी विजय हा मला आवडे ॥ १२ ॥

तुझ्यास्तव तुझ्यापरी मृदुलदेहिनी गेहिनी ।
अनेक समयीं दिली ढकलुनी, अये मोहिनी ॥
तुझ्यास्तव जुमानिलें नहि सुबंधु नारायणा ।
सदा न सदुपासिलें किमपि सूर्यनारायणा ॥ १३ ॥

निशा दशदिशांसही गवसणी यदा घालिते ।
सुषुप्ति निज मोहनी स्थिरचरांवरी टाकिते ॥
प्रशांत समयीं अशा भ्रमसि जेथ लीलावती ।
अतंद्रिताचि तेथ हा अनुसरे तुझा सोबती ॥ १४ ॥

मुठींत नवती[६]-मिषें कनकवाळुका वाळिली ।
परंतु तुजसंगतीं रमुनि तीहि म्यां गाळिली ॥
अशाहि अहितामुळें मन न भंगलें, रंगलें !-।
सदा तव समागमीं गमलिं जंगलें मंगलें ॥ १५ ॥

शरीरसुख सोडुनी, विभवपाश ते तोडुनी ।
निजात्ममन मोडुनी, अहित सर्वदा जोडुनी ॥
तुझ्या प्रणयबंधनीं सतत गुंतुनी जो बसे ।
रुसोनि कविता सखी ! विमुख त्यास व्हावें कसे ॥ १६ ॥

तुझें स्मरण होतसे मजसि राहुनी राहुनी ।
उदास मन जाहलें विरह साहुनी साहुनी ॥
तुझें श्रवण मीं करीं मनन, घेतला ध्यास ना ! ।
त्वदन्य हृदयेश्वरी ! मम जिवास ना वासना ॥ १७ ॥

किती दिवस आणखी तळमळूं तुझ्या कारणें ? ॥
वियोगविष पाजुनी उचित कां मला मारणें ? ॥

---

६ तारुण्य

नको करूं नको असें ! सकल संग मी त्यागितों ।
प्रसन्न परि हो मला ! वर अनन्य हा मागतों ॥ १८ ॥
तुझा प्रणयभानु हा प्रखर या क्षणीं जाहला ।
मनोघन तयामुळें सरसरां स्रवूं लागला ॥
सतेज रसबिंदु ते हृदयशुक्तिनें झेलले ।
जिवा म्हणुनि धीवरें मज दिलीं सुमुक्ताफळें ॥ १९ ॥
फिरे कलमवज्र[७] हें वचनमौक्तिकांच्या वरी ।
मयायुगुण[८] गोवुनी बनवितों तयांच्या सरी ॥
अशा सरस छालितों तुजसि मी सरींच्या सरी ।
प्रसाद परि सुंदरी ! मजवरी करीं गे करी ॥ २० ॥
अहा ! भ्रम-परंतु हा भ्रम अगाध-कां हो मला ।
न पूर्व-कवि-सत्कृती स्मरति कां मला सोज्ज्वला ? ॥
तया कृतिमिषें पहा किति अलंकृतींनीं भलें ।
सुरम्य कवितावपू नखशिखान्त हें शोभलें ॥ २१ ॥
कचांवरि तिच्या पहा ! कविवरेण्य मुक्तेश्वरें ।
किती वचनमौक्तिकें रुचिर गुंफिलीं ही बरें ! ॥
भ्रमें-प्रणयसंभ्रमें मणि ललाम हा मानुनी ।
समर्थकृत बोध ती निज शिरास घे बांधुनी ॥ २२ ॥
प्रसिद्ध रघुनाथ ह्या रसिक पंडितानें तिला ।
नवादिरस घोटुनी तिलक लाल हा लाविला ॥
सुनील कमलप्रभा, अलिविलास, ही वामनें ।
दिली नयनमंडनें रचुनि कृष्णलीलांजनें ॥ २३ ॥
श्रुतींमधुनि घातलीं परम दिव्य देव–द्वयें[९] ।

---

७ लेखणीरूप शायडी ८ माझें आयुष्य हीच दोरी ९ ज्ञानदेव व नामदेव

स्वकाव्यमणिमंडनें, झळकती किती तीं स्वयें ॥
नथ ग्रथुनि घालितां वचनमौक्तिकें श्रीधरें।
किती सरल नासिका विलसते मुखश्री बरें !! ॥ २४ ॥

स्वकीय परमामृतें-नहि[१०] परंतु-मंदस्मितें।
मुकुंद कवि भूषवी विशद कुंदसे दंत ते ॥
सुवर्णमणि, पोतही मधुनि कृष्णभक्तीमिषें।
गळेसरचि बांधिले अढळ एकनाथें कसे ॥ २५ ॥

विराजति गळयांत ह्या किति अभंग-चंद्रावली।
जयांतुनि तुका-यशो-धवल-चांद्रिका फांकली ॥
न संतचरितें महीपति हिला भरी कंकणें।
सुवृत्त-मणि बंधनीं असुनि कां तयां शंकणें ॥ २६ ॥

अहो, सगनभाउनें, रसिकराज होनाजिनें।
दिली इजसि मंदिली विरल कंचुकी प्रीतिनें ॥
सुवर्ण जरिची बुटें, यमक गोल कल्लोलसे।
मयूरकविचा न हा कृतिकलाप, शालू असे ॥ २७ ॥

कटीस कटिबंध[११] ही जडित मेखला आयती।
यतीहि झुलवावया अमृतराय दे काय ती ? ॥
किती श्रुति-मनो-हरा रसिक रामजोशी कृती।
कृती न कविते ! तुझी करिति नूपुरें झंकृती ॥ २८ ॥

पुरातन अतां कुणी असती जे मराठी कवी।
तदीय रचनांस मी समजतों मुद्या जोडवी ॥
अशा कविगणें जिला सजविली स्ववाग्भूषणें।
तिला वचनभूषणें मम नव्हेत, ही दूषणें ॥ २९ ॥

---

१० मुकुंदराजकृत परमामृत नामक ग्रथानें ११ अमृतरायकृत कटिबंध

असोत; जरि दूषणें, तरिहि तीं करीं धारण।
पुराण कविनी तुला नटविली असाधारण॥
म्हणोनि वरवर्णिनी! तुजसि दृष्ट लागेल कीं।
न तीं वचन लांछनें मम कदापि होई सखी!॥ ३०॥

## कारंजें

हें अवलोकुनि कारंजें॥ गा हृदया! रसिका रंजें॥ ध्रु०॥
रवि-प्रकाशा-माझारीं। याचे तेजोमय वारी॥
चमके मुकेच गगनाचे। घ्याया थै थै जणुं नाचे॥ हे०॥ १॥
पडुनि चंद्रिका यास करी। धवल हिमाहुनि नवलपरी॥
विलसनि किति ह्या जलधारा। शुद्ध रुप्याच्या जणुं तारा॥ हें०॥२॥
ह्या बिंदूंचे तों होती। गोल अमोल विमल मोतीं॥
हंसोत अथवा जवाहिरें। मी तों म्हणतो यांस हिरे!॥ हें०॥ ३॥
होतां जल पवनाकुल तें। फूलचि जणु डुलतें झुलते॥
न दिसो तमांत तारांनी। उमगे मंजु तुषारांनी॥ हे०॥ ४॥
सततोत्साहें आनंदें। उडतें पडतें निज छंदें॥
पडुनिहि उंच उडायाला। याला श्रम न कदा झाला॥ हें०॥ ५॥
सुदिनदुर्दिनीं उल्हासें। हांसे सम सुंदर भासे॥
खालीं वरती सतत गती। गती विराम तया मग ती॥ हें०॥ ६॥
शील करी जें तद्घटना। ना तें शक्यचि आकलना॥
शाश्वत अशाश्वती ज्याला। तीच शाश्वती गम त्याला॥ हें०॥ ७॥
स्पृहावंत जरि निरंतरीं। तरीहि निस्पृह निरंतरी॥
तमें तमोमय हें असतें। तेजें तेजोमय दिसतें॥ हें०॥ ८॥
अभिवन, सतत, जरी लहरी। उन्नत, चिंताजाल हरी।
गुणगुणुनी गुणगण हे तूं। तूंचि असें हो हा हेतू॥ हें०॥ ९॥

---

# ३९ लक्ष्मण गणेशशास्त्री लेले

हे कवि श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथें शके १७९२ या वर्षी जन्मले. हे जातीचे कोंकणस्थ हिरण्यकेशी ब्राह्मण. प्रसिद्ध पंडित व कवि कै गणेशशास्त्री लेले यांचे हे चिरंजीव. या कवीचें प्रीव्हियसपर्यंत इंग्रजी शिक्षण झालें असून, संस्कृत भाषेचें यानीं उत्तम अध्ययन केलें आहे. त्याचप्रमाणे जुन्या पद्धतीनें अलंकारशास्त्राचा चागला अभ्यास केला असून, 'अलंकारप्रकाश' या नावाचे एक पुस्तक यानीं प्रसिद्ध केलें आहे. काव्यनाटकाचा यास दृढ परिचय असून वैद्यकाचेंही परिशीलन यांनीं केले आहे. थोडक्यांत सागावयाचे म्हणजे, हे कवि बहुश्रुत, विद्वान् व चांगले ग्रंथकार आहेत.

यानी 'पद्यमंजरी,' 'मेघदूताचें समवृत्त भाषांतर' वगैरे स्वकृत कवितांचीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. शिवाय दुसरींही कांहीं काव्यें केली आहेत. पण तीं अपुरीं आहेत. याची कविता विद्वत्ताप्रचुर, रसालंकारमंडित व मधुर आहे. यांची भाषा प्रौढ असून विचारसरणी उदात्त व मार्मिक आहे. हल्ली हे पुणे येथें न्यू पुना कॉलेजमध्यें मराठी भाषेचे प्रोफेसर आहेत.

## यमुनागीत

कलिंद-नग-कन्यके ! बसुनियां प्रभातीं तटीं ।
विलोकि नर जो तुझी क्षणभरी तनू गोमटी ॥
अये ! हृदयिं त्याचिया प्रगट होतसे साजिरी ।
रमा-रमण-मूर्ति, जी नव-पयो-द-शोभा वरी ॥ १ ॥

माते ! पातक-पात-कारिणि तुझ्या नीलांबुची थोरवी ।
वानायास समर्थ कोण जगतीमाजी असे तो कवी ॥
भक्तीनें तुझिया जलांत जननि ! स्नानादि जो आचरी ।
स्वर्गीं ढाळिति चामरें करतलीं स्वर्गांगना त्यावरी ॥ २ ॥

स्फटिक-धवल, आई ! अंतरंगीं विराजे ।
वरुनि वरि महेन्द्र-श्याम-शोभा पहा जे ॥

विमल, सुरभि, तेवीं पातक-ध्वंस-कारी ।
हरिहरचि करोनी टाकि तें दिव्य वारी ॥ ३ ॥

जेथें मदांध झुलती गज-वाजि-राजी ।
द्वारा तया नृपतिच्या नति आज माझी ॥
जावोत हे दिन तुझ्या, यमुने ! तटाकीं ।
ज्या भूषवोनि फल-पल्लव-कान्ति टाकी ॥ ४ ॥

पापें तोंवरि भोंवती विचरती मृत्यू करी व्याकुल ।
ज्वालांनीं तनु जाळितो निशिदिनी संसार-दावानल ॥
काम-क्रोध-मदांचिया उसळती लाटा तशा अंतरी ।
नाहीं देखियला प्रवाह यमुने ! नेत्रीं तुझा जोंवरी ॥ ५ ॥

## पद्यमंजुषा

वृत्तें मनोहर विचित्र मला न येती । एका रसांतहि गती न असे अहो ! ती ॥
वाणी रसाळ मधुरा जनरंजनाला । नोहे, दिसे कृति अशक्यचि ही मनाला ॥

जसें जननिला पहा स्वशिशुचें नवें बोबडें ।
निरर्थक तथापि तें वच कसें बहू आवडे ॥
तसेंच मम कृत्य हें जरि विचक्षणाला[1] न तें ।
रुचेल तरि माउलीप्रतिस काव्यदेवीस तें ॥ २ ॥

आहे निर्मल वारिपासुनि तुझें हें जन्म पद्मा पहा ।
वास श्रीहरिच्या करामधि मनोहारी सुरां वास हा ॥
जाल्या सुंदरता पहा किति असे रामा-मुखा-स्पर्धिनी ।
यःकश्चिद्-भ्रमरानुराग धरिशी आश्चर्य वाटे मनीं ॥ ३ ॥

अशोकाला आला रुचिर घन पाला बघ कसा ।
अपूर्वा कांतीनें बहुत विलसे येथ सरसा ॥

---

१ विद्वानाला

फुलें कांहीं कांहीं मधुनि दिसती सुंदर वरी ।
मृगाक्षी नारींचा पद-युगल-संपर्क न तरी ॥ ४ ॥

कर्पूरकेतक तसे चल[२] हो अपांग[३] । मंदाकिनी-विमल-फेन विमुक्त-भृंग ॥
कुंद त्रि-नेत्र-शिरिं इंदुकला सुरेख । याहूनियां धवल कीर्ति तुझीच देख ॥५॥

भागीरथी बहुत पावन पापहारी । तापास शीतकर इंदु पहा निवारी ॥
दैन्यास कल्पतरु तोहि वदान्य वारी । हे तीन ताप परि साधुचि एक वारी ॥६॥

ललाटीं कस्तूरी-तिलक नयनीं कज्जल रुची ।
दिसे अंगी पाहे सतत नव दिव्यांबर शुची ॥
गळां मुक्तामाळा बहुतचि विशाला सुविमला ।
धरी नारी कर्णी विमल मणि[४]-ताटंक युगला ॥ ७ ॥

आला वसंत बघ संताप दे बहुत संतास संतत खरें ।
वाटे पसंत बहु कामीजनांस परि आनंद सौख्यद हि रे ॥
मंदानिलेंहि अति कंपायमान तरु वंदावयास भुवनी ।
स्रष्टयास काय जणुं हर्षे स्वमस्तकचि खाली करी निशिदिनीं ॥ ८ ॥

संसाररूप कटु पादप यास दोन ।
आहेत सुंदर फलेंचि सुधेसमान ॥
आस्वादन प्रतिदिनींच सुवाग्रसाचें[५] ।
तैसें दुजें सुजन-संगति-सौख्य साचें ॥ ९ ॥

पुरविला गिरिकंदरिं वास हो । वनचरांसह तोचि सुवास हो ॥
परि नको कधि मूर्खजनांसह । अहह ! संगति नाकिंहीं[६] दुःसह ॥ १० ॥

जयीं दिनमणी पहा उदय-शैल-सानू-वरी ।
हळूं हळूं चढे तया बहुत ताम्रता तोंवरी ॥

---

२ चचल ३ डोळे ४ रत्नजडित कर्णालकार ५ मधुर भाषणाचें ६ स्वर्गात

तशीच वरि ताम्रता जरिहि जाय अस्ताचला ।
असे सतत सारखी सुजनवृत्ति ना चंचला ॥ ११ ॥

बघ जलधींत जातसे पतंग । बघ वन-तामरसांत मत्त भृंग ॥
बघ पादपकोटरीं विहंग । बघ कामी-जन-मानसी अ-नंग ॥ १२ ॥

श्री-राम-चंद्र-रमणी बहु वैभवांत । तीतें निवास दश-कंधर-मंदिरांत[७] ॥
तेव्हां पहा उलट की परिणाम होतो । हें सत्य पूर्व-कृत-कर्म-वशें आहो तों

## संमोहखंडन

धनार्जनाची सोडीं तृष्णा । मंदमते करिं मती वितृष्णा ॥
निजकर्मानें मिळतें वित्त । त्यानें रंजावें आपुलें चित्त ॥ १ ॥
अर्थ अनर्थचि केवल आहे । त्यापासुनि सुखलवहि न लाहे ॥
सुतापासुनिहि धनिका भीति । सार्वत्रिक ही दिसते रीती ॥ २ ॥
कमलावरचें जैसें पाणी । तैसें जीवित चंचल मानी ॥
आधि-भुजंगें समस्त लोक । ग्रस्त जाहले करिती शोक ॥ ३ ॥
न करी धनजन–यौवनगर्व । काल हरी तें क्षणांत सर्व ॥
मायामय हें अखिल सोडुनी । ब्रह्मपदी दे मती जोडुनी ॥ ४ ॥
नित्य करी मनि तत्त्वचिंतन । नश्वरवित्तीं ठेवुं नको मन ॥
क्षणभरि येथें सज्जनसंग । एकचि करितो भवभय भंग ॥ ५ ॥
‘असें कवण मी ? अलों कोठुनी’ । विचित्र संसाराची सरणी ॥
‘स्त्रीपुत्रादिक कोण कुणाची ?’ । समज करुनि घे बंधो याची ! ॥ ६ ॥
पैसा अडका मिळविशि जोंवरि । सगे सोयरे तुजे तोंवरीं ॥
जरा आलिया मागुति देहीं । कोणी ही तुज पुसे न गेही ॥ ७ ॥
कामक्रोधादिकां निवारी । ‘असें कोण मी ?’ मना विचारी ॥

---

७ रावण

आत्मज्ञानें विहीन असती । ते नरकांतरिं बुडोनि पचती ॥ ८ ॥
कल्पतरूचें मूल निकेतन । शयन भूमितल, अजिन[1] हि वसन ॥
सर्वपरिग्रह[2] भोग-त्याग । कवणा देई सुख न विराग ॥ ९ ॥
बाल तोंवरी क्रीडनिं दंग । तरुण तोंवरी अनंग–रंग ॥
वृद्धपणीं मग चिंतादीन । ब्रह्म–पदीं नच कोणी लीन ॥ १० ॥
जनन पुनरपी पुनरपि मरण । पुनरपि जननी–जठरीं शयन ॥
संसारीं हे स्फुटतर दोष । त्यांत कसा तुज वाटे तोष ॥ ११ ॥
शत्रु-मित्र-सुत बंधु-सोयरीं । वैर, मित्रता दोन्ही न करीं ॥
सर्वांभूतीं धरिं तूं समता । इच्छिसि झडकरि जरी ब्रह्मता[3] ॥ १२ ॥
सांज सकाळ हि, तशि दिनरात । येती पुनरपि शिशिर-वसंत ॥
काल खेळतो जातें आयु । तरि न सोडितो आशा–वायु ॥ १३ ॥
अंग गळोनी पिकलें मुंड । दंतपंक्तिनें त्यजिलें तुंड ॥
कांपत कांपत करिं धरि दण्ड । तरि न सोडिते आशा पिण्ड ॥ १४ ॥
मी, तूं इतरहि अवघे एक । हा तुज नाहीं हृदयिं विवेक ॥
आत्मरूप हें सगळें पाहीं । भेद सोडुनी दे लवलाही ॥ १५ ॥

## जटिल

आपणास शिव हा पति मिळावा म्हणून पार्वतीनें हिमालयावर तपश्चर्या चालविली असतां, पार्वतीचें आपणावर खरें प्रेम किती आहे हें पाहण्याकरिता शिवानें एका जटिलाचा म्हणजे जटाधारी तापसाचा वेष धारण करून तिच्या तपोवनात प्रवेश केला, व तिच्याशीं भाषणप्रसंग केला तो या ठिकाणीं वर्णिला आहे.

वाणी प्रौढ मुखीं, जटा शिरिं, धरी पालाश-दंडा[1] करीं ।
दिव्य ब्रह्ममय प्रभा विलसते ज्याच्या शरीरावरी ॥

---

१ चामडें २ मालमत्ता ३ मुक्ति
१ पळस

जाणो आश्रम[2] मूर्तिमंत पहिला[?] ! कृष्णाजिनें[3] झांकिला ।
ऐसा एक युवा गिरीश-तनया[4]-पुण्याश्रमीं पातला ॥ १ ॥
आतिथ्यामधिं दक्ष ती गिरिसुता पाहोनि त्या तोषली ।
जाऊनी पुढती प्रणाम करुनी पूजा तिनें अर्पिली ॥
थोर व्यक्ति-विशेषिं आदर बहु दावीतसे प्रीतिनें ।
लोकीं तो अपुल्यासमान असतां ही वैभवें कीर्तिनें ॥ २ ॥
तेणें तें विधियुक्त पूजन तदा अत्यादरें घेतलें ।
झालासे श्रम दूर हें क्षणभरी बाहेरुनी दाविलें ॥
फेंकी दृष्टि विकार-शून्य मग तो शैलेन्द्र-कन्येवरी ।
शिष्टाचार न सोडितां क्रम-वशें संभाषणातें करी ॥ ३ ॥
होती की सुखलभ्य दर्भ समिधा होमादि साधावया ? ।
तीर्थें पार्वति ! आश्रमांत असतीं सुस्नात की व्हावया ? ॥
होतां ताप न अल्पही तप तुझें अश्रांत कीं चाललें ? ।
देहाच्या सम धर्मसाधन दुजें लोकीं नसे चांगलें ॥ ४ ॥
लाक्षाराग[5] नसोनिही विलसतो आरक्त-बिंबापरी ।
ऐसा हा अधरोष्ठ पाहुनि तुझा स्पर्धा मनीं जो करी ! ॥
वारी घालुनियां जया निशिदिनीं त्वां पोषियेलें स्वतां ।
वाढे कीं मृदु-ताम्र-पल्लव सुखें तो या लतांचा अतां ॥ ५ ॥
घेती प्रेमभरें करांतुनि तुझ्या जे दर्भ ओढोनियां ।
ज्यांच्या संभ्रम-युक्त चारु-गमनें चैतन्य[6] भूमीस या ॥
ज्यांचे अक्षि तवाक्षि-साम्य वरिती होऊनियां चंचळ ।
दृष्टी ठेविशि ना मृगांवरि तयां तूं आपुली प्रेमळ ! ॥ ६ ॥

---

२ ब्रह्मचर्याश्रम ३ काळ्या हरिणाच्या चामड्यानें ४ पार्वती ५ लाखेचा रंग
६ भूमि गजबजून जाते

जेथें सुंदर रम्य रूप दिसतें तेथें नसे दुर्मति ।
ऐसें बोलति तें यथार्थ गमतें माझ्या मना पार्वति ! ॥
बाले, शोभन-दर्शने ! तव असे हें शील नामी किती ! ।
योगी तापसही खरोखरि मनोभावें तया वंदिती ! ॥ ७ ॥

सप्तर्षी गिरिकन्यके ! नमुनियां पुष्पांजली अर्पिती ।
आकाशांत, तयामुळें फुलुनियां होई सुरम्याकृति ॥
तो गंगौघ न तेवि पावन करी ताता तुझ्या सान्वय ।
जेवी ती चरिते तुझी सुविमलें, हा मन्मनी निश्चय ॥ ८ ॥

चित्ताचा करुनी निरोध अपुल्या त्वां शात त्या ठेविलें ।
धर्मा ठेवुनि अर्थ-काम अगदी दूरीं करी सारिले ॥
तेणें भाविनि ! शैल-राज-तनये ! धर्मार्थकामांतुनी ।
लोकां केवळ धर्म सौख्यद असे ये आज माझ्या मनीं ॥ ९ ॥

मोठा आदर आज दावुनि जया पूजा तुवां अर्पिली ।
त्या मातें परकीयसा न समजे, शैलेन्द्रजे ! अंतरी ॥
याचें कारण सुंदरांगि ! वदती ते थोर लोक स्वतां ।
मैत्री सप्त-पदींच होय सुजनामध्यें असें तत्त्वतां ॥ १० ॥

ऐसें सख्यचि आपणामधि अतां उत्पन्न झालें असे ।
त्यायोगें तुज शांति-शालिनि ! गमे कांहीं पुसावें असें ॥
आहे मी द्विज यामुळें चपलता अंगीं स्वभावें वसे ।
देई उत्तर त्यांत सुंदरि ! जरि गे ! गुप्त कांहीं नसे ॥ ११ ॥

झाला जन्म हिरण्य-गर्भ-कुलिं त्या, तारुण्य-कांती भली ।
त्रैलोक्यांतिल रूप एकवटुनी जाणो तनू जाहली ! ॥
तेवीं आपण होउनी विभवही त्वन्मंदिरीं राहिलें ।
हे चार्वङ्गि ! वदे तपःफल असे याहून की आगळें ? ॥ १२ ॥

काहीं दुःसहसें अनिष्ट घडतां धैर्यान्विता मानिनी ।
स्वेच्छेनें तप साधण्यास असलें उद्युक्त होती जनीं ॥
पाहीं अंतरिं मी विचार करुनी कांही इथे हें असें ।
झालें कीं ? परि शैलराजतनये ! कांही दिसेना तसें ॥ १३ ॥

अंगी यौवन दाटलें असुनियां तूं भूषणें टाकिशी ।
शोभे वृद्धपणास वल्कल असें कां नेसुनी बैसशी ॥
तारामंडल आणि इंदु मिरवे जीमाजि तेजें, अशी ।
रात्री होइल सांग योग्य अरुणा सेवावयाला कशी ? ॥ १४ ॥

पाहोनी तव सौम्यदर्शन असें माझ्या मनीं येतसे ।
की तूंतें अपमानदुःख अणुही चित्तांत ठावें नसे ॥
थोडीही अवमानना पितृगृहीं होई तुझी कोठुनी ! ।
कोणी धृष्टपणा करील तुजसी हें संभवेना जनीं ॥ १५ ॥

व्हावा स्वर्ग म्हणोनि उग्र तप हें तूं आचरीशी तरी ।
हा व्यर्थ श्रम ! देवभूमि तुझिया तातप्रदेशांतरीं ॥
किंवा इच्छिसि अंतरी पति, तरी आयास हा कासया ।
शोधी ग्राहक रत्न ! रत्न कधिं त्या जातें न शोधावया ॥ १६ ॥

हेतु त्वन्मनिचा स्वयें सुचवितो अत्युष्ण निश्वास हा ।
येई संशय माझिया परि मनीं शैलेंद्रकन्ये ! पहा ॥
येथे त्वत्प्रणयास योग्य असला कोणी दिसेना मला ।
चित्तीं इच्छिसि ज्यास तो न मिळतां होईल कैसा तुला ?॥१७॥

आली पांडुरता मुखीं, दिसतसे निस्तेज गंडस्थली ।
लोंबे तीवरि रुक्ष पिंगट जटारूपें हि केशावली ॥
पाहोनी अनुकंप्य ही स्थिति तुझी जो न द्रवे अंतरीं ।
ऐसा निर्दय पाहिला पति तुवां; हे गोष्ट आहे खरी ॥ १८ ॥

आलीसे नियमव्रतें करुनियां अंगीं तुझ्या क्षामता ।
भूष्यांगां अति-चंड-भानु-किरणीं आली तशी श्यामता ॥
जैशी इन्दुकला दिनीं, तव तनू निस्तेज झाली तशी ।
तीतें पाहुनियां व्यथा सहृदया होणार नाहीं कशी ? ॥ १९ ॥
देहा कष्टविणार तूं किति तरी, पूर्वाश्रमींचे असे ।
माझें संचित पुण्य, घे गिरिसुते ! त्यांतून अर्धें कसें ॥
त्या योगें तुजला मिळो पति जसा तूं इच्छिसी अंतरीं ।
आहे कोण, कसा, तसाचि कुठला तो, सांग आतां तरी ॥२०॥
युक्तीनें गुजगोष्ट त्या द्विजवरें या रीतिनें काढिली ।
लज्जेनें परि पार्वती न किमपि प्रत्युत्तरा बोलली ॥
होती एक सखी समीप बसली चातुर्यखाणी भली ।
दृष्टी अंजनशून्य मात्र तिकडे प्रेमें तिनें प्रेरिली ॥ २१ ॥

---

# ४० बाळकृष्ण अनंत भिडे

---

हे कवि व ग्रंथकार इ. स. १८७४ सालीं जन्मले. हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. ची पदवी संपादन केल्यावर यानीं नोकरी पतकरली व हल्लीं हे मुरुड--जंजिरा--येथील हायस्कूलचे हेडमास्तर आहेत. यानीं संस्कृत व मराठी काव्याचें व विशेषत मोरोपंताच्या काव्याचें चागलें परिशीलन केलें आहे असें दिसतें हे 'काव्यसंग्रहा' चेही संपादक होते. यानी विपुल काव्यरचना केली असून त्यापैकीं काही मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध आहे, व नुकतेंच यांनीं 'फुलाचे झेले' या नावाचें स्वकृत कवितांचें छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. यांची कविता संस्कृतशब्दप्रचुर असूनही सुबोध व सुरस आहे.

## तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी !

कलत्र–सुत–मित्र ह्यां प्रबल नेई काल क्षणें ।
'मदीय, मम, माझि,' हीं असाति अज्ञतालक्षणें ! ॥

अशी पटुनि खूण ये जरि विरक्तता अंतरीं ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ १ ॥

धन क्षणिक हें असे, क्षणिक सर्व पोरें, गुरें ।
घरें, सुखकरें, मनोहर जगत् असे भुंगुरें ! ॥
जरी समजुनी असें मनि शिरे निराशासुरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ २ ॥

न कांहिं धन लाभलें हृदय जाहलें घाबरें ।
घरी लव न खावया रडति कामिनी लेंकुरें ! ॥
म्हणोनि जरि वाटलें विफळ वांचणें भूवरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ३ ॥

निघोनि सुत दुर्गुणी कुकरणी करोनि जनीं ।
कुळीस मळ लावुनी मिळवि दुर्यशालागुनी ! ॥
तदा कठिण दुःख हें तव मना विदारी जरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ४ ॥

करोनि बहु खर्च तूं पढविलेंस ज्यालागुनी ।
गुणी बनविलें तुवां बहु यदर्थ रे भागुनी ! ॥
निघोनिच कृतघ्न तो तुजसि तुच्छ मानी जरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ५ ॥

अनेक करि ढंग जी अशि मिळेल पत्नी, हितीं ।
नसोन मुळिं दक्ष, ना सुधरते सुयत्नींहि ती ! ॥
गमे म्हणुनि आटली तुज जरी सुखाची झरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ६ ॥

धरोनि मनिं धैर्य तूं कठिण कार्य घेसी करीं ।
परी यश न येउनी उलट ती बसे ठोकरी ! ॥

म्हणोनि भिनली तुझ्या अमित खिन्नता ती उरीं ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ७ ॥

बघून तुज सद्गुणी अतुल कीर्तिचें भाजन ।
विषाद मनिं मानुनी करिति निंद्य हेवा जन ॥
सखेद मन होउनी तव विटेल तेव्हां जरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ८ ॥

समाज-हित-साधनीं विकळ-दुर्बळोद्धारणीं ।
रमून लढसी जसा प्रबळ शूर योद्धा रणी ॥
तदा कुतरिं भुंकती भितरिं आड अंगावरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ९ ॥

अभागि विधवा दया उपजवी तुझ्या अंतरीं ।
उदारमति होसि तूं तिस विपत्समुद्रीं तरी ! ॥
म्हणूनि जरि जाचती तुजसि लोक नानापरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ १० ॥

सदा निजमतांस तूं प्रकटितोस निःसंशय ।
रुचो न अथवा रुचो जरि जनां पुराणप्रिय ! ॥
सधीर तुज पाहुनी कुणि असा कुचेष्टा करी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ ११ ॥

धरोनि मनिं नीतिला सरळ मार्ग तो सेवितां ।
सदैव तशि पूजितां हृदयिं सत्यता-देवता ! ॥
कुबुद्धि नर देति हे जरिहि दुःख कांट्यापरी ।
तरी सुखकरी खरी दुजि सखी न शांतीपरी ! ॥ १२ ॥

## निशामुख

मना भुलविते निशा-निटिल[1]-राग संध्या शुभा ।
विरक्त मिरवी रवी रुचिर आपुली अंशु[2]-भा ॥

---

१ कपाळ २ किरणप्रभा

तया सविधु रोधिती विविध रंग हे अंबुद ।
जणूं स्व-रिपु-बंधना रजनि धाडिते जासुद ॥ १ ॥
क्षणक्षण निजाकृती बदलती घनांच्या घटा ।
क्षणक्षण विलक्षण प्रकटितात रंगच्छटा ॥
रवी गमत या पला क्षिति-ज-संधिला दापला ।
सुवर्णघट तापला जणुं अधोमुख स्थापला ॥ २ ॥
रवि क्षितिज गांठितां दिसतसे जरी चापट ।
सुवर्णकिरणी विणी तरि घनी जरीचा पट ॥
बघून पति, पश्चिमा, धरुनि पूजनी लालसा ।
गुलाल जणुं लालसा उधळिते विनम्रालसा ! ॥ ३ ॥
प्रमोदभर वाटला जणुं नको मतीतें, धवा ।
बघून गत, पद्मिनी म्हणुन कोमती तेधवां ॥
मलूल मग जाहली इतरही फुलें मोहक ।
परंतु निशिगंध[3] हा खुलत बांधव-द्रोहक ॥ ४ ॥
निमीलित विलोकुनी कमलिनी-महा-वैभवें ।
सलील कुमुदें मुदें हंसति नीच पंकोद्भवें ॥
घरांतिलच हे असे कठिण होत भेदे खरे ।
न दे रिपुहि जें, अशांकडुनि तेंहि भें[4] देख रे ॥ ५ ॥
प्रफुल्ल कुसुमांतला सुरस शोषणाऱ्या निका ।
भरार उडणें अजी त्यजिति चंचला मक्षिका ॥
विहंगगण बापुडे, जणुं पडोनियां सांकडें ।
विहार-रति सोडुनी परतती स्व-नीडां कडे ॥ ६ ॥
नभोमणि लपे रवी, मग कबूतरीं पारवीं ।

---

३ पुष्पविशेष ४ भीति

स्वतांस सभयारवीं लपविलें लतापल्लवीं ॥
विलोलतर खार जी तरुवरी त्वरें संचरे ।
निरुद्यम अतां ठरे, तरु करोनि ती मंच, रे ॥ ७ ॥

फुलांमधिल साखरा चुफुनियां पुरेसा खरा ।
गुडूप फुलपांखरा करिति पंखिच्या पाखरा ॥
स्व-कोटर-विलीन हे विहग थोरले भास्वर ।
तरी मधुनि कावळे करिति धीट, ' काका ' स्वर ! ॥ ८ ॥

बिळ त्यजुनि, मूषक प्रकट होय बागेमधीं ।
निशा गणुनिया प्रिया, निरखितो दृढ-प्रेम-धी ॥
' चुचूंचुचु ' करी, ठरे अभय वृक्षमूलावरी ।
जरा कुरतडी, क्षणें नजर हा करी बावरी ॥ ९ ॥

चढे चपल–काय[5] तो तरुवरी क्षणार्धांत कीं ।
पुढें कृति उपक्रमी निवळ घातकी पातकी ॥
फळें रुचिर पोफळें, पनस, नारिकेलादिकें ।
उगा करुनि दंश हा, रिचवि[6] कोंवळीं भूमिके ॥ १० ॥

सबंध दिन टांगला उलट पादपीं व्याकुळ ।
अतां नयन विस्तरी, चळवळी करी वाघुळ ॥
सुदीर्घ पसरोनियां असित आपुले पक्ष ते ।
भरार सफरी करी दळफळाकरा लक्षतें ॥ ११ ॥

असंख्य चिलटें हटें करिति संप्रती वावर ।
पिटाळिलिं तरी पुन्हां बिलगती शरीरावर ॥
' गुगूंगुगुगुगूं ' असें गुणगुणोनियां, टोंचितें ।
शिलीवदन[7], चुंबनीं दहनतुल्य वाटोचि तें ॥ १२ ॥

---

५ शरीर ६ पाडी ७ सुईसारखें तीक्ष्ण तोंड

न शंख बरवा तनूवर, न वा विषाणें भलीं ।
अशा निघति दुर्बळा हळुच बाहिरीं गोगली ॥
करी किरकिरीस हा रजनिचा किडा सारखा ॥
जणों जप करीतसे, इतर गोष्टिंना पारखा ! ॥ १३ ॥
विलोलगति वाहतो पवन पश्चिमेचा सखा ।
घरांत घुसतो जवें धसमुशा मुलासारिखा ! ॥
दिवारजनि दूरचा बडबडे वृथा सागर ।
चहाडिस तयाचिया करित वायु ' फूफू '-स्वर ॥ १४ ॥
छळून दुबळयांप्रती गणिति कावळे हे मजा ।
म्हणून दडल्या दिशां सभय संधिकोदींत ज्या ॥
अशा मुदित बेडक्या टणटणा उड्या मारत्या ।
' गुडुंगुडुडु ' बोलत्या, त्वरित होति संचारत्या ॥ १५ ॥
तरूवर करीतसे घुबड घोर ' घूघू '–स्वर ।
जया श्रवुनि घेतसे हृदय कांपरें कातर ॥
विचित्रपथ मानवी धरितसे मनोवृत्ति ते ।
स्वकीय समतेस जे सकल वस्तुतें स्थापिते ? ॥ १६ ॥
सुरक्षित बघूनियां सदट राहती जाळकीं ।
मृगी समृग झोंपती सुखित वेढल्या बाळकीं ॥
असे रजनि, तों चुफा हरिणहो ! सुखाचा मध ।
सकाळ नळिकास्त्र[८] तें अदय मांडितें पारध ! ॥ १७ ॥
न गाढ निजतो परी निजबिळी ससा कातर ।
तयास विविधध्वनी गमति मानसा कातर ॥
जराच डुलकीस घे, उघडितोच तों चक्षुतें ।

---

८ बदूक

प्रभूस विनवी जणूं तव दया प्रभो ! रक्षु ते ॥ १८ ॥
सुखांत गृहकुक्कुटें करिति गाढनिद्रारती ।
कितीक चुकली परी विकळ अंध संचारती ॥
तयांस पकडावया त्वरित धूर्त कोल्हा हले ।
दणाणवि मधून तो क्षिति भयाण कोलाहलें ॥ १९ ॥

नभो-विततमंडळी स्फुरण पावती तारका ! ।
निशा गगनमंडपा जडित मौक्तिकी हार का ॥
हळूहळुच वर्षती शिशिर हे दंवाचे कण ।
सुधा-कर-करांतले जणुं सुधालवांचे गण ॥ २० ॥

## मनोभंग

लौकिक-तृष्णा नको नको ती, मोठेंपण हें पुरे,
वीट ये उत्सव हा ओसरे ॥ ध्रु० ॥
मनुज-स्थिति ही चंचल बुद्बुद वारीवर की स्फुरे,
चित्त हें फार तयें बावरे ॥
महत्व-तृष्णा-बीज मनोभू घेई अजि आदरें,
आशा वारी वर पाझरे,
फुटती नंतर मूळधुमारे; भरुनी मानांकुरें,
रोप तें सुंदरसें भरभरे ॥
भव्य मनोहर तरुवर त्याचा साचा बनला त्वरें,
शोभला मोदरूप मोहरें,
मग तयास येई सुयशःसुम कोमळ ।
मग रसाळ सुखफळ जों येई उज्ज्वळ ॥
तों दुर्विधि शिशिरें हंत ! मांडिला छळ ।
पल्लव गळती, मूळें ढळती, कोमळ सुमगण चुरे ॥
फळ हुके, मग नर मनिं चुरचुरे !

# ४१ काशिनाथ हरि मोडक

याचा जन्म इ. स १८७१ साली झाला. हे कवि ‘माधवानुज’ या नांवाने प्रसिद्ध आहेत हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. ठाणे जिल्ह्यात कल्याण या गांवीं हे डॉक्टरचा धंदा करीत असत. यानी ‘मेघनादवध’ या नावाचें एक मोठे काव्य केले असून ते ‘काव्यरत्नावलीत’ प्रसिद्ध झालें आहे हे एका बंगाली काव्याचे रूपातर आहे शिवाय यानी विविध विषयावर सुमारे एव्वाशेवर स्फुट काव्ये केलीं आहेन, व तीं ‘मासिकमनोरंजन’ वगैरे मासिकातून प्रसिद्ध आहेत. याची भाषा सुबोध, सुरस व प्रौढ आहे याची कविता प्रासादिक आहे.

## मूर्तिकार

दृष्टि फेंकित आपुली सभोंवार। फिरत असतां स्वछंद मूर्तिकार॥
शिला दिसली मार्गांत भव्य त्याला। बघुनि तीतें थांबला मुग्ध झाला॥१॥
काय द्यावा आकार त्या शिलेला। विचारी या तो कुशल मग्न झाला॥
मनी आकृति काढूनि कल्पनेनें। करी सुस्थिर ती शांत चिंतनाने॥ २॥
करीं एक्या टाकीस धरुनि वेगें। शिलेवर तो आघात करूं लागे॥
स्व-कर्तव्यीं सं-लग्न चित्त होत। इतर सारे विसरला वस्तुजात॥ ३॥
करायाचें ज्या असे महत्कार्य। वचन त्याचें हें सदा शिरोधार्य॥
जरी उत्तम वाटतें कार्य व्हावें। स्वकार्यातें सर्वस्व तयें द्यावें॥४॥
शिलेवर जे हळुहळू होत घाव। दिसूं लागे सत्वरी तत्प्रभाव॥
रूप पूर्वीचें जाउनी लयाला। शिला लागे साकार दिसायाला॥ ५॥
दूर सारे जें कृष्णमेघ होती। रम्य तारे चमकती नभःप्रांतीं॥
शिला-शकलें त्यापरी निघुनि गेलीं। सुभग सत्वर बाहेर मूर्ति आली॥६॥
मूर्तिकारें काढिली शिलेंतूनी। मूर्ति सुंदर संपन्न अवयवांनीं॥
तीस पाहुनि कृतकृत्य मनीं झाला। हर्षरंगीं नाचला! गृहा गेला॥ ७॥

सफल होतां सद्यत्न मानवाचे । मूढजन जो नच हर्षभरें नाचे ॥
शीण त्याचा सकलही लया जाई । कार्य करण्या सामर्थ्य नवें येई ॥ ८ ॥
त्याच ठायीं मग भक्त एक आला । मूर्ति पाहुनि आनंद तया झाला ॥
रम्य देवालय एक रचुनि तेथें । मूर्ति नेउनि ठेविली तयें हातें ॥ ९ ॥
शिला पूर्वी जी एक रूपहीन । तीस देऊं लागले लोक मान ॥
विजन होती जी भूमी एककाली । तीच पुण्य-क्षेत्र-भू पुढें झाली !॥ १० ॥
क्षुद्र दगडा देवत्व द्यावयाचें । असे मनुजा ! सामर्थ्य तुझें साचें ॥
कसा दीनाहुनि दीन असा होसी ?। मूर्तिकाराचा कां न धडा घेसी ? ॥ ११
तुझ्या मार्गी जे दगड आड येती । घाव त्यांवर आपुल्या घाल हातीं ॥
काढ त्यांतुन रमणीय दिव्य मूर्ति । करिल मग ती तव सर्व कामपूर्ति ॥ १२

## दीपविसर्जन

करीं आरती घेउनी आर्यबाला । त्वरें पातल्या नर्मदेच्या तटाला ॥
करूनी तयांनी सरित्पूजनाला । प्रवाहीं दिली सोडुनी दीपमाला ॥ १ ॥
अहा काय शोभा वदूं त्या क्षणाची । तृषा शांत झाली मदीयेक्षणाची ॥
तदा अस्तगामी जरी अंशुमाली । मना वाटलें यामिनी काय झाली ॥ २ ॥
सरित्पात्र तें स्वच्छ तैसें विशाल । परी भासलें की दुजें अंतराल ॥
तती त्यावरी शोभली दीपकांची । उदेली जणों पंक्ति की तारकांची ॥ ३ ॥
जशी अंतरिक्षी फिरे चंद्रकोर । प्रवाहीं करी चारु नौका विहार ॥
नभीं स्वैर संचारती मेघखंड । जळीं खेळती वीचि तैशा उदंड ॥ ४ ॥
अशी दिव्य शोभा पहातां पहातां । मनीं शांत झालों लया जाय चिंता ॥
झणीं सूचली कल्पना एक चित्ता । असे सर्व सृष्टीस जो सारभूता ॥ ५ ॥
दिले सोडुनी दीप जे बालिकांनीं । दिला सारखा वेग सर्वां तयांनीं ॥
तयांची स्थिती तत्क्षणीं भिन्न झाली । वरी दृश्य कोणी कुणी जाय खालीं ॥ ६

कुणी गुंतुनी राहिले भोंवऱ्यांत । जलौघासवें जाय कोणी वहात ॥
तयांतील कांहीं तटा अन्य गेले । पुढें जाउनी अल्प मागेंच आले ॥ ७ ॥
जसे दीप तैसे असंख्यात जीव । प्रभू निर्मितो थोर ज्याचा प्रभाव ॥
तयां सोडुनी देत कालप्रवाही । वहाती तदोघासवें सर्व देही ॥ ८ ॥
कुणी रंक होई कुणी होय राजा । दुजा देखणा तो तिजा हीनतेजा ॥
कुणी मूर्ख होई कुणी हो शहाणा । कुणी धैर्यशाली तसा दीनवाणा ॥ ९ ॥
तसें कां करावें? असें मी करीन । वृथा वल्गना मानवाच्या अजाण ॥
स्थितीचा असे किंकर प्राणिमात्र । स्थिती त्या करी पात्र किंवा अपात्र ॥ १० ॥
जरी राहिलें नर्मदातीर दूर । जरी आज बाला न माझ्या समोर ॥
स्मरोनी तरी दीप-सर्ग-प्रसंग । झणीं हर्षयोगें भरे अंतरंग ॥ ११ ॥

## प्रेम

( अर्ध तनू वारुळीं वुडाली० या चालीवर )

अखिल विश्व हें कां न दिसे मग शून्य वनाच्या परी ।
गेलें प्रेम लयाला जरी ॥ ध्रु० ॥
या विश्वाचें जीवित केवळ चाले प्रेमावरी ।
संसृति प्रेम सुखाची करी ॥
स्वरूप त्याचें वर्णायातें शक्त नसे वैखरी ।
तयाची मूर्ति न दृग्गोचरी ।
॥ चाल ॥ त्याचा संभव कोठें असे ॥
स्थानीं कुठल्या केव्हां वसे–
अतर्क्य सकलां असुनी ज्याची खूण पटे अंतरीं ॥ १ ॥
तेजोराशी दिनमणि उगवे गगनीं प्रेमामुळें ।
तडागीं पंकज तैसें फुले ॥
चंद्र पाहुनी पयोनिधीला भरतें कीं येतसे ।

कांतमणी द्रवतसे ।
॥ चाल ॥ याचें करण नाहीं दुजें
एका प्रेमाविण गूढ जें ।
परंतु ज्यानें मोहित केली सारी दुनिया खरी ॥ २ ॥
स्फूर्ति-तरंगीं चित्त कवीचें उंच खळाळे किती ।
कल्पना दिव्य अती नाचती ॥
वृत्ति तयाच्या प्रसन्न होतां पद्यें वदनांतुनी ।
भराभर बाहिर येती जनीं ।
॥ चाल ॥ मंजुळ मुरलीचा तो ध्वनी ॥
सुंदर चित्रांची रेखणी ।
केविं होतसे आश्रय नसतां प्रेमाचा ! पळभरी ॥ ३ ॥
दिव्य प्रेमा ! शुद्ध प्रेमा ! सकल सुखाच्या घरा ।
मातें केवळ तूं आसरा ॥
काळ कंठितों कृपेमुळें तव एकाकी काननीं ।
दूर मी बंधु मित्र सोडुनी ।
॥ चाल ॥ तूं कंटकशय्येवरी ॥
पसरुनी मखमालचि साजिरी ।
विषम विषासम भवास देसी अमृताची माधुरी ॥ ४ ॥

## स्मृतिचित्र

पदः-( चाल -अर्धतनू वारुळी )

स्मरतो मज तो प्रसंग अजुनी दिन बहु झाले जरी ॥
नको तें स्मरण तयाचें परी ॥ ध्रु० ।
बाळपणीं मी सहज मजेनें गेलों एकया दिनीं ॥
फिराया स्वच्छंदें उपवनीं ।

दिसली तेव्हां प्रभात वेला प्रसन्न नयनां किती ॥
विहंगम मंजुल आलापिती ।
दिनकर संगें दिसे रंगली पूर्व दिशा सुंदरी ॥
लोचना रूप जियचें हरी ॥
॥ चाल ॥ झाल्या कुसुमित नाना लता ।
होता मंदानिल वाहता ।
परिमल-पूरित सेवुनि ज्यातें मन मोदातें वरी ॥ १ ॥
उद्यानी मी वेंचित असतां प्रफुल्ल सुंदर फुलें ।
सहसा एक नरा देखिलें ॥
उग्र तयाचें रूप पाहुनी उपजे भीती मनी ।
सुटला कंप शरीरा झणीं ॥
पाहुनि मातें वदे ‘ बालका ! मज भीसी कासया ॥
हें घे पुस्तक खेळावया ’ ।
॥ चाल ॥ ऐसें सस्मित वच बोलुनी ॥
हस्ती पुस्तक मम देउनी ।
दृष्टिपुढुनि मम नर तो झाला अंतर्हित सत्वरी ॥ २ ॥
रम्य रेखिली होतीं चित्रें पशुपक्ष्यांचीं वरी ।
मुद्रिलें होतें हेमाक्षरीं ॥
आशा, विभव, प्रीति, संपदा यांवरी होते धडे ॥
पुस्तकीं लिहिलेले रोकडे ॥
हर्षभरें मी नाचत गेलों सदना तें घेउनी ॥
त्याजला नीट दिलें ठेउनी ॥
॥ चाल ॥ गेले वत्सर कांहीं पुढें ॥
दृष्टिस एके दिवशीं पडे ॥
पुस्तक तें मी औत्सुक्यानें धरिलें अपुल्या करीं ॥ ३ ॥

सुरम्य चित्रें कुरूप दिसली, गेलीं तीं अक्षरें ॥
मागें पुस्तक कोरें उरे ! ॥
आशा, विभव, प्रीति, संपदा, सुदिव्य यांचे धडे ।
गेले विलयाला बापुडे ॥
एकवार जें कारण झालें सुखवाया लोचना ।
उपजवी उलटी तें भावना ॥
॥ चाल ॥ झालों खिन्न बहु मीं मनो ।
बोललों आणुनि जल लोचनीं ॥
क्रूरा ! काळा ! असे तुझी ही कठोर करणी खरी ॥ ४ ॥
असती बाल्यीं उड्या मनाच्या उंच अहाहा ! किती
बेतही नित्य नवे चालती ॥
वाटे विक्रम करुनि कीर्तितें धरुनी आणूं घरा ।
इंदिरा सकल सुखाचा झरा ॥
सकल जगातें वदावयातें लावूं की हा खरा ।
जन्मला धन्य जगीं मोहरा ॥
॥ चाल ॥ जातां बाल्यदशा ती दुरी ।
उलटा अनुभव येई परी ॥
दुःख निराशा यांचा पगडा बैसे हृदयावरी ! ॥ ५ ॥

## तीन वृत्ति

जाई मी फिरण्यास नाद म्हणुनी, कोठें तरी एकला ।
जातां एक दिनी बकूल तरु मी मार्गामधीं देखीला ॥
नक्षत्रे गगनी जशीं चमकती नाना अपारद्युति ।
होती भूमिवरी फुलें पसरली मागें पुढें भोंवती ॥ १ ॥
होती वेळ सकाळची, कितितरी आनंददायी मना ।
भासे तें जग जीर्णता त्यजुनियां तारुण्य घे कीं पुन्हां ॥

पुष्पांचा सुटला सुगंध पसरी चौफेर वायू जया ।
सेवाया बसलों तदा तरुतली मी शांत चित्तें तया ॥ २ ॥
त्या उन्मादक सौरभें हरिखुनी मी गुंग झालों मनीं ।
माझें भान मला उरे न, न कळे स्वर्गीं असें वा वनीं ॥
वेचायास फुलें करांत परड्या घेवोनि तों सत्वरी ।
आल्या तीन मुली, पदध्वनि मला जागा तयांचा करी ॥ ३ ॥
आहा ! त्या वनदेवताच अथवा दिव्यांगना, ना मुली ।
त्यांचा संभव होय काय न कळे किंवा रमेच्या कुळीं ॥
त्यांच्या कोमल मुग्ध रम्य बघुनी रूपा गमे अंतरीं ।
आल्या नूतन कल्प-वृक्ष-कलिका स्वर्गांतुनी भूवरी ॥ ४ ॥
एकीनें परिधानलें[1] धवलसें दुग्धापरी अंबर ।
नेसे दाडिमरक्त[2] वस्त्र दुसरी, अत्यंत चेतोहर ॥
आली कज्जलकृष्ण रम्य तिसरी लेऊनि बाला पट ।
त्यांचा संगम पाहतां स्थलचि तें भासें त्रिवेणीतट ॥ ५ ॥
एकीमागुनि एक त्या तरुतलीं वेंचीत होत्या फुलें ।
पुष्पें कोमल फार, मंद म्हणुनी त्या टाकिती पाउलें ॥
होत्या हांसत, गातही मधुनियां गाणें कुणी मंजुळ ।
त्यांच्या सुस्वरसंगमा परिसुनी मच्चित्त हो विव्हळ ॥ ६ ॥
बालांनीं परड्यांतुनी जमविलीं ताजी फुलें सुंदर ।
नेत्रीं बाष्प तसे नवे चमकती बिंदू हिमाचे वर ॥
बोले एक दुजीस " हीं तुजहुनी माझी पहा गे किती " ।
" यांचें तूं करणार काय ? " पुसती त्या एकमेकींप्रती ॥ ७ ॥
" यांचा हार रचूनि मी प्रभुपदीं वाहीन भावें तया " ।

१ परिधान केलें  २ डाळिंबी रंगाचें

" पुष्पांचा रमणीय गुच्छ करुनी अर्पीन नाथा प्रिया " ॥
" वेणी गुंफुनियां मनोहर करीं घालीन मी कुंतलो " ।
एकीमागुनि एक बोलत असें, तेथोनि गेल्या मुली ॥ ८ ॥

बाला तें स्थळ सोडुनी अपुलिया गेहांस गेल्यावरी ! ।
त्यांच्या उक्तिवरी विचार करण्या मी लागलों अन्तरी ॥
' पुष्पें एकच वेंचिलो तरुतळीं होती तिघीही जर ।
कां त्यांच्या उपयोजनेंत पडलें मोठें असें अन्तर ? ' ॥ ९ ॥

सृष्टी ही त्रिगुणात्मका, वदत हा सिद्धान्त आले मुनी ।
त्याचा प्रत्यय आज ये मज पुरा त्या बालिका पाहुनी ॥
होती सात्विक वृत्तिची प्रभुपदी अर्पीतसे जी फुला ।
देवा भक्ति समर्पणाविण न जी अन्या घरी हेतुला ॥ १० ॥

बाला राजस वृत्तिची प्रियकरा जी गुच्छ अर्पीतसे ।
प्रेमाचें प्रतिदान नाथ वितरो, हेतू मनींचा असे ॥
होती तामस जी वदे ' गुंफुनि मी घालीन वेणी शिरीं ' ।
स्वार्थावांचुनि कोणता न दुसरा हेतू तिच्या अन्तरी ॥ ११ ॥

त्यांचे वेषहि वृत्तिसूचक असे होते, कसे ते पहा ।
सत्वा श्वेत रुचे, रजा अरुण, तो काळा तमातें अहा ! ॥
ज्याची वृत्ति जशी तशीच घडती कार्यें तयाहातुनी ।
हें तों सत्य असे सनातन परी मीं जाणिलें त्या क्षणीं ॥ १२ ॥

मी ज्या ज्या समयीं बकूल-तरुतें पाहीं, वनीं हिंडतां ।
येती मन्नयनांपुढें झडकरी बाला तिन्ही तत्त्वतां ॥
त्यांनी जें कृतिनें मला शिकविलें तें तत्त्व मातें स्मरे ।
' सृष्टी ही त्रिगुणात्मका, मनुज हा वृत्ती तसा वावरे ' ॥ १३ ॥

---

# ४२ विद्याधर वामन भिडे

हे कवि इ. स. १८६१ या वर्षी जन्मले. हे जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण. मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर शाळाखात्यात यानीं नोकरी धरिली व हल्ली ते त्याच खात्यात आहेत. त्यानी काव्यरचना पुष्कळ केली आहे. त्याची भाषा प्रौढ परंतु अत्यंत संस्कृतप्रचुर असून स्थळविशेषी क्लिष्टही आहे. याची कविता चागली बोधपर व क्वचित् विनोदी आहे.

## पक्वपंडित

सोडोनियां निज-पुरा-प्रति विप्र तीन ।
वित्तार्थ अन्य नगराप्रति वित्तहीन ॥
पाथेय[१] बांधुनि पटांत सवें निघाले ।
संभाषणें श्रम तदीय पथीं निमाले ॥ १ ॥

मंत्र श्रुति-स्मृति-पुराण-कला-कलाप- ।
पारंगतत्त्व-यश मेळवुनी दुराप[२] ॥
झाले बृहस्पति-समान जनांत मान्य ।
त्यांचेपरी निपुण तेचि जगांत नान्य ॥ २ ॥

विद्वच्छिरोमणि तरी कमला[३] तयांस ।
दावी न सुंदर अशा अपुल्या मुखास ॥
देखों असें सतत कीं विबुधांस लोकीं ।
लक्ष्मी प्रसन्न नयनें न कधीं विलोकी ॥ ३ ॥

ठावें तयां कनक पीत जशी हरिद्रा ।
नेत्री दिसे कनक त्यां न कधीं दरिद्रां ॥

---

१ प्रवासाची सामुग्री २ मिळविण्यास कठीण ३ लक्ष्मी

देशाटनें कनक तें मिळवावयाला ।
जावें असा मनिं तदीय विचार आला ॥ ४ ॥
चंड, प्रचंड, परिचंड अशीं सुवर्ण ।
नांवें तदीय बहु तोषवितात कर्ण ॥
नामाक्षरानुमित पंडितता तयांची ।
ग्रंथावलोकन-विक-स्वर-रूप[४] साची ॥ ५ ॥
होती वनांतुनि अरुंद तदीय वाट ।
ती भोंवती उगवले तरुखंड दाट ॥
वल्ली तिथें कठिन-रज्जु समान-सार[५] ।
देती सदैव पथिकांप्रति कष्ट फार ॥ ६ ॥
आला रवी गगन-मध्य-पदासि जेव्हां ॥
हे तीन पांथ थकले अतिमात्र तेव्हां ॥
विश्रांति-सौख्य मग ते मिळवावयाला ।
प्रच्छाय-रम्य तरुच्या बसले तलाला ॥ ७ ॥
अभ्याश-वर्ति[६] मधुरोदक पल्वलासी ।
जावोनियां मग तयी चरणां करांसी ॥
प्रक्षाळिलें, फिरुनियां तरुच्या तळाला ।
आले तिघे; श्रम तदीय तदा गळाला ॥ ८ ॥
पाथेय सोडुनि पटांतुनि खावयाला ।
ते बैसले, मधुर तें गमलें तयांला ॥
जिव्हा कदन्नहि सुधेपरि गोड मानी ।
भागे यदा नर उदंड तनु-श्रमांनी ॥ ९ ॥
पाथेय खाउनि तयां बहु तोष झाला ।

४ केवळ पुस्तकी विद्या, असा भाव ५ बल ६ जवळच असलेल्या

कांतार-संचरण-ज[7] श्रमही निमाला ॥
आरंभिलें मग तयी विविधप्रकारें- ।
संभाषणा; विषय गोड तयांसि सारे ॥ १० ॥

आसन्न-देश-गत देखुनि कीकसांतें[8] ।
बोले सदर्प वच चंड सुहृद्द्वयांतें ॥
"अभ्यस्त मंत्रबल दाखवितों पहा हें ।
माझेपरी कवण मंत्रबलासि वाहे ? ॥ ११ ॥

हीं कीकसें हरि-शरीर-गतें, तयाचें- ।
देहावसान घडलें शिशिरांत साचें ॥
हें मंत्र-योग पटुता मज जाणवीते ।
म्यां त्या जरी बघितलें न कधी हरीतें ॥ १२ ॥

मन्मन्त्र-योग-बल दाखवुनी तुम्हांतें ।
आश्चर्य वाटविन जोडुनि कीकसांतें ॥
कंकाल अस्थि जुळवूनि करीन आतां ।
मीं लाविल्याविण तयांसि मदीय हातां" ॥ १३ ॥

ऐसें वदोन जल घे मग चंड हातीं, ।
त्याचा प्रचंड, परिचंड विधी पहाती ॥
मंत्राक्षरें मग तयें प्रबळें मुखानें- ।
उच्चारिली, बल दिलें सलिला तयानें ॥ १४ ॥

हें मंत्र-पूत जल सिंचियलें तयानें ।
अस्थीवरी वदुनि मंत्र-वचा मुखानें ॥
कंकालरूप धरिलें हरि-कीकसांनीं ।
तो चंड शक्ति अपुली मग फार वानी ॥ १५ ॥

---

७ वनात फिरण्यामुळे झालेला ८ हाडाचा सापळा

" माझेपरी कवण मर्त्य समर्थ आहे ? ।
माझे परी कवण मंत्रबलासि वाहे ? ॥
मी लाविल्याविण करा हरिकोकसातें ।
तो जोडिलीं, बल मदीय अहो ! पहा तें " ॥ १६ ॥

दर्पोक्ति ही परिसुनी वदला प्रचंड ।
तारस्वरें, उठुनि ठोकुनि बाहुदंड ॥
" मच्छक्ति बाढतर सत्य तुझ्या परीस ।
मांसोपपन्न करितों बघ ह्या हरीस " ॥ १७ ॥

बोले प्रचंड वच हें, मग अल्प तोय ।
घेऊनि मंत्रपठनांत निमग्न होय ॥
तोयें तदा मिळविलें बल मंत्रजन्य ।
मानी प्रचंड अपणासि अतीव धन्य ॥ १८ ॥

हें पंजरावरि तयें जल सिंचियेलें ।
मांसोपपन्न निमिषांत तयासि केलें ॥
चर्मेंहि आवृत मृगेंद्र-शरीर झालें ।
तें ठाकलें भुवि उभें, परि तें न हाले ॥ १९ ॥

हर्यक्ष उग्रतनु तो उभला विशाल ।
वायु-प्रवाह-परि-कंपित-केश-जाल ॥
त्यातें प्रचंड अवलोकुनि फार हर्षे ।
मानी स्वतास अति धन्य बलप्रकर्षे ॥ २० ॥

मित्रांस दावुनि मृगेंद्र स-मांस-चर्म ।
वर्णी प्रचंड निज अद्भुतरूप कर्म ॥
" माझेंचि मंत्रनिपुणत्व जनांत मान्य- ।
होईल, सत्य मजसा भुवनांत नान्य " ॥ २१ ॥

ह्या दर्प-गर्भ न वचा परिचंड साहे ।
बोले " तुम्हापरिस मद्बल थोर आहे ॥
प्राणोपपन्न मृगराज करावयाला ।
मी शक्त, हें उघड दाखवितों तुम्हांला " ॥ २२ ॥

बोलोनि हें वच, जला परिचंड हातीं- ।
घे, तत्सुहृद्द्वय तदीय विधी पहाती ॥
मंत्रोद्भवें जल बलें उपपन्न केलें ।
तेव्हां, तयें मग हरीवरि सिंचियेलें ॥ २३ ॥

आश्चर्य हें मग घडे अतिमात्र, तोय- ।
स्पर्शें मृगेंद्र असुंनी उपपन्न होय ॥
तो सासु[9] पाहुन तदा परिचंड हर्षे ।
केकी[10] जसा घन-घटा-नव-वारि-वर्षे ॥ २४ ॥

वात्यारयाहत[11]-पयोधि-रवा-समान ।
तो गर्जना हरि करी उभवोनि मान ॥
पांथ-त्रय-श्रुति-वरि बसवूनि टाळी ।
ती गर्जना सकल तद्धृतिही पिटाळी ॥ २५ ॥

गुंजाफलोपम विलोचन शोणवर्ण[12] ।
प्रेरोनि चंचल तदा, उभवोनि कर्ण ॥
वांसोनि तीक्ष्ण-रद आनन अध्वनींना[13] ।
तो श्वापदेंद्र भिववी अतिमात्र दीनां ॥ २६ ॥

पांथांवरी मग मृगाधिप झेंप घाली ।
पाडी तयां बल-लवें निमिषांत खालीं ॥

९ सजीव १० मयूर ११ खवळलेल्या समुद्राच्या गर्जनेप्रमाणे १२ रक्तवर्ण
१३ प्रवाशांना

ज्याचा गजावलि-विमर्दन नित्य खेळ।
लागे मनुष्यहननीं न तयासि वेळ॥ २७॥

चंड, प्रचंड, परिखंड मृगाधिपानें।
केले विदीर्णतनु; तद्बल तें न सानें॥
हा हंत! त्या क्षणिच दंडित ते निमाले।
ते जीर्ण त्या पशुचिया जठरांत झाले॥ २८॥

हा हंत! मन्त्रपटु पंडित ते निमाले!!।
पांडित्यही विफल सर्व तदीय झालें॥
हो ज्ञान निष्फल सखा न जया विवेक,।
तें क्लेश देइल सदैव नरा अनेक॥ २९॥

ज्ञानावलिप्त[१४] नर देखतसों, स्वशर्मा।
जे स्वप्रिया, बुडविती स्वजना, स्वधर्मा॥
त्यांचा धरोनि हृदयांत असा दुरन्त।
जागो सदैव सदसन्मननांत[१५] सन्त॥ ३०॥

'पक्कपंडित' कथा मनोरमा। वामनात्मज मिळावया शमा॥
हे रची; स-शम त्या करो हरी!। अन्य कामहृदयीं न तो धरी॥ ३१॥

---

# ४३ दत्तात्रय कोंडो घाटे

जन्म.–ई. स. १८७५, मृत्यु.–इ. स. १८९९

आधुनिक कविमंडळात हे एक सुंदर कविरत्न चमकून गेले. हे जातीचे मराठे असून, मुंबई युनिव्हर्सिटीचे बी ए. होते यानी पुष्कळ लहान लहान काव्ये केली आहेत याची भाषा सरस व प्रौढ आहे याच्या कवितेत प्रसाद विशेष असून करुणरस व उद्विग्नता यांची छटा ठिकठिकाणी आढळते. निर्घृण काळाने यांच्या रसाळ

---

१४ ज्ञानाने गर्विष्ठ १५ सारासार विचारात

वाणीचा मराठी वाङ्मयास अधिक लाभ घेऊं दिला नाहीं ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे !

## तरुवरा

क्षुद्र बुद्धिनें अवगणिलें तरि थोर करी उपकृती ।
दिसते तीच मला तव रिती ॥
कितीक वेळां जवळुनि गेलों, नाहिं पाहिलें तुला ।
मनीं तो राग न तूं मानिला ॥
विहंग-वदनें हका मारिल्या, जवळि न आलों तरी ।
धरिला राग न तो अंतरी ॥
अपराध्यावरतीही करिती सन्त दया अक्षय ।
दिसतो तोच तुझा निश्चय ॥
जलवृष्टीनें भिजलो आलों जवळ तुझ्या तरुवरा ।
दिला तूं प्रेमानें आसरा ॥
संकटसमयीं सहाय्य करिती सन्त सुजन-दुर्जनां ।
नाही भेद मनी सज्जना ॥
शाखा-कर पसरुनी तयांच्या खालीं मज घेतलें ।
सुतासम स्नेहें सांभाळिलें ॥
फेडुं कसा उपकार तुझा मी दुर्बळ नकळे मला ।
अर्पितों पद्यसुमन हें तुला ॥

## दुःखिताचे उद्गार

सुटलासी दीन अनाथा । धरिलेंसी मृत्यूपंथा ॥ शेवटीं ॥ १ ॥
संपला येथला वास । सरला तव आयुप्रवास ॥ शेवटीं ॥ २ ॥
दारिद्र्यदशा तनुसंगें । येथेंच राहिली मागें ॥ यापुढें ॥ ३ ॥
तुज तीव्र रवीचा ताप । मावळला आपोआप ॥ यापुढें ॥ ४ ॥

तुज अद्य हिवाचें वारें । झोंबेल कधींहि न बारे ॥ यापुढें ॥ ५ ॥
घनवृष्टि पुन्हा येथील । कधिंही न तुला भिजवील ॥ यापुढें ॥ ६ ॥
हंसतील न आतां धनिक । छळितील न निर्दय लोक ॥ यापुढें ॥ ७ ॥
वसनाची न करीं चिंता । झालास दिव्य तूं आतां ॥ यापुढें ॥ ८ ॥
गेलास करुनि अन्नान्न । करिं आतां अमृतपान ॥ यापुढें ॥ ९ ॥
हरल्या तव आधिव्याधि । टळल्या तव सर्व उपाधी ॥ यापुढें ॥ १० ॥
बहुमान तसा अपमान । तुज आतां सर्व समान ॥ यापुढें ॥ ११ ॥
तनुविकार येथिल सारे । येथेंच राहिले बारे ॥ यापुढें ॥ १२ ॥
गेलास खऱ्या सुखधामा । घे आतां चिर विश्रामा ॥ यापुढें ॥ १३ ॥
अशनाविण वसनावीण । गेलास अम्हां त्यागून ॥ त्रासुनी ॥ १४ ॥
सांगशील ना सुरभुवनीं । किती निर्दय आम्ही प्राणी ॥ येथले ॥ १५ ॥
प्रेमाचें मोल कुणाला । ठाऊक नसे आम्हांला ॥ सांग तूं ॥ १६ ॥
बा सांग सुखानें कांहीं । मज आतां बघवत नाही ॥ ही दशा ॥ १७ ॥
चाललों तरी सखया मी । भेटेन तुला निजधामीं ॥ लवकरी ॥ १८ ॥

## प्रभात

प्रभात झाला रवी उदेला ऊठ उशिर झाला ।
प्रेमळभावें सरळ मनानें वंदि जगत्पाला ॥ १ ॥
दहिंवर पडलें मौक्तिक-वृष्टी जणुं भूवर झाली ।
प्रेम रंग-रंगित ही स्मित-मुखि पूर्व दिशा खुलली ॥ २ ॥
मंदमंद मधुगंधि समीरण येती भेटाया ।
आलिंगुनि सांगती 'काळ हा दवडुं नको वांया' ॥ ३ ॥
हास्यवदन ही सुमन-मंडळी उठुनि उषःकालीं ।
दहिंवर तोयें जणुं कां प्रातःस्नान करित बसली ॥ ४ ॥
प्रसन्न-वदना वन लक्ष्मी ही शुचिर्भूत दिसते ।
नानाविध नव पल्लव वाहुनि देवपुजा करिते ॥ ५ ॥

तरुवर उठले, प्रफुल्ल झाले, आनंदें डुलती ।
तन्मय होउनि मानस-पूजा जणुं कां हे करिती ॥ ६ ॥
विहंग उठले गाउं लागले तरुवरि केव्हांचे ।
मंजुळ-वाणी ऐक, जणूं हे गायक स्वर्गींचे ॥ ७ ॥
गगन-विहारी खग वैतालिक वायूवरि बसुनी ।
प्रभुगुण गाती उंच अंबरीं तल्लिन होऊनी ॥ ८ ॥
खळखळ वाहत लगबग येती तटिनी गिरिवरुनी ।
देवदर्शना जणूं चालल्या भाविक या तरुणी ॥ ९ ॥
तरुवसनावृत तुंग पुरातन पर्वत हे दिसती ।
वल्कल-धारी आद्यऋषी जणुं ध्यान धरुनि बसती ॥ १० ॥
जिकडे तिकडे मंगलमय हें भूमंडळ दिसतें ।
ऊठ मानवा आळिव प्रभुला जाइं शरण त्यातें ॥ ११ ॥

## घारीस उद्देशून

अमर्याद हा व्योमसिंधू गभीर । मधे चालली घार ही नाव धीर ॥
अशी उंच ही एकटी संचरे कां । पुसाव्या हिला सर्व येथून शंका ॥ १ ॥
जगाचा भला थोरला हा पसारा । तुला वाटला काय निःसार सारा ॥
म्हणोनी अम्हां सोडुनी भूमिभागीं । सदा हिंडसी उंच आकाशमार्गीं ॥२॥
खरें प्रेम नाहीं, खरा स्नेह नाहीं । दया लेश माया नसे येथ कांहीं ॥
असें वाटलें काय बाई तुला गे । म्हणोनी तुला अंबरीं गोड लागे ॥ ३ ॥
जयानें तुझें प्रेम चोरूनि नेलें । तुला एकलें खालतीं सोडियेलें ॥
तया वल्लभा अंबरीं शोधण्यातें । निघालीस कां सांग बाई खरें तें ॥ ४ ॥
गतप्राण झालीं तुझीं काय बाळें । तुला वाटलें प्राण त्यांचे उडाले ॥
म्हणोनी पुन्हां त्यास आणावयाला । नभीं हिंडसी काय वेडे कशाला॥५॥

जयानें तुझी निर्मिली पक्षिकाया । दिली अंबरीं शक्ति तूतें उडाया ॥
तुला जो सदा पोषितो वाढवीतो । नभीं शोधिसी काय बाई विधी तो ॥६॥
जगा त्रासुनी लोक संन्यास घेती । घरा सोडुनी वास रानीं करीती ॥
परी रानही सोडिलें दूर खालीं । विरक्ती कशानें तुला पूर्ण आली ॥७॥
जगाचा तुला वीट आला कशानें । मला गूढ सांगें, तुझ्या संगतीनें ॥
नको येथलें प्रेम खोटें क्षणाचें । गडे दाव जें सत्य, जें शाश्वतीचें ॥ ८ ॥

## निज नीज माझ्या बाळा !

चाल--सुतार निर्गुणिचे तुजसाठीं आणवीले

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा ।
निज नीज माझ्या बाळा ॥ ध्रु० ॥
रवि गेला रे सोडुनि आकाशाला ।
धन जैसें दुर्भाग्याला ॥
अंधार वसे चोंहिकडे गगनांत ।
गरिबाच्या जेंवि मनांत ॥
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक ।
मम आशा जेंवि अनेक ॥
॥ चाल ॥ खडबड हे उंदिर करिती ।
कण शोधायातें फिरती ॥
परि अंतीं निराश होती ॥
लवकरि हेही सोडितील सदनाला ।
गणगोत जसें अपणाला ॥ १ ॥
बहु दिवसांच्या जुन्या कुडाच्या भिंती ।
कुजुनी त्यां भोंकें पडती ॥
त्यांमधुनी त्या दाखविती जगताला ।

दारिद्र्य आपुलें बाळा ॥
हें कळकीचें जीर्ण मोडकें दार ।
करकरकर वाजे फार ॥
हें दुःखानें कण्हुनि कथी लोकाला ।
दारिद्र्य आपुलें बाळा ॥
॥ चाल ॥ वाहतो फटीतुनि वारा ।
सुकवीतो अश्रूधारा ।
तुज नीज म्हणे सुकुमारा ।
हा सूर धरी माझ्या या गीताला ॥
निज नीज माझ्या बाळा ॥ २ ॥
जोंवरतीं हें जीर्ण झोंपडें आपुलें ।
दैवानें नाहीं पडलें ।
तोंवरती तूं झोंप घेत जा बाळा ।
काळजी पुढें देवाला ॥
जोंवरतीं या कुडीत राहिल प्राण ॥
तोंवरि तुज संगोपीन ॥
तदनंतरची करूं नको तूं चिंता ।
नारायण तुजला त्राता ॥
॥ चाल ॥ दारिद्र्या चोरिल कोण ? ।
आकाशा पाडिल कोण ? ॥
दिग्वसना फाडिल कोण ? ॥
त्रैलोक्यपती आतां त्राता तुजला ।
निज नीज माझ्या बाळा ॥ ३ ॥
तुज जन्म दिला सार्थक नाहीं केलें ।
तुज कांहिं न मी ठेवीलें ॥

तुज कोणि नसे, छाया तुज आकाश ।
धन दारिद्र्याची रास ॥
या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा ।
गृह निर्जन रानीं थारा ॥
तुज ज्ञान नसे अज्ञानाविण कांहीं ।
भिक्षेविण धंदा नाहीं ॥
॥ चाल ॥ तरि सोडुं नको सत्याला ।
धन अक्षय तेंच जिवाला ।
भावें भज दीनदयाळा ।
मग रक्षिल तो करुणासागर तुजला ।
निज नीज माझ्या बाळा ॥ ४ ॥

## कोकिलकूजित

प्रातःकालीं कुणी कोकिला तरुशिखरीं बैसुनी ॥
उंच स्वरानें सांगुं लागली जगता लागूनी ॥ १ ॥
वसंतरायें आज्ञा देउनि मजला पाठविलें ॥
राजदूति मी आज्ञा त्याची सांगाया आलें ॥ २ ॥
वसंतराया येइल आतां तुम्हां भेटाया ॥
राजदर्शना सज्ज रहावें आलें सांगाया ॥ ३ ॥
अलंकार भूषणें लेउनी तनुला सजवावें ॥
सुहास्यवदनें चतुर खगांनी सामोरें जावें ॥ ४ ॥
बालतृणाचे रम्य गालिचे वनांत पसरावे ॥
विविध फुलांचे सडे तरूंनीं मार्गी घालावे ॥ ५ ॥
प्रफुल्ल सुमनें हातिं घेउनी लतिकांनीं रहावें ॥
मंद सुगंधित शीतल अनिलें वनीं संचरावें ॥ ६ ॥

तन्वंगी सरितांनीं प्रेमें नाचावें गावें ।
तुंग गिरींनीं वसंतवैभव जगता दावावें ॥ ७ ॥
मिलिंद्-बंदीजनीं त्यापुढें पथिं ललकारावें ।
विहंग वैतालिकें तरुवरी स्तुतिपाठा गावें ॥ ८ ॥
ताल तरूनें छत्र, कीचकें चामर ढाळावें ।
तरुलतिकांनीं विनयें वांकुनि राया वंदावें ॥ ९ ॥
बाल-रवीनें अरुण-गुलाला गगनीं फेंकावें ।
विकसित सुमनीं रायावरि मकरंदा उधळावें ॥ १० ॥
दिगंगनांनीं दहिंवर सिंचुनि स्नाना घालावें ।
उपवन-श्रीनें वस्त्राभरणें राया सजवावें ॥ ११ ॥
वनदेवांनीं षड्रसयुत फलभोजन घालावें ।
सरोवरांनीं कमल-सुगंधी जल प्याया द्यावें ॥ १२ ॥
मदनोद्यानीं उंच आसनीं राया बसवावें ।
वृक्षवल्लरी मिळुनी मंगलपूजन साधावें ॥ १३ ॥
वनीं येउनी कविनीं कोकिल कूजित ऐकावें ।
हा बघ आला वसंत कविते, त्यातें वर्णावें ॥ १४ ॥

## बघसी अंत किती राजसे !

( कवितेस उद्देशून )

जिकडे तिकडे जगांत सारें प्रेम सांचलें दिसे ।
तयाविण कोठें कांहीं नसे ॥
प्रवाह सारे धांवत जाती नदीकडे अक्षय ।
होती तिज भेटुनि अक्षय ॥
निशिदिनिं रानोवनीं चालुनी सरिताही झरझरा ।

देती आलिंगन सागरा ॥
या पुष्पवल्लरी तरुसंगें क्रीडती ।
शशि-संगें रमते सदा कौमुदी सती ।
अंबरी समीरण सारे सम्मीलती ॥
प्रेमावांचुनि जीवित निष्फल ठावें तुजला असे ।
बघसी अंत किती राजसे ॥ १ ॥

तुंग मही-धर गगन-श्रीच्या वदनाला चुंबिती ।
शशि-कर जल-लहरी कर्षिती ॥
दिन-मणि येता घरीं प्रेमला पूर्वदिशा सुंदरी ।
फुलते कदंब-कुसुमा परी ॥
हांसत हांसत प्रफुल्ल वदनें तारागण खेळती ।
अंबरी परस्परां ओढिती ॥
रवि येतां उघडी नेत्रातें कमलिनी ।
शशि दिसतां हांसे आनंदुनि कुमुदिनी ।
वन-लक्ष्मी नटते मधु आला पाहुनी ॥
चंचल चपला परि ती मेघा सोडुनि दूर न वसे ।
बघसी अंत किती राजसे ॥ २ ॥

शालदुशाला नको नको मज मंदिलही भरजरी ।
त्याहुनि कंथा माझी बरी ॥
सुरेंद्र-नगरी नको, तुजसवें राहिन मी काननीं ।
दुजें धन नको मला तुजहुनी ॥
ओवाळुनि टाकिन तुजवरुनी साठ कोटि अप्सरा ।
नको ती इंद्राची इंदिरा ॥
तुज शोधित फिरलों जनीं स्मशानीं वनीं ।
तरुवल्ली विहगा विचारिलें जाउनी ॥

गिरि सरिता उडुगण नाही सांगत कुणी ॥
काय करूं तुज पाहूं कोठें तुजविण भरलें पिसें ।
बघसी अंत किती राजसे ॥ ३ ॥
झुळ झुळ वाहे प्रवाह जल हें एकसारखें जसें ।
माझें आयु चाललें तसें ॥
तुजविण दिसती शून्य दशदिशा ये लवकरि धांउनी ।
देई आलिंगन साजणी ॥
सुमन-भूषणें रचुनि परोपरि तनु-लतिका मंडिन ।
गुंफुनि अलंकार देइन ॥
नव-काव्य-माळ वेणींत तुझ्या घालिन ।
नव-रसी सुरस मिष्टान्न तुला चारिन ।
या कवि-कुंजांतच तुजसंगें राहीन ॥
सखये कविते दर्शन दे मज तुजविण कोणी नसे ।
बघसी अंत किती राजसे ॥ ४ ॥
शास्त्राभ्यासा करुनी विटलों, विटलों विद्यालया ।
यानें जाइन लवकरि लया ॥
महा परीक्षा झाली, आली विद्या किंवा कला ।
तरी मी तुजवांचुनि एकला ॥
प्रेमदृष्टि तूं ठेव मजवरी, मग सारें तत्क्षणी ।
देइन हांकुन हृदयांतुनी ॥
ही विद्या साधिल तव-पद-संवाहन ।
ही कला करिल तव तनु-लतिका-मंडन ।
नव काव्य रचुनि हा दास करिल रंजन ॥
तव चरणीं सर्वस्व वाहिलें येउनि घे त्या कसें ।
बघसी अंत किती राजसे ॥ ५ ॥

---

# ४४ कृष्णाजी पांडुरंग लिमये

हे कवि कोंकणांत दापोली तालुक्यात पाडलें गांवी शके १७९९ या सालीं जन्मले. हे 'राधारमण' या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे जातीचे कोंकणस्थ ब्राह्मण पुणे येथील 'न्यू इंग्लिश स्कुलात' हे शिक्षक होते. हल्ली हे दापोली येथे 'मिशन स्कुलात' शिक्षक आहेत. याची लहान मोठी पुष्कळ काव्ये प्रसिद्ध आहेत. याची भाषा प्रौढ परंतु बरीच संस्कृतशब्दप्रचुर आहे. कवितेत प्रसादगुण चागला उतरला आहे

## स्वप्न

**चैतन्य जो ओतित जीवलोकीं। तो पावला भास्कर अन्यलोकी ॥**
**होई क्रमें दैनिक[1] मिश्र घोष। संधि-प्रकाशा-सह नामशेष ॥ १ ॥**
**स्थलीं स्थलीं दीप-लतावलीला। ज्योति-र्मयी[2] पुष्प-विकास-लीला ॥**
**विभूषवी चालविण्यास साचा। व्यापार जो जागृति-माळिणीचा ॥२॥**
**विनाशुनी दीप-परंपरेला। आधार जी जागृति-जीविताला ॥**
**सुषुप्ति शांतिप्रद सिद्ध होय। वर्चस्व लोकीं करण्या स्वकीय ॥ ३ ॥**
**कंठी जिवांच्या मृदु बाहुपाश। करूनियां अर्पण सावकाश ॥**
**मोहूनियां इंद्रियवर्ग सर्व। निद्रा स्वसत्ता मिरवी सगर्व ॥ ४ ॥**
**हळूहळू बाल-दशा त्यजोनी। नक्षत्ररत्नी तनु भूषवोनी ॥**
**तारुण्य-भावें रजनी विराजे। सुषुप्तिचा अंमल पूर्ण गाजे ॥ ५ ॥**
**शुभंकर श्यामल शांत शान। सुषुप्तिचें राज्य हरीत भान ॥**
**पराजिता जागृति दे उसासे। कोणासही दास्य न गोड भासे ॥ ६ ॥**
**'मातें मिळे आश्रय कोण आतां'। चिंतेस ही पातली थोर चिंता ॥**
**विचारपंक्तीस पडे विचार। करीतसे दुःखचि दुःख फार ॥ ७ ॥**

---

१ दिवसाची गटबड २ नक्षत्रमय

निद्रा विनिद्रा निज राज्यतंत्र । पाळी जरी दक्षपणें सुयंत्र ॥
तरी तया ऱ्हास कदा चुकेना । लोभें न वास स्थिर संपदांना ॥ ८ ॥
साधावया योग्य रिपूंस वैर । सुषुप्तिचा दीन दशा-प्रकार ॥
करीतसे उत्सुक जागृतीला । तदीय राज्यस्थिति दर्शनाला ॥ ९ ॥
चारावलीशी बहु-रूप-धारी । मार्जारिशी केवळ मंदचारी ॥
राज्यीं शिरे जागृति-वैरिणीच्या । छाया जशी अंतरिं आरशाच्या ॥१०॥
विचार नैसर्गिक नित्यमित्र । जाई दिन-श्री-सह जेंवि मित्र ॥
संगें तिच्या तीसम ज्या हुरूप । स्वीकारण्याला विविध स्वरूप ॥ ११ ॥
अन्योन्य कंठार्पित बाहुपाश । सुषुप्तिचा आक्रमिती प्रदेश ॥
विचार तो जागृति तीच अंतीं । सुषुप्तिच्या संमुख नीट येती ॥ १२ ॥
नरेंद्रशी जागृति जे विशाल । निर्मी तदां अद्भुत इंद्रजाल ॥
त्या स्वप्न हें नांव मिळे जनांत । लाभे पदा अग्र चमत्कृतीत ॥ १३ ॥

## इंद्रधनुष्य

मेघोदयें नील नभस्तलाला । विभूषवी वासव-चाप-लीला ॥
करी तिचें सुंदर चित्ररूप । आश्चर्ययोगें जन चित्ररूप ॥ १ ॥
नभस्तला माणिक पाच नील । यांचें जणूं कोंदण रम्यशील ॥
कोणी करी शिल्प-कला-विहारी । मयासुराचा मद जो निवारी ॥ २ ॥
पयोधरीं भासुर चित्रहार । नभःश्रियेच्या करितो विहार ॥
अनंग-चाप प्रतिमाच किंवा । घेई नभश्चित्र-पटीं विसावा ॥ ३ ॥
परोपकारी निज जीवनाला । वेंचावया अंबुद–राज आला ॥
तदादरा इंद्र-धनुः-स्वरूप । शोभे जणूं तोरण रम्यरूप ॥ ४ ॥
अनेक-रत्नावलि बद्ध सेतू । मंदाकिनी-मंडन-मुख्य-हेतू ॥
असे, दिसे भव्य कमान त्याची । न मूर्ति ही इंद्र-शरा-सनाची ॥ ५ ॥

मुकुंद-वक्ष-स्थल-वास-लीला । विचित्र-वर्णा वन-पुष्प-माला ॥
पूर्वीं कशी क्षोभलि हें जनांला । आली धनु-श्री जणुं सांगण्याला ॥६ ॥
नभःपटा उज्ज्वल वर्ण-लेप । भरूनियां सुंदर इंद्रचाप ॥
रेखी करांनीं सविता स्वकीय । ही मानवां साध्य न गोष्ट होय ॥ ७ ॥
रवि-प्रभेची शुची बाह्य काया । तशीच की आंतहि हें पहाया ॥
प्रकाश-वर्गी-करण-क्रियेचा । प्रयोग होतो गगनांत साचा ॥ ८ ॥
' परस्पर-स्नेह-वशें-स्वतांची । शोभा चढे सर्वहि संहतीची ' ॥
हे सांगण्या तत्त्व गमे जगाला । शोभे नभीं सुंदर वर्ण-माला ॥ ९ ॥
दिव्य-प्रभा-भूषित चाप-कांती । पहावया उन्मुख लोक होती ॥
अधिष्ठितां उच्चपदा जनांची । कोणाकडे दृष्टि वळे न साची ॥ १० ॥
धनुष्य हें निर्गुण वक्र-शील । टिके जरी केवळ अल्प काल ॥
तरी तयाला वश लोक होय । अ-तुल्य-सौंदर्य-रसें तदीय ॥ ११ ॥

होतां पयो-द-पटलीं क्रम-पूर्व लोप ।
सांगे जनां घन-रवें जणुं इंद्रचाप ॥
' आयुष्य अल्पचि असो परि लोकमान्य ।
होवोनि जा मिळवण्या परलोक धन्य ' ॥ १२ ॥

---

# ४५ राम गणेश गडकरी

---

हे कवि "गोविंदाग्रज" ह्या नावानें प्रसिद्ध असून ह्याचा जन्म इ. स १८८५ त गुजराथेंत नवसरी येथे झाला. हे जातीचे चांद्रसेनीय कायस्थ प्रभु असून करजत तालुक्यांत सागवी येथचे मूळचे राहणारे. परंतु ह्यांचे बाळपण गुजराथेंत गेलें, व अभ्यास, उद्योग इत्यादि बहुतेक सर्व पुण्यास झालीं. घरच्या गरिबीमुळें ह्यांचें शिक्षण इंग्रजी प्रवेश परीक्षेच्या पलीकडे गेलें नाहीं. ह्यांचा काव्य--वाङ्मय--व्यासंग दांडगा होता. ह्यांनीं लहानमोठ्या पुष्कळ कविता लिहिल्या असून त्या विविध मासिकांतून

प्रसिद्ध झाल्या आहेत. ह्यांची काव्यरचना रसाळ, प्रासादिक, ठसकेदार व मधुर आहे. ह्यांनीं तीन चार नाटकेंही लिहिलीं असून ती हल्लीं रंगभूमीवर येऊन बरींच लोकप्रिय झालीं आहेत. ह्यांची विनोदी लेख लिहिण्याची हातोटी प्रशंसनीय होती. हे इ स. १९१९ त निवर्तले. ह्यांची ग्रंथरचना बऱ्याच वरच्या दर्ज्याची आहे, ह्यांत शंका नाहीं.

## राजहंस माझा निजला !

पतिनिधनानंतर अल्पावधीतच बापडीवर एकुलत्याएक मुलाचे निधन पहाण्याचा प्रसग आल्यावर असा भ्रम का होणार नाही ?

हें कोण बोललें बोला ?
'राजहंस माझा निजला !।'
दुर्दैवनगाच्या शिखरीं। नवविधवा दुःखी आई।
तें हृदय कसें आईचें। मी उगाच सांगत नाही !
जें आनंदेंही रडतें। दुःखांत कसें तें होई—
हें कुणीं कुणां सांगावें !
आईच्या बाळा ठावें ?
प्रेमाच्या गांवा जावें—
मग ऐकावें या बोला। 'राजहंस माझा निजला '!
मांडीवर मेलें मूल। तो हृदया धक्का बसला।
होउनी कळस शोकाचा। भ्रम तिच्या मानसीं वसला।
मग हृदय बधिरची झालें। अतिदुःख थिजवि चित्ताला।
तें तिच्या जिवाचें फूल !
मांडिवर होत मलूल !
तरि शोकें पडुनी भूल—
वाटतची होतें तिजला। ' राजहंस माझा निजला !'

जन चार भोंवतीं जमले । मृत बाळा उचलायाला ।
तो काळ नाथनिधनाचा । हतभागी मना आठवला ।
तो प्रसंग पहिला तसला । हा दुसरा आतां असला !
तें चित्र दिसे चित्ताला !
हें चित्र दिसे डोळ्यांला !
निज चित्र चित्तनयनाला,
मग रडुनि वदे ती सकलां । ' राजहंस माझा निजला !'
करुं नका गलबला अगदीं । लागली झोंप मम बाळा ।
आधीच झोंप त्या नाहीं । खेळाचा एकच चाळा !
जागतांच वाऱ्यासरसा । खेळाचा घेइल आळा !
वाजवूं नका पाऊल !
लागेल तया चाहूल !
झोंपेचा हलका फूल !
मग झोंपायाचा कुठला । ' राजहंस माझा निजला !'
हें दूध जरासा प्याला । आतांसा कोठें निजला !
डोळ्याला लागे डोळा । कां तोच भोंवतीं जमलां ?
जा ! नका उठवुं वेल्हाळा । मी ओळखतें हो सकळां !
तो हिराच तेव्हां नेला !
हिरकणीस आतां टपलां !
परि जिवापलिकडे याला—
लपवीन ! एकची मजला । ' राजहंस माझा निजला !'
का असलें भलतेंसलतें । बोलतां अमंगळ त्याला ?
छवकड्यावरुनि माझ्या या । ओंवाळुनि टाकिन सकलां !
घेतें मी पदराखालीं । पाहूंच नका लडिवाळा !

मी गरीब कितिही असलें !
जरि कपाळ माझें फुटलें !
बोलणें तरी हें असलें--
खपणार नाहिं हो मजला । 'राजहंस माझा निजला !'

हें असेंच सांगुनि मागें । नेलांत जिवाचा राजा !
दाविलाहि फिरूनी नाहीं । नाहित का तुम्हां लाजा ?
न्यावयास आतां आलां । राजहंस राजस माझा !
हा असा कसा दुष्टावा ?
कोणत्या जन्मिचा दावा ?
कां उगिच गळा कापावा—
पाहुनी गरिब कोणाला । 'राजहंस माझा निजला !'

हे काळे कुरळे केश । खेळतात डोक्यावरतीं ।
ही दृष्टि पहा मम वदनीं । नेहमीं अशी ही असती !
हें तेज अशा रत्नाचें । झालें का आहे कमती ?
कानांत नाचती डूल,
तोंडावर हंसरें फूल,
जीवाची घालुनि झूल—
मी असाच झांकिन याला । 'राजहंस माझा निजला !'

या अर्ध्या उघड्या नयनीं । बाळ काय पाहत नाहीं ?
या अर्ध्या मिटल्या तोंडीं । बाळ काय बोलत नाहीं ?
अर्थ या अशा हंसण्याचा । मज माझा कळतो बाई !
हें हंसें मुखावर नाचे !
जणुं बोल दुग्धपानाचे !
कीं मुक्या समाधानाचे !

इतुकेंहि कळे न कुणाला–। 'राजहंस माझा निजला!'
या माझ्या मानससरसीं। सारखें प्रेमजल वाही!
त्या तरंगलहरींवरतीं। राजहंस पोहत राही!
सारखा पोहुनी दमला। मग मला भुकेला बाही!
नयनांच्या शिंपांमधुनी,
अश्रूंचे मौक्तिकसुमणी,
मीं दिले तया काढोनी,
मोत्यांचा चारा असला। 'राजहंस खाउनी निजला!'

ते वैकुंठेश्वर गेले। पदिं त्यांच्या अर्पायाला।
ही अखंड या अश्रूंची। वैजयंति मोहनमाळा।
मी करित असें केव्हांची। धरुनियां उराशी बाळा।
कौस्तुभ हा माळेमधला!
हृदयाचें कोंदण याला!
तो चोराया कां आला!
दैत्याहुनि दैत्यचि झाला। 'राजहंस माझा निजला!'

हें असें जाहलें म्हणतां। तरि देवचि निजला का हो?
जरि निर्दय होउनि निजला। आळवीन फोडुनि टाहो
कीं असा पोटचा गोळा। पोटांतचि देवा राहो!
ही कुऱ्हाड आकाशाची,
मजवरती पाडायाची,
नाहीच कल्पना त्याची,
हा तुमचा कावा सगळा। 'राजहंस माझा निजला!'

जरि दूत यमाचे आले। लाडक्यास या न्यायाला।
ते निष्ठुर असले तरिही। भुलतील पाहुनी याला!

हृदयाचें होउनि पाणी । लागतील चुंबायाला !

मी मुका असा घेतांना–
हा पहा–पुन्हां हंसलाना !
कां अशा फिरवितां माना ?

सुख खुपे काय डोळ्याला । 'राजहंस माझा निजला !'

हें सर्वस्वाचें फूल । त्याभवतीं झालां गोळा ।
मी बघतें–कधिंचा आहे । त्यावरतीं तुमचा डोळा !
एकदां करावा त्याचा । वादानें चोळामेळा !

सर्वांच्या मनिंचा लाहो,
हाच ना ? स्पष्ट बोला हो ?
मी इतकी वेडी काहो—

कीं हेंहि कळेना मजला । 'राजहंस माझा निजला !'

जरि होउं नये तें झालें । तरि सोडणार या नाहीं !
पाळणाहि रुततो ज्याला । प्रेमें जरि निजवी आई !
तो देह खांच दगडांत–छेः ! नको नको ग बाई !

हृदयाची खणुनी खांच,
झांकिन मी बाळ असाच,
दुःखांचे फत्तर साच !

जा ! जाउनि सांगा काळा । 'राजहंस माझा निजला !'

जरि काळाचाही काळ । बाळाला न्याया आला !
तरि नाहीं मी द्यायाची । या जीवाच्या जीवाला !
सारखीं गाउनी गाणीं । निजवीन कल्पवर याला !

जा ! करा आपुलें काळें !
माझेही दमले डोळे !
प्राणांचें पसरुनि जाळें—

मी निजतें घेउनि याला । 'राजहंस माझा निजला !'

*　*　*　*　*

सांगुनी असें सकलांशीं । मृत बाळ उराशीं धरुनी ।
तन्मुखीं स्वमुख ठेवोनी । चुंबिलें एकदां फिरुनी ।
पाहिलें नीट निरखोनी । क्षणिं तीहि गेली निजुनी !
　मग पुन्हां कधीं ती उठली,
　जाणीव कुणा ही कुठली !
　परि मति या प्रश्नें हटली—
"बोलेल कोण या बोला । राजहंस माझा निजला !"

मग मातापुत्रांवरि त्या । तरु गाळिति कोमल पानें ।
ढाळिती लता निज सुमनें । पशुपक्षिहि रडती गानें
दशदिशा दगडही कढती । मन दुभंगुनी शोकानें ।
　दुमदुमतें स्थळ तें अजुनी,
　त्या एकच करुणागानीं,
　जा जाउनि ऐका कानीं !
ऐकाल याच बोलालाः—
　"राजहंस माझा निजला !"

---

# ४६ एकनाथ पांडुरंग रेंदाळकर

---

कोल्हापूर संस्थानांत रेंदाळ गांवीं हे कवि इ. स. १८८५ त जन्मले लहानपणापासून कवितेचा नाद लागल्यानें ह्यांचें इंग्रजी शिक्षण फारसे झाले नाहीं. परंतु ह्यानी संस्कृताचे चागलें अध्ययन केले होते. ह्यांनी प्रथम "धर्मविचार" मासिकाचे दुय्यम संपादक व पुढें "मासिक मनोरंजना"चे साहाय्यक म्हणून काम केले होते. पुढे हिंगण्याच्या महिला विद्यापीठात व नंतर कै. हरि नारायण आपटे ह्यांच्यापाशी हे राहिले होते. हे सन. १९२० साली निवर्तले. ह्यांची काव्यकृति सुंदर, मनोहर व रसाळ आहे. ह्याना करवीर पीठाकडून "कविभूषण" ही पदवी मिळाली होती.

## प्रबोधन

उघडिं नयन ! रम्य उषा हंसत हंसत आली !
अरुणकिरणमय वसना अवनी ही ल्याली ! ॥ ध्रु० ॥

मंजु मधुर गान करित,
आनंदें भुवन भरित,
विहगवृंद गगनिं उडत—
या सुरम्य कालीं !

हंसति फुलें, तरु डुलती,
लतिकागण नृत्य करिति,
धावति या भ्रमरतती—
सुप्ति तुला आली !

स्निग्ध दृष्टि तव पडतां
होय वृत्ति सुखभरिता
रविकरिं घनपंक्ति तथा—
स्वर्णमय जहाली !

सुप्रभात सुखकर हा
दारुण तिमिरोत्कर हा
रमवी सकलांस पहा—
दिव्य विभवशाली !

ऊठ ! ऊठ ! तुजविण परि
नीरस हें सुख सुंदरि !
विफल गमत तें ज्यावरि—
दृष्टि न तव गेली !

विकचकमलगंधि पवन
शीतल, करि तापशमन
त्यांत परि श्वसन तव न—
तप्त तनु जहाली !

खगकूजित अलिरुंजित
लतिकातरुगणसिंजित
सुदति ! विफल सकल गमत—
तुजविण या कालीं !

गगन तरणिकररंजित
चपल धवल घन विहरत
क्षणहि परि न दृष्टि वळत—
तव मुखिं दृढ ठेली !

ऊठ ! ऊठ ! सखि ! झडकरिं !
नयनद्युति चपल पसरिं !
रम्य मधुर हास्य करी—
स्वर्ग आण खालीं !

प्रेमाचा ओघ सरल
वाहो तव मुखिं अविरल
अचरहि जग करुनि तरल—
बुडविं सुखिं विशाली !

---

# ४७ त्र्यंबक बापूजी ठोमरे

" बालकवि " ह्या नांवानें प्रसिद्ध असलेले हे कवि नऊ वर्षांचे असतांना ह्यांचे वडील निवर्तल्यामुळे व गरिबीमुळे एका कथेकऱ्याजवळ राहून वाङ्मयाचा अभ्यास करूं लागले. ह्या कथेकऱ्याबरोबर प्रवास करीत असता हे कवि बडोदें मुक्कामीं प्रस्तुत " रसतरंगिणी " कार सी वा. पेंडसे ह्यास भेटले. त्याच्याकडून बालकवीस चागलें साह्य व उत्तेजन मिळाल्यामुळे ह्याची कविता प्रकाशित होऊन जगापुढें येऊं लागली. पुढे जळगावच्या साहित्य सम्मेलनात ह्यास " बालकवि " ही पदवी मिळाली. प्रसिद्ध आधुनिक कवि नारायणराव टिळक ह्याच्या मदतीने ह्यास शिक्षण व पुढे नोकरी मिळाली. इ. स. १९१८ त रेलवेच्या अपघातात ह्या कवीचा अल्पवयात अत्यंत खेदजनक स्थितींत अंत झाला. ह्याची कविता साधी परतु गंभीर, मधुर व सहृदयानंददायी आहे.

## संध्या-रजनी

अस्तगिरीच्या अभिनवकुंजीं निजला निजनाथ,
बघतां बघतां त्यास रंगलें वारुणिचें चित्त.
हळुच पाहते, मधुर हांसते, जाते लाजून,
म्हणे मनाशी " जीव टाकुं का हा ओवाळून ? "
प्रेमनिर्भरा बघुन सखीला भास्कर मायावी
जातां जातां साखरचुंबा एक तिचा घेई !
लाजलाजुनी जीव सतीचा मग अर्धा झाला,
त्यांतच आल्या रोषाच्याही लहरी गालाला !

[ २ ]

गेला, झाला दृष्टिआडही सूर्य, तरी अजुनी
पहा चमकते प्रेमपताका पश्चिम दिग्वदनीं.

थक्क होउनी दिशा म्हणाल्या " काय मोहिनी ही !
प्रेम-समाधी अझुनि खुळीची या उतरत नाहीं !
किती पश्चिमे ! आतां त्याचें चिंतन करिशील ?
दृष्टी लावुनि अशीच बसशिल सांग किती वेळ ?
खिन्नपणा हा पुरे ! पुरे ग अश्रूंची माळ !
उद्यां बरें का तो राणीला अपुल्या भेटेल ! "

[ ३ ]

संध्येच्या खिडकींत येउनी ही हंसरी तारा,
हळुच पाहते, खुणावितेही " या या " कोणाला ?
पलिकडचा तो तेजोमय नव पडदा सारून
बघते, हंसते, क्षणांत लपते, ही दुसरी कोण ?
लाजत लाजत असाच येइल सारा स्वर्लोक,
मुग्ध बालिका जमतिल गगनीं आतां नव लाख !
प्रथम तारके ! पहा सखी तव एक पुढें आली,
ही दुसरी, ही तिसरी आतां कितितरि भंवतालीं !

[ ४ ]

आली होती भरती, आतां अस्त समुद्राला,
त्या लाटातुन काय सांडल्या या मौक्तिकमाला !
कल्पतरूचीं फुलें उडालीं की वाऱ्यावरती !
आकाशींच्या गंगेला कीं बुद्बुद हे येती !
नव टिकल्यांची चंद्रकळा कीं गगनश्री नेसे !
स्वर्गीचें भांडार उघडलें कीं रात्रीसरसें !
विश्वशिरावर टोप चढविला हिऱ्यामाणकांचा !
मंगल मंगल जिकडे तिकडे जय मांगल्याचा !

[५]

रजनी देवी ! वैभशाली तूं अमुची राणी,
हीं नक्षत्रें, तारा साऱ्या, लीन तुझ्या चरणीं,
ज्याच्या त्याच्या तारा वांटून दे ग्रहगोलांना,
गगनमंडलीं फेर धरूं दे प्रेमाचा त्यांना.
दिशादिशांला तुझीं गाउनी प्रेमाचीं गाणीं
रजनी देवी ! विश्व टाक हें प्रेमें भारोनी !
काळ्या काळ्या या पडणाऱ्या अंधारासंगें
ब्रह्मांडाचें हृदय नाचवीं प्रेमाच्या रंगें !

[६]

काळ्या अंधारांत खेळतें विश्व लपंडाव,
ताऱ्यांवरती बसून बघती तें कौतुक देव.
दहा दिशांनीं पांघरूनि या काळ्या बुरख्याला,
काळा बागुल काळोखाचा एक उभा केला.
मंद मंद तेजांत शोधितें गगनश्री त्यांना,
पाजळूनि हे नक्षत्रांचे रत्नमणी नाना.
खेळ चालला एकसारखा हा खालींवरती,
पूर्व दिशाही तोंच हांसली सांपडली हातीं.

[७]

उदयगिरीवर नव तेजाची शांत पताका ही !
कीं गंगेच्या शुभ्र जलाचा झोत वरी येई !
हे मेघांचे धुवून पडदे स्वच्छ कुणीं केले !
मंगल मंगल तेज चहुंकडे कुठुनि बरें आलें !
अर्ध्या मिटल्या, अर्ध्या उघड्या असल्या नयनांनीं

कुणास बघती दिशा कळेना मंदस्मित करुनी !
पहा उदेला दिव्य गोल हा—छे; भलतें कांही !
हा तारांचा सखा तयांना भेटाया येई !

[ ८ ]

तुमची राणी बसे सारखी तुम्हां न्यहाळीत,
गगनाच्या चौकांत चला हो, या रजनीनाथ !
धवल चंद्रिके ! दे आलिंगन दिव्य यामिनीला,
बहिणी बहिणी तुम्ही सुखानें चंद्राशीं खेळा !
कां तारांनों ! तुम्ही लाजतां हा मंगल काल !
निर्मत्सर व्हा, प्रेमसंगमीं पोहा चिरकाल !
ब्रह्मांडाचा गोल धरी या प्रेमाचा फेर,
फुलें शांतिची अहा उधळली जगती चौफेर.

[ ९ ]

निज निज आतां म्हणे जगाला वत्सलता माता,
रजनी देवी गात बैसली अंगाई गीतां.
गगनाच्या या शेजेवरती निजवा तारांना,
चंद्रा ! दे ओढणी तुझ्या नव तेजाची त्यांना.
हंसतां हंसतां झोंप लागली दहा दिशांनाही,
ब्रह्मांडाचा गोल डोलतो, पण जागा नाही !
या प्रेमाला गातां गातां कविचेंही चित्त
प्रेमाच्या निद्रेंत रंगलें पाठ गात गात !

## आनंदी आनंद

आनंदी आनंद गडे !
इकडे तिकडे चोहिकडे

वरती खालीं मोद भरे,
वायूसंगें मोद फिरे;
नभांत भरला,
दिशांत फिरला,
जगांत उरला,
मोद विहरतो चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ २ ]

सूर्य किरण सोनेरी हें,
कौमुदि ही हंसते आहे,
खुलली संध्या प्रेमानें,
आनंदें गाते गाणें;
मेघ रंगले,
चित्त दंगलें,
गान स्फुरलें—
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[ ३ ]

नीलनभी नक्षत्र कसें
डोकावुनि हें पाहतसे;
कुणास बघतें ? मोदाला !
मोद भेटला का त्याला ?
तयामधें तो
सदैव वसतो,

सुखें विहरतो,
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[४]

वाहति निर्झर मंदगती,
डोलति लतिका वृक्षतती,
पक्षि मनोहर कूजित रे
कोणाला गातात बरें ?
कमल विकसलें,
भ्रमर गुंगले,
डोलत वदले-
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे !

[५]

स्वार्थाच्या बाजारात
किती पामरें रडतात;
त्यांना मोद कसा मिळतो
सोडुनि स्वार्था तो जातो ?
द्वेष संपला,
मत्सर गेला,
आतां उरला
इकडे तिकडे चोहिंकडे
आनंदी आनंद गडे ?

---

# शब्दकोश

## अ

अंक–१ मांडी. २ चिन्ह. ३ एक, दोन इत्यादि प्रत्येक.

अ-किंचन–१ निर्धन, भिकारी २ निरिच्छ.

अ-क्रिय–जें कांहीं करीत नाहीं तें.

अग–१ पर्वत, डोंगर. २ वृक्ष.

अगद्–औषध.

अगम्य–जाणतां येत नाहीं असे.

अंगद–१ बाहुभूषण. २ वालिपुत्र.

अग्र-ज–वडील भाऊ.

अ-गाध–खोल, अपार.

अगार–घर.

अंगार–निखारा.

अघ–पाप.

अघ-वाही–पापी.

अघोर–एक गोसाव्याची जात आहे.

अंघ्रि–पाय.

अ-चक्षु–१ अंध. २ धृतराष्ट्र.

अ-ज–१ ज्याला जन्म नाहीं असा. २ विष्णु, ब्रह्मदेव, शिव इत्यादि.

अ-जंगम–न चालणारे–झाड वगैरे.

अंजन–काजळ, नेत्रौषध.

अजांड–ब्रह्मांड.

अ-जात-रिपु–ज्याला शत्रु नाहींत असा; धर्मराज.

अ-जातारि--अजातशत्रु; धर्मराज.

अ-जित-त्व–अजिंकपणा.

अ-जित-नाम-ईश्वराचें नाम.

अजिन–चर्म, कातडें.

अटन–फिरणें.

अडवी–अटवी, अरण्य, रान.

अढळ–अचल, स्थिर.

अणु–अल्प, थोडें.

अ-तर्क्य–ज्याविषयीं कल्पना करतां येत नाहीं असें.

अंतरंग–मन.

अंतराय–१ विघ्न. २ यम.

अंतराल–आकाश.

अंतरीं–मनात, हृदयात.

अंतरि( री )क्ष–पोकळी.

अंतरीप–बेट.

अंतरीपायमान–द्वीपतुल्य.

अतर्हित–गुप्त.

अतिक्रम–मर्यादा उल्लंघून जाणें.

अतिपात–भंग, नाश, अमर्यादा, उल्लंघन.

अतिमात्र–अत्यंत, बहुत.

अतींद्रिय द्रष्टा–इंद्रियास समजत नाहीं तें पाहाणारा.

अंतुरी–स्त्री, जाया, बायको.

अंत्य ज–अतिशूद्र
अत्रि–सप्तऋषींपैकीं एक ऋषि.
अ-दभ्र–बहुत.
अ-दंभित्व–दांभिकपण नव्हे ते.
अदिति–कश्यपऋषीची स्त्री व देवाची आई.
अ-दृष्ट–१ दैव. २ न पाहिलेलें.
अद्रि–पर्वत.
अधिष्ठान–१ स्थान. २ आश्रय.
अधिष्ठिली–आक्रमिली
अधीन–वश.
अध्वर–यश.
अध्वांग, अध्वंग–ज्याचे अंग अधू आहे तो.
अनंत–१ ज्याला अंत नाही तो. २ विष्णु. ३ शेष.
अनंतर–मग.
अनन्य–१ ज्यास दुसरा नाहीं तो, एकटा. २ अगतिक, एकनिष्ठेने भजणारा.
अनर्घ्य–अमूल्य.
अ-नव–जीर्ण, वृद्ध, जुना.
अनवरत–निरंतर.
अनवसर–अप्रसंग.
अनळ–अग्नि
अनसूया-सुत–दत्तात्रेय.
अ-नाथ-वाणी–अनाथासारखा, दीनवाणी.
अनाद्यंत–ज्याला आदि नाही व अंत नाहीं असा. ईश्वर.

अनार्य–दुष्ट
अ-निर्देश्य–जें अमुक म्हणून सांगता येत नाही तें.
अनीक–सेना, सैन्य.
अनुकंपा–दया.
अ-नुज, अनु-जनि — धाकटा भाऊ, मागून जन्मलेला.
अनुबिंब–प्रतिबिंब
अनुरक्त–प्रेमाने आसक्त.
अनुराग–प्रीति, प्रेम.
अनुरूप–योग्य
अनुवाद–सांगणे, बोलणे.
अनृत–खोटा, असत्य.
अन्य-तम–बहुतांतून कोणताही एक.
अन्वय–१ संबंध २ वंश.
अन्वित–युक्त.
अपरूप–अपूर्व, अदृष्टपूर्व.
अपरोक्ष–समक्ष, प्रत्यक्ष.
अपर्णा–पार्वती.
अपर्णा-पति–सदाशिव.
अपसद–दुष्ट, नीच.
अपां-पति–समुद्र
अपेक्षा–इच्छा
अप्सरा–देवांगना.
अ-प्रमेय–जें जाणण्यास किंवा अनुमान करण्यास कठीण ते.
अंबक–डोळा.
अंबर–१ आकाश. २ वस्त्र.

अबला–स्त्री.
अबाधित–बिनहरकत.
अंबिका–१ माता. २ पार्वती.
अंबु–पाणी.
अंबु-ज–कमल.
अब्ज-ज–कमलापासून उत्पन्न झालेला, ब्रह्मदेव
अब्जिनी–कमलिनी.
अब्द–१ मेघ. २ वर्ष.
अभद्र–अशुभ.
अभिनय–हावभाव.
अभिनव / अभिन्नव }–नवीन व चमत्कारिक.
अभिराम–सुंदर.
अंभो-ज–कमल
अंभो-द–मेघ.
अंभो-रुह–कमल.
अभ्र–मेघ.
अभ्रमु–ऐरावताची स्त्री.
अमर–देव.
अमर-तरु–कल्पवृक्ष.
अभि-ज्ञ–जाणता.
अमित-अमूप–पुष्कळ.
अमृत-कर–चंद्र.
अ-मोघ–सफल.
अय–लोखंड.
अयन–१ गमन. २ मार्ग. ३ वर्ष.
अरि–१ शत्रु. २ विष्णूचे चक्र (सुदर्शन).
अरुण–१ रक्तवर्ण. २ सूर्यसारथि.
अरुवार–मृदु, कोमळ, रवाळ.
अरुष–आर्ष, वेडेवाकडे.
अर्क–१ सूर्य २ रुईचें झाड.
अर्की–रुईचें झाड,
अर्जणे–संपादणें.
अर्णव–समुद्र.
अर्थ–पैसा, द्रव्य.
अर्थिला–अर्थी, याचक,
अर्भक–लहान मूल.
अलक्ष, अलक्ष्य–अतर्क्य, दुर्लक्ष्य.
अलंघ्य–उल्लंघण्यास अयोग्य कठीण.
अलाबु–भोंपळा.
अलि–१ भ्रमर. २ पंक्ति.
अलिक–कपाळ.
अलिनी–भ्रमरी.
अलिप्त–जो लिप्त नाही तो, अलग.
अलोट–मोठे, अचाट, अनिवार.
अवकळा–दुश्चिन्ह, नीचकला.
अवगत–ठाऊक.
अवगाहणे–वर्णणे; प्रवेश करणे.
अवंचक–वचक नव्हे तो, खरा.
अवचट–अवचित.
अवचितां–अकस्मात्.
अवतरण–१ उतरणें २ अवतार घेणें.
अवतीर्ण–ज्यानें अवतार घेतला आहे.
अवतंस–भूषण.
अवथिले–योजिले.

अवदान–हविर्भाग.
अवधारणें–ऐकणें.
अवन–रक्षण.
अमरावती–इंद्राची नगरी.
अवलोक–दृष्टी.
अवलीळा सहजात, लीलेनें.
अवनत–नम्र, आज्ञाधारक.
अवनि–पृथ्वी.
अवलंब-स्वीकार, आश्रय.
अवसर–समय, प्रसंग.
अव्हाटें–आडमार्गानें.
अव्हेर–तिटकारा, हेळसाड.
अवाङ्मुखी–खालीं पहाणारी.
अवारित–निवारल्यावाचून.
अवि-अवी–मेंढा.
अविद्या–माया, अज्ञान.
अंश–विभाग.
अशन–भोजन, खाणे.
अशनि–वज्र.
अ-शरीरवाणी / अ-शरीरिणी –आकाशवाणी.
अ-शिव–अकल्याण.
अ-शुद्ध–रक्त.
अ-शेष–संपूर्ण.
अश्रु–आसवें, नेत्रोदक.
अष्टभाव–निश्चेष्टता, बेशुद्धि ( इंद्रियज्ञानशून्यता ). रोमांच उभे राहणें, घाम येणें, मुखाचें वैवर्ण्य, कंप सुटणें, अश्रू येणें, स्वर बदलणें, असे आठ भाव आहेत.
अ-सकृत्–वारंवार.
असकें–सर्व.
असती–१ अपकीर्ति. २ खोटी, असत्य.
असंभावनी-संभव नाहीं अशी, अतर्क्य.
असाधुवाद–दुर्भाषण निंदा.
असाध्य–न होण्याजोगें.
अ-साध्वस–निर्भय.
असावली / असारली –अश्रुयुक्त झाली.
असित–नीलवर्ण, काळा.
असित-पथ–कृष्णवर्त्मा ( अग्नि ).
असि (सी) पत्र–तरवारीचें पान.
असिवार–खड्गधर, पदाति.
असु–प्राण.
असुख–दु:ख.
असूं–अश्रु, नेत्रोदक.
असूया–हेवा, मत्सर, ईर्ष्या.
असोशी–हव्यास, अति इच्छा.
अस्तमित–अस्तास गेलेला.
अस्त्र–१ शस्त्र. २ मंत्रप्रयोगानें सोडण्याचें शस्त्र.
अस्त्रतति–शस्त्रांचा समूह.
अहंकृति–अहंकार.
अहंमति–अहंकार.
अहर्निशीं–रात्रंदिवस.
अहिवर–सर्पांत श्रेष्ठ कालिया.

अहेवतंतू–सौभाग्यसूत्र.
अहेवपण–सौभाग्य, अवैधव्य.
अलुमाळ–थोडथोडा, थोडासा.
अक्ष–फासा.
अक्षम–असमर्थ.
अक्षत–जें तुटलें फुटलें नाहीं ते.
अक्षर–जो नाश पावत नाही तो, स्थिर, न ढळणारा.

## आ

आकर्णन–ऐकणें, श्रवण.
आकळणें–१ जाणणें. २ वश होणें.
आकांक्षणें- इच्छिणे.
आक्रंदणें–ओरडणे.
आक्रोशणे–बोलणे.
आखंडल–इंद्र.
आखु–उंदीर; आखुवाह–गणपति.
आख्या–१ नाम. २ कीर्ति.
आग–अपराध.
आगम-शास्त्र.
आगमन–येणें.
आगवण–१ शक्ति. २ खोड, छंद.
आगळा-आगळें–अधिक.
आगा–१ घर, स्थान. २ अरे.
आगार–घर, स्थान.
आगीं–अग्रभागीं.
आंगीं–स्वतः.
आंगोळी–बोट.
आघवें–सर्व, अवघे.
आचार्य–गुरु.
आजी–१ युद्ध. २ आज.
आज्य–तूप.
आटणी–मिश्रण.
आटाआटी–प्रयास, श्रम, खटपट.
आटीं–अरण्यात.
आटोप–डौल.
आडळ–आडणूक, अडचण.
आडपडे–मागें पडे.
आढ्य–धनिक
आततायी–अविचारानें दुसऱ्याच्या प्राणादिकाचें हरण करणारा.
आत्त–गृहीत, घेतलेला.
आतप–उष्ण,
आतर–नोर, नावेचा उतार.
आतळणे–स्पर्शणें.
आतिथ्य–पाहुणचार.
आतुडणें–समजणें, सांपडणें
आतुर–१ मरणोन्मुख. २ उत्सुक.
आतुर्बळी–अतिबळी, बळकट.
आत्मचर्चा–आत्म्याविषयीं विचार.
आत्म-ज–पुत्र.
आत्म-जा–मुलगी, कन्या.
आत्मविद्या–आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान.
आत्महत्या–१ आपला आपण जीव घेणें. २ आपण आपणास न जाणणें.
आत्मज्ञानी–आत्मा म्हणजे ब्रह्म तें जाणणारा.

आथी–आहे.
आदळणे–पावणें.
आदिठाणें–मूळपीठ
आदिशक्ति–मूळशक्ति.
आधि–मनाची व्यथा, दुःख.
आन–अन्य, भिन्न, दुसरें.
आनकदुंदुभि–वसुदेव.
आनन–मुख.
आपगा–नदी.
आपंगिता–साभाळणारा.
आपद्–दुःख, विपत्ति.
आपन्ना–दुःखी.
आपपर–स्वकीयपरकीय.
आप्त–१ संबंधी. २ सत्यवक्ता.
आपैसा–आपोआप.
आफळी–आपटी.
आभास–काहींसा भास, भ्राति.
आमय–रोग.
आमलक–आवळा.
आमा–स्तन.
आमुष्मिक–परलोकसंबंधी.
आम्नाय–देव
आयस–लोखंड.
आराणुक–१ वेळ, फुरसत. २ शातिसुख.
आरामवाटी–बाग.
आरुष–१ आर्ष, छादिष्ट. २ असमंजस. ३ असंबद्ध.
आरूढ–वर चढलेला.
आरोह–कमर, नितंब.
आर्जव–सरळपणा.
आर्त–१ दुःखसूचक. २ पीडित.
आर्ती-आर्त–आवड.
आर्या–१ सभ्य स्त्री. २ वृत्तविशेष.
आलवाल–आळें.
आलाप–१ भाषण. २ गाण्यांतला आलाप.
आलापणें–१ बोलणें २ गाणें.
आलाबु–भोंपळा. ‘अलाबु’ पहा.
आली–१ सखी. २ पंक्ति.
आव–१ धैर्य. २ डौल.
आवरण–१ कुंपण. २ आच्छादन, संयमन.
आवृत–वेष्टित.
आवाका–धैर्य.
आवास–१ राहणे. २ राहण्याची जागा.
आव्हा–नाम.
आव्हाटे–१ पसारा. २ आडमार्गाने.
अव्हेरणे–टाकणें.
आश-आस–आशा.
आशय–मनोरथ, अभिप्राय.
आशा–१ दिशा. २ इच्छा.
आशी–आशीर्वाद.
आस्य–तोंड, मुख.
आहव–युद्ध.
आहाळणे–१ पोळणे. २ खळबळणें.
आहे–ज्वाला.
आळ (ळी)–ळळा, हट्ट.
आळविणे–कळवळा उत्पन्न करणे.

### इ

इजारा–मक्ता.
इंगित–लक्षण, अभिप्राय.
इठाण–स्थान.
इंदिरा–लक्ष्मी.
इंदीवर–कमळ.
इंद्रियग्राम–इंद्रियसमुदाय.
इंदु–चंद्र.
इभ–हत्ती. इभी–हत्तीण.
इषु–बाण.
इसाळ–ब्रह्मराक्षस.
इक्षु–ऊंस.
इंद्रजाल–गारुड.

### ई

ईशान–शंकर.

### उ

उक्त–१ बोललेले. २ भाषण.
उगला–उगाच, निमूटपणे.
उगवून–उलगडून.
उगाणा–उलगडा, झाडा, गणना.
उचंबळणें–भरून साडणे.
उचित–योग्य.
उच्चैःश्रवा–इंद्राचा घोडा.
उजाळे–प्रकाश, शुभ्रता.
उटज–पर्णकुटी.
उठाउठी–सत्वर, लवकर.
उठाणे–१ उत्थान. २ तरंग.
उडु–नक्षत्र. उडुप–चंद्र.
उत–अथवा.
उतटणें–१ भरणे. २ उकलणें.
उतणें–माजणें.
उत्कर–पुंज, राशि.
उत्कट–अतिशयित, मोठे.
उत्तमर्ण–सावकार.
उत्तमाग–मस्तक, डोकें.
उत्तरापति, उत्तरावर–अभिमन्यु.
उत्तराशेला–उत्तरदिशेला.
उत्तरीय–शेला, अंगवस्त्र.
उत्तीर्ण–ऋणमुक्त.
उत्पल–कमल.
उत्सव–आनंद.
उदग्र–१ उंच. २ ज्याचे अग्र वर आहे तो.
उदंड–पुष्कळ.
उदरंभर–पोट भरणारा.
उदश्रु–रडणारा.
उदणे–१ उदय पावणे. २ उद्भवणें.
उद्देशें–हेतूनें, कारणानें.
उद्धार–१ मुक्ति. २ वर काढणें.
उद्यान–बाग, उपवन.
उद्विग्न–उतावीळ, विव्हल.
उद्वेग–मनाची अस्वस्थता.
उद्भट–मोठा.
उन्मन–विरक्त.
उन्मूलन–उपटणे.
उपकरण–साहित्य.
उपचार–आदर.

उपतिणें–मिळणे, उत्पन्न होणें.
उपरति-वैराग्य.
उपरम–१ शाति. २ सुख.
उपराग–ग्रहण.
उपरि–१ मस्तकावर. २ वर.
उपवन–बाग.
उपाधि–पदार्थाच्या स्वरूपात भेद करणारा किंवा भासविणारा अन्य पदार्थ किंवा त्याचा संबंध.
उपानह्–चर्मी जोडा, पैजार.
उपायन–भेट, नजराणा.
उपायातर–अन्य उपाय.
उपाव–उपाय.
उपासना–सेवा.
उपास्ति–उपासना.
उपेगा–उपयोगाला.
उपेक्षा–हयगय, औदासिन्य.
उफळता–उफाळता, उडतां.
उफाळणें–उद्भवणें.
उबगणें–१ उपेक्षणें. २ त्रासणें, कंटाळणें.
उभय–दोन्ही.
उभविणें–उभारणें.
उभरून–उभारून–उचलून.
उभासे–दिसे.
उभेठाति–उभे राहती.
उमस–दम, विसांवा.
उमगून–शोधून.
उमा–पार्वती.
उमाणे–मोजणें.
उमाळा–उद्भव, हुंदका, लोट.
उमोप–पुष्कळ.
उरग–सर्प.
उरण–मेंढा.
उरी–अवशिष्ट, बाकी.
उर्वरित बाकी राहिलेले.
उर्वी–पृथ्वी.
उलूक–घूबड.
उल्हाटी–उलटी.
उसंत–विश्राति.

## ऊ

ऊर्ध्वरेता–ब्रह्मचारी.
ऊन–उणें, कमी.
ऊर्वरित–उरलेलें, शेष.
ऊर्मी–उकळी, गर्व.

## ऋ

ऋत्विक्–यज्ञक्रियेस साह्य करणारा.

## ए

एकनिष्ठ–अनन्य, ईश्वरपरायण.
एकसरें–१ एकदम. २ एकच मोठा.
एकाकी–एकटा.
एणाक–हरिणाचें चिन्ह ज्याला आहे असा–चंद्र.
एणी–हरिणी.
एन–एनस्–पातक.

## ऐ

ऐना–आरसा.

### ओ

ओखटा–वाईट.
ओगरणें–वाढणे.
ओगरू–वाढणारा.
ओढवणे–पुढे करणें.
ओपणे–१ देणे. २ विकणे ३ स्वाधीन करणे
ओसग–माडी.
ओसंडोन–साडून.
ओसर–एकीकडे हो.

### औ

और्व–वडवानल

### अं

अंचल–पदर.

### क

कच–१ केश २ बृहस्पतीचा मुलगा.
कंज–कमल
कज्जल–काजळ.
कट–हत्तीचे गंडस्थळ.
कटक–१ सैन्य २ कडे. ३ कडा.
कटकटा–हाय हाय.
कटाथी–कढई.
कटाक्ष–दृष्टिपात.
कंठणे–दु खाने घालविणे.
कठोर–कठीण.
कडगे–वाकी, भूषणे.
कडवा-वी-वे––क्रूर.
कडसणी–विचार.
कडे–एकीकडे.
कढेत–कढईत.
कण–रज, खडा.
कणव (वा)–दया.
कणवाळपणे–कृपाळूपणाने.
किणका–कणी
कतबा–खत.
कंथा–गोधडी
कथालाप–वर्णन.
कदन–१ युद्ध. २ मारणे.
कदम–पाऊल
कदंब–कळंबाचे झाड. २ समूह.
कदर्थले–अवमानिले
कदली–केळ.
कंदर्प–मदन.
कदर्यु–कृपण.
कंदुक–चेंडू.
कनकबीज–धोतऱ्याचे बी.
कनकलतिका–सुवर्णाची वेल.
कनवाळ–कृपाळू
कपाट–१ दार. २ गुहा.
कपि (पी)–वानर.
कंपिततनु–ज्याच्या अंगाला काप सुटला आहे तो.
कपिध्वज–अर्जुन
कबंध–मस्तकावाचून शरीर, धड.
कबरी–कबरीभार–वेणी.
कंबु–शंख.
कमचा–काठी.

कमनीय—सुंदर.
कमळा—लक्ष्मी.
कमळापति—विष्णु.
कर—१ हात. २ सोंड. ३ किरण. ४ खंडणी.
करकर—कटकट.
करंटा—कृपण, हतभाग्य.
करटी—गज, हत्ती.
करंडक—करंडा.
करणीचा—खोटा.
करपुष्कर—१ शुंडाग्र. २ हस्तकमल.
करबाडे—कडबा.
करवाल—तरवार.
करवीर—कण्हेर.
करा—मडकें.
कराळ—भयंकर.
करी—हत्ती.
करुण—१ करुणरस. २ दयार्द्र.
करुणाबुद—दयेचा मेघ.
कर्णिका—कमलातील गड्डा.
कलंकी—लाच्छनयुक्त.
कलगी—मोत्याचा अथवा जडावाचा पागोट्यात खोंचण्याचा डागिना.
कलत्र—स्त्री, बायको.
कल्पात—जगत्प्रलय, ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि रात्र. हा काळ मनुष्याच्या ४,३२,००,००,००० वर्षांचा होय.
कलभ—हत्तीचा छावा.

कलभंड—भाडखोर.
कलशजानित, कलशसंभव, कलशोद्भव = अगस्ति मुनि.
कलाप—१ मयूरपिच्छ. २ समुदाय.
कलि (ली)—१ कज्जा. २ कलियुग. ३ दुष्ट.
कलिका—कळी.
कलिल—कलुषित—गढूळ.
कलेवर—शरीर.
कल्लोळ—मोठी लाट.
कवइता—कवनकर्ता, कवि.
कवच—चिलखत.
कवडा—एकपक्षी ( अशुभसूचक ).
कवळ—घास.
कवळणे—आलिंगणे.
कवि—१ शुक्राचार्य २ ज्ञाता.
कविजा—शुक्रकन्या, देवयानी.
कश्यप—सप्तऋषींपैकी एक विशेष ऋषि.
कशा—चाबूक.
कशी—काचणी.
कसणें—१ बाधणे. २ कसोटीस लावणे.
कल्हार—कमळ.
कल्होळ—लाटा.
कळकळविणें—दु.ख देणें.
कळानिधि—चंद्र.
कक्ष—तृण.
काईसेनें—कशानेही.

काग–कावळा.
काचा–कच्चा.
काचावणें–कचरणे.
काज–कार्य.
काजरा–कुचल्याचें झाड.
काजळी–१ जंग. २ डाग
काजी–पेज.
काटला–मळला.
कांड–ब्रह्मांड.
कांत–१ पति. २ सुंदर.
कातर–भितरा.
कांता–बायको, सुंदरी.
कानकोंडें–चोरटें.
कानन–वन, अरण्य.
कापडी–यात्रेकरू.
काम–१ इच्छा. २ मदन.
कामद–इच्छा पुरविणारा.
कामना–इच्छा, वासना.
कामारि–१ शंकर. २ चाकर.
कामित–इच्छिलेलें.
कार्पास–कापूस.
काय–शरीर.
कार्यवादू–कामापुरते गोड बोलणारा.
कार्याकारण–१ कारणपरत्वें. २ जितक्यास तितकें.
कारा–बंदिशाळा, तुरुंग.
कालाही–काळसर्प.
कालिंदी–कलिंद पर्वतातून निघालेली यमुना.
कालीय–सर्प.
काव्य–शुक्राचार्य.
काश्यप–कण्वऋषि.
कास–१ कासोटा. २ आश्रय.
कासयाची–कशाची.
कासर–महिष, रेडा.
कासार–सरोवर.
कासाविस–दुःखित.
काळकूट–विष.
काळवखें–काळोख.
काळसर्प–काळिया सर्प.
किंकरी–दासी.
किण–घट्टा.
कितव–१ दुष्ट, कपटी, ठक. २ द्यूतकार.
किरात–कोळी, पारधी.
किरी–डुकर.
किरीट–मुगुट. किरीटी–अर्जुन.
किशोर–मूल.
किष्किंधा–सुग्रीवाची नगरी.
कीटक–किडा.
कीर–१ रावा. २ निश्चयें.
कीरवाणी–१ शुकवाणी. २ खरोखर.
कीलवाणी–केविलवाणा.
कीर्तिला–वर्णिला.
कीला–अग्निज्वाला.
कीश–वानर.
कुचर–( मूग, हरभरे वगैरेचा ) न भिजणारा, न शिजणारा दाणा.

कुचैला–वाईट वस्त्र नेसलेली.
कुचुंबणें–दुःख पावणे.
कुंजर-कुंजरु–गज.
कुटज–कुड्याचे झाड.
कुटिल–१ वाकडा. २ कपटी
कुठार–कुऱ्हाड.
कुडी-कुडें–देह.
कुंडल–कर्णभूषण.
कुंत–भाला.
कुंतल–केश.
कुत्सा–निंदा.
कुन्हा–अकस, चुरस.
कुंभिणी-कुंभिनी–पृथ्वी.
कुंभिनीपाळ–पृथ्वीपति.
कुंभीपाक–एक नरक आहे
कुमुद–कमळ.
कुमुदिनी–चंद्रविकासी कमलाची वेल
कुरंग–हरिण.
कुरवंडणे–ओवाळणे.
कुरुकुल–कौरववंश.
कुरुगुरु–कौरवांचा गुरु–द्रोणाचार्य.
कुलगिरि–भारतवर्षांतील मुख्य ७ पर्वत त्यांचीं नांवे–महेंद्र, मलय, सह्य, शक्तिमान्, गंधमादन, विंध्य व पारियात्रक.
कुलज–कुलीन.
कुलाल–कुंभार.
कुलिश–वज्र.
कुलिशपाणी–इंद्र, ज्याच्या हातात वज्र आहे.
कुवलय–१ चंद्रविकासी कमळ. २ भूमंडळ.
कुश–दर्भाची एक जात आहे
कुशली–खुशाल
कुशस्थली–द्वारकापुरी.
कुश्चल ( ळ )–कुत्सित.
कुश्चीळ–दुर्गंधी, घाणेरडा
कुसरी–चतुराई.
कुसुम–फूल.
कुसुमचाप–मदन.
कुहू–अमावास्या.
कुलपति–कुलपुरुष, कुलातील मुख्य.
कुक्षि–कूस.
कूजणें–गाणे, शब्द करणे
कूट–१ पश्चात् निंदा. २ खोटे. ३ शिखर
कूप–आड
कूर्पर–कोपर.
कृतांत–यम
कृतांतभागिनी–यमुना नदी.
कृतार्थ–धन्य.
कृत्तिवासा–कातडे धारण करणारा, शिव
कृत्या–पिशाची.
कृप ( कृपाचार्य )–द्रोणाच्या बायकोचा भाऊ
कृशानु–अग्नि.
कृशोदरी–सिंहकटी स्त्री.
कृषिक–शेतकरी, शेतकी.
कृष्ण–अर्जुन.

कृष्णा–द्रौपदी. २ यमुना.
कें–काय.
केउती–कोणती.
केउतीं–कशी
केउतें–कशाचे
केका–मोराचा शब्द.
केकी–मोर.
केंडणें–तुच्छ मानणे.
केणें–व्यापाराचा माल
केतु–ध्वज
केली–क्रीडा.
केवि–कसे
केविलवाणे–दीनवाणे.
केसर–कमळतंतु, केशर.
केसरी–सिंह.
कै–केव्हा.
कैटभारी–कैटभ राक्षसाचा शत्रु-विष्णु.
कैरविणी–चंद्रविकासी कमळाची वेल.
कैवर्तक–धीवर, कोळी
कैवल्य–मोक्ष.
कैवल्यदानी–मोक्षदाता.
कोटिगा–कोडगा.
कोड–कौतुक, हौस
कोडी ( ढी )–कोटी.
कोदाटणे–दाटणे, भरणे.
कोपी–झोपडी.
कोंभ-कोंब–अंकुर, मोड
कोमेला–निस्तेज झाला.
कोयाळ–कोकिळ.
कोष्ठ–उदर
कौपीन–लंगोटी
कौशिक–विश्वामित्र
कौसुंभ–कुसुबाचा.
कौस्तुभ–विष्णूच्या गळ्यातील रत्न.
कौलिक–मांत्रिक
क्रतु–यज्ञ.
क्रौड–डुकर.
क्रोष्टा–कोल्हा.

## ख

ख–आकाश.
खग–पक्षी.
खगगमन–पक्ष्यावर बसून जाणारा-गरुड-वाहन–विष्णु.
खंगणे–कृश होणे
खगेंद्र-गरुड.
खंजन–ताजवा पक्षी.
खडतर–फार उग्र
खडतरणे–आदळणे, खोचणे.
खंडज्ञान–अल्पज्ञान.
खत–पत्र
खंत, खंती–खेद, काळजीने झुरणे.
खद्योत–काजवा.
खनि–खाण
खंबाइत–उंची वस्त्र
खल्वाट–टकल्या
खर–१ तीक्ष्ण. २ गाढव. ३ एक राक्षस.

खवंद–फोड वगैरे होऊन क्षत पडतें ते.
खाजुणे-खाजे–खाद्य, खाऊ.
खाडा–एक प्रकारची तरवार; हिचें पातें रुंद असून हिला दोहोंकडे धार असते.
खाडाणे- लाथाळ
खाडणे–तोडणे
खाडियाची–शस्त्राची.
खाणी–खाण, जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज ह्या चार खाणी आहेत.
खासदार–मोतद्दार.
खुर्द–लहान, अल्प
खेटक–ढाल.
खेव-खेवो–आलिंगन

ग

गगन–आकाश
गगनग–आकाशसंचारी–देव.
गगनवाणी–आकाशवाणी.
गजगमा–हत्ती सारखी (हळू) चालणारी स्त्री
गजपूर–हस्तिनापूर.
गजबज–गडबड.
गजहंता–सिंह.
गणप–गणपति.
गणिका–वेश्या.
गंड–१ अनिष्ट, संकट. २ गंडस्थल.
गत–गेलेलें.
गतवयस्क–म्हातारा, वृद्ध.
गदारोळी–मोठ्यानें.
गदीश-गदीन–गदायुद्धात निपुण.
गद्य–वाक्यरूप ग्रंथ.
गभस्ति–सूर्य.
गभीर–गंभीर, खोल.
गमणे–काळ सुखानें जाणे.
गर-गरल–विष.
गरगल–विषकंठ–शिव
गरिमा–मोठेपणा.
गरी-गुर्वी–श्रेष्ठ.
गरुद्रथ–गरुडपक्षी
गल्ल–गाल.
गवसणी–आच्छादन, आवरण
गव्हर–१ गुहा, २ गुह्य, मर्म, तत्त्व.
गवादि–धर्मपोई, अन्नसत्र.
गवाक्ष–धारें, झरोका.
गहन–१ अरण्य. २ खोल.
गळदंड–हत्तीच्या मानेवरून रिकिबीप्रमाणें चढण्यासाठी सोडलेली दोरी, किलावा.
गाग–गंगेचें.
गागेय–गंगेचा पुत्र–भीष्म.
गाजी–शूर.
गाठीचें–पदरचें.
गाडीव–अर्जुनाचें धनुष्य.
गाढ–दृढ.
गाढें–दुर्बल.
गात्र–शरीर.
गाधर्व–१ स्त्रीपुरुषाचा परस्पर प्रीतीनें

